भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प ९३ वें



# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )

## चतुर्थ खंड.

वनपर्व, अध्याय १८६–३१५. विराटपर्व अ० १–४०.




न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
—भ. गी. अ. ४, ३८.

लेखकः—
आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री,
संस्थापक आचार्यकुल, पुणें.

नित्यं क्रोधात्तपो रक्षेद्धर्मं रक्षेच्च मत्सरात्। विद्यां मानापमानाभ्यामात्मानं तु प्रमादतः॥
आनृशंस्यं परो धर्मः क्षमा च परमं बलम्। आत्मज्ञानं परं ज्ञानं सत्यं व्रतपरं व्रतम्॥
पृ. १०५.

शके १८५२. ] किंमत ~~साडे तीन~~ रुपये. [ सन १९३०.
चार

## — वाचकांसाठीं —



महाभारतार्थाचा चौथा खंड वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग भगवान् श्रीकृष्णाच्या कृपेनें आल्यामुळें आम्हांला आनंद होत आहे. महाभारतार्थाचें काम आमच्या इच्छित संकल्पाप्रमाणें व्हावें तसें जलद होत नसलें तरी धीरे धीरे त्याचें पाऊल पुढेंच पडत आहे. याला कारणें अनेक आहेत व त्यांत प्रस्तुतची परिस्थिति हें एक प्रबल कारण आहे. लोकांचीं मनें देशाच्या स्वातंत्र्याकरितां चालू झालेल्या लढयानें आकर्षून गेलीं असल्यामुळें इतर गोष्टींकडे त्यांचें विशेष लक्ष नसल्याचें सर्वांच्या रोज प्रत्ययास येत आहे. अशा स्थितींत हातीं घेतलेलें कार्य तडीस जाण्याकरितां आम्हीं आमच्या वाचकांच्या साहाय्याची अपेक्षा करणें जरूर झालें आहे. आमच्या वाचकांना आमची एवढीच विनंति आहे कीं त्यांनीं आपल्या इष्टमित्रांस या ग्रंथराजाचा परिचय करून देऊन त्यांच्या संग्रहीं तो ठेवला जाईल असे करावें.

दुसरें, आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या चार खंडांत ज्यांचें भाषांतरकारांस लेखनकार्यात साहाय्य झालें आहे व ज्यांच्या साहाय्यानेंच पुढील भाग तयार होणार आहेत व ज्यांनीं हें काम या ग्रंथराजाची उपयुक्तता जाणून विशेष गाजावाजा न करतां निरपेक्षपणें केलें आहे व करणार आहेत, त्या **श्रीमती लक्ष्मीबाई प्रधान** यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. भगवान् श्रीकृष्ण त्यांच्या हातून अशींच लोकोपकारक कार्यें घडवून आणो अशी त्याच्याजवळ प्रार्थना आहे.

शेवटीं आमचे वाचक आमच्या विनंतीप्रमाणें आमच्या कार्यात आम्हांस हातभार लावतील असा भरंवसा बाळगून तूर्त त्यांची रजा घेतों.

सर्वांचा नम्र,

**मंगेश नारायण कुळकर्णी.**

# विषयानुक्रमणिका.



## ३ वनपर्व पृ. १–३७४.



### मार्कंडेयसमास्यापर्व १२. पृ. १–१५५.

---

## द्रौपदी-सत्यभामासंवादपर्व १३. पृ १५५-१६३.



---

# घोषयात्रापर्व १४. पृ. १६३–२०५.

---

## मृगस्वप्नोद्भवपर्व १५. पृ. २०५–२०६.



---

## व्रीहिद्रौणिकपर्व १६. पृ. २०७–२१५.



---

## द्रौपदीहरणपर्व १७. पृ. २१६–२३८.

---

## जयद्रथविमोक्षणपर्व १८. पृ. २३८–२४५.



---

## रामोपाख्यानपर्व १९. पृ. २४५–२९९.

---

## पतिव्रतामाहात्म्यपर्व २०. पृ. ३००–३२६.

---

## कुंडलाहरणपर्व २१. पृ. ३२७–३४७.

---

## आरणेयपर्व २२. पृ. ३४८–३७८.



---

# ४ विराटपर्व.



## प्रवेशपर्व १. पृ. ३७९–४१०.



---

## समयपालनपर्व २. पृ. ४११–४१४.



---

## कीचकवधपर्व ३. पृ. ४१४–४५०.

---

## गोहरणपर्व ४. पृ. ४५०–४८०.

---

*

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## चतुर्थ खंड.



## ३ वनपर्व–( पुढें चालू )



## मार्कंडेयसमास्यापर्व १२.



### अध्याय १८६ वा.



[ १ मार्कंडेयानें वर्णिलेला सरस्वती व तार्क्ष्य यांचा संवाद. २ धेनुदानप्रशंसा. ३ अग्निहोत्रव्रत. ४ तार्क्ष्यांचा 'तूं कोण' असा प्रश्न. ५ मोक्षस्थानाविषयीं प्रश्नोत्तर.]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर वनांत राहून सत्यादि धर्मांचें पालन करणाऱ्या पुरुषाचें कर्तव्य, प्राप्य व ज्ञेय सांगण्याच्या आशयानें मार्कंडेय म्हणाला—हे परपुरंजय युधिष्ठिरा, पूर्वी एकदा बुद्धिमान् तार्क्ष्य मुनीनें प्रश्न केला असतां सरस्वतीनें जें गीत त्याला सांगितलें, तें ऐक—

**तार्क्ष्य**—हे भद्रे, या लोकीं मनुष्याचें श्रेय कोणतें? काय केलें असतां पुरुष धर्मापासून च्युत होत नाहीं, हें मला सांग. म्हणजे तुझ्या उपदेशाप्रमाणें आचरण करून मी स्वधर्मापासून च्युत होणार नाहीं. हे सुभगे, अग्नीमध्यें आहुति कशी द्यावी? कोणत्या वेळीं पूजा करावी? कोणत्या उपायानें धर्म नष्ट

होत नाहीं ? मी आसक्तिशून्य होऊन सर्वकामभाक्त्वरूप फलाला कसा प्राप्त होईन म्हणजे सर्व लोकांत माझा यथेष्ट संचार कसा होईल ? हें मला कथन कर.

मार्कंडेय—राजा, याप्रमाणें तार्क्ष्यानें प्रीतियुक्त प्रश्न केला असतां हा विप्र श्रवणेच्छु व बुद्धिमान् आहे, हें जाणून सरस्वती त्याला असें धर्मयुक्त हितवचन बोलली.

सरस्वती—जो देशभेदाचें अतिक्रमण न केलेल्या व उत्तरायण मार्गानें लभ्य असलेल्या सगुण ब्रह्माला जाणतो, प्रणवजपामध्यें तत्पर असतो, चिभूंत व सावधान चित्तानें युक्त असतो, तो देवलोकांहून श्रेष्ठ असलेल्या हिरण्यगर्भाच्या लोकास जातो. त्याचा देवांशीं प्रीतियोग होतो. त्या लोकांत रम्य, विपुल, विशोक, सुखावह, पुष्पित, कर्दमरहित व मत्स्ययुक्त अशा अति पवित्र पुष्करणी आहेत. त्यांना चांगले घाट बांधलेले असून त्या हिरण्यमय कमलांनीं आच्छादित झालेल्या असतात. त्यांच्या तीरावर पुण्यवान् लोक राहतात. सर्व अलंकारांनीं भूषित झालेल्या अप्सरा त्यांची पृथक् पृथक् उपासना करितात. त्यांच्या अंगाचा पुण्य गंध व शोभन वर्ण यांच्या योगानें ते अतिशय संतुष्ट होतात.

( २ ) पण हा ब्रह्मलोक मिळणें फार कठिण आहे. यास्तव आतां अगोदर देवलोकच कसा प्राप्त होतो, तें मी तुला सांगतें. गायीचें दान करणारे स्वर्गलोकास प्राप्त होतात. शकट वहाण्यास समर्थ असलेल्या वृषभांचें दान करणारांस सूर्यलोक मिळतो. वस्त्र देणारांस चंद्रलोक व सुवर्णाचें दान करणारांस अमरत्व प्राप्त होतें.

देखणी, विपुल दूध देणारी, शुभ वत्सानें युक्त असलेली व पळून न जाणारी अशा दुभत्या गायीचें दान देणारा पुरुष देवलोकीं जातो व तिच्या अंगावर जितके लोम असतात, तितकीं वर्षें तो तेथें रहातो. जो दाता नांगर ओढणारा, समर्थ, धुरंधर, बलाढ्य, तरुण व गुणवान् वृषभाचें दान करितो, त्याला दहा धेनूंचें दान करणाऱ्या पुरुषांस मिळणारे लोक प्राप्त होतात.

जो पुरुष वस्त्र, दूध काढण्याचें कांस्यपात्र व दक्षिणादि द्रव्यें यांसह कपिला धेनूचें दान करितो, त्या पुरुषाला ती गाय सर्वगुणसंपन्न कामधेनु होऊन त्याच्यापाशीं परत येते. गोप्रदान करणाऱ्या पुरुषाला तिच्या अंगावरील रोमांइतकीं वर्षें पुण्यफल मिळतें व तो पुरुष पुत्र-पौत्रांसह सर्वकुल व

पूर्वींचे सात पूर्वज यांस परलोकीं तारतो. सुवर्णमय शृंगें, दोहनाचें कांस्यपात्र व दक्षिणादि धन यांसह सत्पात्र ब्राह्मणांस तिलधेनूचें दान करणारास वसूंचे लोक प्राप्त होतात.

गायीचें दान, महासागरांतील नौकेप्रमाणें, स्वकर्मांनीं कामक्रोधयुक्त-देहाभिमानरूप अंधतमांत पडणाऱ्या पुरुषाचें रक्षण करितें. जो ब्राह्मविधीनें सालंकृत कन्यादान करितो, ब्राह्मणांस भूमि देतो व यथाविधि इतर दानेंहि करितो त्याला इंद्रलोक प्राप्त होतो. हे तार्क्ष्या, जो सदाचारसंपन्न व जितेंद्रिय पुरुष सात वर्षें अग्नीमध्यें हव्याचा प्रक्षेप करितो, तो स्वतःला आणि मागच्या व पुढच्या सात पुरुषांना स्वकर्मांनीं पावन करितो.

( ३ ) अग्निहोत्राचें हवन करणारा लोभाचा नाश करितो, म्हणून मैत्रायणीय उपनिषदामध्यें ' अग्निहोत्राला ज्ञानाचें अंतरंगत्व ' सांगितलें आहे. यास्तव आपण तत्संबंधी विशेष व्रतादिकांविषयीं प्रश्न करावा अशा आशयानें तार्क्ष्य म्हणाला—हे देवि, अग्निहोत्राचें वेदोक्त व्रत कोणतें आहे, तें मला सांग. म्हणजे तुझ्या अनुशासनानें मला त्या वेदोक्त व्रताचें यथार्थ ज्ञान होईल.

**सरस्वती**—ज्यानें हात-पाय धुवून व आचमन करून देहशुद्धि केलेली नाहीं, ज्याला पाठ व अर्थ यांच्या द्वारा वेदाचें ज्ञान नाहीं, अशा अशुचि पुरुषानें अग्निहोत्र हवन करूं नये. वेदाचा अर्थ समजून घेऊनहि ज्यानें त्याचा अनुभव घेतलेला नाहीं, अशा पुरुषालाहि अग्निहोत्राचा अधिकार नाहीं, कारण देव दुसऱ्याचें चित्त जाणण्याची इच्छा करितात. त्यांना कर्मठाच्या पावित्र्याची अपेक्षा असते. त्यामुळें ते अश्रद्धेनें दिलेल्या हवीचें ग्रहण करीत नाहींत. ऋत्विक्‌हि असाच असावा. वेदज्ञ नसलेल्या विप्राला देवहव्यांत कधींहि नियुक्त करूं नये, कारण अज्ञ ऋत्विक् हवींचें दान निष्फल करीत असतो.

ज्याचें कुल, शील, गोत्र आपल्याला ज्ञात नसतें, अशा अश्रोत्रिय द्विजाला अग्निहोत्र करावयास कधीं सांगूं नये व त्यानें तें करूंहि नये. जे धनादि दर्पांनीं रहित असलेले, श्रद्धाळु, सत्यव्रत व हुतावशिष्ट अन्न भक्षण करणारे ऋत्विक् किंवा यजमान अग्निहोत्रादिकांचें हवन करितात ते प्रथम हिरण्यगर्भाच्या लोकासमीप असलेल्या पुण्यगंधयुक्त गोलोकास प्राप्त होतात, तेथें त्याला ब्रह्माख्य परम देवाचें दर्शन होतें. पुढें क्रमानें त्यांस ब्रह्मसंज्ञक परम सत्यदेवाचेंहि ज्ञान होतें. अर्थात् सर्वगुणयुक्त अग्निहोत्राचें परंपरेनें कैवल्य हें फल आहे.

( ४ ) तें ऐकून तार्क्ष्य म्हणाला—हे भगवति, तूं कोण आहेस! तूं परमात्मरूप प्रज्ञाच आहेस, असें मला वाटतें. कारण तुझी बुद्धि ज्ञानकांड व कर्मकांड यांच्या फलाविषयीं निश्चित झाली आहे. यास्तव तूं कोणी सामान्य स्त्री नाहींस, असें मला वाटतें.

**सरस्वती**—मी विप्रश्रेष्ठांचा संशय घालविण्यासाठीं अग्निहोत्रादि सत्कर्मांपासून आविर्भूत झालेली परापर विद्यारूप सरस्वती आहें. मीं तुझ्या संनिध येऊन ' कर्मांना परंपरेनें मोक्षहेतुत्व आहे, ' हा अर्थ तुला सांगितला आणि सगुण ब्रह्मविद्याहि सांगितली. श्रद्धावान् पुरुषाला अग्निहोत्रादि कर्मानें देवतांचा प्रसाद प्राप्त होऊन कर्म व उपासना यांचें फल मिळतें. मी याच अर्थामध्यें स्थित आहें व तोच अर्थ मीं तुलाहि यथावत् निवेदन केला आहे.

**तार्क्ष्य**—हे सुभगे, तुझ्यासारखी अन्य स्त्री या त्रिभुवनांत संभवत नाहीं. साक्षात् श्रीप्रमाणें तूं अतिशय शोभत आहेस. तुझें दिव्य रूप अतिशय मनोहर आहे व तूं देवी प्रज्ञेला आपल्या ठिकाणीं धारण करीत आहेस.

**सरस्वती**—हे विद्वन् तार्क्ष्या, यज्ञामध्यें ज्या कर्मांगावबद्ध उपासना सांगितल्या आहेत व 'सर्व यज्ञांगांमध्यें ब्रह्मदृष्टि करणें' अशाप्रकारचें जें उपासनास्वरूप सांगितलें आहे, त्यांच्या योगानें हे विप्रा, मी अतिशय वृद्धि पावतें. त्या उपासनांच्या बलानेंच मी अशी परिपुष्ट व रूपवती होत असतें. हे विद्वन्, यज्ञामध्यें समिधा, जुहू इत्यादि जें काष्ठमय, सुवर्णमय व व्रीहियवादि पार्थिव द्रव्य योजिलें जातें, त्याच्या योगानें मी हें दिव्य रूप व प्रज्ञा यांनीं युक्त झालें आहें आणि मी तुझी सिद्धिच आहें, असें जाण.

( ५ ) ' माझें स्वरूप ही तुझीच सिद्धि आहे' या वाक्यानें सरस्वतीनें ज्या प्रत्यग्रूपाचा निर्देश केला, त्याविषयीं प्रश्न करण्याच्या इच्छेनें तार्क्ष्य म्हणाला—" हे देवि, श्रद्धाळु मुनि हें प्रत्यग्रूपच परम श्रेय आहे, असें मानून आपल्या इंद्रियादिकांचा निरोध करितात. यास्तव ते जितेंद्रिय मुनि ज्यामध्यें प्रवेश करितात, तें सर्वशोकशून्य मोक्षस्थान तू मला सांग. ज्ञानी व ध्यायी ज्या परम वस्तूला जाणतात, त्या सनातन तत्त्वाला मी जाणत नाहीं. "

**सरस्वती**—हे विप्रा, वेदवेत्ते विद्वानूच त्या श्रेष्ठ तत्त्वामध्यें प्रवश करितात. वेदपठन व वेदार्थज्ञान यांनीं हीन असलेले ब्राह्मणहि त्याला कधींच प्राप्त होत नाहींत. हें निरुपाधिक ब्रह्मतत्त्व सोपाधिक विराट्, सूत्रात्मा व अंतर्यामी

यांहून श्रेष्ठ असून सच्चिदानंदरूपानें सर्वत्र प्रतीतीला येतें. तें सनातन तत्त्व आद्यन्तशून्य आहे. यास्तव स्वाध्याय, अहिंसादि व्रतें, जपादि पुण्य, चित्तवृत्ति-निरोधरूप योग व तप, यांनीं युक्त असलेले विद्वानूच त्या परम तत्त्वाला प्राप्त होतात, आणि शोक-मोहादि बंधांपासून मुक्त होतात.

त्या चिदात्म्यामध्यें वेताच्या वृक्षासारखा ब्रह्मांडवृक्ष बीजांकुरासह रहातो. तो अचिंत्य, रमणीय, धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य इत्यादि पुण्यगंधांनीं युक्त व अपरिच्छिन्न आहे. लौकिक वृक्षाच्या शाखांप्रमाणें त्या वृक्षावर अनंत भोगसाधनें आहेत. त्या ब्रह्मांड वृक्षाच्या अविद्यारूप मूलापासून नद्यांप्रमाणें संतत प्रवाहयुक्त असंख्य भोगवासना उद्भवतात. त्यांतून भोगजन्य सुख हेंच मधुर जल वहातें.

त्या वासनारूपी महानद्या आपल्या प्रवाहांत पडलेल्या पुरुषाला भिन्न भिन्न भोगस्थानापाशीं घेऊन जातात. म्हणजे पुण्याच्या वासनेनें पुण्याचरण करून जीव स्वर्गाला जातात व पापवासनेनें पापाचरण करून नरकादि पापफल भोगतात. त्या शाखारूप भोगस्थानांमध्यें परस्परांशीं संबद्ध न होणारे पुत्र-पश्वादि विषय त्यांच्या सुख-दुःखाला कारण होतात. भाजलेले यव, अपूर्ण मांसयुक्त शाका, पायस व कर्दम यांची तेथें समृद्धि असते.

पण भाजलेले यव जसे अंकुर उत्पन्न करीत नाहींत, तसें तें विषयसुख दुसरे भोग देऊं शकत नाहीं. सच्छिद्र अपूपाप्रमाणें तें असंख्य छिद्रयुक्त असतें, मांसाप्रमाणें हिंसेनेंच प्राप्त होतें. कारण भूतांना पीडा दिल्यावांचून भोग संभवत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. शाकांप्रमाणें विषयसुखांत स्थिरांश कांहीं नसतो. पायसाप्रमाणें तें आरंभीं मधुर व परिणामीं क्लेशकर असतें व चिखलाप्रमाणें चित्तपटाला मलिन करितें. याप्रमाणें श्रेष्ठ चैतन्यभूमीमध्यें अनादि अविद्या मूळापासून उत्पन्न झालेला हा संसारवृक्ष अति कटु फल देणारा आहे. यास्तव अविद्यामूलाचा नाश करून त्याचें समूल उन्मूलन करावें.

चित्-अद्वैत हेंच अव्याहत स्थान आहे. इंद्र व मरुद्गण यांसह अग्न्यादि देव ज्याच्या प्राप्तीसाठीं श्रेष्ठ योगयज्ञ करितात व त्या साधनानें ज्याला प्राप्त होतात, तें मज विद्यारूपी सरस्वतीचें प्राप्तव्य स्थान आहे. तें स्थान सर्वोत्कृष्ट ज्ञातृ-ज्ञान-ज्ञेयभानरहित ब्रह्माद्वैतच आहे. ३. १२. १८६.

## अध्याय १८७ वा.

[ १ वैवस्वत मनूचें चरित्र. २ मत्स्याचा वृत्तान्त, मनूला त्याच्या कर्तव्याचा उपदेश. ३ मत्स्यानें केलेलें मनूचें रक्षण व सृष्टीची उत्पत्ति. ]

(१) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर पांडुपुत्र युधिष्ठिर मार्कंडेय ऋषीला म्हणाला—" हे विप्रा, मला वैवस्वत मनूचें चरित्र सांग. "

मार्कंडेय म्हणाला—हे नृपते, अति प्रतापी व प्रजापतीसारखा तेजस्वी असा एक विवस्वानाचा महर्षि पुत्र होता. त्यानें आपलें विशेष ओज, तेज व तप यांच्या योगानें आपला पिता व पितामह यांचें अतिक्रमण केलें. त्याचें ' मनु ' असें नांव होतें.

---

१ पूर्वाध्यायांत ' चिद्भूमींतील अविद्यामूलापासून हा जगद्वृक्ष उत्पन्न झाला आहे व अविद्येचा क्षय झाला असतां तो चिद्भूमींतच लीन होतो' असें सांगितलें. त्यावर युधिष्ठिर असा आक्षेप घेत आहे—'हे महर्षे, एकदा अविद्येचा क्षय झाला म्हणजे वस्तुतः संसाराचें भान संभवत नाहीं. पण ज्यांच्या अविद्येचा क्षय झाला आहे, अशा तुजसारख्या महर्षींना आम्हांप्रमाणेंच संसाराचें भान होत असल्याचें दिसतें. अर्थात् जीवदवस्थेंत मुक्ति संभवत नाहीं. या आख्यायिकेंतील मनु म्ह० अभिमानात्मक अहंकार आणि विवस्वान् म्ह० मायावी ईश्वर. वैवस्वत मनूचें चरित्र सांग म्ह० अविद्येचा नाश झाला असतां अविद्याकार्यरूप अहंकार कसा संचार करितो ? कारण तंतूचा दाह झाला असतां पट रहात नाहीं. असा या आक्षेपाचा आशय आहे.

२ मार्कंडेय मनूच्या आख्यायिकेला अनुसरूनच युधिष्ठिराच्या प्रश्नाचें उत्तर देत आहे. या आख्यायिकेंतील मत्स्यसंज्ञक जीव परब्रह्माचेंच रूपांतर आहे. तो अहंकाररूप मनूकडून ' अलिंजरादिरूप उत्तरोत्तर श्रेष्ठ स्थूलदेहांमध्यें तपोबलानें पाडला जातो. समुद्राख्य विराडात्म्याच्या देहामध्यें पडलेला तो जीवमत्स्य अविद्यानाशरूप कल्पान्त झाला असतांहि दग्धपटन्यायानें ( वस्त्र जळालें तरी त्याची वीण कांहीं काळ दिसते, या न्यायानें ) अनुवृत्त होणारे सप्तर्षिसंज्ञक प्राणादि आणि बीजसंज्ञक प्रारब्ध कर्मे यांसह चरमदेहरूप नावेंत आरूढ झालेल्या व वासना-रज्जूनें जीवमत्स्याकडून प्रलयकाळींहि ओढून नेल्या जाणाऱ्या, मेरुशृंगासारख्या अचल असलेल्या भगवद्रूपामध्यें, सद्वासनेमध्यें लीन झालेल्या अहंकाराख्य मनूला पाहून जीवमत्स्यहि अस्त पावतो. म्हणजे अहंकार लीन झाला असतां जीवत्वहि

तो मनु पिता ईश्वर व पितामह शुद्धब्रह्म यांना देहाभिमानामुळें मानीनासा झाला. याप्रमाणें ईशादिकांच्या अज्ञानामुळें अहंकाराला बंध प्राप्त झाला असतां तप हाच त्याच्या निवृत्तीचा उपाय आहे, अशा आशयानें मार्कंडेय पुढें म्हणाला—

( २ ) हे नराधिपा युधिष्ठिरा, विशाला बदरीकाश्रमीं तो स्वायंभुव मनु बाहु ऊर्ध्व करून, एका पायावर उभा राहून, तीव्र तप आचरूं लागला. त्यानें अधोमुख होऊन नेत्र न झांकतां दहा हजार वर्षें अशी घोर तपश्चर्या केली. तो अशा रीतीनें तप करीत असतां एकदा स्नान करून नुक्ताच नदींतून बाहेर आला होता. त्यामुळें त्याचें वस्त्र व जटाहि ओल्याच होत्या. इतक्यांत त्या ' चीरिणी '-नदीच्या तीरावर एक मत्स्य येऊन त्याला असें वचन बोलला—

मत्स्य—हे भगवन्, मी एक क्षुद्र मत्स्य आहें. बलवान् मत्स्यांपासून मला भय आहे. यास्तव हे सुव्रता, त्या बलवानापासून माझें रक्षण करण्यास तूं समर्थ आहेस. बलवान् मत्स्यांनीं विशेषतः दुर्बल मत्स्यावर निर्वाह करावा, अशी ही पुरातन वृत्ति विहित आहे. तस्मात् बुडत असलेल्या माझें या महद्भया-पासून रक्षण कर. तूं जर एवढें कार्य केलेंस तर मी योग्यकालीं तुजवर प्रत्यु-पकार करून उतराई होईन.

राजा, मत्स्याचें हें वचन ऐकून दयाळु अंतःकरणाच्या वैवस्वत मनूनें आपल्या हातानें त्या मत्स्याला उचलून घेतलें आणि जलाशयाजवळ आणून चंद्रकिरणासारख्या स्वच्छ जलपूर्ण मृत्तिकापात्रांत सोडिलें. राजा, अशाप्रकारें मनूनें परम सत्कारपूर्वक विशेषतः पुत्रवत् स्वीकारलेला तो मत्स्य तेथें वाढूं लागला.

युधिष्ठिरा, दीर्घकालानें तो मत्स्य मोठा झाल्यामुळें त्या मृत्पात्रांत मावेनासा झाला. तेव्हां तो मनूला पुनः म्हणाला—" हे भगवन्, आतां तूं मला अन्य स्थानीं न्यावेंस, हें बरें ! "

---

नष्ट होतें. ज्याचा जीवभाव नष्ट झाला आहे व त्यामुळेंच जो ब्रह्मरूपतेस प्राप्त झाला आहे, असा अहंकार वासनेच्या योगानें जगत् उत्पन्न करीत नाहीं, पण अवि-द्याख्य कारण नष्ट झाल्यावरहि कुलाल चक्राच्या भ्रमणाप्रमाणें संसारभानरूप कार्य कांहीं काल अनुवृत्त होतें. हेंच या सर्व अध्यायाचें तात्पर्य आहे. त्याचा अक्षरार्थ मूळ भाषांतरांत दिलाच आहे.

तें ऐकून मनूनें त्या मत्स्याला त्या मृत्पात्रांतून काढून एका विस्तृत कूपांत नेऊन सोडिलें. तेव्हां तो मत्स्य तेथेंहि अनेक वर्षें वाढत राहिला. ती विहीर दोन योजनें लांब व एक योजन रुंद होती. परंतु इतक्या विस्तृत विहिरींतहि त्या मत्स्याला हालचाल करतां येईनासें झालें. तेव्हां तो मनूला पुनः म्हणाला—" हे प्रभो, तुझ्या कृपेनें माझ्या शरीराची अपरिमित वाढ होत चालली आहे, त्यामुळें या विहिरींत रहाणें मला आतां शक्य नाहीं. यास्तव समुद्राची प्रिय महिषी जी गंगा तिच्यापाशीं मला ने. तेथें मी सुखानें राहूं शकेन. तुला हा विचार कसा काय वाटतो ! कारण हे निष्पापा, असूयारहित असलेल्या मला तुझ्या आज्ञेंत राहिलें पाहिजे. "

मत्स्यानें असें म्हटलें असतां भगवान् मनूनें स्वतः त्या मत्स्याला गंगानदींत आणून सोडिलें. हे अरिंदमा युधिष्ठिरा, तो मत्स्य तेथेंहि कांहीं काल राहिला व अतिशय वृद्धि पावला. तेव्हां पुनः तो मनूला म्हणाला—"हे साधो, माझ्या या विशाल देहामुळें मला गंगेंतहि हालचाल करण्यास जागा पुरत नाहीं. यास्तव हे भगवन्, मजवर प्रसन्न हो, आणि मला सत्वर समुद्रांत नेऊन सोड.

हे पार्था, तेव्हां मनूनें स्वतः त्या मत्स्याला गंगाजलांतून उचलून समुद्राजवळ आणिलें आणि त्याला त्यांत सोडून दिलें. हे राजा, त्या वेळीं त्या महा प्रचंड मत्स्यालाहि उचलून नेत असतां मनूनें त्याचा सुखकर [1]स्पर्श व गंध अनुभविला. युधिष्ठिरा, मनूनें त्या मत्स्याला समुद्रांत सोडलें असतां तो हंसून असें वचन बोलला—

**मत्स्य**—हे भगवन्, तूं विशेष काळजीपूर्वक माझें संरक्षण केलेंस. आतां तूं कोणतें प्राप्तकाल कर्तव्य करावेंस हें मी तुला सांगतों ऐक. हे महाभागा आतां लवकरच या भूमीवरील सर्व स्थावर-जंगमांचा प्रलय होणार आहे. ज्याप्रमाणें शुक्तीवरील रजताचा आरोप नाहींसा झाला असतां शुद्ध शुक्तीच रहाते त्याप्रमाणें प्रपंचमल दूर होऊन सर्व लोकांचें क्षालन होण्याचा काल प्राप्त झाला आहे. तस्मात् मी तुला तुझ्या हिताचा उत्तम उपदेश करितों, तो ऐक. स्थावर-जंगमासह सव चराचर सृष्टीचा क्षय होण्याचा परम दारुण काल ओढवला आहे. यास्तव तूं एक दृढ रज्जूनें युक्त असलेली नौका तयार कर व

१ अहंकाररूपी मनूला चिदाभासाच्या संसर्गानें अप्रतिम सुख प्राप्त झालें.

सप्तर्षींसह तिच्यावर आरूढ हो. पूर्वी द्विजांनीं सांगितलेल्या सर्व बीजांचा संग्रह करून त्यांचें त्या नावेंत उत्तम प्रकारें रक्षण कर आणि त्या नौकेंत माझी मार्गप्रतीक्षा करीत रहा.

हे तापसा, मी लवकरच तेथें शृंगयुक्त होऊन येईन. त्या शृंगावरूनच तूं मला ओळखशील. याप्रमाणें तूं कर. आतां मी तुझी अनुज्ञा घेऊन जातों. हे मुनिजनप्रिय तपोनिष्ठा, तो प्रचंड जलौघ माझ्यावांचून तुला तरून जातां येणें शक्य नाहीं. माझ्या या वचनाविषयीं तूं मुळींच साशंक होऊं नको.

( ३ ) युधिष्ठिरा, तेव्हां मनूनें ' ठीक आहे, तुझ्या सांगण्याप्रमाणें करतों,' असें त्याला म्हटलें व ते दोघेहि परस्परांची अनुज्ञा घेऊन आपआपल्या मार्गानें निघून गेले.

त्यानंतर हे महाराजा, मनूनें मत्स्याच्या सांगण्याप्रमाणें शुभ नौका निर्माण करून व त्यांत सर्व प्रकारचीं बीजें ठेवून त्यांसह महाऊर्मींनीं युक्त असलेल्या समुद्रांत प्रवेश केला. ती नौका त्या जलनिधीमध्यें तरंगत असतां मनूनें त्या मत्स्याचें चिंतन केलें. हे परपुरंजया कौंतेया, मनु आपलें चिंतन करीत आहे हें जाणून तो शृंगी मत्स्य तेथें सत्वर प्राप्त झाला.

त्यावेळीं हे नरश्रेष्ठा, पर्वताप्रमाणें प्रचंड असलेल्या त्या मत्स्याला समुद्रांत पाहून मनूनें आपल्या नौकेला बांधलेली दृढ रज्जु त्या मत्स्याच्या मस्तकावर टाकिली आणि त्याच्या शृंगाला तो रज्जुपाश अडकवून दिला. त्यामुळें तो मत्स्य पाशानें बद्ध झाला.

त्यानंतर हे मनुजेश्वरा, त्या शृंगीनें ती नाव मोठ्या वेगानें त्या क्षीरसागरांतून ओढून नेली. त्या वेळीं ती नौका वादळानें क्षुब्ध झालेल्या व लाटांच्या योगानें भयंकर गर्जना करणाऱ्या त्या महासागरांत एखाद्या मत्त व चंचल वृत्तीच्या स्त्रीप्रमाणें जणुं काय नृत्य करीत हेलकावे घेऊं लागली. त्या वेळीं भूमि, दिशा, विदिशा, यांतील कांहींच दिसेनासें झालें. आकाश व पृथ्वी

१ येथें अध्यात्मदृष्टया 'बीजें' याचा अर्थ अदृष्ट, पूर्व कर्में असा आहे. २ मज अंतरात्म्याची म्ह० तूं जड-अनृतादि सर्वधर्मशून्य असलेल्या माझें आलोचन कर म्हणजे मी व्यक्त होईन. ३ शृंग म्ह० जीवोपाधीचा बाध करणारा एक अवयव. ४ संसाररूपी सागर मजवांचून म्ह० ज्ञानावांचून तरून जातां येणार नाहीं.

जलमग्न झाली. याप्रमाणें सर्व लोक जलमय होऊन व्याकुल झाले असतां सप्तर्षींसह मनु व मत्स्य एवढेंच कायतें दिसत होतें.

अशा रीतीनें तो मत्स्य निरलसपणानें ती नांव त्या जलार्णवांतून अनेक वर्षें ओढीत ओढीत हिमालयाच्या श्रेष्ठ शृंगासमीप आला आणि हंसून हलकेच त्या ऋषींना म्हणाला—" ही नौका या हिमालयाच्या शृंगाला सत्वर बांधा."

तेव्हां मत्स्याचें वचन ऐकून त्या ऋषींनीं मोठ्या त्वरेनें ती नौका हिमवताच्या श्रेष्ठ शृंगाला बांधिली. तेव्हांपासून हे भरतश्रेष्ठा, त्या शिखराचें 'नौबंधन' हें नांव रूढ झालें व तें अद्यापि प्रसिद्ध आहे. हें कौंतेया, तेंच हें शिखर आहे, असें जाण.

त्यानंतर तो नेत्र न मिटणारा मत्स्य ऋषींना म्हणाला—" मी प्रजापति ब्रह्मा आहें. माझ्याहून श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं. मीं मत्स्यरूपानें या महद्भयापासून तुम्हांला मुक्त केलें आहे. आतां मनूनें देव-असुर-मनुष्य यांसह सर्व प्रजा व सर्व चराचर सृष्टि उत्पन्न करावी. तीव्र तपाच्या योगानें याला या उत्पत्तीची प्रतिभा स्फुरेल व माझ्या प्रसादानें प्रजेच्या उत्पत्तीविषयीं मोह प्राप्त होणार नाहीं.

राजा असें बोलून तो मत्स्य एका क्षणांत अदृश्य झाला. नंतर प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा करणारा वैवस्वत मनु स्वतः मूढ झाला. सृष्टि कशी निर्माण करावी, हें त्यास कळेना. म्हणून त्यानें तीव्र तपश्चर्या केली. नंतर महत्तपानें

---

१ अचल व अमूर्त कारणात्मरूप शृंगाला रज्जु बांधल्याचें फल ईश्वरानुग्रहानें 'मी ब्रह्म आहें' असें ज्ञान होणें हेंच आहे. अर्थात् पूर्वी मूर्तीमध्यें स्थिर केलेलें चित्त मूर्तीच्या एकेक अवयवाचा त्याग करून तिचा एकदेश जें केवल स्मित त्यामध्यें स्थिर करावें. मूर्तीच्या स्मितावर चित्त स्थिर झालें म्हणजे तें तेथून काढून आकाशांत स्थिर करावें व आकाशाच्याहि अनवधानानें तें माझ्या स्वरूपामध्यें स्थिर झालें, म्हणजे दुसऱ्या कशाचेंहि चिंतन करूं नये. येथें 'हिमालयाच्या शृंगाला नौका बांधा' व 'मी प्रजापति आहें' या दोन श्लोकांनीं मूर्तीच्या आराधनेनेंच प्रथम कारण ब्रह्म व नंतर निर्विशेष परम ब्रह्म प्राप्त होतें, असें सुचविलें आहे. 'मज मत्स्यरूपी जीवस्वरूपाला जाणल्यानेंच तुम्ही भयापासून मुक्त झालां आहां' या कथनानें भय हा अहंकारादिकांचाच धर्म आहे, असे सुचविलें आहे.

युक्त असलेला तो सर्व प्रजा उत्पन्न करूं लागला व त्यानें सर्व सृष्टि साक्षात् यथापूर्व निर्माण केली. असें हें 'मात्स्यक' पुराण आहे. हें सर्वपापनाशक पुरातन आख्यान मीं तुला सांगितलें. जो नर हें मनूचें चरित्र आरंभापासून नित्य ऐकेल तो सुखी व पूर्णकाम होऊन सर्व लोकांस प्राप्त होईल.३. १२.१८७

---

## अध्याय १८८ वा

[ १ युधिष्ठिराचा प्रलयकालाविषयीं सविस्तर प्रश्न. २ मार्कंडेयानें केलेलें चतुर्युग व कलींतील अनाचार यांचें वर्णन. ३ प्रलयकालीन वृत्तान्त. ४ मार्कंडेयाचा प्रथम एकार्णवांतील व नंतर नारायणाच्या उदरांतील संचार. ५ बालरूपी प्रभूच्या मुखांतून बाहेर पडल्यावर त्यानें केलेला प्रश्न. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्यानंतर विनययुक्त धर्मराज युधिष्ठिरानें यशस्वी मार्कंडेयाला पुनः प्रश्न केला—" हे महामुने, तूं अनेक सहस्र युगांचे अंत पाहिले आहेस. या लोकीं तुझ्या सारखा आयुष्मान् दुसरा कोणीहि नाहीं. हे ब्रह्मवेत्त्या, परमेष्ठी महात्म्या ब्रह्मदेवाला वर्ज करून तुझ्या इतका दीर्घायु अन्य पुरुष नाहीं. हे विप्रश्रेष्ठा, हा लोक स्थूल पंचभूतें व देव-दानव यांनीं रहित झाला असतां म्ह० प्रत्यगात्म्यामध्यें स्थूल प्रपंचाचा लय झाला असतां सूक्ष्म भूतमय हिरण्यगर्भापाशीं तूंच उपस्थित होतोस आणि प्रलय निवृत्त होऊन पितामह जागृत झाला असतां परमेष्ठीनें निर्माण केलेलीं हीं सत्व वासनामय जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज भूतें तूं एकटाच पहातोस. स्थूल जगाला प्राणनिरोधानें वायुमात्र करून, भिन्न भिन्न उपायांनीं देहाकार परिणत झालेल्या आपांचा परित्याग करून म्ह० ब्रह्माण्ड स्थूलदेहांत व स्थूलदेह लिंगशरीरांत लीन करून तूं मनाच्या ऐकाग्र्यानें लोकगुरु सूत्रात्म्याची आराधना करितोस.

अनेक उपायांनीं या ब्रह्माण्डरूप कार्याला आत्ममात्र करून म्ह० सर्वात्मतेस प्राप्त होऊन किंवा स्वयंप्रकाश चैतन्य हेंच ज्याविषयीं प्रमाण आहे, त्याला स्वरूपानें जाणून म्ह० सर्वज्ञतेस प्राप्त होऊन चित्तैकाग्र्यरूप घोर तपानें प्रजापतींना जिंकतोस. त्यांना आत्मसात् करितोस. तूं नारायणाच्या अगदीं समीप असतोस. तेथें तुझी मोठी ख्याति आहे. तूं भगवद्भक्तांतील श्रेष्ठ भक्त आहेस. परलोकीं अथवा स्थूलदेहाचा त्याग करावयाचा प्रसंग आला असतां तूं लोकां-

कडून अतिशय स्तुति केला जातोस. योगकलेनें आपलें हृदयपुंडरीक विकसित करून तूं ज्ञानदृष्टीनें भगवानाला अनेकदा पाहिलें आहेस. परम वैराग्याचा आश्रय करून तूं सर्व बाह्यदृष्टि टाकितोस आणि अंतर्दृष्टीनें हृदयाकाशांत त्याला पाहतोस. चिदात्म्याची पूर्ण ओळख पटल्यावर तूं बहिर्दृष्टि होऊन सर्व ब्रह्माण्ड-रूपी चिदात्म्याचें साक्षात् दर्शन घेतोस म्हणून हे विप्रर्षे, त्या परमेष्ठीच्या प्रसादानें तुजपाशीं सर्वांतक मृत्यु व देहाचा विनाश करणारी जरा येत नाहीं.

हे ब्राह्मणा, ज्यावेळीं सूर्य, अग्नि, वायु, चंद्र, अंतरिक्ष व पृथ्वी यांतील कांहींच अवशिष्ट रहात नाहीं व पंचमहा भूतांचा प्रलय होतो, सर्व लोक एक समुद्रमय होऊन स्थावर-जंगम प्रजा नाश पावते, देव, असुर व महासर्प यांचाहि अभाव होतो, त्या वेळीं तो अमितस्वरूपी भगवान् हृदयपुंडरिकांत शयन करितो. पण त्या अवस्थेंतहि तूं एकटाच त्या सर्वभूतैश्वर्यसंपन्न ब्रह्मा-पाशीं उपस्थित होतोस.

हे द्विजोत्तमा, तूं हें सव पूर्ववृत्त प्रत्यक्ष पाहिलें आहेस. म्हणून मी ही सर्वकारणात्मक कथा तुझ्या तोंडून ऐकूं इच्छितों. तूं ही लोकस्थिति अनेकदा अनुभविली आहेस. तुला अविदित असें कधींच कांहीं नाहीं.

( २ ) मार्कंडेय—हे राजा, मी स्वयंभूला नमस्कार करून तुला हा सर्व वृत्तान्त सांगतों. तो भगवान् जन्मरहित आहे. कारण त्याचाहि जन्म मानिल्यास उत्तरोत्तर त्याच्या अनेक कारणांचा जन्म मानावा लागेल व या सर्व जन्य पदार्थांच्या मुळाशीं एक अज वस्तु आहे, असें सिद्ध होणार नाहीं. तसाच तो स्वयंभू, पुराणपुरुष, नित्य, अनादि, अव्यक्त, अतिसूक्ष्म, निर्गुण व मायोपाधीनें युक्त आहे.

हे पुरुषश्रेष्ठा, तोच हा येथें बसलेला पितांबरधारी जनार्दन आहे. हाच कर्ता, संहर्ता, भूतात्मा, भूतकृत् प्रभु आहे. यालाच अचिंत्य महदाश्चर्यरूप ब्रह्म व पवित्र म्हणतात. हा आद्यंतशून्य, भावरूप, विश्वात्मा, अव्यय व अक्षय आहे. कर्ता असून दुसऱ्या कोणाकडून केला जात नाहीं. पौरुषाचें कारणहि हाच आहे. हा साक्षात् वेदरूप जरी असला तरी ते वेद याला जाणत नाहींत. या परमात्म्यापासून उत्पन्न झालेलें हें प्रत्यक्षादि प्रमाणांचा विषय होणारें जगत् स्वप्न, माया किंवा इंद्रजाल यांप्रमाणें आश्चर्यरूप आहे. त्याची उत्पत्ति व स्थिति कोणत्याहि उपपत्तीनें संभवनीय आहे, असें सांगतां येत नाहीं.

एका परमात्म्यापासून हें विचित्र जगत् कसें झालें, तो स्वतः अपरिणामी व असहाय असतांना ही विचित्र रचना त्याच्यापासून कशी उद्भवली, हें कोणालाहि सांगतां येणार नाहीं. रज्जूवरील सर्पाप्रमाणें किंवा आकाशाच्या नीलवर्णाप्रमाणें त्याच्या आश्रयानें भासणारें हें जगत् म्ह० एक मोठें आश्चर्यच आहे. अर्थात् ब्रह्मच संसार करितें व तेंच जगद्रूपानें विवर्त पावतें, हाच सिद्धान्त होय.

हे मनुजश्रेष्ठा, हाच पुरुष स्वतःच्या अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या या आश्चर्ययुक्त जगाला पहात त्याविषयीं राग-द्वेषानें दोषवान् होतो व तो स्वतःच युगचतुष्टयरूप बनतो. हे भारता, सर्व जगाचा क्षय झाला असतां सृष्टीच्या आरंभीं देवांच्या चार सहस्र वर्षांचें एक कृतयुग होतें. त्याचा संध्याकाल व संध्यांशकाल चार-चारशें वर्षांचा असतो.

तीन सहस्र दिव्य वर्षांचें एक त्रेतायुग म्हटलें जातें. त्यांतील संध्या व संध्यांश प्रत्येकीं तीनशें वर्षें असतात. द्वापर युगाचें प्रमाण दोन हजार दिव्य वर्षें असून त्याची संध्या व संध्यांश प्रत्येकीं दोनशें वर्षें आहेत. कलियुगाचें प्रमाण एक हजार वर्षें असून त्यांतील संध्या व संध्यांश शंभर वर्षें आहेत. याप्रमाणें प्रत्येक युगाचे संध्या व संध्यांश यांचें प्रमाण एकसारखेंच असतें, असे तूं निश्चित समज.

---

१ धर्मापासून पराङ्मुख झालेला पुरुष हा कलि, शास्त्र व आचार्य यांच्यापासून धर्म समजून घेणारा द्वापर, धर्माचें अनुष्ठान करण्याची इच्छा करणारा त्रेता व साक्षात् धर्मानुष्ठान करणारा पुरुष कृत होय. कलिपुरुष अतिशय हीन आहे, हें दाखविण्यासाठीं येथें कृतादि युगांचें कालप्रमाण सांगितलें आहे.

२ पूर्व युगांत उत्तरयुगधर्माचा गौणत्वानें संक्रम होणें, ही संध्या; तिचें प्रमाण चारशें वर्षें असून उत्तरयुगांत पूर्वयुगधर्माचा संकर होणें हा संध्यांश. त्याचें प्रमाण तीनशें वर्षें आहे. हाच पूर्वयुगाच्या अपेक्षेनें संध्यांश व उत्तरयुगाच्या अपेक्षेनें संध्या होय. अर्थात् कृत व त्रेता यांच्या संध्या-संध्यांशाचें कालप्रमाण सातशें वर्षें; त्रेता व द्वापर यांचें पांचशें वर्षें; द्वापर व कलि यांचें तीनशें वर्षें आणि कलि व कृत यांचें पांचशें वर्षें आहे. त्यामुळें कृतयुगाच्या आरंभींचीं चारशें वर्षें हा कलीच्या अपेक्षेनें संध्यांश जरी असला, तरी कृतयुगाच्या अपेक्षेने संध्याच आहे. याप्रमाणें चारी युगांच्या संध्या-संध्यांशाचें प्रमाण तुल्य होतें.

हे राजा, कलियुग क्षीण झालें म्हणजे कृतयुगाचा आरंभ होतो. या बारा सहस्र वर्षांचें एक दैवयुग होतें व अशा एक सहस्र दैवयुगांचा ब्राह्मदिवस होतो. ब्रह्मभवनामध्यें हें सर्व विश्व गुप्त होऊन रहातें. हे मनुजश्रेष्ठा, त्यालाच विद्वान् लोक 'लोकांचा प्रलय' असें म्हणतात. हे भरतश्रेष्ठा, प्रत्येक दैव-युगांताला थोडासा अवकाश राहिला असतां म्ह० कलियुगाच्या शेवटच्या चवथ्या पादांत सर्वलोक प्रायः मिथ्याभाषण करूं लागतात. साक्षात् यज्ञ, दान व व्रतें न करितां त्यांचे प्रतिनिधि कल्पितात. ब्राह्मण शूद्रांचें कर्म करूं लागतात व शूद्र धनार्जन करितात. किंवा ते क्षात्रधर्मावरहि आपली उप-जीविका करितात.

राजन्[1] यज्ञ, स्वाध्याय, दंड व अजिन यांनीं हीन झालेले ब्राह्मण कलियुगांत सर्वभक्षक बनतात, द्विज जप सोडतात व शूद्र तत्परा-यण होतात. याप्रमाणें सर्वलोक विपरीत आचरण करूं लागले म्हणजे हें नाशाचें पूर्वचिह्न आहे, असें जाणावें. हे राजा, त्या वेळीं पृथ्वीवर मिथ्या शासन करणारे, पापी, मिथ्या वादांत परायण असलेले आंध्र, शक, पुलिंद, यवन, कांबोज, शूर, बाल्हिक, आभीर इत्यादि अनेक म्लेच्छ राजे राज्य करितात. त्या कालीं एकहि ब्राह्मण याजन-प्रतिग्रहादि स्वधर्मावर उपजीविका करूं शकत नाहीं. क्षत्रिय व वैश्यहि निषिद्ध कर्मामध्यें रत होतात. त्यामुळें ते अल्पायु, हीनबल, अल्पवीर्य, पराक्रमशून्य, निःसार, अल्प-देह, अनृत भाषण यांनीं भूषित होतात. मोठमोठे देश जनरहित होतात. सर्व दिशा पशु व सर्पादि प्राणी यांनीं भरून जातात.

युधिष्ठिरा, युगान्तसमय प्राप्त झाला असतां ब्राह्मणादि सर्व प्रजा अनु-भवाच्या अभावीं वृथा ब्रह्मवादी बनतात. शूद्र श्रेष्ठांनाहि 'अरे, तुरे' म्हणूं लागतात व ब्राह्मण शूद्रांनाहि श्रेष्ठ मानूं लागतात. हे नरेंद्रा, कलियुगाच्या शेवटीं सर्व प्राण्यांची अशी स्थिति होते. ते दुर्गंधयुक्त पदार्थांचाहि मोठ्या प्रीतीनें वास घेतात. किंवा सर्व सुगंधीपदार्थांचा गंधच नाहींसा होतो. सर्व

---

१ निवृत्तयज्ञस्वाध्याया दंडाजिनविवर्जिताः ॥ ब्राह्मणाः सर्वभक्षाश्च भविष्यन्ति कलौ युगे ॥ अजपा ब्राह्मणास्तात शूद्रा जपपरायणाः ॥ विपरीते तदा लोके पूर्व-रूपं क्षयस्य तत् ॥ बहवो म्लेच्छराजानः पृथिव्यां मनुजाधिप ॥ मृषानुशासिनः पापा मृषावादपरायणाः ॥

रस नीरस बनतात. प्रत्येकाला विपुल प्रजा होते. त्यांचे देह ठेंगू असतात. ते शील व आचार यांनीं रहित असतात.

स्त्रिया मुखानेंच भगकार्य करूं लागतात. देश अन्नाला महाग होतात. सर्व प्राणी क्षुद्व्याधीनें पीडतात. चव्हाट्यांवर विट व वारांगना यांचे समूह जमतात. स्त्रिया पतीचा द्वेष करणाऱ्या व निर्लज्ज निपजतात. गायी फारच थोडें दूध देतात. वृक्षांवर परिमित फळें व पुष्पें येऊं लागतात व त्यांवर वायसांची समृद्धि होते.

हे भूपाला, ब्रह्महत्या व मिथ्या भाषण करणाऱ्या नृपालांकडून द्विज प्रतिग्रह घेतात. हे पृथ्वीपाला, लोभ व मोह यांनीं युक्त आणि कपटधर्म हाच ज्यांचा धर्म आहे, असे विप्र भिक्षेसाठीं दशदिशांतील लोकांना पीडा देतात. करभाराच्या भयानें गृहस्थ वंचना करितात. वैश्य मुनींचा कपटवेश धारण करून उपजीविका करितात. ब्राह्मण द्रव्यलोभानें नखें, दाढी व जटा वाढवून मिथ्याचरण करितात.

आश्रमांतील ब्रह्मचारी, मद्यपान व गुरुस्त्रीगमन इत्यादि वृथाचारांत रत होतात व ज्यायोगें मांस व शोणित यांची वृद्धि होईल असेंच लौकिक आचरण करितात. हे नरश्रेष्ठा, युगक्षयाच्या समयीं सर्व आश्रम अनेक प्रकारच्या पाखंडांनीं युक्त व परान्नाची प्रशंसा करणारे होतात.

त्याचप्रमाणें भगवान् इंद्र योग्य ऋतूमध्यें वृष्टि करीत नाहीं व सर्व बीजें योग्य प्रकारें उगवत नाहींत. सर्वलोक अशुचि व हिंसापरायण होतात किंवा (ब्राह्मण-संन्याश्यादि शुचिर्भूत लोकहि हिंसापरायण होतात.) त्या काळीं अधर्माचें फल पराकाष्ठेला पोंचतें. हे राजन्, त्या काळीं जो नर धर्मपरायण असतो, तो अल्पायु होणार असें जाणावें, कोणीहि धार्मिक रहात नाहीं. वैश्य खोट्या मापानें विक्रय करितात. व्यापारी अतिशय मायावी होतात.

हे राजा त्याकाळीं धर्माचरणी जन क्षीण होतात व पापी वृद्धि पावतात. त्याचप्रमाणें धार्मिक दुर्बल व अधार्मिक बलयुक्त होतात. धर्मिष्ठ मानव अल्पायु व दरिद्री होतात आणि अधार्मिक लोक दीर्घायु व समृद्ध होतात.

१ धर्मिष्ठा परिहीयन्ते पापीयान्वर्धते जनः ॥ धर्मस्य बलहानिः स्यादधर्मश्च बली तथा ॥ अल्पायुषो दरिद्राश्च धर्मिष्ठा मानवास्तथा ॥ दीर्घायुषः समृद्धाश्च विधर्माणो युगक्षये ॥

युगान्तसमयीं नगरांतील क्रीडास्थानांत प्रजा अधार्मिक उपायांनीं व्यवहार करितात.

अल्प धनसंचय होतांच पुरुष आढ्य व मदयुक्त होतात. दुसऱ्याची विश्वासानें ठेवलेली ठेव ते मिथ्यावादी पापाचारयुक्त नर हरण करितात आणि ते निर्लज्ज लोक 'असें घडलेंच नाहीं' म्हणून सांगतात. त्याचप्रमाणें नगरांतील क्रीडाभुवनें व देवालयें यांतून वृक-व्याघ्रादि हिंस्र पशु निर्भयपणें शयन करितात.

हे नृपाला, सात-आठ वर्षांच्या अल्पवयी कन्या गर्भधारण करितात आणि दहा-बारा वर्षांचे पुरुष प्रजा उत्पन्न करितात. सोळावे वर्षी मनुष्यांचे केंस पिकतात व त्यांचें आयुष्य सत्वर क्षय पावत. हे महाराज, आयुष्य क्षीण झालेले तरुण वृद्धाप्रमाणें दुर्बल होतात आणि तरुणांचें शील वृद्धांमध्यें दिसूं लागतें.

हे राजा, त्या काळीं विपरीत आचरण करणाऱ्या दुःशील स्त्रिया आपल्या अनुरूप पतींची वंचना करून दास व पशु यांच्याशीं ग्राम्य व्यवहार करितात. त्याचप्रमाणें वीर पत्न्या भर्ता जिवंत असतांहि परपुरुषांचा आश्रय करून व्यभिचार करितात.

( १ ) हे महाराजा, त्या युगाचा सहस्र वर्षांचा काल क्षीण झाला असतां अनेक वर्षें अनावृष्टि होते. त्यामुळें निःसत्त्व व क्षुधित झालेलीं बहुतेक भूतें लय पावतात. त्यानंतर द्वादश आदित्य आपल्या प्रखर किरणांनीं समुद्र व

१ कलियुगाच्या अंत्यसमयीं स्त्री-पुरुषसंघ दुराचाराच्या अतिरेकामुळें अनंत नरकास प्राप्त होतो हें येथवर दाखविलें. आतां यापुढें त्याच्या परिहारासाठीं योगानुष्ठान करावें असे मार्कंडेय स्वानुभव कथनानें व्यक्त करितो. या पुढील ग्रंथ स्थूलदृष्टि लोकांना कल्पान्तप्रतिपादनपर जरी भासला, तरी तो योगपरच आहे, असें म्हणून नीलकंठांनीं आपल्या टीकेंत "दीप्त सूर्य म्ह० इडानामक सूर्यनाडीचे अवयव, जल म्ह० चिदाभासयुक्त चित्तवृत्ति, समुद्र म्ह० काम, सरित् म्ह० नाड्या" असा शब्दार्थ करून 'सात प्राणांनीं उद्दीपित केलेल्या नाडीनें वायूचें आकर्षण करून चित्तवृत्तीचा निरोध केला जातो. तेव्हां काष्ठादिकांसारखें असलेलें शरीर भस्मसात् झालेलें दिसतें. म्ह० त्याचा अनुभव येईनासा होतो. त्या वेळीं जठराग्निहि लोकदृष्ट्या स्थित असलेल्या देहाला पीडा देत नाहीं. वायूलाहि

नद्या यांतील सर्व जल शोषून घेतात. त्यावेळीं पृथ्वीतलावरील काष्ठें, तृण व सर्व शुष्क आणि आर्द्र पदार्थ भस्मसात् झालेले दिसतात.

त्यानंतर हे राजा, प्रलयकालचा अग्नि वायूसह प्रवृत्त होतो आणि पूर्वीं आदित्यानें शोषण करून रुक्ष केलेल्या सर्व प्रदेशांत प्रवेश करितो. तो अग्नि पृथ्वीचा भेद करून रसातलांत जातो व देव-दानव-यक्ष यांना महद्भय उत्पन्न करितो. या लोकाचा व नागलोकाचा नाश करून तो अग्नि अधोलोकाचाहि विनाश करितो.

त्यानंतर तो संवर्तक अग्नि व अमंगल वायु असंख्य योजनें पसरतो आणि तो प्रदीप्त अग्नि देव, असुर, गंधर्व, यक्ष, उरग व राक्षस यांसह या सर्व जगाला दग्ध करून टाकितो. नंतर नभोमंडलांत विद्युन्मालेनें शोभणारे व गजसमुदायाप्रमाणें अद्भुत दिसणारे प्रचंड मेघसमूह उठतात. त्यांतील कांहीं मेघ नीलोत्पलासारखे श्यामवर्ण, कांहीं कुमुदासारखे, कांहीं परागासारखे, कांहीं पीतवर्ण, कांहीं सोनेरी, कांहीं कमलपत्राच्या वर्णाचे, कांहीं श्रेष्ठ नगराकार, कांहीं वायसांच्या अंडाकृति, कांहीं काजळासारखे कृष्णवर्ण, कांहीं मकराकार, अशा अनेक आकाराचे व वर्णाचे असतात.

हे राजन्, ते घोरस्वरूपाचे मेघ भयंकर गर्जना करीत सर्व आकाश व्यापून टाकितात. त्या वेळीं वन, पवत व खाणी यांसह ही सर्व पृथ्वी त्या महापुरानें भरून जाते. हे पुरुषश्रेष्ठा, परमेष्ठीच्या प्रेरणेनें ते घोर ध्वनि करणारे जलधर सर्वतः वृष्टि करून समग्र वसुंधरेला जलांत सत्वर बुडवून टाकितात. याप्रमाणें अतिशय घोर, अमंगल व क्रूर अग्नीला शांत करून त्या महात्म्याच्या प्रेरणेनें ती पर्जन्यवृष्टि बारा वर्षे सुरू रहाते. त्या वेळीं समुद्र आपल्या मर्यादेचें उल्लंघन करून पर्वत विदीर्ण करितो आणि पृथ्वी जलांत निमग्न होते.

---

त्याला इष्ट असलेल्या भ्रू व घ्राण यांच्या संधिरूपस्थानीं नेलेलें असल्यामुळें त्यासह संवर्तक अग्नि इडा नाडीरूप आदित्यान शुष्क केलेल्या भ्रू-घ्राणसंधिरूप स्थानामध्यें प्रवेश करितो. नाड्यांतील वायु व अग्नि त्या त्या अवयवावरील अभिमान टाकून त्याला जाळितो. इत्यादि सविस्तर योगप्रक्रिया येथें सांगितली आहे. पण ती सामान्य वाचकांना दुर्बोध असल्यामुळें आम्ही येथें तिचा अधिक विस्तार करीत नाहीं.

त्यानंतर भयंकर वायु प्रवृत्त होतो. तेव्हां वायुवेगानें पराभूत झालेले मेघ इतस्ततः पसरतात व सर्व नभस्तलाला व्यापून नष्ट होतात. हे भारता, नंतर तो आदि पद्मालय स्वयंभू देव त्या घोर वायूला प्राशन करून शयन करितो. याप्रमाणें सर्व स्थावर-जंगम, देवासुरगण, यक्ष-राक्षस, मनुष्यें, श्वापदें व वृक्ष हीं सर्व नष्ट झालीं असतां आणि पंचमहाभूतांचा लय झाला असतां त्या घोर एकार्णवांत मी एकटाच इतस्ततः भ्रमण करीत रहातों. हे नृपश्रेष्ठा, त्या घोर एकार्णवजलांत संचार करीत असतां सर्व भूतें दृष्टीं न पडल्यामुळें मी मूर्च्छित होतों.

( ४ ) हे राजा, निरलसपणें दीर्घकाल पोहून गेल्यावर मी श्रांत होतों. परंतु मला कोठेंहि आधार दिसत नाहीं. इतक्यांत त्या महाजलार्णवांत एक विशाल व प्रचंड वटवृक्ष मला दिसतो. त्या वृक्षाच्या विस्तीर्ण शाखेवर दिव्य आस्तरणानें युक्त असलेल्या मंचकावर एक बालक निजलेलें माझ्या दृष्टीं पडतें. त्या बालाचें मुख चंद्र किंवा कमल यांसारखें आल्हादकारक असून नेत्र फुललेल्या कमलाप्रमाणें विशाल असतात.

तें पाहून हे पृथ्वीपते, मी विस्मित होतों. ‘ सर्व लोकांचा नाश झाला असतां हा बालक येथें कसा निजला आहे ’ याविषयीं मी तपःसामर्थ्यानें पुष्कळ विचार करितों. परंतु भूत, भविष्यत् व वर्तमान जाणणाराहि मी त्याचें आकलन करूं शकत नाहीं. हे राजन्, अतसीपुष्पाप्रमाणें नीलवर्ण असलेला व श्रीवत्सभूषण धारण करणारा तो बालक मला त्या वेळीं साक्षात् लक्ष्मीचें निवासस्थान असलेला शेषशायी भगवान्च भासतो.

नंतर तो अतिशय तेजस्वी कमलपत्राक्ष बालक मला असें श्रवणीय वचन बोलतो—“ हे भार्गव मार्कंडेया, तूं श्रांत झालेला असून विश्रांतीची इच्छा करीत आहेस, हें मी जाणतों. यास्तव तूं इकडे ये व वाटेल तितका काल येथें बैस.

हे मुनिश्रेष्ठा, माझ्या शरीरांत प्रवेश करून तेथें तूं सुखानें निवास कर. मी तुजवर प्रसन्न होऊन हें निवासस्थान तुला देत आहें.

राजा, त्या बालाचें हें वचन ऐकून मला अतिशय विषाद वाटतो, ‘ अरे अरे हा बालक असूनहि त्यानें मजवर प्रसन्न झालों आहें असें म्हणावें ना ? धिक्कार असो मला !’ अशा विचारानें मला दीर्घायुष्य व मनुष्यजन्म या दोहोंविषयीं

विरक्ति येते. त्यानंतर तो बालक आपलें मुख पसरतो व दैववश झालेला मी त्याच्या मुखांत प्रवेश करितों.

हे नरश्रेष्ठा, त्याच्या कुशींत प्रवेश केला असतां राष्ट्र व नगरें यांनीं व्याप्त असलेली ही समग्र पृथ्वी माझ्या दृष्टीं पडते. शेकडों मार्गांनीं वहाणारी गंगा, सीता, यमुना, कौशिकी, चर्मण्वती, वेत्रवती, चंद्रभागा, सरस्वती, सिंधु, गोदावरी, महानदी व पृथ्वीवर वहाणाऱ्या इतरहि सर्व नद्या त्या महात्म्याच्या कुक्षींत मला दिसतात. त्याचप्रमाणें जीवजंतूंनीं युक्त असलेला जलनिधि महासमुद्र, अग्न्यादिकांप्रमाणें तेजस्वी, देदीप्यमान व चंद्र-सूर्यांनीं विराजित असलेलें गगन, अरण्यांनीं शोभणारी पृथ्वी, अनेक यज्ञ करणारे ब्राह्मण, सर्व वर्णांचें रक्षण करणारे क्षत्रिय, यथान्याय कृषि करणारे वैश्य, द्विजांच्या शुश्रूषेंत तत्पर असलेले शूद्र, हिमालय, हेमकूट, गंधमादन इत्यादि पृथ्वीतलावर असलेले सर्व श्रेष्ठ पर्वत मी पहातों.

त्या महात्म्याच्या उदरामध्यें संचार करीत असतां सिंह-व्याघ्रादि सर्व हिंस्र पशु, शक्रादि सर्व देवगण, रुद्र, साध्य, गुह्यक, पितर, सर्प, नाग, सुपर्ण, वसु, अश्विनिकुमार, गंधर्व, अप्सरा, यक्ष, ऋषि, दैत्य, दानवांचा संघ, राहु-केतु, इतर सुरशत्रु आणि जेवढें स्थावर-जंगम या लोकीं दिसतें, तें सर्व तेथें माझ्या दृष्टीं पडतें. फलमूलावर उपजीविका करणारा मी मोठ्या त्वरेनें फिरून तेथें समग्र जगत् पहातों.

हे भारता, याप्रमाणें त्या परमात्म्याच्या अंतःशरीरांत मी शंभर वर्षांहून अधिक काल वास करितों; तरीहि मला त्याच्या देहाचा अंत लागत नाहीं. त्या महात्म्याचें चिंतन करणारा मी सतत भ्रमण करीत असतांहि त्याचा अंत पाहूं शकत नाहीं. त्यानंतर मी त्या वरद व शरण्य देवाला मनानें आणि कर्मानें यथाविधि शरण जातों. तेव्हां त्या महात्म्याच्या पसरलेल्या मुखांतून मी एकाएकीं वायुवेगानें बाहेर पडतों.

त्या वेळीं हे पृथ्वीपाला, त्याच वटवृक्षाच्या शाखेवर सर्व जगत् घेऊन तशाच बालवेषांत असलेल्या अमित तेजस्वी व श्रीवत्सलांछन धारण करणाऱ्या प्रभूला मी पहातों. तेव्हां तो पीतांबरधारी महातेजस्वी बाल प्रेमानें जणुकाय हंसतच मला म्हणतो—" हे मुनिश्रेष्ठा, श्रांत झालेला तूं माझ्या या शरीरांत सुखानें राहिलास ना!"

(५) राजा, त्या सर्वसाक्षी विभूचें हें वचन ऐकतांच मला नवीन दृष्टि प्राप्त होते. मी स्वतःला मुक्त व ज्ञानी मानूं लागतों. त्या बालरूपी सर्वान्तर्यामीचीं मृदु व आरक्त अंगुलींनीं शोभणारीं सुंदर चरणकमलें मी मोठ्या यत्नानें मस्तकावर धारण करितों आणि त्या प्रभूचा अपरिमित प्रभाव व अमित तेज पाहून मी हात जोडून त्याच्यापाशीं जातों आणि त्या सर्व भूतात्म्या देवाधिदेवाला नम्रपणें वंदन करून म्हणतों—

"हे भगवन्, तुझी ही उत्तम माया जाणण्याची माझी इच्छा आहे. तुझ्या मुखांतून शरीरांत प्रवेश करून मीं तुझ्या जठरांत समस्त जगत् पाहिलें. तुझ्या शरीरांत असलेलें देव-दानवादिकांसह सर्व स्थावर-जंगम जगत् माझ्या दृष्टीं पडलें. हे सर्वेश्वरा, तुझ्या प्रसादानें माझी पूर्वस्मृति नष्ट झाली नाहीं. तुझ्या शरीरांत मी त्वरेनें सर्वत्र संचार करीत होतों व तेथून बाहेर यावेंसें वाटतहि नव्हतें. पण हे प्रभो, केवल तुझ्या इच्छेनें मी बाहेर पडलों. यास्तव, तुला जाणण्याची माझी इच्छा आहे. हे अनघा, तूं साक्षात् कमलनाभ सर्व जगताचें प्राशन करून येथ बाल होऊन कां राहिला आहेस? हें सर्व जगत् तुझ्या शरीरांत कां राहिलें आहे? तूं येथें किती काल राहणार आहेस? हें सर्व तुझ्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव ब्राह्मणाची कामना पूर्ण करण्यासाठीं मीं पाहिलेलें हें अचिंत्य व अद्भुत दृश्य मला यथार्थ व सविस्तर सांग.

राजा, माझें हें भाषण ऐकून तो महाद्युतिमान् श्रीमान् देवेश माझें सांत्वन करून असें वचन बोलला. ३. १२. १८८.

---

## अध्याय १८९ वा.

[ १ मार्कंडेयाला परमात्मस्वरूपकथन. ]

( १ ) **नारायण**—हे विप्रश्रेष्ठा, देवहि मला तत्त्वतः जाणत नाहींत, तथापि तुजवरील प्रेमामुळें 'मी हें जगत् उत्पन्न कसें करितों,' तें तुला सांगतों. तूं पितृभक्त असून मला शरण आला आहेस, शिवाय तुझें ब्रह्मचर्यहि अतिशय दृढ आहे. त्यामुळेंच तुला माझें साक्षात् दर्शन झालें.

हे ब्रह्मर्षे, पूर्वीं मीं जलाला 'नारा' असें नांव दिलें आणि तें जल माझें 'अयन' आहे. यास्तव 'नारा'-वर शयन करणारा म्हणून मी 'नारायण' म्हटला

तों. हे द्विजोत्तमा, असा ‘ नारायण ’-संज्ञक मी शाश्वत व अव्यय असून र्व प्राण्यांची उत्पत्ति व संहार करणारा आहें. मी विष्णु, ब्रह्मा, सुराधिप इंद्र, श्रवण कुबेर, यम, शिव, सोम, कश्यप, प्रजापति, धाता, विधाता आणि त आहें.

त्याचप्रमाणें अग्नि हें माझें मुख असून, पृथ्वी हे दोन पाय, चंद्र-सूर्य हे भय नेत्र, स्वर्ग हेंच मस्तक आणि आकाश व दिशा हेंच श्रोत्र आहे. जल माझ्या शरीरापासून उत्पन्न झालेला स्वेद असून सर्व दिशांसह नभोमंडल झा मध्य देह आहे. वायु माझ्या मनामध्यें स्थित असतो.

मी विपुल दक्षिणायुक्त असंख्य यज्ञ करितों. वेदवेत्ते जन देवयजनामध्यें गत असलेल्या माझेंच यजन करितात. पृथ्वीवरील सर्व क्षत्रियश्रेष्ठ नृपति गांच्या इच्छेनें माझेंच यजन करितात व स्वर्ग जिंकण्याची इच्छा करणारे य मलाच भजतात. मीच शेष होऊन मेरु-मंदरांनीं भूपित व चतुःसमुद्रांनीं रवेष्टित असलेली ही वसुंधरा धारण करितों.

हे विप्रा, पूर्वी जलामध्यें बुडणाऱ्या पृथ्वीला मीच वराहरूप धारण करून ऱ्या सामर्थ्यानें ओढून काढिलें. मीच अग्नि व वडवानल होऊन सव जल शन करितों व पुनः पर्जन्यरूपानें वृष्टि करितों.

हे मार्कंडेया, माझ्या मुखांत ब्राह्मण, बाहूंत क्षत्रिय, मांड्यांमध्यें वैश्य व गांत शूद्र अवस्थित आहेत. तसेंच ऋक्, साम, यजु व अथर्वण हे चारी वेद ानें व व्युत्क्रमानें मजपासूनच प्रादुर्भूत होतात व मजमध्येंच लय पावतात. म-क्रोध-द्वेषरहित, जितेंद्रिय, निष्पाप व अध्यात्मज्ञानी यति माझेंच चिंतन ताात. यतनशील व शांतिपर विप्र माझी उपासना करितात.

मीच संवर्तक वह्नि, वायु व सूर्य आहें. नभस्थलांत दिसणारे सर्व तारे ऱ्या देहावरील रोमच्छिद्रें आहेत व चारी दिशांतील समुद्र माझें वसन, ान व विलयस्थान आहे, असें जाण. हे विप्रा, मींच देवकार्यासाठीं त्या साग- ा उत्तम विभाग केला आहे. त्याचप्रमाणें काम, क्रोध, हर्ष, भय व मोह हे ते रोम आहेत, असें समज.

सत्य, दान, उग्र तप व प्राण्यांची अहिंसा हें शुभ कर्म करून मानव मलाच ा होतात. हे धर्मज्ञा, माझ्या देहांत विहार करणारे हे सर्व जीव माझ्याच गेनें व मीच ज्यांच्या विज्ञानाचा पराभव केला आहे, असे होत्साते सर्व

व्यवहार करितात. आपल्या इच्छेनें कांहीं करूं शकत नाहींत. जें माझें परम पद दुष्कर्मे करणाऱ्या, लोभी, कृपण, अनार्य व जितेंद्रिय नसलेल्या लोकांस मिळत नाहीं, तें सम्यक् वेदाध्ययन करणाऱ्या, विधियुक्त यज्ञ करणाऱ्या, शांत व क्रोध-रहित ब्राह्मणांना प्राप्त होतें. तस्मात् भावितात्म्यांनीं सेवन केलेलें महाफल हेंच आहे, असें जाण. हा योग्यांनीं सेवन केलेला मार्ग मूढांना दुष्प्राप्य आहे.

हे मार्कंडेया, जेव्हां जेव्हां धर्माचा क्षय व अधर्माचा उत्कर्ष होतो तेव्हां तेव्हां मी राम-कृष्णादि अवतार धारण करून व्यक्त होतों. ज्याप्रमाणें सूर्याला वस्तुतः आविर्भाव-तिरोभावांचा कधीं स्पर्शहि होत नसतो, परंतु आपण त्याच्यावर ते आरोपित करितों आणि सूर्याचा उदय व अस्त झाला, असें मानितों, त्याप्रमाणें जन्म-मरणांनीं रहित असलेल्या मज नंदकुमाराच्या ठिकाणींहि मूढांनीं जन्मादि कल्पिले आहेत.

हे मुनिश्रेष्ठा, जेव्हां देवांनाहि अवध्य असलेले हिंसानुरक्त दारुण दैत्य व राक्षस या लोकीं उत्पन्न होतील, तेव्हां मी मनुष्यदेह धारण करून शुभ कर्मे करणाऱ्या लोकांच्या गृहांत जन्म घेईन, आणि सर्वांचा नाश करून अधर्माचें प्रशमन करीन. हे ब्रह्मन्, मी देव, मनुष्य, गंधर्व व राक्षसादिकांसह इतर सर्व स्थावर-जंगम भूतें उत्पन्न करितों व स्वमायेनें त्यांचा संहार करितों. पुनः कर्मकालीं जगाची मर्यादा राखण्यासाठीं अविचिन्त्य मनुष्यदेह निर्माण करून मी त्यांत प्रवेश करितों.

हे विद्वन्, माझा वर्ण कृतयुगांत श्वेत, त्रेतामध्यें पीत, द्वापरांत रक्त व कली-मध्यें कृष्ण असतो. कलियुगांत तीन चतुर्थांश अधर्म असतो आणि जगाचा अंत होण्याचा समय प्राप्त झाला असतां मी एकटाच दारुण कालाचें रूप घेऊन सर्व स्थावर-जंगमासह त्रैलोक्याचा नाश करितों.

हे विप्रश्रेष्ठा, मी त्रैलोक्यांत सचार करणारा त्रिवर्त्मा, विश्वात्मा, सर्वलोक-सुखावह, सर्वगामी, अनंत, हृषीकेश आहें. ज्याच्या आश्रयानें सर्व लोक उद्योग करितात व जें सर्व भूतांचा नाश करितें, तें रूपरहित कालचक्र मी एकटाच फिरवीत असतों. याप्रमाणें सर्व भूतांमध्यें माझा आत्मा सम्यक् वास्तव्य करीत असतो. पण कोणीहि मानव मला जाणत नाहीं.

हे द्विजा, सर्व लोकांमध्यें माझे भक्त माझी सर्व प्रकारें पूजा करितात. हे धर्मज्ञा, माझ्या जठरामध्यें तुला जे कांहीं क्लेश प्राप्त झाले असतील, ते सर्व

तुझा सुखोदय व श्रेय यांसाठीं आहेत. या लोकीं तूं जेवढें स्थावर-जंगम पहातोस, तें सर्व मींच उत्पन्न केलेलें आहे.

सर्वलोकपितामह माझें अर्धशरीर असून मींच त्याला भूतोत्पत्तीसाठीं निर्मिलें आहे. मी शंख-चक्र-गदा धारण करणारा नारायण आहें. युगांचीं सहस्र परिवर्तनें होईपर्यंत मी विश्वात्मा सर्व भूतांना मोहित करीत शयन करितों. याप्रमाणें पितामह जागृत होईपर्यंत मी जरी वस्तुतः बाल नाहीं तरी शिशु-रूपानें येथें वास करीत आहें.

हे विप्रसत्तमा, मीच प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाच्या रूपानें तुला वारंवार वर देत असतों. हें सव स्थावर-जंगम जगत् एकार्णवांत नष्ट झालेल पाहून तूं व्याकुळ झाला आहेस, हें जाणूनच मीं तुला समग्र जगत् दाखविलें. तूं जेव्हां माझ्या शरीरांत प्रवेश केलास व तेथें सर्व जगत् पाहून विस्मयानें भ्रांत झालास, तेव्हां मीं तुला माझ्या मुखांतून सत्वर बाहेर काढीन.

हे ब्रह्मर्षे, देव-दानवांसहि दुर्ज्ञेय अशा माझ्या स्वरूपाची मीं तुला ओळख करून दिली आहे. आतां जोंवर तो महातपस्वी भगवान् ब्रह्मा जागृत झाला नाहीं, तोंवर तूं येथें सुखानें व निर्भयपणें संचार कर. त्यानंतर लोकपितामह जागृत झाला असतां, मी त्याच्याशीं एकीभूत होऊन सर्व प्राणिशरीरें, आकाश, पृथ्वी, ज्योति, वायु, जल आणि या लोकीं जेवढें स्थावर-जंगम आहे, तेवढें सर्व निर्माण करीन.

मार्कंडेय—हे धर्मराजा, असें बोलून तो परम अद्भुत देव अंतर्धान पावतो. नंतर त्यानें निर्माण केलेल्या या सर्व विविध आणि विचित्र प्रजा माझ्या दृष्टीं पडतात. हे राजन्, युगक्षयाचा काल प्राप्त झाला असतां असें हें महदाश्चर्य मीं पहातों. हे भरतश्रेष्ठा, वीं मीं जो कमलपत्राक्ष देव पाहिला, तोच हा तुझा आप्त जनार्दन आहे. याच्याच वरदानानें मला दीर्घायु आणि स्वच्छंद मरण प्राप्त होऊन माझी स्मृति नष्ट होत नाहीं.

हे युधिष्ठिरा, तोच हा अचिंत्यस्वरूपी, पुराण पुरुष वार्ष्णेय प्रभु कृष्णरूपानें जणुकाय क्रीडाच करीत आहे. हाच धाता, विधाता, संहारकर्ता, शाश्वत, श्रीवत्सचिह्नांकित व प्रजापतींचा पति आहे. या आदिदेव पीतांबरधारी

---

१ जोंवर विराडात्मा प्रगट झाला नाहीं म्ह० स्थूल देहाध्यासाचा उदय होण्यापूर्वी जीवानें सूक्ष्म देहांतच रहावें, असा याचा स्पष्टार्थ आहे.

वृष्णिश्रेष्ठाला पाहून मला पूर्वस्मृति होत आहे. हे कुरुश्रेष्ठांनो, हा माधव सर्व भूतांचा माता-पिता आहे. या शरण्य प्रभूला तुम्ही सर्व शरण जा.

**वैशंपायन**—राजा, मार्कंडेयाचें हें वचन ऐकतांच त्या पांची पांडवांनीं द्रौपदीसह जनार्दनाला नमस्कार केला. तेव्हां त्या मानार्ह पुरुषोत्तमानें त्यांचा यथाविधि सत्कार करून मधुर शब्दांनीं त्या सर्वांचें सान्त्वन केलें. ३.१२.१८९.

---

## अध्याय १९० वा.

[ १ युधिष्ठिराचा प्रश्न. २ मार्कंडेयानें केलेलें कलियुगांतील अधर्माचें सविस्तर वर्णन. ३ कल्कीचा अवतार. ]

**वैशंपायन**—जनमेजया, कुंतीपुत्र युधिष्ठिरानें महामुनि मार्कंडेयाला 'आपल्या साम्राज्यानंतर जगाची स्थिति कशी होईल!' असा पुनः प्रश्न केला.

( १ ) **युधिष्ठिर**—हे वक्त्यांतील श्रेष्ठ भार्गवमुने, युगाच्या आरंभीं उत्पत्ति आणि प्रलय यांविषयींचें आश्चर्यकारक वृत्त आम्हीं तुझ्या तोंडून ऐकिलें. आतां कलियुगामध्यें सर्व धर्मांचा संकर झाला असतां अवशिष्ट राहिलेल्या जगाचा उत्कर्ष कसा होतो, त्या कालीं मानवांचा पराक्रम, आहार व विहार कसा असतो, युगक्षय झाला असतां मनुष्याचें आयुष्य किती असतें, त्यांचा निवास कशा प्रकारचा असतो आणि किती कालावधीनंतर पुनः कृतयुग सुरू होतें ! हें सर्व मला सविस्तर सांग. हे मुने, खरोखर तूं मोठ्या विचित्र कथा सांगतोस !

( २ ) तेव्हां तो महर्षि मार्कंडेय वृष्णिश्रेष्ठ कृष्ण व पांडव यांचें रंजन करीत पुनः म्हणाला—'हे राजन्, देवाधिदेवाच्या प्रसादानें मीं पूर्वीं जें पाहिलें, ऐकलें व अनुभविलें आहे तें कलियुगांतील सर्वलोकांचें भविष्यवृत्त सांगतों, ऐक. हे भरतश्रेष्ठा, कृत युगांतील धर्म चार पायांनीं युक्त असलेल्या वृषभाप्रमाणें चतुष्पाद असतो. तो निष्कपट व लोभादिरहित धर्म मनुष्यांमध्यें पूर्णपणें स्थित असतो. त्रेतायुगांत अधर्मानें विद्ध झालेला धर्म तीन अंशांनीं प्रतिष्ठित असतो. द्वापरांत धर्म अर्ध्या अधर्मानें मिश्र होतो आणि कलियुगामध्यें अधर्म तीन अंशांनीं सर्व लोकांना व्यापून रहातो.

हे भरतश्रेष्ठा, कलियुगामध्यें केवल एकचतुर्थांश धर्म लोकांमध्य वास करितो. मनुष्याचें आयुष्य, वीर्य, बुद्धि, बल व तेज यांचा ऱ्हास होतो. हे युधिष्ठिरा, क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य व शूद्र कपट धर्माचें आचरण करितात.

पंडितंमन्य लोक धर्माचें जाळें पसरून सत्याचा संक्षेप करितात आणि सत्याची हानि झाल्यामुळें ते अल्पायु होतात. आयुष्याचा क्षय झाल्यामुळें द्विज विद्येवर उपजीविका करूं शकत नाहींत. विद्याहीन झाल्यामुळें अज्ञानानें ते लोभग्रस्त होतात.

हे पांडवा, लोभ व क्रोध यांनीं युक्त असलेले कामासक्त मूढ जन परस्परांच्या वधाची इच्छा करीत वैरानें बद्ध होतात. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचा परस्परांशीं संकर होतो. तप व सत्य यांनीं रहित असलेले ते शूद्रतुल्य होतात. चांडालादि हीन वर्ण क्षत्रियांचें कर्म करितात आणि क्षत्रियादि श्रेष्ठ वर्ण चांडालांचें कर्म करितात, यांत संशय नाहीं. युगाचा अंत समीप आला म्हणजे लोकांचें आचरण अशा प्रकारचें होतें.

हे राजा, त्या कालांत तागाचें वस्त्र व हरकाचें धान्य श्रेष्ठ मानलें जातें. युगक्षयाच्या प्रसंगीं पुरुष भार्येलाच आपला मित्र मानूं लागतात. लोक मत्स्याहारावर उदरनिर्वाह करितात आणि गायी नष्ट झाल्यामुळें शेळ्या-मेंढ्यांच्या दूधावर उपजीविका करितात. नित्य व्रताचरण करणारे पुरुषहि लोभी होतात. मनुष्यें परस्परांच्या धनादिकांचा अपहार करून हिंसा करितात. ब्राह्मणहि जपरहित, नास्तिक व चोर होतात.

हे नृपश्रेष्ठा, नदीतीरावर पशूंच्या अभावीं कुदळीनें खणून धान्य पेरावें लागतें व तेंहि अल्प फल देतें. श्राद्धादि पितृतर्पण व देवतार्चन करणारे नियतव्रत पुरुषहि लोभपरायण होऊन परस्परांच्या वित्ताचा अपहार करतात. पिता पुत्रावर व पुत्र पित्यावर उपजीविका करतो. युगान्तसमयीं भोज्यपदार्थांच्या मर्यादेचें अतिक्रमण होतें.

तर्कवादानें मोहित झालेले वेदनिंदक ब्राह्मण व्रताचरण, यज्ञ व होम करणार नाहींत. ते मोहित झालेले तार्किक हीन कर्मांत आसक्त होतील. मनुष्यें निमुळत्या प्रदेशांत शेती करतील, गायींना व एक वर्षाच्या गोवत्सालाहि नांगराला जुंपतील. पिता पुत्राचा व पुत्र पित्याचा वध करील आणि 'मीच ब्रह्म आहें' असें म्हणणाऱ्या त्य उद्वेगहीन लोकांची त्यांच्या निंद्य कृत्याबद्दल निंदाहि होणार नाहीं !

हे युधिष्ठिरा, म्लेच्छप्राय झालेलें हें सर्व जगत् निष्क्रिय, यज्ञवर्जित आणि आनंद व उत्सव यांनीं रहित होईल. मनुष्यें कृपणाचें, वारस असलेल्यांचें व विधवांचेंहि धन हरण करतील. लोक बलहीन, आढ्य, लोभ-मोहपरायण व

स्तुतिप्रिय होतील. ते कपटाचार व परिग्रह करणारे मानव दुष्टांपासूनहि परिग्रह करतील. पापबुद्धि राजे परस्परांचा वध करण्यास उद्युक्त होऊन आह्वान करतील. युगान्तसमयीं मूर्ख असलेले क्षत्रिय स्वतःस पंडित मानून लोककंटक होतील. मान व अहंकार यांनीं दृप्त झालेले लुब्ध नृपति प्रजेचें रक्षण न करितां केवळ दंडपरायण होतील.

हे भारता, निर्दय लोक सज्जनांना रडत बसवून त्यांचें द्रव्य व दारा यांचा उपभोग घेतील. कोणीहि कन्येची याचना करणार नाहीं व कोणी कन्या अर्पण करणार नाहीं. युगान्त समीप आला असतां पति स्वतःच दारपरिग्रह करील. राजे असंतुष्ट व अविवेकी होऊन अनेक उपायांनीं परद्रव्याचा अपहार करतील. हें सर्व जगत् म्लेच्छमय होईल.

सोदर भ्राते परस्परांची वंचना करितील. पंडितंमन्य लोकांकडून सत्याचा अपलाप होईल. वृद्ध बालवृत्तीचे व बाल वृद्धस्वभावाचे बनतील. त्याचप्रमाणें शूर व मानी लोक भीरु बनतील आणि भित्रे शूर होतील. युगान्तसमयीं कोणीहि परस्परांवर विश्वास ठेवणार नाहीं.

लोभ व मोह यांत स्थित असलेलें हें सर्व जगत् मांसादियुक्त एकाच प्रकारचा आहार करील, भक्ष्याभक्ष्याचा भेद रहाणार नाहीं; त्या वेळीं अधर्माची वृद्धि होऊन धर्म कुंठित होईल. हे राजा, युगक्षयाच्या कालीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या वर्णविभागाचा नाश झाल्यामुळें सर्वांचा एकच वर्ण होईल. पिता पुत्राचा व पुत्र पित्याचा वध करील. पत्नी पतीची शुश्रूषा करणार नाहीं.

हे धर्मराजा, युगांतसमयीं सर्व नागरिक जन हें भारतवर्ष सोडून जेथें यव आणि गहूं उत्पन्न होतात, त्या देशांचा आश्रय करितील. स्वैर वर्तन करणारे पुरुष व स्त्रिया परस्परांचा उत्कर्ष सहन करणार नाहींत. लोक देवतांचें पूजन व श्राद्धांनीं पितृतर्पण करणार नाहींत. कोणी कोणाचा श्रोता किंवा गुरु होणार नाहीं. त्या वेळीं सर्व लोक अज्ञानतमानें ग्रस्त होतील. सोळाव्या वर्षींच आयुष्याची परमावधि होइल व लोक प्राण सोडतील. हे भारता, त्या कालीं पांच किंवा सहा वर्षांच्या बाला प्रसूत होतील आणि सात किंवा आठ वर्षांचे कुमार प्रजा उत्पन्न करूं लागतील.

युगान्त समीप आला असतां पतीपासून पत्नीला व भार्येपासून भर्त्याला सुख प्राप्त होणार नाहीं. पति-पत्नी परस्परांवर संतुष्ट रहाणार नाहींत. लोकांचें

वित्त कमी होईल, परंतु ते धनाचा वृथा दर्प वहातील व हिंसापरायण होतील. कोणी कोणाचा दाता होणार नाहीं.

हे भारता, युगान्तसमयीं सर्व मनुष्यें म्लेच्छाचार करणारीं, सर्वभक्षक व दारुण कर्मांत आसक्त होतील, यांत संशय नाहीं. त्या कालीं सर्व लोक वित्त-लोभानें क्रय-विक्रयांत परस्परांची वंचना करितील. ज्ञेय वस्तूंचें स्वरूप न जाणतां लोक कर्में करूं लागतील. युगाचा क्षय समीप आला असतां स्वभावतःच क्रूर कर्में करणारे लोक परस्परांवर मिथ्या आरोप करूं लागतील. ते निःशंकपणें उद्यानें व वृक्ष यांचा नाश करतील. प्राण्यांच्या जीविताचाहि संशय उत्पन्न होईल. लोभग्रस्त लोक ब्राह्मणांच्या वित्ताचा उपभोग घेण्यासाठीं ब्रह्महत्या करितील. शूद्रांनीं पीडलेले द्विज भयार्त होऊन 'हाय, हाय' करीत भ्रमण करतील. परंतु त्यांना या समग्र पृथ्वीतलावर कोणी त्राता मिळणार नाहीं. याप्रमाणें लोक जेव्हां जीविताचा अंत करणारे, क्रूर, भयंकर व प्राणिहिंसक होतील तेव्हां त्या युगाचा नाश होईल.

हे कुरुश्रेष्ठा, त्या कालीं त्रस्त होऊन इतस्ततः फिरणारे ब्राह्मण नद्यांचे तीर व दुर्गम पर्वत यांचा आश्रय करितील. चोरांनीं पीडा दिलेले किंवा नीचवृत्तीवर उपजीविका करणारे, आणि दुष्ट राजांकडून करभारानें त्रस्त झालेले लोक धैर्य सोडून शूद्रांचे परिचारक होऊन निषिद्ध कर्में करूं लागतील. शूद्र धर्मोपदेश कर-तील, आणि त्यांची उपासना करणारे ब्राह्मण त्यांचें वचन प्रमाण मानून श्रोते बनतील.

युगान्तसमयीं श्रेष्ठ लोक हीन होतील व हीन श्रेष्ठ होतील, असें सर्व विश्व विपरीत होईल. लोक देवतांना वर्ज्य करतील व अस्थींच्या भिंतींचें पूजन करूं लागतील. शूद्र द्विजांची परिचर्या करणार नाहींत. महर्षींचे आश्रम, ब्राह्मणांचीं निवासस्थानें, देवालयें, चैत्य इत्यादि पवित्र स्थानीं मृतांच्या अस्थि पूजिल्या जातील. त्या वेळीं पृथ्वी देवगृहांनीं भूषित होणार नाहीं. युगक्षय होत आला म्हणजे युगांताचीं अशीं लक्षणें दिसूं लागतील.

हे महाराज, तेव्हां पुरुष क्रूर, धर्महीन, मांसभक्षक व मद्यपी होतील. पुष्पाला पुष्प व फलाला फल येऊं लागेल. अकालीं पर्जन्यवृष्टि होईल. मनुष्यांच्या

---

१ मागच्या कांहीं श्लोकांचीच येथें पुनरुक्ति असल्यामुळें त्यांतील कांहींचा संक्षेप करून कांहीं मुळींच सोडले आहेत.

क्रिया क्रम सोडून होऊं लागतील. शूद्र ब्राह्मणांशीं विरोध करूं लागतील. सर्व पृथ्वी अल्पावधींतच म्लेच्छमय होईल. द्विज करभाराच्या भयानें दाही दिशेंत भ्रमण करूं लागतील. देशांतील विशेष नाहींसे होतील. सर्व देशांतील आचार व वेष समान होतील. बलाढ्य लोक वेतनावांचून भृत्यांकडून काम करून घेतील. फल-मूलांवर उपजीविका करणारे लोक आश्रमाचें अवलंबन करतील. याप्रमाणें लोक पर्याकुल झाले असतां कोणतीच मर्यादा रहाणार नाहीं.

शिष्य गुरूच्या आज्ञेंत रहाणार नाहींत व त्याचें अप्रिय करूं लागतील. इतकेंच केवल नव्हे तर निर्धन आचार्यांची निर्भर्त्सना करतील. मित्र व आप्तसंबंधी जन द्रव्यार्जनासाठीं प्रवास करितील, स्नेहधर्मानें करणार नाहींत. सर्व भूतांचा अभाव होईल. सर्व दिशा प्रज्वलित होतील. नक्षत्रें निस्तेज होतील. सर्व ज्योति प्रतिकूल होतील व वायु उलट दिशेनें वाहूं लागतील. महाभयनिदर्शक अनेक उल्कापात होतील. भास्कर अन्य सहा आदित्यांसह प्रदीप्त होईल. आकाशांत भयंकर गर्जना होतील.

हे राजा, जेव्हां सर्व दिशांचा दाह होईल, सूर्याला उदय व अस्त या समयीं ग्रहण लागेल, भगवान् इंद्र अकालीं पर्जन्यवृष्टि करील व तृणधान्यादि उगवणार नाहींत, तेव्हां युगाचा नाश होईल.

हे नृपश्रेष्ठा, युगाचा क्षय समीप आला असतां क्रूर, भयंकर व कठोर भाषण करणाऱ्या रोदनप्रिय स्त्रिया पतीचें वचन मानणार नाहींत. पुत्र आपल्या जनक-जननीचा वध करितील. स्त्रिया पुत्रांचा आश्रय करून पतीचा घात करितील. पर्वकालावांचूनच सूर्याला ग्रहण लागेल. अग्नि सर्वत्र प्रदीप्त होईल.

अन्न-पानांची याचना करणारे पांथस्थ भोजन न देतां घालवून दिल्यामुळें आश्रयस्थानाच्या अभावीं मार्गांतच शयन करितील. मेघ परस्परांवर आपटून भयंकर गर्जना ऐकूं येतील. वायस, हत्ती, पशु व पक्षी कर्णकटु ध्वनि करतील. त्या वेळीं पुरुष आप्त, इष्टजन व सर्व परिवार यांचा त्याग करतील आणि भिन्न भिन्न देश, दिशा, नगरें व पुरें यांचा क्रमानें आश्रय करितील. ' हे तात, हे पुत्रा, ' असा परस्परांना उद्देशून आक्रोश करीत लोक पृथ्वीपर्यटन करतील. याप्रमाणें युगक्षयप्रसंगीं सर्वत्र भयंकर व्याकुलता पसरेल.

( ३ ) त्यानंतर हे राजा, क्रमानें द्विजातीचा उत्कर्ष होऊं लागेल. यदृच्छेनें पुनः दैव अनुकूल होईल व पुनः लोकांची वृद्धि होऊं लागेल. ज्या वेळीं गुरु,

सूर्य व चंद्र हे एकत्र पुष्य नक्षत्राला प्राप्त होऊन एका राशीला येतील, तेव्हां कृतयुगाची प्रवृत्ति होईल, असें जाणावें. तेव्हां पर्जन्य योग्य वेळीं वृष्टि करील. शुभ नक्षत्रें प्रकाशतील आणि अनुकूल ग्रह फलदायक होतील. सर्व देश सुपीक होऊन आरोग्ययुक्त व निरामय होईल.

त्या वेळीं हे महाराज, 'संभल'-नामक एका पवित्र ब्राह्मणाच्या गृहीं 'विष्णु-यश '-संज्ञक ब्राह्मणरूपानें कल्कीचा अवतार होईल. तो महाबुद्धिमान् व पराक्रमी पुरुष केवल चिंतन करून वहानें, आयुधें, शस्त्रें, कवचें उपस्थित करील. तो धर्मविजयी पुरुष चक्रवर्ती राजा होईल आणि हें सर्व व्याकुल झालेल जगत् प्रसन्न होईल. असा तो देदीप्यमान उदारबुद्धि ब्राह्मण सर्व युगाच्या अव्यवस्थेचा नाश करून युगपरिवर्तन करील. तो ब्राह्मणांनीं परिवेष्टि-लेला द्विज सर्वत्र पसरलेल्या शूद्रांचा म्लेच्छगणांसह नाश करील." ३.१२.१९०

---

## अध्याय १९१ वा.

[ १ मार्कंडेयानें वर्णिलेला कृतयुगाचा आरंभ व वृत्तान्त. २ युधिष्ठिराला उपदेश. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, तो द्विज पुढें चोरांचा नाश करून अश्वमेध यज्ञामध्यें द्विजांना या पृथ्वीचें विधिवत् दान देईल. नंतर तो ब्राह्मण स्वयंभू प्रजापतीला विहित असलेल्या शुभ मर्यादा पुनः प्रस्थापित करील व यशस्वी कर्में करणारा तो पुण्यात्मा रमणीय वनामध्यें प्रवेश करील. तेव्हां पृथ्वीवर रहाणारे मानव त्याच्याच शीलाचें अनुवर्तन करतील. त्या विप्रानें चोरांचा नाश केला असतां सर्वत्र क्षेम होईल.

त्यानंतर तो ब्रह्मचाऱ्यांनीं परिधान करावयाचीं कृष्णाजिनें व युद्धोपयोगी शक्तिप्रभृति आयुधें यांची जिंकून घेतलेल्या आपल्या राज्यांत समृद्धि करून ब्रह्मकर्म व राजधर्म या दोहोंच्या संयोगानें ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या धर्मांची व्यवस्था लावून देईल. नंतर विप्रांकडून स्तुति केला जाणारा व द्विजांचा बहुमान करणारा तो कल्कि शत्रूंचा वध करण्यांत आसक्त होऊन सर्व पृथ्वीवर संचार करील. तो वीर ' हे माते, हे पुत्रा, हे तात ' असा आक्रोश करणाऱ्या शत्रूंचा मोठ्या त्वरेनें क्षय करील.

याप्रमाणें कृतयुगाला आरंभ झाला असतां अधर्माचा क्षय व धर्माची वृद्धि होऊं लागते. सर्व लोक विहित कर्में करूं लागतील. विविध उपवनें, चैत्य, सरोवरें, पुष्करणी, देवालयें यांनीं संपन्न झालेल्या देशांत अनेक यज्ञक्रिया होऊं लागतील. ब्राह्मण साधु, मुनि व तपस्वी होतील, आश्रम पाखंडाचा नाश करतील व सर्व प्रजा सत्याचारणी होतील. सर्व भूतें शुद्ध होतील. ब्राह्मणादिकांनीं संस्काररूपानें पेरून ठेविलेलीं व क्रियमाण कर्मांनीं दृढ संपादन केलेलीं बीजें ज्ञानबलानें नाश पावतील.

हे राजेंद्रा, सर्व ऋतूंमध्यें सर्व प्रकारचें धान्य योग्य कालीं उत्पन्न होईल. पुरुष व्रतें, नियम व दान यांत तत्पर होतील. ब्राह्मण जप-यज्ञपरायण होऊन धर्मकार्यांत आनंदानें निमग्न होतील. नृपति या वसुंधरेचें धर्मानें पालन करितील. वैश्य व्यवहारदक्ष होतील. ब्राह्मण यजन-याजन, अध्ययन-अध्यापन व दान-परिग्रह या षट्कर्मांत, क्षत्रिय युद्धादि पराक्रमांत, वैश्य व्यवहारांत व शूद्र त्रैवर्णिकांच्या शुश्रूषेंत रत होतील. हे राजा, हा धर्म कृत, त्रेता व द्वापर या तीन युगांत प्रतिष्ठित असतो. शेवटल्या कलियुगांतील लोकस्थितीचें वर्णन मीं नुक्तेंच केलें आहे. युगसंख्या तुला ठाऊकच आहे. याप्रमाणें मीं तुला ऋषींनीं प्रशंसा केलेल्या वायुपुराणाचें स्मरण करून ही भूत व भविष्यत्कालीन स्थिति सांगितली. मीं चिरंजीव असल्यामुळें अशाप्रकारचे अनेक संसारमार्ग पाहिले व अनुभविले आहेत. तेच मीं तुला निवेदन केले.

( २ ) आतां हे धर्मराजा, माझें हें व दुसरेंहि वचन तूं भ्रात्यांसह लक्षपूर्वक ऐक. तें धर्माविषयींच्या संशयाचें निरसन करणारें आहे. हे धर्मज्ञा, तूं स्वतःला नित्य धर्मामध्यें नियुक्त कर. कारण हे राजन्, धर्मात्मा इहलोकीं व परलोकीं सुखानुभव घेतो. मी तुला जें शुभ हितवचन सांगणार आहें, तें चित्त देऊन ऐक. हे महाराज, तूं ब्राह्मणांचा पराभव करण्याचें केव्हांहि मनांत आणूं नको. ब्राह्मण क्रुद्ध झाला असतां तो सर्व लोकांचा प्रतिज्ञेनें नाश करितो.

वैशंपायन—राजा, मार्कंडेयाचें हें वचन ऐकून बुद्धिमान् व परम तेजस्वी कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर त्याला म्हणाला—" हे मुने, प्रजेचें संरक्षण करणाऱ्या मीं कोणत्या धर्मांत स्थित व्हावें ! कसें वागलें असतां मी स्वधर्मापासून च्युत होणार नाहीं, तें मला सांग."

मार्कंडेय—हे पांडवा, तूं दयावान्, सर्व भूतांचा हितकर्ता, अनसूयक, सत्यवादी, मृदु, दान्त व प्रजेच्या रक्षणांत तत्पर होऊन धर्माचें आचरण कर.

अधर्माचा त्याग कर. पितर व देव यांचें पूजन कर. हे प्रभो, तुझ्या हातून प्रमादानें जें कांहीं अकार्य घडलें असेल, त्यावर सम्यग्दानानें जय मिळीव. तूं केव्हांहि अभिमान धरूं नको व सतत धर्मपराधीन होऊन रहा.

सर्व पृथ्वीला जिंकून सुखी व संतुष्ट हो. मीं तुला हा भूत व भविष्यत्-कालीन धर्म सांगितला आहे. इह लोकांतील कोणतेंहि भूत-भविष्यत् तुला अज्ञात नाहीं. यास्तव या क्लेशांमुळें तूं खिन्न होऊं नको. हे महाबाहो, ज्ञानसंपन्न लोक प्रत्यक्ष कालानें जरी पीडा दिली, तरी मोहित होत नाहींत. अशा प्रकारचा अनिष्ट काल देवादिकांसहि प्राप्त झालेला आहे आणि कालानेंच प्रेरणा केल्या-मुळें प्रजा मोहित होत असते.

हे निष्पापा, मीं तुला जें सांगितलें त्याविषयीं तूं साशंक होऊं नको. माझें वचन शंकनीय नाहीं. याविषयीं शंका घेतल्यास तुझ्या धर्माचा लोप होईल. हे भरतश्रेष्ठा, कुरूंच्या प्रसिद्ध कुलांत तुझा जन्म झाला आहे. यास्तव शरीर, वाक् व मन यांनीं हाच धर्म आचर.

**युधिष्ठिर**—हे द्विजश्रेष्ठा, तूं जें श्रवणीय वचन सांगितलेंस, त्या तुझ्या आज्ञेप्रमाणें वागण्याचा मी यत्न करीन. हे विप्रेंद्रा, माझ्या मनांत लोभ भय किंवा मत्सर यांचा लेशहि नाहीं; यास्तव तूं मला जें सांगितलेंस तें सर्व मी करीन.

**वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें बुद्धिमान् मार्कंडेयाचें हें भाषण ऐकून शार्ङ्गधर श्रीकृष्णासह सर्व पांडव, श्रेष्ठ ब्राह्मण आणि तेथें इतरहि जे वानप्रस्थ जमले होते, ते सर्व अतिशय संतुष्ट झाले. ज्ञानसंपन्न मार्कंडेयाच्या मुखानें ती प्राचीन शुभ कथा ऐकून त्या सर्वांस परम विस्मय वाटला. ३. १२. १९१.

---

## अध्याय १९२ वा.

[ १ मार्कंडेयानें सांगितलेली परीक्षित्-राजा व मंडूकराजकन्या यांची कथा. २ मडूकराजाचा शाप. ३ राजपुत्रानें केलेला वामी अश्वांचा अपहार. ४ वामदे-वाचा शाप. ५ राजपत्नीवर अनुग्रह. ]

**वैशंपायन**—राजा, ' पुनरपि ब्राह्मणांचें महाभाग्य सांगा' असें युधिष्ठिरानें म्हटलें असतां जारण-मारण-स्तंभनादि कर्मेंहि कृष्णाच्या अद्वैतज्ञानबलानेंच सिद्ध होतात, हें दर्शविण्यासाठीं मार्कंडेय ही मंडूकाख्यायिका सांगूं लागला.

( १ ) तो म्हणाला—युधिष्ठिरा, ब्राह्मणाचें हें एक अपूर्व चरित्र सांगतों ऐक. पूर्वी अयोध्येमध्यें 'परीक्षित्'-नांवाचा एक इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा होता. तो एकदा मृगयेला गेला असतां एकाच अश्वानें मृगाच्या मागें लागला. तेव्हां त्या मृगानें त्याला फार दूरवर नेलें. त्यावेळीं तो मार्गांतील श्रम, क्षुधा व तृषा यांनीं क्लांत होऊन चालला असतां त्या प्रदेशांत एक नीलवर्ण गहन वन त्याच्या दृष्टीं पडलें. त्यानें त्या वनांत प्रवेश केला. तेथ एक अतिशय रमणीय सरोवर त्याला दिसलें. तें पहातांच त्या राजानें अश्वासह त्यांत स्नान केलें व कमलांचे देंठ अश्वाच्या पुढें टाकून त्यानें त्या पुष्करणीच्या तीरावर शयन केलें. तो तेथें विश्रांति घेत असतां मधुर गीतध्वनि त्याच्या कानीं आला. तो सुस्वर ध्वनि ऐकून 'येथें मनुष्यांचा प्रवेशहि दिसत नाहीं, असें असतां हा मंजुल गीतरव कोणाचा बरं असावा' असा विचार तो आपल्या मनांत करूं लागला.

इतक्यांत तेथें पुष्पें वेंचित असलेली व गायन करणारी एक अतिशय सुस्वरूप कन्या त्याच्या दृष्टीं पडली. ती राजाच्या समीप आली. तेव्हां तिला पाहून राजा म्हणाला—"भद्रे तूं कोणाची व कोण आहेस ?"

राजाचा हा प्रश्न ऐकून ती म्हणाली—मी कन्या आहें. तिचें हें वचन ऐकतांच राजानें तिला म्हटलें—हे कुमारि, मी तुझी कामना करीत आहें.

त्यावर ती कन्या म्हणाली—माझा कांहीं नियम आहे, तो पाळल्यास तुला माझी प्राप्ति होईल, एरवीं होणार नाहीं. तेव्हां राजानें तिला 'तुझा नियम काय आहे' असें विचारिलें असतां ती कन्या म्हणाली—मला जलाशयाचें दर्शन होतां कामा नये.

तें ऐकून राजानें 'ठीक आहे' असें म्हटलें व तिचें पाणिग्रहण करून तो परीक्षित राजा मोठ्या संतोषानें तिच्यासह क्रीडा करीत तेथें स्तब्ध होऊन राहिला. तो राजा अशाप्रकारें बसला असतां त्याचें सर्व सैन्य तेथें आलें व त्याच्या सभोंवार उभें राहिलें. तेव्हां तो राजा आपल्या नवपरिणीत भार्येसह उत्कृष्ट शिबिकेंत बसून आपल्या नगरास परत गेला व तिच्यासह एकांतांत राहूं लागला. त्यामुळें त्या क्रीडासक्त राजाचें त्याच्या निकटस्थ जनांसहि दर्शन होईनासें झालें. तें पाहून राजाच्या मुख्य अमात्यांनीं अंतर्गृहांतील स्त्रियांना विचारिलें कीं, हा काय प्रकार आहे !

तेव्हां त्या स्त्रिया म्हणाल्या—खरोखर, आम्ही हें एक अपूर्वच पहात आहों. कारण भूपाल जेथें निवास करीत आहे, तेथें उदक मुळींच नेत नाहींत. तें ऐकून

अमात्यानें एक जलशून्य वन निर्माण करविलें. तें रमणीय उपवन प्रफुल्ल वृक्षांनीं व रसाळ फल-मूलांनीं युक्त होतें. त्या वनाच्या मध्यभागीं मोत्यांच्या जाळीनें आच्छादिलेलें एक वासंतीगृह असून त्याच्यामागें शुभ्र चुनेगच्चीनें शोभणारी एक गुप्त विहीर निर्माण केली होती.

नंतर तो अमात्य राजापाशीं जाऊन म्हणाला—" महाराज, हें वन अतिशय रम्य आहे, तेथें आपण आनंदानें विहार करावा." अमात्याचें हें वचन ऐकून राजानें भार्येसह त्या वनांत प्रवेश केला. कांहीं काल त्या रम्य उपवनांत विहार केल्यावर एकदा क्षुधा व तृषा यांनीं क्लांत व श्रांत झालेल्या त्या राजानें तेथें असलेलें वासंतीगृह पाहिलें. भार्येसह त्यांत प्रविष्ट झाल्यावर मधुर जलानें तुडुंब भरलेली व चुन्यानें बांधलेली एक धवल वापी त्याच्या दृष्टीं पडली.

ती जलपूर्ण विहिर पहातांच राजा भार्येसह तेथेंच बसला. नंतर तिला म्हणाला—"हे देवि, या विहिरींतील जलांत तूंहि उतर."

राजाचें हें वचन ऐकून ती राज्ञी वापीमध्यें उतरली व जलांत बुडाली, ती पुनः वर आली नाहीं. तेव्हां तिचा शोध करणाऱ्या राजानें ती विहीर उपसून पूर्णपणें निर्जल करून टाकिली. परंतु ती देवी त्याच्या दृष्टीं पडली नाहीं. तथापि एका बिळाच्या तोंडाशीं एक मंडूक त्याला दिसला. त्याला पहातांच त्या क्रुद्ध झालेल्या राजानें ' सर्वत्र मंडूकांचा वध करावा, आणि जो कोणी माझ्या दर्शनाला येईल त्यानें मृत मंडूकांची भेट घेऊन यावें ' अशी आज्ञा केली.

राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें राजाज्ञा झाली असतां सर्वत्र भयंकर मंडूकवध होऊं लागला. तेव्हां भयभीत झालेल्या सर्व मंडूकांनीं मंडूकराजापाशीं येऊन त्यास सर्व वृत्तान्त निवेदन केला. तें वृत्त ऐकून तो मंडूकांचा राजा तापस वेष धारण करून परीक्षित राजापाशीं आला व म्हणाला—'हे राजन्, तूं असा क्रोधवश होऊं नको. प्रसन्न हो. निरपराध मंडूकांचा असा वध करणें योग्य नाहीं.' इतकें बोलून त्यानें पुढील अर्थाचे दोन श्लोक म्हटले—

" हे अच्युता, मंडूकांचा संहार करूं नको. आपला कोप आवरून धर त्यायोगें अज्ञानी लोकांचें ऐश्वर्य, तप आणि उत्कर्ष यांचा क्षय होतो. यास्तव स्त्रीवियोगानें प्राप्त झालेल्या या क्रोधाचा त्याग करण्याची प्रतिज्ञा कर. तुझा हा अधर्म पुरे झाला. मंडूकांचा वध करून तुला काय लाभ होणार आहे ?"

त्या मंडूकाचें हें भाषण ऐकून इष्टवियोगानें व्याकुल झालेला राजा म्हणाला—“ हे विद्वन्, त्या दुरात्म्यांनीं माझी प्रिया भक्षिली आहे. त्यांना मी क्षमा करणार नाहीं. हे मंडूक सर्वथैव वधार्ह आहेत. त्यांचा मी संहार करीन. तूं माझ्याशीं व्यर्थ विरोध करूं नको. ”

राजाचें हें भाषण ऐकून खिन्न झालेला मंडूक म्हणाला—हे राजन्, मी ‘ आयु ’-नांवाचा मंडूकराज आहें आणि तुझी ती भार्या ‘ सुशोभना ’-नामक माझी दुहिता आहे. तिचा स्वभाव असाच दुष्ट आहे. तिनें आतांपर्यंत अशाप्रकारें अनेक राजांना फसविलें आहे.

त्यावर राजा म्हणाला—मी तिची कामना करीत आहें, यास्तव मला ती अर्पण कर.

( २ ) तेव्हां तिच्या पित्यानें ‘ या राजाची शुश्रूषा कर ’ असें बोलून आपली कन्या राजाला अर्पण केली आणि त्या क्रुद्ध झालेल्या पित्यानें तिला असा शाप दिला—“ ज्या अर्थीं तूं अनेक राजांची अशाप्रकारें वंचना केली आहेस, त्या-अर्थीं तुझ्या या अनृत दोषामुळें तुझीं अपत्यें ब्रह्मद्वेष करणारीं निपजतील. ”

त्यावेळीं तिच्या समागमसुखाविषयीं आतुर झालेला तो राजा तिच्या प्राप्तीनें जणुं काय त्रैलोक्याचें ऐश्वर्यच लाभलें आहे, असें मानून व मोठ्या हर्षानें तिच्या पित्याला प्रणाम करून सद्गदित कंठानें ‘ मी आपला अनुगृहीत आहें ’ असें म्हणाला. तेव्हां तो मंडूकराज आपल्या कन्येचा निरोप घेऊन आल्या मार्गानें निघून गेला.

त्यानंतर कांहीं कालानें त्या राजकन्येच्या ठिकाणीं राजाला तीन पुत्र झाले. त्यांचीं नांवें अनुक्रमें शल, बल आणि दल अशीं होतीं. पुढें योग्य कालीं तो राजा आपल्या ‘ शल ’-नामक ज्येष्ठपुत्रास राज्याभिषेक करून तपश्चरणाच्या हेतूनें वनांत निघून गेला. एकदा शल मृगयेला गेला असतां रथांत बसून मृगाचा पाठलाग करूं लागला. तो सारथ्याला म्हणाला—“ हे सूता, रथ वेगानें चालीव आणि मला सत्वर त्या मृगाच्या समीप ने. ”

तेव्हां सारथि राजाला म्हणाला—महाराज, असा आग्रह धरूं नको. कारण तुझा रथ वामदेवाच्या अश्वांनीं जरी युक्त असला, तरीहि हा मृग हातीं लागणें शक्य नाहीं. मग या सामान्य अश्वांची काय कथा ?

सूताचें हें वाक्य ऐकून राजा म्हणाला—वामी अश्व कसे असतात तें मला सांग. नाहींतर मी तुझा जीव घेईन. राजाचें हें वचन ऐकतांच 'सांगावें तर वामदेव शाप देईल, न सांगावें तर राजाचा कोप होईल' या भीतीनें तो सारथि कांहीं न बोलतां स्वस्थ बसला. तेव्हां राजानें खड्ग उपसून त्याला पुनः 'सत्वर सांग, नाहीं तर तुझा वध करीन' असें म्हटलें.

३ तेव्हां राजाच्या भीतीनें त्या सूतानें 'वामदेवाचे दोन अश्व मनासारखे वेगवान् आहेत' असें सांगितलें. तेव्हां राजा म्हणाला—"तर मग अगोदर वामदेवाच्याच आश्रमास चल पाहूं." राजाज्ञेप्रमाणें सूतानें रथ तेथें नेला असतां राजा वामदेवाला म्हणाला—"हे भगवन्, मीं विद्ध केलेला मृग पळून जात आहे. यास्तव तुझे दोन वामी अश्व देऊन माझी संभावना कर."

ऋषि—ठीक आहे. माझे वामी तुला देतों. पण तुझें कार्य होतांच माझे ते दोन्ही अश्व मला सत्वर परत आणून दे.

तेव्हां वामदेवाचें वचन मान्य करून राजानें ते दोन्ही अश्व घेतले व ऋषीची अनुज्ञा घेऊन तो वेगानें निघाला. त्यानें वामी अश्व जोडलेल्या रथांत बसून त्या मृगाचा पाठलाग केला. नंतर तो राजा सारथ्याला म्हणाला—"हे सूता, असे हे रत्नासारखे श्रेष्ठ अश्व ब्राह्मणाच्या काय उपयोगी! मी ते वामदेवाला परत देणार नाहीं." राजा, सारथ्याशीं असा संकेत करून त्या शलानें अश्वांच्या साह्यानें मृगांस गांठलें व ते अश्व वामदेवास परत न देतां तो त्यांसह आपल्या राजधानीस परत गेला आणि त्यानें ते दोन्ही अश्व अंतःपुरांत ठेविले.

इकडे वामदेव मनांत म्हणूं लागला—अहो! तो तरुण राजपुत्र माझें वाहन घेऊन गेला व त्यांतच सुखानें रमला आहे. अद्यापि माझे अश्व परत करीत नाहीं. काय करावें? फार वाईट गोष्ट झाली! असा विचार करीत एक महिना पूर्ण झाल्यावर तो ऋषि आपल्या शिष्याला म्हणाला—"हे आत्रेया, जा आणि त्या राजाला म्हणावें कीं, तुझें कार्य झालें असल्यास आमच्या आचार्यांचे वामी अश्व परत दे."

तेव्हां राजाकडे जाऊन त्या शिष्यानें गुरूची आज्ञा त्याला सांगितली. ऋषीचा तो निरोप ऐकून राजा म्हणाला—"अशाप्रकारचें अश्व-रत्न ब्राह्मणांच्या उपयोगी नाहीं. हें राजाचें वाहन आहे. ब्राह्मणांना अश्व घेऊन काय करावयाचे आहेत! यास्तव तूं आल्या मार्गानें निघून जा."

तें ऐकून त्या शिष्यानें आचार्यापाशीं परत येऊन घडलेला सर्व वृत्तान्त त्यास निवेदन केला. तेव्हां क्रोधाविष्ट झालेला वामदेव स्वतःच राजाकडे गेला व अश्वांची मागणी करूं लागला. परंतु राजानें ते त्याला दिले नाहींत.

(४) **वामदेव**—हे पार्थिवा, माझे वामी अश्व मला परत दे. त्यांनीं तुला अशक्य असलेलें कार्य केलें आहे. यास्तव ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यांत भेद करून तूं वरुणाच्या घोर पाशांनीं आपला वध होईल असा घोर प्रसंग आणूं नको.

**राजा**—हे वामदेवा, सुस्वभावी व उत्तम वृषभच ब्राह्मणांचें वाहन आहे. यास्तव हे महर्षे, तुला इष्ट असलेल्या स्थलीं तूं त्याच वाहनावरून जात जा. शिवाय तुझ्यासारख्यांना वेद वाहून नेत असतात.

**वामदेव**—हे राजा, परलोकामध्यें माझ्यासारख्यांना वेदच वाहून नेत असतात हें सत्य आहे. तथापि या लोकीं माझें व मजसारख्या इतरांचेंहि अश्व हेंच वाहन आहे.

**राजा**—हे ब्राह्मणा, चार गर्दभ, चार खेचरी व वायूसारखे वेगवान् चार अश्व तुला वाहून नेण्यास पुरे आहेत. त्यांतून तूं जा. हे वामी अश्व क्षत्रियांचें वाहन आहे. यास्तव हे अश्व माझे आहेत, तुझे नाहींत, असें समज.

**वामदेव**—हे राजन्, तूं ब्राह्मणाच्या वस्तूवर निर्वाह करण्याची इच्छा करीत आहेस. हें तुझें घोर कर्म अनिष्ट फल देणारें आहे. माझ्या प्रेरणेनें लोहाप्रमाणें दृढ असलेले घोररूपी भयंकर चार राक्षस हातीं शूल घेऊन तुझीं शकलें करोत व तीं चार दिशेंत वाहून नेवोत.

**राजा**--हे वामदेवा, तूं ब्राह्मण असून मनानें, वाणीनें व कर्मानें माझा वध करण्यास प्रवृत्त होत आहेस, हें कळतांच हातीं तीक्ष्ण शूल घेतलेले माझे अनुचर माझ्या आज्ञेनें शिष्यांसह तुझा नाश करितील.

**वामदेव**--हे राजन्, 'तुझे हे दोन वामी अश्व मी परत आणून देईन' असें बोलून तूं ते घेऊन गेलास, यास्तव तुला जर जिवंत रहाण्याची इच्छा असेल तर ते माझे अश्व मला सत्वर परत दे.

**राजा**—ब्रह्मन्, ब्राह्मणांना मृगया विहित नाहीं. यास्तव तुझ्याजवळ हे अश्व असणेंच संभवत नाहीं. तूं त्यावर आपलें वृथा स्वामित्व सांगत आहेस. तरीहि असें असत्य भाषण करणाऱ्या तुला मी शासन करीत नाहीं, उलट तुझ्या अपराधाची क्षमा करून आजपासून मी तुझ्या आज्ञेंत वागेन व त्यायोगें पुण्यलोकास प्राप्त होईन.

वामदेव—हे राजा, ब्राह्मण केव्हांहि दंडाला पात्र होत नसतो. ब्राह्मणाला कोणीहि शरीरानें, वाणीनें व मनानें शासन करूं शकत नाहीं. जो ब्राह्मणसेवी विद्वान् याप्रमाणें ब्राह्मणजातीला जाणतो, तो दीर्घायु होतो आणि याच्या उलट वागणारा ब्राह्मणद्वेष्टा नाश पावतो. यास्तव तुझे हे दोन्ही मनोरथ व्यर्थ आहेत.

मार्कंडेय—युधिष्ठिरा, वामदेव असें बोलत आहे तोंच तेथें चार घोररूपी राक्षस प्रकट झाले व ते हातांतील शूलांनीं राजावर प्रहार करीत असतां राजा उच्च स्वरानें म्हणाला—"हे ब्रह्मन्, मी तर तुझे हे अश्व परत देणार नाहींच. परंतु इक्ष्वाकुवंशांतील क्षत्रिय, माझा कनिष्ठ भ्राता दल आणि हे सर्व वैश्यहि जर माझे आज्ञांकित असतील, तर तेहि तुज वामदेवाचे अश्व तुला परत देणार नाहींत.

हे पांडवा, असें बोलतांच राक्षसांनीं वध केल्यामुळें तो पृथ्वीपति तत्काल भूमीवर पडला. त्यानंतर तो राजा मृत झाल्याचें कळतांच इक्ष्वाकुवंशजांनीं दलाला राज्याभिषेक केला. 'दल' राज्यारूढ झाल्यावर तो वामदेव पुनः तेथें येऊन राजाला बोलला—"हे दला, ब्राह्मणांना दान द्यावें असें सर्व धर्मांमध्यें श्रुत आहे. यास्तव, तुला जर अधर्माची भीति वाटत असेल, तर माझे वामी अश्व मला सत्वर परत दे."

वामदेवाचें हें वचन ऐकून तो राजा क्रोधानें आपल्या सारथ्याला म्हणाला—"हे सूता, माझ्या संग्रहाला असलेला विचित्र स्वरूपाचा विषलिप्त बाण मला सत्वर आणून दे. माझ्या बाणानें विद्ध झालेला हा वामदेव आर्त होऊन भूमीवर पडो व श्वान त्याला तोडून विह्वल करोत."

वामदेव—हे नरेंद्रा, तुला सम्राज्ञीच्या ठिकाणीं झालेला एक दहा वर्षांचा पुत्र आहे, हें मला ठाऊक आहे. तूं सोडिलेला घोर बाण माझ्या प्रेरणेनें तुझ्या त्या प्रिय पुत्राचा वध करील. मला विद्ध करणार नाहीं.

मार्कंडेय—हे धर्मराजा, वामदेव असें बोलला असतां राजाच्या हातून सुटलेला तो प्रखर तेजस्वी बाण मोठ्या वेगानें अंतःपुरांत शिरला व त्या विषलिप्त बाणानें राजपुत्राचे प्राण हरण केले.

ही वार्ता कानीं येतांच दल म्हणाला—अरेरे, वाईट गोष्ट झाली. हरकत नाहीं; इक्ष्वाकुवंशजांनो, मी तुमचें प्रिय करीन. आज मी या ब्राह्मणाला क्लेश देऊन त्याचा वध करितों. हे भूपालहो, मला आणखीं एक तीक्ष्ण बाण आणून द्या व माझा पराक्रम पहा.

**वामदेव**—हे राजन्, तूं जर हा घोर विषलिप्त बाण मला अनुलक्षून धनुष्याला जोडिलास, तर तूं शरसंधान करण्यास व बाण जोडण्यासहि समर्थ होणार नाहींस.

हे पांडुपुत्रा, वामदेवाच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच त्या राजाचे हात व पाय स्तंभित झाले. त्याला ते हलवितांहि येईनात. तेव्हां तो म्हणाला—" हे इक्ष्वाकूद्भव नृपालहो, पहा, या विप्रानें मला बद्ध केलें आहे. मला हा शर सोडतां येत नाहीं आणि याचा नाश करण्याचाहि मला उत्साह वाटेनासा झाला आहे यास्तव हा आयुष्मान् वामदेव जिवंत राहो.

(५) **वामदेव**—हे मानवेंद्रा, तूं बाणानें आपल्या राज्ञीला विद्ध कर म्हणजे ती तुला ब्रह्महत्याव्यवसायाच्या पातकापासून मुक्त करील.

युधिष्ठिरा, तेव्हां वामदेवाच्या सांगण्याप्रमाणें आचरण करितांच त्या राजाचे स्तंभित झालेले हस्तपाद पुनः पूर्ववत् झाले. त्या वेळीं ती राजपत्नी मुनीला म्हणाली—" हे वामदेवा, माझ्या या निर्दय पतीला ज्याअर्थीं मी कल्याणकर अशा वचनानें नित्य अधर्मापासून परतविण्याचा प्रयत्न करीत असत्यें, त्याअर्थीं ब्राह्मणांची सेवा करण्याची इच्छा करणाऱ्या मला पुण्यलोकाची प्राप्ति व्हावी."

**वामदेव**—हे राजपुत्रि, तूं आज राजकुलाचें रक्षण केलें आहेस. यास्तव मी तुला अप्रतिम वर देईन. तूं इष्ट वर मागून घे. हे अनिंदिते, तूं स्वजनांचे आणि या अतिशय मोठ्या इक्ष्वाकुराज्याचेंहि पालन कर.

**राजपुत्री**—हे भगवन्, माझ्या पतीला या पातकापासून मुक्त कर. हे द्विजश्रेष्ठा, पुत्र व बांधव यांसह त्याचें कल्याण व्हावें, हे वर मला दे.

**मार्कंडेय**—हे कुरुश्रेष्ठा, त्या राजनंदिनीचें तें वचन ऐकून मुनि 'तथास्तु' असें म्हणाला. तें पाहून राजा फार संतुष्ट झाला व त्यानें त्या विप्रश्रेष्ठाचे वामी अश्व त्याला परत दिले. ३. १२. १९२.

---

## अध्याय १९३ वा.

[ १ युधिष्ठिराचा प्रश्न. २ इंद्र-बकसंवाद. ३ दीर्घायु लोकांच्या सुख-दुःखांचें वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर युधिष्ठिर, ब्राह्मण आणि इतर ऋषि यांनीं 'बक दिर्घायु कसा झाला' असा मार्कंडेयाला पुनः प्रश्न केला. तेव्हां

'ब्रह्मविद्या जरी प्राप्त झाली तरी दीर्घायु दुःखमिश्रितच असतें, यास्तव विदेह कैवल्यच श्रेष्ठ आहे' अशा आशयानें—

**मार्कंडेय** म्हणाला—हे पांडवा, बक राजर्षि महातपस्वी व दीर्घायु होता. त्याच्या विषयीं विचार करण्याचें कारणच नाहीं.

मार्कंडेयाचें हें उत्तर ऐकून भ्रात्यांसह युधिष्ठिर पुनः म्हणाला—हे भगवन्, बक व दाल्भ्य हे दोघे महात्मे चिरंजीव असून देवराज इंद्राचे प्रिय सखे होते असें श्रुत आहे. त्या लोकसंमत बकाचा व इंद्राचा झालेला समागम व त्यांनीं केलेला सुख-दुःखांचा विचार तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे. तो समग्र वृत्तान्त मला सांग.

( २ ) **मार्कंडेय**—हे राजन्, पूर्वीं जेव्हां देव-दानवांचा अंगावर रोमांच आणणारा संग्राम झाला, तेव्हां इंद्राला त्रैलोक्याचें आधिपत्य प्राप्त झालें. त्यामुळें पर्जन्य योग्य वेळीं वृष्टि करूं लागला व या लोकीं तृण-धान्यांची समृद्धि झाली. सर्व प्रजा धर्मपरायण, नीतिमती व निरोगी झाल्या. सर्व लोक स्वधर्माचें पालन करीत आनंदानें राहूं लागले.

तेव्हां हे राजन्, सर्व प्रजा आनंदांत आहेत असें पाहून संतुष्ट झालेल्या इंद्रानें ऐरावतावर आरूढ होऊन त्या हृष्ट प्रजेचें समीक्षण केलें. तो देवराज शतक्रतु विचित्र आश्रम, विविध पवित्र नद्या, समृद्ध नगरें, खेडीं, देश, प्रजापालनांत दक्ष व धर्माचरणी नृपाल, अनेक प्रकारचे जलाशय आणि वेदपारंगत द्विजोत्तमांनीं सेवन केलेलीं सरोवरें, यांस अवलोकन करीत रम्य पृथ्वीवर उतरला.

तेथें रमणीय पूर्व दिशेमध्यें समुद्राच्या समीप पवित्र प्रदेशांत देवेंद्रानें एक मनोरम आश्रम पाहिला. विपुल वृक्षांनीं शोभणाऱ्या व पशुपक्ष्यांनीं व्याप्त असलेल्या त्या रम्य आश्रमांत बक-राजर्षि त्याच्या दृष्टीं पडला. बकहि शतक्रतूला पाहून अतिशय संतुष्ट झाला. त्यानें त्या सुरेंद्राची पाद्य, आसन अर्घ्यदान इत्यादिकांनीं पूजा करून फल-मूलांनीं त्याचा सत्कार केला.

नंतर सुखासनावर बसलेल्या त्या वरद त्रिदशेश्वरानें बकाला असा प्रश्न केला—हे निष्पाप मुने, तुझा जन्म होऊन अनेक हजार वर्षें होऊन गेलीं आहेत. यास्तव, दीर्घायु लोकांना कसलें दुःख अनुभवावें लागतें, तें मला सांग.

(३) बक—हे सुरेशा, दीर्घायु माणसांना अप्रिय लोकांचा सहवास व प्रिय जनांचा वियोग प्राप्त होतो आणि दुर्जनांशीं व्यवहार करावा लागतो. स्त्री-पुत्र, ज्ञातिजन व सुहृद् यांचा विनाश झाल्यामुळें पराधीन होऊन रहावें लागतें. याहून अधिक कष्टकर काय आहे ! हे देवेंद्रा, द्रव्यहीन पुरुषाचा इतर लोक अनादर करीत असतात, याहून अधिक दुःखकर कांहीं असेलसें मला वाटत नाहीं. चिरंजीव माणसें नेहमीं अकुलीनांची वृद्धि व कुलीनांचा कुलक्षय होत असलेला पहातात. हे पाकशासना, हीन कुलोत्पन्नांस ऐश्वर्य प्राप्त झालें असतां त्यांचें कुलहि कसें कुलीन मानलें जातें, हें तूं प्रत्यक्ष जाणतोसच. देव, दानव, गंधर्व, मानव, उरग, राक्षस या सर्वांची स्थिति पालटत असते. याहून अधिक खेदजनक दुसरें काय आहे ! सुकुलांत उत्पन्न झालेले लोक दुष्कुलीनांच्या अधीन होऊन क्लेश भोगीत असतात. धनानें आढ्य झालेले लोक दरिद्री माणसांचा अवमान करितात. ज्ञानहीन मूढ जन सौख्यांत असतात व ज्ञानसंपन्न विद्वान् क्लेश भोगतात, असा विपरीत प्रकार सर्वत्र दृष्टीं पडतो. एकंदरींत या लोकीं मनुष्यजन्म अनेक प्रकारचें दुःख व क्लेश यांनीं युक्त असल्याचें दिसून येतें.

इंद्र—हे देवर्षिगणसेवित महात्म्या, दीर्घायु लोकांचें सुख कशा प्रकारचें असतें, हें मला सांग.

बक—हे मघवन्, जो मनुष्य आठ किंवा बारा दिवसांनीं एकदा कां होईना पण आपल्या घरांत केवळ भाजी शिजवून निर्वाह करितो, पण दुर्जनांचा आश्रय करीत नाहीं, जो चार दिवस कोठें गेला असतां 'हा पाहुणा आतां कधीं जाणार ?' म्हणून घरांतील माणसें दिवस मोजीत नाहींत, व ज्याला कोणी खादाडहि म्हणत नाहींत, त्याहून अधिक सुखी कोण आहे ?

[1]स्वकष्टानें द्रव्य संपादन करून स्वतःच्या घरांत केवल भाजीपाला खाणाराहि सुखी होय. दुसऱ्याच्या घरचें तिरस्कारानें दिलेलें मिष्टान्न नित्य सेवन करण्यापेक्षां स्वतःच्या घरचें केवल फल किंवा भाजी यांवर निर्वाह करणें अधिक श्रेयस्कर आहे, असें सज्जनांचें मत आहे. जो कृपण श्वानाप्रमाणें परान्नाची लालसा करितो, त्या दुरात्म्याला धिक्कार असो.

---

१ अपि शाकं पचानस्य सुखं वै मघवन् गृहे । अर्जितं स्वेन वीर्येण नाप्युपाश्रित्य कंचन ॥ फलशाकमपि श्रेयो भोक्तुं ह्यकृपणं गृहे । परस्य तु गृहे भोक्तुं परिभूतस्य नित्यशः । सुमृष्टमपि न श्रेयो विकल्पोऽयमतः सताम् ॥

हे सुरेश्वरा, जो पुरुष अतिथि, पितर व भूतें यांस अर्पण करून अवशिष्ट राहिलेलें अन्न स्वतः भक्षण करितो, त्याच्यासारखा भाग्यवान् कोण आहे ? हे शतक्रतो, नित्य अतिथीला देऊन अवशिष्ट राहिलेलें अन्न आपण सेवन करणें यांहून अधिक मधुर व पवित्र कार्य दुसरें कोणतेंहि नाहीं. अन्नाचे जेवढे ग्रास ब्राह्मण भक्षण करितो, तेवढ्या सहस्र गोप्रदानांचें फल त्या अन्नदात्याला प्राप्त होत असतें आणि त्या दात्याच्या हातून तारुण्यांत जें कांहीं पातक घडलें असेल, तें सर्व निःसंशय नष्ट होऊन जातें. दक्षिणेसह भोजन केलेल्या ब्राह्मणाच्या हातावरील जलाचें स्वतःच्या शरीरावर सिंचन करणारा मनुष्य तत्काल पापमुक्त होतो.

या व आणखींहि अनेक शुभ कथा सांगितल्यावर इंद्रानें बकमुनीची अनुज्ञा घेऊन इंद्रलोकीं प्रयाण केलें. ३. १२. १९३.

---

## अध्याय १९४ वा.

[ १ मार्कंडेयानें वर्णिलेलें क्षत्रियमाहात्म्य. ]

**वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर पांडवांनीं पुनः मार्कंडेयाला प्रश्न केला कीं, ब्राह्मणांचें महाभाग्य आम्हीं ऐकलें. आतां क्षत्रियांचें माहात्म्य निवेदन कर.

( १ ) तें ऐकून युद्ध व प्रजापालन यांत व्यग्र असलेल्या नृपतीमध्येंहि विद्याबल असतें, हें दाखविण्यासाठीं मार्कंडेय महर्षि म्हणाला—हे पांडुपुत्रांनो, मी तुम्हांला आतां क्षत्रियांचें महद्भाग्य सांगतों, तें ऐका. एकदा, कुरुकुलोत्पन्न 'सुहोत्र'-नामक एक राजा महर्षींना भेटून परत येत असतां त्याला मार्गांत उशीनराचा पुत्र शिबि रथांतून येत असलेला दिसला. तेव्हां परस्परांच्या अभिमुख असलेल्या त्या उभयतांनीं आपापल्या वयोमानानुसार एकमेकांचा योग्य सत्कार केला. पण गुणांनीं तुल्य असलेल्या त्या दोघांनीं 'आम्हां दोघांची योग्यता समान आहे' असें मानून परस्परांस मार्ग दिला नाहीं.

इतक्यांत देवर्षि नारद तेथें प्रकट होऊन म्हणाला—अरे, तुम्ही दोघेहि परस्परांचा मार्ग अडवून उभे राहिलां आहां, याचा अर्थ काय ?

नारदाचा हा प्रश्न ऐकून ते दोघे म्हणाले—हे भगवन्, आमच्यांतील कोणीं कोणाला मार्ग द्यावा, याचाच निश्चय होत नाहीं. प्राचीन व्यवहारज्ञांनीं 'जो श्रेष्ठ व समर्थ असेल, त्याला निकृष्ट व असमर्थ पुरुषानें मार्ग द्यावा' असा

उपदेश केला आहे. आम्ही परस्परांच्या मित्रत्वास प्राप्त झालों आहों. त्यामुळें आमच्यांतील श्रेष्ठ-कनिष्ठभाव नष्ट झाला आहे. तेव्हां कोणीं कोणाला मार्ग द्यावा ?

ते नृपति असें बोलले असतां नारदानें तीन श्लोक म्हटले—" हे कौरव्या, क्रूर माणसें मृदुवृत्तीच्या लोकांना व मृदु क्रूरांना, त्याचप्रमाणें सज्जन दुर्जनांस व दुर्जन सज्जनांस मार्ग देत असतात. मग तुम्हींच परस्परांस मार्ग देण्याचें सौजन्य कां दाखवूं नये ! एकानें दुसऱ्यावर शकडों उपकार जरी केले असले तरी त्या उपकारांचें प्रमाण किती असावें याचा देवांनींहि निर्णय केलेला नाहीं.

शिवाय, हे राजा, हा औशीनर तुझ्याहून सच्छील आहे. हे भूपते, कृपणाला दानान, असत्यवाद्याला सत्यानें, क्रूर कर्मे करणारास क्षमेनें व दुर्जनाला सदाचरणानें जिंकावें, असे श्रुत आहे. तुम्ही दोघेहि उदार अहां. यास्तव तुम्हां उभयतां पैकीं जो कोणी स्वतःस श्रेष्ठ मानीत असेल, त्यानें बाजूला सरकून दुसऱ्याला मार्ग द्यावा. त्यायोगेंच श्रेष्ठत्व निदर्शनास येईल. " असें बोलून नारद स्तब्ध झाला.

देवर्षीचें हें भाषण ऐकतांच कुरुश्रेष्ठ सुहोत्रानें औशीनर शिबीला प्रदक्षिणा करून त्याच्या अनेक कर्मांची प्रशंसा केली आणि त्याला मार्ग देऊन तो निघून गेला. हे महाराज, याप्रमाणें शिबिनृपतीचें महद्भाग्य नारदानें कथन केलें. ३. १२. १९४.

---

## अध्याय १९५ वा.

[ १ मार्कंडेयानें वर्णिलेलें ययातीचें औदार्य. ]

( १ ) **मार्कंडेय**— हे युधिष्ठिरा, हें आणखीं एक नृपचरित्र ऐक. पूर्वी नहुषपुत्र ' ययाति '-नामक एक राजा होता. तो एकदा आपल्या प्रजाजनांसह सभेंत बसला असतां गुरुदक्षिणेसाठीं याचना करणारा एक ब्राह्मण तेथें आला व म्हणाला—" हे राजन्, मी गुरुदक्षिणेसाठीं तुजपाशीं भिक्षा मागण्यास आलों आहें. परंतु माझी कांहीं अट आहे. " तें ऐकून राजा म्हणाला—" हे भगवन्, तुझी अट काय आहे ती सांग. "

---

१ जयेत्कदर्यं दानेन सत्येनानृतवादिनम् ।
क्षमया क्रूरकर्माणमसाधुं साधुना जयेत् ॥

**ब्राह्मण**—हे नृपाला, या मर्त्यलोकीं सर्व लोक याचकाचा द्वेष करीत असतात, यास्तव तूं जर मला संतोषानें भिक्षा घालशील तरच मी तिचा स्वीकार करीन. हे भूपते, मी प्रथम असें विचारितों कीं मला इष्ट असलेली भिक्षा तूं मला कशी काय देणार आहेस ? द्वेषानें कीं प्रीतीनें ?

**राजा**—हे दानास योग्य असलेल्या विप्रा, मी एकदा दान केल्यावर त्याचा पुनः उच्चारहि करीत नसतों. कारण दान करून तें दुसऱ्यास सांगितलें असतां दुःखद होतें. एरवीं दुःखद होत नाहीं. माझ्यापाशीं अयाच्य म्ह० मागण्यास अयोग्य अशी एकहि वस्तु असल्याचें माझ्या स्मरणांत नाहीं. तुलाहि अयाच्य असें कांहीं मागावयाचें नाहीं व मजपाशीं अदेय असें कांहींच नाहीं. मला प्राप्त असलेलें—वित्तासह स्त्री-पुत्रादिकांपासून माझ्या देहापर्यंत सर्व देयच आहे. अप्राप्य वस्तु देतां येणें शक्यच नाहीं. यास्तव मला जें प्राप्त आहे तें देऊन मी सुखी होईन.

हे ब्राह्मणा, याचना करणारा विप्र मला प्रिय आहे. यास्तव मी तुला एक सहस्र धेनु देतों. याचकाचा मला केव्हांहि क्रोध येत नाहीं व कोणत्याहि वस्तूचें दान केल्यानंतर मला त्याचा विषाद वाटत नाहीं.

असें बोलून राजानें त्या ब्राह्मणाला सहस्र गायी दिल्या आणि सहस्र धेनूंच्या प्राप्तीनें तो विप्रहि संतुष्ट झाला. ३. १२. १९५.

---

## अध्याय १९६ वा.

[ १ मार्कंडेयानें सांगितलेलें सेदुक वृषदर्भाचें चरित्र. ]

**वैशंपायन**—राजा पारिक्षिता, युधिष्ठिरानें पुनः 'आणखीं एका नृपालाचें महाभाग्य कथन करा' असें म्हटलें असतां मार्कंडेय मुनीनें 'राजांनीं आपला नियमभंग करणाऱ्या ब्राह्मणांस दंड जरी केला तरी त्यानें मागितलेल्या भिक्षेहून अधिक वित्त देऊन त्याला प्रसन्न करण्यासहि ते समर्थ असतात' हें दर्शविण्यासाठीं पुढील कथा आरंभिली.

( १ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, पूर्वीं वृषदर्भ व सेदुक या नांवाचे दोघे भूपाल अतिशय नीतिमान् व अस्त्रें आणि उपास्त्रें यांत प्रवीण होते. वृषदर्भानें बालपणापासूनच ब्राह्मणांस रौप्य व सुवर्ण यांवांचून अन्य कसलेंहि दान द्यावयाचें नाहीं, असें गुप्त व्रत ग्रहण केल्याचें सेदुकाला ठाऊक होतें. एकदा सेदुक-

राजाजवळ कोणी एक वेदाध्ययनसंपन्न ब्राह्मण आला व त्यानें राजाला आशीर्वाद देऊन 'हे राजा, मला गुरुदक्षिणार्थ सहस्र अश्व दे' अशी भिक्षा मागितली.

तेव्हां सेदुक त्या ब्राह्मणाला म्हणाला—हे विप्रा, तुला इष्ट असलेली ही गुरुदक्षिणा मला देतां येण्याचा संभव नाहीं. यास्तव तूं वृषदर्भराजापाशीं जा. तो भूपति परम धर्मज्ञ आहे, त्याच्यापाशीं तूं ही भिक्षा माग. तो तुला इष्ट वस्तु देईल. कारण त्याचें असें गुप्त व्रतच आहे.

सेदुकाच्या सांगण्यावरून त्या भिक्षार्थी ब्राह्मणानें वृषदर्भाच्या समीप जाऊन सहस्र अश्वांची याचना केली. ती ऐकतांच राजानें त्या याचकाला कोरड्यानें ताडन केलें.

तेव्हां 'मज निरपराध्याला तूं ताडन कां करितोस?' असें बोलून तो राजाला शाप देऊं लागला.

तें पाहून राजा म्हणाला—हे विप्रा, जो कोणी तुला आपलें धन देऊं इच्छीत नाहीं, त्याला असा शाप देणें उचित आहे किंवा ब्राह्मणाला योग्य असलेलें हें ब्राह्मण्यहि देणारा शापाला योग्य आहे? शिवाय शांति-धर्मपरायण असलेल्या ब्राह्मणानें शाप देणें योग्य नव्हे.

ब्राह्मण—हे राजाधिराज, सेदुकानें पाठविल्यामुळें मी तुजपाशीं भिक्षा मागण्यास आलों. त्या राजाच्या सांगण्यावरून मी तुजपाशीं भिक्षा मागितली.

राजा—हे ब्रह्मन्, आज राज्यांतून मजकडे जो कर येईल तो सर्व उद्यां सकाळीं मी तुला देईन. ज्याला कोरड्यानें ताडन केलें त्याला वृथा दूर कसें करतां येईल! त्याला अवश्य प्रसन्न केलेंच पाहिजे.

असें बोलून त्या राजानें आपलें एका दिवसाचें सर्व उत्पन्न म्हणजे सहस्र अश्वांहूनहि अनेक पटीनें अधिक द्रव्य त्या ब्राह्मणाला दिलें. ३. १२. १९६.

---

## अध्याय १९७ वा.

[ १ शिबीचें औदार्य. ]

( १ ) मार्कंडेय—राजा युधिष्ठिरा, एकदा स्वर्गामध्यें देवांच्या परस्पर गोष्टी चालल्या असतां 'आपण भूतलावर जाऊन औशीनर शिबीची चांगली

---

१ हें आख्यान पूर्वी तीर्थयात्रापर्वात ( अध्याय १३१ ) आलेलें आहे. यास्तव त्यांत आलेल्या कथेचा संक्षेप करून तेथें नसलेला भाग मात्र घेतला आहे.

परीक्षा पाहूं या' असें बोलणें निघालें. तें ऐकून इंद्र व अग्नि 'ठीक आहे' असें म्हणून हें कार्य करण्यास सज्ज झाले. अग्नीनें कपोतरूप धारण केलें व इंद्र श्येनरूपानें आमिषार्थ त्याच्या मागें लागला.

नंतर दिव्यासनावर बसलेल्या शिबिराजाच्या मांडीवर तो कपोत जाऊन पडला. तेव्हां पुरोहित राजाला म्हणाला—" हे महाराज, श्येनाच्या भीतीनें हा कपोत प्राणरक्षणार्थ तुझ्या आश्रयाला आला आहे. परंतु कपोत अंगावर पडणें अनिष्टसूचक असल्याचें श्रुत आहे. यास्तव पृथ्वीपतीनें वसुदान देऊन या अशुभाचा परिहार करावा."

इतक्यांत तो कपोत राजाला म्हणाला—हे राजा, मीं एक मुनि असून या कपोतशरीरांत प्रवेश केला आहे. या श्येनाच्या भीतीनें प्राणरक्षणासाठीं मी तुला शरण आलों आहें. स्वाध्यायानें कृश झालेला मी ब्रह्मचर्य, तप व दम यांनीं युक्त आहें. आचार्याशीं कधींहि प्रतिकूल भाषण न केल्यामुळें मी निष्पाप आहें, असें तूं समज. मी वेद म्हणतों व छंद जाणतों. मीं सर्व वेदांचें अध्ययन केलें आहे. माझ्यासारख्या श्रोत्रियाला श्येनाच्या स्वाधीन करणें हें योग्य दान नव्हे. तस्मात् मला श्येनाच्या हातीं देऊं नको. कारण मी वस्तुतः कपोत नाहीं.

त्यानंतर श्येन राजाला म्हणाला—हे प्रजापालका, या जगच्चक्रामध्यें या जन्मांतील पिता, पुत्र, भार्या, माता इत्यादि जे आप्त असतात ते पुढल्या जन्मीं त्याच्या विपरीत संबंधी होतात. या जन्मांतील भार्या जन्मांतरीं माता, पुत्र असलेला पिता व शत्रु असतो तो मित्र होतो. याप्रमाणें अन्य जन्मीं स्थिति होत असते. हे राजा, पूर्वजन्मीं तूं या कपोतापासून उत्पन्न झाला होतास. यास्तव आपल्या जन्मांतरींच्या पित्याचें रक्षण करून माझ्या आहारांत विघ्न आणूं नको.

तें ऐकून कपोत व श्येन यांच्यासारख्या पक्ष्यांनीं सुसंस्कृत वाणीनें भाषण केल्याचें कोणीं कधीं पाहिलें आहे काय? हे दोघे कोण आहेत? त्यांचें स्वरूप जाणून मीं यांच्याशीं उचित व्यवहार कसा बरें करावा? तथापि शरणागताला शत्रूच्या स्वाधीन करणें योग्य नाहीं. कारण जो नृपति भयार्त शरणार्थी जीवाला शत्रूच्या हस्तगत करितो, त्याच्या राज्यांत वर्षाकालीं पर्जन्यवृष्टि होत नाहीं. योग्य कालीं पेरलेलें धान्य उगवत नाहीं आणि संकटकालीं त्याचें कोणीं संरक्षण करीत नाहीं. त्याची प्रजा अल्पायु होते, त्याच्या गृहांत पितर वास्तव्य करीत नाहींत व त्यानें

अर्पण केलेल्या हवींचें देव ग्रहण करीत नाहींत. त्याचें अन्न निष्फल होतें. तो अनुदार पुरुष स्वर्गांतून सत्वर भ्रंश पावतो. इंद्रासह देव त्याच्यावर वज्रप्रहार करितात. मनांत असा विचार करून तो राजा म्हणाला—"हे श्येना, या कपोताला सोडून माझे भृत्य तुला वृषभाचें मांस आणि भात शिजवून कपोताच्या प्रतिनिधित्वानें समर्पण करोत. तूं ज्या प्रदेशांत सुखानें विहार करीत असशील, तेथें शिबिकुलोत्पन्न नर तुला मांस देवोत."

**श्येन**—हे राजन्, मला वृषभमांसाची इच्छा नाहीं. मला या कपोतावांचून इतर कोणतेंहि मांस प्रिय नाहीं. हे प्रभो, आज देवांनींच मला हें भक्ष्य दिलें आहे. यास्तव हा एकच पक्षी तूं मला दे.

**राजा**—हे श्येना. माझे परिजन तुला यत्किंचित्‌हि क्लेश न देतां एखादा पुष्ट बैल किंवा सर्वांगांची पूर्ण वाढ झालेली वंध्या धेनु यांचा शोध करोत आणि ते पशु या भयग्रस्त कपोताच्या बदली माझ्या आज्ञेनें तुला पोंचते करोत. परंतु तूं या कपोताचा नाश करूं नको. हे सोम्य श्येना, हा कपोत किती प्रियदर्शन आहे हें तूं जाणत नाहींस काय? हा क्रतुवत् नित्य पालन करण्यास योग्य आहे. मी प्राणत्याग करीन, परंतु हा कपोत तुला देणार नाहीं. तूं व्यर्थ क्लेश पावूं नको. मी ह्या कपोतास तुझ्या स्वाधीन कदापि करणार नाहीं.

हे श्येना, ज्यायोगें शिबिकुलोत्पन्न श्रेष्ठ पुरुष प्रसन्न होऊन धन्यवादांनीं माझी प्रशंसा करितील आणि ज्यायोगें तुझेंहि प्रिय होईल, असें कार्य मला सांग. मी तें तत्काल करीन.

**श्येन**—हे राजन्, या कपोताच्या वजनाइतकें तूं आपल्या उजव्या मांडीचें मांस काढून मला दे. म्हणजे कपोताचें उत्तम प्रकारें रक्षण होईल. शिबिवंशज तुझी प्रशंसा करितील आणि माझेंहि प्रिय घडेल.

**मार्कंडेय**—राजा युधिष्ठिरा, नंतर शिबीनें आपल्या मांडीचें मांस कापून पुनः पुनः ताजव्यांत घातलें, तरीहि कपोताचेंच वजन अधिक भरलें. शेवटीं शिबिराजा प्रसन्न मनानें स्वतःच तागडींत बसला. तें पाहून 'तूं कपोताचें रक्षण केलेंस' असें म्हणून श्येन गुप्त झाला. तेव्हां राजा कपोताला म्हणाला—हे कपोता, शिबिवंशज तुला कपोतच समजतील. परंतु हा श्येन कोण आहे? खरोखर कोणीहि अनीश्वर अशाप्रकारचें कर्म करूं शकणार नाहीं. यास्तव हे भगवन्, माझ्या या प्रश्नाचें उत्तर दे.

कपोत—हे नृपश्रेष्ठा, मी धूमकेतु वैश्वानर अग्नि असून, हा श्येन वज्रधर इंद्र आहे. तुज सुरथपुत्राची परीक्षा पहाण्यासाठीं आम्ही तुझ्यापाशीं आलों. हे भूपाला, तूं माझ्या मोबदल्यांत आपल्या शरीरांतील जें मांस खड्गानें कापून दिलेंस, तें मी तुम्हां नृपांचें सुवर्णमय, सुंदर व सुगंधयुक्त असें राजचिह्न करितों.

या शरीरापासून प्रजेचें पालन करणारा, यशस्वी व देव आणि ऋषि यांना संमत असलेला असा सुलक्षणी पुत्र लवकरच उत्पन्न होईल. त्याचें नांव ‘कपोतरोम’ असें ठेव. हे पृथ्वीपाला, तो तुझा पुत्र वृषभाप्रमाणें सुदृढ, आपल्या यशानें देदीप्यमान होणारा व शूर निपजेल. तुझ्या या शिथिल शरीरापासून उत्पन्न झालेला तो तेजस्वी पुत्र कपोतरोम लवकरच तुझ्या दृष्टीं पडेल. ३. १२. १९७.

---

## अध्याय १९८ वा.

[ १ नारदानें वर्णिलेलें शिबीचें श्रेष्ठत्व. ]

(१) वैशंपायन—जनमेजया, युधिष्ठिरानें मार्कंडेयाला ‘नृपतीचें आणखी माहात्म्य सांगा’ असें म्हटलें असतां मार्कंडेय म्हणाला—धर्मराजा, वैश्वामित्र अष्टकाच्या अश्वमेध यज्ञांत सर्व राजे जमले होते. त्यांत अष्टकाचे प्रतर्दन, वसुमना व औशीनर शिबी असे तिघे भ्राते होते. यज्ञ समाप्त झाल्यानंतर अष्टक आपल्या या तिन्ही भ्रात्यांसह रथांतून चालला असतां मार्गांत त्यांस नारद येत असलेला दिसला.

तेव्हां त्या सर्व भ्रात्यांनीं देवर्षीला वंदन करून ‘भगवन् या रथांतून चलावें’ असें म्हटलें. तेव्हां नारदमुनि ‘ठीक आहे’ असें बोलून रथारूढ झाला. नंतर त्यांतील एका भ्रात्यानें सुरर्षि नारदाला म्हटलें—“भगवंतांस प्रसन्न करून कांहीं प्रश्न करावा अशी इच्छा आहे.” त्यावर देवर्षीनें ‘अवश्य विचार’ असें म्हटलें.

भ्राता—हे धर्मज्ञा, आम्ही सर्व दीर्घायु व सर्वगुणसंपन्न आहों. यास्तव आम्ही चौघेहि चिरकाल भोग्य असलेल्या स्वर्गलोकीं जाऊं. पण आमच्यांतील कोणता भ्राता प्रथम भूलोकीं येईल ?

नारद—हा अष्टक प्रथम भूलोकीं येईल.

भ्राता—कां बरें ? त्यानें स्वर्गांतून च्युत होण्याचें कारण काय ?

**नारद्**—एकदा मी अष्टकाच्या घरीं वास्तव्य केलें असतां तो मला रथांतून नेत होता, तेव्हां मीं विविध वर्णांच्या सहस्त्रावधि धेनु पाहिल्या व त्याला विचारलें कीं, या गायी कोणाच्या आहेत ?

त्यावर अष्टक म्हणाला—' मीं दान दिलेल्या या सर्व धेनु आहेत. ' याप्रमाणें त्यानें स्वकर्मांची प्रौढी सांगून आत्मश्लाघा केल्यामुळें तो स्वर्गांतून प्रथम खालीं पडेल.

नारदाचें हें भाषण ऐकून तो भ्राता पुनः म्हणाला—आम्ही तिघे स्वर्गांत जाऊं तेव्हां त्यांतून कोण खालीं येईल ?

**नारद्**—हा प्रतर्दन स्वर्गांतून खालीं उतरेल.

**भ्राता**—तो कोणत्या कारणानें खालीं येईल ?

**नारद्**—मी प्रतर्दनाच्याहि गृहीं राहिलों होतों. एकदा तो मला रथांतून घेऊन चालला असतां एक भिक्षार्थी ब्राह्मण त्याच्याकडे येऊन ' मला अश्व दे ' अशी याचना करूं लागला. तेव्हां प्रतर्दनानें ' मी परत आल्यावर तुला अश्व देईन ' असें त्यास सांगितलें. परंतु तो ब्राह्मण ' सत्वर दे ' असें म्हणाला. त्यावेळीं ' ठीक आहे, मी ब्राह्मणाला त्वरितच दान देतों ' असें बोलून त्यानें उजव्या बाजूच्या रथचक्राकडील अश्व सोडून तो ब्राह्मणाला दिला.

इतक्यांत दुसरा एक अश्वार्थीच ब्राह्मण आला. त्याच्याशींहि पूर्वीप्रमाणेंच संभाषण होऊन प्रतर्दनानें डावीकडील अश्वाचें दान केलें. पुनः तिसरा ब्राह्मण येऊन तोहि अश्व मागूं लागला. तेव्हां राजानें रथाच्या धुरेजवळील डाव्या बाजूचा अश्व त्याला अर्पण केला. थोड्या वेळानें चवथा ब्राह्मण आला व तोहि पूर्वींच्या इतर तिघांप्रमाणेंच अश्वाची भिक्षा मागूं लागला. तेव्हां राजानें पूर्ववत् ' मी परत आल्यावर देईन ' असें म्हटलें. पण त्या ब्राह्मणानें ' आतांच दे ' असें म्हणतांच त्यानें तोहि अश्व देऊन टाकिला आणि अतिशय वेगवान् चारी अश्वांचें दान केल्यामुळें रथाची धुरा आपल्या हातानेंच धरून नेणारा तो ' ब्राह्मणांना कांहीं युक्तायुक्त विचार नसतो' असें म्हणाला.

याप्रमाणें प्रतर्दनानें दान केलें, परंतु ब्राह्मणांची असूयाहि केली. या दोषामुळें तो स्वर्गांतून लवकर खालीं यईल.

तेव्हां भ्रात्यानें ' आम्हां दोघांतून पूर्वी कोण खालीं उतरेल,' असा प्रश्न केला असतां **नारद्** म्हणाला—हा वसुमना उतरेल. भ्रात्यानें त्याचें कारण

विचारिल असतां नारद पुनः म्हणाला—मी पृथ्वीवर पर्यटन करीत असतां वसुमनाच्या घरीं गेलों होतों. त्यावेळीं त्यानें गिरि-गगन-सागर इत्यादि दुर्गम मार्गांतून संचार करतां येण्यासाठीं पुष्परथ निर्माण करविला होता व त्याचें स्वस्तिवाचन चाललें होतें. मी तेथें गेलों, तेव्हां ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन केल्यानंतर राजानें तो रथ मला दाखविला.

तो रथ पाहून मीं त्याची केवल स्तुति केली, परंतु रथाची याचना केली नाहीं. पण राजानें माझा आशय जाणूनहि तो रथ मला दिला नाहीं. उलट रथस्तुतीला अनुमोदन देत तो म्हणाला—" भगवानानें ज्याअर्थीं या रथाची प्रशंसा केली आहे, त्याअर्थीं हा रथ आपलाच आहे. "

त्यानंतर कांहीं कालानें पुनः मी त्या राजाकडे गेलों असतां तेथें पूर्वीप्रमाणेंच रथाचें स्वस्तिवाचन चाललें होतें. तें पाहून मीं रथाची प्रशंसा केली व राजानेंहि ' हा रथ आपलाच आहे ' असें म्हटलें.

पुनः तिसऱ्या वेळींहि रथाचें स्वस्तिवाचन होत असतांच मी तेथें जाऊन पोंचलों. त्यावेळीं रथ ब्राह्मणांना दाखवीत व माझ्याकडे पहात हा राजा म्हणाला—" भगवंतानें या पुष्परथाचीं स्वस्तिवाचनें प्रत्येक वेळीं उत्तम प्रकारें साजरीं केलीं. "

याप्रमाणें मला रथ न देतां वृथा औपचारिक भाषण केल्यामुळें हा ' वसुमना ' स्वर्गापासून च्युत होऊन भूलोकीं येईल.

देवर्षीनें असें सांगितलें असतां त्या भ्रात्यानें ' आमच्या पैकीं अवशिष्ट राहिलेला हा शिबि एकटाच स्वर्गीं गेल्यावर मग कोण परत येईल ? ' असा प्रश्न केला.

नारद—हा शिबि स्वर्गांत जाईल व मी खालीं येईन.

भ्राता—कां बरें ? या शिबीचें पुण्य तुझ्याहूनहि अधिक आहे कीं काय ?

नारद—होय, मी शिबीसारखा श्रेष्ठ नाहीं. एकदा कोणी एक ब्राह्मण शिबीपाशीं येऊन 'मी अन्नार्थी आहें' असें बोलला. तेहां शिबि म्हणाला—"मीं तुझ्यासाठीं काय करावें याची आज्ञा कर."

त्यावर तो ब्राह्मण म्हणाला—हे राजा, तुझा हा ' बृहद्गर्भ '-नांवाचा जो पुत्र आहे, त्याला मारून त्याचें मांस उत्तम प्रकारें शिजवून तयार ठेव व माझी

येण्याची वाट पहा. वीरा, असें सांगून तो ब्राह्मण निघून गेला. तेव्हां राजानें पुत्राचा वध करून, त्याचें मांस उत्तम प्रकारें शिजवून ताटांत वाढिलें व तें ताट मस्तकावर घेऊन हा राजा ब्राह्मणाचा शोध करीत निघाला.

याप्रमाणें शिबिराजा त्या अतिथीचा शोध करीत चालला असतां मार्गांत त्याला कोणीं एकानें म्हटलें—"अरे, हा पहा, तुझा ब्राह्मण क्रोधानें नगरांत प्रवेश करून तुझें कोशागार, आयुधागार, स्त्रियांचें अंतःपुर, अश्वशाला, गजशाला हें सर्व दग्ध करीत आहे." हें ऐकून शिबीचें मुख यत्किंचित्‌हि म्लान झालें नाहीं. त्यानें निर्विकार मुखानें नगरांत प्रवेश करून त्या ब्राह्मणाला म्हटलें—"भगवन्, हें आपलें अन्न सिद्ध आहे."

त्यावर तो ब्राह्मण कांहीं बोलला नाहीं. विस्मयानें अधोमुख झाला. तेव्हां राजानें ब्राह्मणाला प्रसन्न करीत म्हटलें—"भगवन्, आपण भोजन करावें."

त्यावेळीं क्षणभर थांबून तो ब्राह्मण राजाकडे पाहून म्हणाला—"हे राजा, तूंच हें अन्न भक्षण कर." तेव्हां राजानें 'ठीक आहे' असें बोलून अविमनस्क चित्तानें त्या ब्राह्मणाचें पूजन केलें व मस्तकावरील ताट खालीं ठेवून तो तें अन्न भक्षण करण्यास उद्युक्त झाला. इतक्यांत त्या ब्राह्मणानें शिबीचा हात धरला व म्हटलें—"हे ज्ञाननिष्ठ राजा, तूं क्रोधाला जिंकिलें आहेस. तूं ब्राह्मणासाठीं कोणत्याहि वस्तूचा त्याग करण्यास तयार आहेस!"

याप्रमाणें त्या ब्राह्मणानें महाभाग शिबीचा सत्कार केला असतां राजानें वध केलेला तो राजपुत्र सुगंधयुक्त अलंकारांनीं भूषित होऊन एखाद्या देव-कुमाराप्रमाणें तेथें प्रकट झाला. याप्रमाणें तो ब्राह्मण त्याला कृतकृत्य करून तेथेंच अंतर्धान पावला. त्या राजर्षीची परीक्षा पहाण्यासाठीं साक्षात् विधाताच ब्राह्मण-रूपानें तेथें आला होता. तो ब्राह्मण अंतर्धान पावला असतां अमात्य राजाला म्हणाला—"हे महाराज, स्वतः सर्वज्ञ असूनहि तूं कोणता हेतु मनांत धरून हें कृत्य केलेंस?"

शिबि—मी कोणत्याहि हेतूनें किंवा भोगेच्छेनें दान देत नाहीं किंवा मी यशाच्या इच्छेनें कोणतेंहि कार्य करीत नाहीं. पापी लोकांनीं सेवन न केलेला हा मार्ग आहे. त्याला अनुसरून मी सर्व करीत असतों. सज्जनांनीं सेविलेला मार्ग सदोदित प्रशंसनीयच असतो. यास्तव मी त्याच उत्कृष्ट मार्गाचें अवलंबन करितों.

मार्कंडेय—यांप्रमाणें शिबीचें माहात्म्य मला ठाऊक या ५६ व मीं तेंच तुला यथार्थ निवेदन केलें आहे. ३.१२.१९८

---

## अध्याय १९९ वा.

[ १ इंद्रद्युम्नाचें उपाख्यान. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर पांडव व ऋषि यांनीं पुनः मार्कंडेयाला ' भगवन्, आपल्या पूर्वी जन्मलेला कोणी आहे काय ? ' असा प्रश्न केला. तेव्हां मार्कंडेयानें ' जोंवर कीर्ति असते तोंवर प्राणी स्वर्गांत रहातो आणि त्याच न्यायानें अकीर्ति असेपर्यंत नरकांत रहातो. नंतर कीर्ति व अकीर्ति हीं दोन्ही नष्ट झालीं असतां त्याला स्वकर्मानुरूप ब्राह्मणादि उच्च किंवा तिर्यगादि हीन योनि प्राप्त होते, ' अशा आशयानें म्हटलें—"होय, माझ्याहि पूर्वी उत्पन्न झालेले दीर्घायु प्राणी आहेत."

राजा, ' इंद्रद्युम्न '-नांवाचा एक प्रसिद्ध राजर्षि होता. त्याचें पुण्य क्षीण झाल्यामुळें तो स्वर्गांतून च्युत झाला. तेव्हां ' आपली भूलोकांतील कीर्ति नष्ट झाली कीं काय ?' हें पहाण्यासाठीं तो मजपाशीं येऊन म्हणाला—" भगवन्, मला ओळखिलेंत का ? ' तेव्हां मी त्याला म्हणालों—आम्हीं पुण्यकर्मासाठीं जपादि अनुष्ठान व तीर्थाटन करीत फिरत असल्यामुळें एका ग्रामांत केवल एक रात्र वास्तव्य करून कृच्छ्रादि व्रतें व उपवास यांपासून होणाऱ्या देहतापानें व्यग्र झालों आहों. त्यामुळें पूर्वीचे व पुढले कोणीच प्राणी आम्ही ओळखीत नाहीं. परंतु हिमालय पर्वतावर ' प्रावारकर्ण '-नामक एक उलूक रहातो. तो माझ्या पूर्वी जन्मलेला आहे. तो कदाचित् तुला ओळखीत असेल. येथून हिमालय फार दूर अंतरावर आहे व तो प्रख्यात उलूक तेथें वास करीत आहे.

---

१ हा अध्याय दात्याच्या गुण-दोषविधानपर आहे. यांत दात्याचें उत्तरोत्तर श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. जो मनुष्य दान करून श्लाघा करितो, त्याच्याहून दान देऊन असूया करणारा श्रेष्ठ, त्याहून याचकाचा आशय जाणूनहि त्याला इष्ट वस्तु न देतां केवल स्तुतीनेंच त्याची संभावना करणारा अधिक श्रेष्ठ, परंतु या सर्वांपेक्षां जो भिक्षार्थी ब्राह्मणाला श्रद्धा-क्षमापूर्वक अदेय वस्तूंचेंहि दान देतो आणि त्यास अप्रिय वचनहि ऐकवीत नाहीं तो अत्यंत श्रेष्ठ होय. म्हणूनच नारदानें शिबीला स्वतःहूनहि श्रेष्ठ म्हटलें आहे.

तेव्हां इंद्रद्यु. श्व झाला व त्यानें मला आपल्या पाठीवर बसवून त्या उलूकापाशीं नेलें. तेथें गेल्यावर राजानें त्याला विचारलें–' तूं मला ओळखतोस का ?' त्यावेळीं त्या उलूकानें क्षणभर विचार करून म्हटलें—" छे बुवा, मी तुला ओळखीत नाहीं.' तेव्हां इंद्रद्युम्नराजर्षीनें त्याला पुनः प्रश्न केला–' तुझ्या पूर्वी उत्पन्न झालेला एखादा चिरंजीव आहे काय ?"

उलूक—होय आहे. येथें जवळच 'इंद्रद्युम्न'-नांवाचें प्रसिद्ध सरोवर आहे. त्यांत 'नाडीजंघ'-संज्ञक एक बक रहात असतो. तो माझ्याहि अगोदर या लोकीं आलेला आहे. त्याला विचार.

तें ऐकून इंद्रद्युम्न त्या उलूकाला बरोबर घेऊन माझ्यासह तेथून निघाला व जेथें तो बक रहात होता, त्या सरोवरापाशीं आला. तेव्हां आम्हीं त्याला विचारिलें—" तूं इंद्रद्युम्न राजाला ओळखतोस का ?"

त्यावर क्षणभर चिंतन करून बक म्हणाला—नाहीं महाराज, मला इंद्रद्युम्न-राजा माहित नाहीं.

आम्हीं त्याला पुनः म्हटलें—तुझ्या आधीं जन्म पावलेला एखादा दीर्घायु प्राणी तुला ठाऊक आहे काय ?

बक—आहे खरा. याच सरोवरांत 'अकूपार'-नांवाचा एक कांसव आहे. तो मजहून वयानें ज्येष्ठ आहे. तेव्हां तो कदाचित् या राजाला ओळखीत असेल, त्याला तुम्ही विचारा.

असें बोलून त्या बकानें कांसवाला असें विनविलें—"हे अकूपारा, आम्हांला इष्ट असलेली कांहीं माहिती तुला विचारावयाची आहे, यास्तव तूं कृपा करून अगोदर बाहेर ये."

तें ऐकून कांसव त्या सरोवरांतून बाहेर पडला व जेथें आम्हीं होतों तेथें आला. सरोवराच्या तीरावर त्याला आलेलें पहातांच आम्हीं ' तूं या इंद्रद्युम्नराजाला ओळखतोस का ? ' असें त्याला विचारिलें.

तेव्हां अकूपारानें क्षणभर स्मरण करतांच त्याचे नेत्र बाष्पाकुल झाले, हृदय उद्विग्न झालें, भ्रांत चित्त झालेल्या त्याच्या शरीराला कंप सुटला. नंतर तो हात जोडून म्हणाला—" या राजाला मी कसा बरें ओळखणार नाहीं ? यानें याच प्रदेशांत सहस्रावधि अग्निचयनें करून प्रत्येकाचा एकेक असे असंख्य यूप

स्थापिले. त्यानें दक्षिणा दिलेल्या विपुल धेनूंच्या संचारानें या वर जो खळगा पडला, त्याचेंच हें सरोवर झालें आहे आणि मीहि येथेंच निवास करीत आहें."

याप्रमाणें 'अकूपार'-कांसवानें सांगितलेला हा वृत्तांत ऐकल्यानंतर देवलोकांतून एक दिव्य रथ तेथें प्रकट झाला व त्याच वेळीं इंद्रद्युम्नाला उद्देशून अशी अदृश्य वाणी ऐकूं आली—"हे राजा, तुला पुनः स्वर्गलोक प्राप्त झाला आहे. म्हणून आपल्या योग्य स्थानीं चल. तूं अखंड कीर्तिमान् आहेस, तस्मात् अव्यग्र चित्तानें ये."

याविषयीं असे श्लोक आहेत—"पुण्यकर्माचा ध्वनि स्वर्ग व भूमि यांस स्पर्श करीत असतो. जोंवर तो यशोध्वनि दुमदुमत असतो, तोंवरच तो पुण्यवान् पुरुष स्वर्गांत रहातो. ज्या कोणा पुरुषाची अपकीर्ति होते, तो अधमलोकीं जातो व त्याची ती दुष्कीर्ति यालोकीं जोंवर लोक बोलत असतात तोंवर तो मनुष्य अधमलोकांत रहातो. यास्तव पुरुषानें सौख्यासाठीं सर्वदा कल्याणकारक आचरण ठेवावें व पापाचा त्याग करून धर्माचाच आश्रय करावा."

हें ऐकून राजा म्हणाला—मी या दोघांना जेथून आणिलें आहे तेथें परत पोंचवून येतों, तोंवर थांबा.

मार्केडेय—असें बोलून इंद्रद्युम्नानें मला आणि प्रावरकर्णाला आपआपल्या स्थानीं पोंचविलें व तो त्या दिव्य वहानांतून आपल्या उचित स्थलीं निघून गेला. राजा युधिष्ठिरा, दीर्घायु असलेल्या मीं अशाप्रकारचा अनुभव घेतला आहे.

पांडव—हे मार्कंडेया, स्वर्गलोकांतून च्युत झालेल्या इंद्रद्युम्न राजाला तूं पुनः त्याच्या यथायोग्य स्थानीं स्थापन केलेंस, हें फार उत्तम झालें.

तें ऐकून मार्कंडेय म्हणाला—अहो, या देवकीपुत्र कृष्णानेंहि नरकांत निमग्न झालेल्या नृगराजर्षीचा त्या संकटांतून उद्धार केला व पुनः त्याला स्वर्गलोकीं पाठवून दिलें. ३. १२. १९९.

## अध्याय २०० वा.

[ १ युधिष्ठिराचा प्रश्न. २ निष्फल जन्म व दानें. ३ सत्पात्र ब्राह्मणाचें वर्णन. ४ अनेक प्रकारच्या दानांचें फल. ५ यमलोकाचें वर्णन. ६ ब्राह्मणमाहात्म्य. ७ आत्मज्ञानाचें साधन. ८ दानविधीचें वर्णन. ]

(१) **वैशंपायन**—पारिक्षिता, याप्रमाणें इंद्रद्युम्नाला पुनः स्वर्गप्राप्ति झाल्याचा वृत्तान्त महाभाग मार्कंडेयाच्या मुखानें ऐकून राजर्षि युधिष्ठिरानें पुनः त्या मुनीला प्रश्न केला—हे महामुने, पुरुषानें कोणत्या अवस्थेमध्यें दान दिलें असतां त्याला इंद्रलोकांतील भोग प्राप्त होतात, तें मला सांग. त्याचप्रमाणें गृहस्थाश्रम अथवा बाल्य, तारुण्य व वृद्धत्व या भिन्न भिन्न कालीं दानाच्या फलांचा उपभोग कशा रीतीनें मिळतो, तें मला यथार्थ कथन कर.

( २ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, हे पुढील चार जन्म व हीं सोळा दानें व्यर्थ आहेत. पुत्ररहित व सर्वधर्मबहिष्कृत पुरुषाचा जन्म व्यर्थ आहे. त्याचप्रमाणें जे लोक परान्नावर उपजीविका करतात व स्वतः मात्र आपल्या पुरतेंच अन्न शिजवितात, बाल, वृद्ध व अतिथि यांना अन्न न देतांच भोजन करितात आणि गो-ब्राह्मणादिकांचें पालन न करितांच मिथ्या प्रौढी मिरवितात, त्यांचा जन्म वृथा होय.

आपल्या उत्तरोत्तर श्रेष्ठ आश्रमापासून च्युत झालेल्या आत्मघाती माणसाला शास्त्रांत प्रायश्चित्तच सांगितलेलें नाहीं. अशा आरूढपतिताला, अन्यायानें धनसंचय करणाराला, पतित ब्राह्मणाला किंवा तस्कराला दिलेलें दान व्यर्थ आहे. तसेंच गुरूशींहि असत्य भाषण करणारा, पापी, कृतघ्न, ग्रामजोशी, वेदाचा विक्रय करणारा, शूद्रांचें याजन करणारा, वेदाध्ययनशून्य जातिमात्र ब्राह्मण, शूद्र स्त्रीशीं विवाह करणारा, स्त्रिया, गारुडी आणि परिचारक यांना दिलेलें दान निष्फळ होय. अशीं हीं सोळा प्रकारचीं दानें व्यर्थ होत.

अज्ञानानें, भीतीनें किंवा क्रोधानें जें दान केलेलें असतें त्या दानाचें फल मनुष्य पुढल्या जन्मीं गर्भावस्थेंत असतेवेळीं भोगतो आणि इतर प्रकारें ब्राह्मणास केलेल्या दानाचें फल तो वृद्धापकाळीं भोगीत असतो. यास्तव हे पार्थिवा, स्वर्गमार्गाची इच्छा असणारानें सर्व कालीं, सर्व अवस्थेंत, सर्व दानें सत्पात्र ब्राह्मणालाच द्यावींत.

---

१ ह्या अध्यायांत मार्कंडेयानें स्वर्गप्रद साधारण धर्म सांगितले आहेत.

युधिष्ठिर—हे विप्रश्रेष्ठा, ब्राह्मण विद्यमान असलेल्या चारी वर्णांकडून प्रतिग्रह घेत असतात. पण ते कोणत्या विशेषामुळें स्वतःस तारून इतरांसहि तारितात.

( १ ) मार्कंडेय—राजा, जप, मंत्र, होम, स्वाध्याय व अध्ययन यांच्या योगानें वेदमयी नौका करून विप्र स्वतः तरून जातात व इतरांसहि तारतात. हे कौंतेया, जो मनुष्य ब्राह्मणांना संतुष्ट करितो, त्याच्यावर देवता प्रसन्न होतात. विप्रांच्या केवल शब्दानेंच स्वर्गलोक प्राप्त होतो. हे युधिष्ठिरा, तूं पितृ-देवतापूजन व ब्राह्मणांचा सत्कार यांच्या योगानेंच अनंत पुण्यलोकाला प्राप्त होशील, यांत संशय नाहीं.

( २ ) पुण्यप्रद स्वर्गाची इच्छा करणाऱ्या मानवानें शरीर कफ-वात-पित्ता-दिकांनीं व्याप्त होऊन आसन्नमरण झालें तरी देहभान असेपर्यंत ब्राह्मणाचेंच पूजन करावें. श्राद्धकालीं मोठ्या यत्नानें अनिंद्य ब्राह्मणांस भोजन द्यावें. पांढरा फटफटीत, अति गौर वर्ण, किंवा अति कृष्ण बिभत्स वर्ण असलेला, कुनखी, कुष्ठरोगी, कपटी, कुंड[1]-गोलक व धनुष्यबाण धारण करणारा क्षत्रिय-वृत्तीचा ब्राह्मण, यांस प्रयत्नानें वर्ज्य करावें. कारण निंदेला पात्र झालेलें श्राद्ध इंधनाला जाळणाऱ्या अग्नीप्रमाणें कर्त्यालाच दग्ध करितें. मुके, आंधळे, बहिरे इत्यादि ब्राह्मण श्राद्धांत योजूं नयेत. परंतु ते जर वेदपारंगत ब्राह्मणांत मिश्र झाले असले तर त्यांस नियुक्त करावें.

( ३ ) हे युधिष्ठिरा, आतां दान कोणाला द्यावें आणि कोणता सामर्थ्यवान् ब्राह्मण प्रतिग्रह घेऊन स्वतःला व दात्याला तारतो, तें सांगतों ऐक. हे पृथापुत्रा, जो दात्याचा व स्वतःचा उद्धार करितो तोच समर्थ होय. सर्व शास्त्रवेत्त्या पुरुषानें अशा समर्थ ब्राह्मणालाच दान द्यावें. अग्नि अतिथिभोजनानें जसे संतुष्ट होतात, तसे ते हविष्यान्न, होम, पुष्पें व अनुलेपन यांनींहि होत नाहींत. तस्मात् हे राजा, तूं सर्व प्रकारें अतिथींना भोजन घालण्याचा प्रयत्न कर. हे राजन्, जे कोणी अतिथींना पादप्रक्षालनार्थ उदक, पायाला लावण्यासाठीं घृत, दीप, अन्न व रहाण्यास जागा देतात, ते यमलोकीं जात नाहींत.

---

१ पति जिवंत असतां व्यभिचारानें झालेला पुत्र कुंड व पति निधनानंतर दुराचारानें उपजलेला पुत्र गोलक म्हटला जातो. यांना श्राद्ध भोजनास शास्त्रानें निषिद्ध मानिलें आहे.

( ४ ) देवांचा निर्माल्य काढणें, ब्राह्मणांचीं उच्छिष्टपात्रें घांसून स्वच्छ करणें, अतिथीला गंधादि अर्पण करून त्यांचें अंग, पाय इत्यादि चेपून परिचर्या करणें, यांतील एकेकाचें फल गोप्रदानाहूनहि श्रेष्ठ आहे. हे नृपश्रेष्ठा, कपिला धेनूच्या दानानें मनुष्य मुक्त होतो, यांत संशय नाहीं. तस्मात् अलंकृत केलेल्या कपिलेचें ब्राह्मणाला दान द्यावं.

हे भारता, दरिद्री[1] श्रोत्रिय, अग्निहोत्री गृहस्थ, दारिद्र्यामुळें स्त्री-पुत्रांचेंहि पोषण करण्यास असमर्थ व आपल्यावर उपकार न करणारा, अशाहि द्विजाला दान द्यावें. समृद्ध माणसाला कदापि दान देऊं नये. संपन्न लोकांना दिलेल्या दानाचा काय उपयोग !

हे भरतश्रेष्ठा, एक धेनु एकाच ब्राह्मणाला अर्पण करावी. अनेकांना मिळून एक गाय कदापि दान देऊं नये. दान केलेल्या गायीचा विक्रय झाल्यास त्यायोगें दात्याच्या तीन पिढ्यांचा नाश होतो. तें गोप्रदान दात्याला तारीत नाहीं व त्या ब्राह्मणाचा तर मुळींच उद्धार करीत नाहीं.

जो मनुष्य ब्राह्मणाला शुद्ध सुवर्णाचें एक नाणें दान देतो त्याला सुवर्णाचीं शंभर नाणीं दान केल्याचें फल मिळतें. जो पुष्ट व बलवान् वृषभाचें दान देतो, तो दुस्तर संकटांना तरून स्वर्गलोकीं जातो. विद्वान् ब्राह्मणांना भूमिदान देणाऱ्याच्या सर्व कामना त्याला अनुसरतात. राजा, मार्गांतील श्रमानें ज्यांचें शरीर थकून गेलें आहे व पाय धुळीनें भरले आहेत असे पांथस्थ ज्या दात्याचें घर विचारीत येतात, तो या लोकीं दाता म्हणून प्रसिद्ध होतो. अशा श्रमार्त लोकांना अन्न कोठें मिळेल, एवढी माहिती देणाऱ्या बुद्धिमानाचीहि अन्न-दान करणाऱ्या पुरुषासारखीच प्रसिद्धि होते. यास्तव हे युधिष्ठिरा, तूं सर्व दानें सोडून अन्नदानच करीत जा. अन्नदानासारखें विचित्र पुण्यफल देणारें या लोकीं दुसरें कोणतेंहि दान नाहीं.

जो मनुष्य ब्राह्मणाला यथाशक्ति सुग्रास अन्न देतो, तो केवल तेवढ्याच पुण्यप्रभावानें प्रजापतीच्या सलोकतेला प्राप्त होतो. हे कौंतेया, सर्व पदार्थांत अन्नच विशिष्ट आहे, त्याहून श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. अन्न प्रजापति आहे. प्रजापतीला संवत्सर म्हटलें आहे, संवत्सरच यज्ञ आहे आणि यज्ञांत सर्व प्रतिष्ठित

---

१ श्रोत्रियाय दरिद्राय गृहस्थायाग्निहोत्रिणे । पुत्रदाराभिभूताय तथाऽह्यनुपकारिणे ॥
एवंविधेषु दातव्या न समृद्धेषु भारत । को गुणो भरतश्रेष्ठ समृद्धेष्वभिवर्जितम् ॥

आहे, यज्ञापासून सर्व चराचर भूतें निर्माण होतात. तस्मात् सर्व पदार्थांहून अन्न विशिष्ट आहे, असें श्रुत आहे.

ज्यांनीं तळीं, जलाशय, वापी, कूप व गृहें निर्माण केलीं आहेत, जे अन्नदान करितात व मधुर वाणी बोलतात, त्यांना यमाची वार्ताहि ऐकूं येत नाहीं. जो मनुष्य स्वकष्टार्जित वित्तसंचयाचें सच्छील विप्राला दान देतो, त्यावर वसुंधरा संतुष्ट होते आणि द्रव्याची वृष्टि करिते. अन्नदाता प्रथम स्वर्गीं जातो, सत्यवक्ता त्याच्यामागून आणि शेवटीं अयाचित दान देणारा, याप्रमाणें हे तिघे क्रमानें समान फलास प्राप्त होतात.

( ५ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर अनुजांसह धर्मराजानें मार्कंडेयाला पुनः मोठ्या कौतुकानें प्रश्न केला—" हे महामुने, यमलोक व मनुष्यलोक यांतील अंतर किती आहे ? त्याचें प्रमाण काय आहे ? आणि पुरुष कोणत्या उपायानें त्या लोकाला तरून जातात, तें मला सांग.

**मार्कंडेय**—हे धार्मिकांतील श्रेष्ठ राजा, हा ऋषींनीं प्रशंसा केलेला, पवित्र व गुह्यांतील अतिशय गुह्य प्रश्न आहे, त्याचें उत्तर सांगतों, ऐक. हे नराधिपा, याम्य व मानुष या दोन लोकांतील अंतर शहायशीं सहस्र योजनें आहे. यांत जलरहित आकाश व घोर अरण्य यांचें दर्शन होतें. त्यांत गृहें, जलाशय किंवा वृक्षच्छाया मुळींच नसते. मार्गांतील श्रमांनीं थकलेला पुरुष विश्रांति घेऊं लागल्यास त्याला यमाचे आज्ञांकित दूत बलात्कारानें तेथून ओढून नेतात.

हे राजा, भूलोकीं जे पुरुष, स्त्रिया किंवा अन्य जीव अश्वादिकांचीं उत्तमोत्तम विविध दानें ब्राह्मणाला देतात ते उन्हाचें निवारण करून उत्कृष्ट मार्गानें स्वर्गलोकीं जातात. छत्राचें दान देणारा सावलींतून जातो. अन्नदाते तृप्त होतात आणि अन्नदान न करणारे अतृप्त रहातात. वस्त्रदान करणारे वस्त्रयुक्त होतात आणि तें न देणारे वस्त्ररहित रहातात. सुवर्णदान करणारे अलंकारांनीं युक्त होऊन स्वर्गलोकीं जातात. भूमिदान करणाऱ्या मानवांच्या सर्व कामना पूर्ण होतात. तृणदान करणारे क्लेशरहित होऊन गमन करितात. गृहदान करणारे विमानांतून सुखानें प्रयाण करतात. जलदान करणारे तृषाक्रांत होत नाहींत. दीपदान करणारांचा मार्ग प्रकाशित होऊन ते सुखानें गमन करतात. गोप्रदान करणारे सर्व पातकांपासून मुक्त होऊन जातात.

एक मास उपवास करणारे हंसयुक्त विमानांतून व सहा रात्रीं उपवास करणारे मयूराच्या विमानांतून गमन करितात. हे पांडवा, तीन रात्री एक-

भुक्त राहून मध्यंतरीं कांहींहि भक्षण न करणारास अनामय लोक प्राप्त होतात. जलदान करणारास यमलोकीं सुखकर दिव्य फल मिळतें. अशा उदकदान करणाऱ्या लोकांसाठीं यमलोकीं 'पुण्योदका'-नांवाची एक नदी निर्माण केलेली आहे. पुण्यपुरुष तिचें अमृततुल्य शीतल जल प्राशन करितात. परंतु दुराचरणी पातकी लोकांसाठीं 'पू'-निर्माण केलेला असतो.

हे महाराज ती नदी सर्व कामना पूर्ण करणारी आहे. यास्तव हे राजेंद्रा, तूंहि अतिथींचा यथाविधि सत्कार करीत जा. मार्गांतील श्रमांनीं श्रांत होऊन धूळीनें शरीर मलिन झालेला मनुष्य अन्नदात्याची चौकशी करण्यास किंवा आश्रयाच्या आशेनें तुजपाशीं आल्यास त्याचा मोठ्या यत्नानें सत्कार कर. कारण तोच खरा अतिथि व ब्राह्मण होय. तो चालला असतां इंद्रासह सर्व देव त्याला अनुसरतात. त्याचा आदर केल्यास देव संतुष्ट होतात व अनादर केल्यास ते निराश होतात. तस्मात् हे राजन्, तूंहि अशा अतिथींचा यथाविधि सन्मान कर. यापूर्वींहि मीं तुला अनेकदा हेंच सांगितलें आहे. आतां दुसरें काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे !

( ६ ) **युधिष्ठिर**—हे धर्मज्ञा, तूं सांगितलेल्या धर्मयुक्त पवित्र कथा पुनः पुनः ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**मार्कंडेय**—हे नृपश्रेष्ठा, मी आतां तुला सर्व पातकांचा नाश करणाऱ्या कांहीं निराळ्या धर्मकथा सांगतों, त्या लक्षपूर्वक ऐक. ज्येष्ठमासांत पुष्करतीर्थावर कपिलेचें दान दिलें असतां, जें फल मिळतें, तेंच केवल ब्राह्मणांच्या पादप्रक्षालनानें प्राप्त होतें. हे पांडवा, ब्राह्मणांच्या पादोदकानें भिजलेली भूमि जोंवर ओली असते, तोंवर पितर कमल पत्रांतून जल प्राशन करितात. हे राजा, विप्रांचें स्वागत केलें असतां अग्नि, त्यांस आसन देण्यानें इंद्र, पादप्रक्षालनानें पितर आणि अन्नदानानें प्रजापति तृप्त होतो.

राजेंद्रा, धेनु प्रसूत होत असतां वत्साचे चरण व मस्तक दिसूं लागतांच शुद्ध चित्तानें तिचें मोठ्या प्रयत्नानें दान करावें. युधिष्ठिरा, धेनूच्या प्रसूतीसमयीं जोंवर वत्स बाहेर आलेलें दिसत नाहीं व ती व्याली नाहीं तोंवर ती धेनु पृथ्वीसमान आहे. अशा गाईचें दान करणारा त्या वत्साच्या अंगावरील रोमांइतकीं वर्षे स्वर्गसुख भोगितो.

कपिला गायीला आपादमस्तक सुवर्णभूषणांनीं व सर्व रत्नांनीं अलंकृत व तिलांनीं आच्छादित करून दान दिलें असतां, त्या प्रतिग्रह घेणारानें तीच धेनु एखाद्या सज्जनाला पुनः दान दिल्यास त्याला सर्व फलांतील श्रेष्ठ फल प्राप्त होतें. त्याला पर्वत, अरण्यें, गुहा, नद्या यांसह समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान केल्याचें पुण्य निःसंशय लागतें.

हे धर्मराजा, जो ब्राह्मण भोजनप्रसंगीं गुडघ्याच्या आंत हात ठेवून व्यवस्थित बसतो व ताट हालूं न देतां मुकाट्यानें भोजन करितो, तो दात्याला तारण्यास समर्थ होतो. त्याचप्रमाणें मद्यपान न करणारे, ज्याचा कोणीहि दुर्लौकिक सांगत नाहींत, जे संहितेचा यथाशास्त्र जप करितात, असे ब्राह्मणहि दात्याचा उद्धार करण्यास समर्थ असतात. असा श्रोत्रियच हव्य-कव्यादिकांचें ग्रहण करण्यास पात्र आहे. श्रोत्रियाला दिलेलें दान प्रज्वलित पवित्र अग्नीमध्यें हवन करणें, यासारखेंच आहे. विप्र क्रोधानें प्रहार करितात, शस्त्रानें युद्ध करीत नाहींत. असुरांचा वध करणाऱ्या वज्रपाणि शक्राप्रमाणें ब्राह्मण आपल्या क्रोधानें दुर्जनांचा नाश करितात. हे निष्पाप धर्मराजा, अशी ही धर्मयुक्त कथा मीं तुला सांगितली. ही कथा ऐकून शोक, भय व क्रोध यांनीं रहित असलेले नैमिषारण्यवासी निष्पाप मुनि संतुष्ट झाले. त्याचप्रमाणें हे राजन्, ही कथा ऐकणारे मानव स्वर्गाला प्राप्त होऊन क्रमानें उत्तरोत्तर श्रेष्ठ लोकीं जातात व शेवटीं मुक्त होतात. ते पुनरपि जन्म-मरणाच्या फेऱ्यांत सांपडून पुनरपि इहलोकीं येत नाहींत.

( ७ ) **युधिष्ठिर**—हे महाप्राज्ञ मुने, ज्याच्या योगानें विप्र सदा शुद्ध होतो, तें शौच कोणतें, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**मार्कंडेय**—हे धर्मनिष्ठ राजा, अमंगल शब्दांचा उच्चार न करणें, हें वाक्शौच, दुराचरण न करणें, हें कर्मशौच आणि जलानें शरीर निर्मल करणें हें जलात्मक शौच आहे. या तीन प्रकारच्या शुद्धतेनें युक्त असलेला पुरुष स्वर्गाला निःसंशय पात्र होतो.

जो ब्राह्मण प्रातःकालीं व सायंकालीं वेदमाता जी पवित्र गायत्री देवी तिचा जप करून संध्या करितो, त्या विप्राला ती देवता पावन करिते. त्यायोगें तो निष्पाप होतो. त्यानें सागरासह सर्व पृथ्वीचें दान जरी घेतलें, तरी त्यापासून त्याला कांहींच उपद्रव होत नाहीं. अंतरिक्षांतील सूर्यादि ग्रह कितीहि दारुण असले, तरी ते त्याला मुळींच क्लेश न देतां उलट सौम्य व कल्याणप्रद होतात.

मांसभक्षक, भयंकर व धिप्पाड राक्षस त्याचा केव्हांहि पाठलाग करीत नाहींत किंवा त्याला पीडा देत नाहींत. विप्र प्रज्वलित अग्नीसारखे आहेत. त्यामुळें त्यांना अध्यापन, याजन व दुसऱ्यापासून घेतलेला प्रतिगृह यांचा दोष लागत नाहीं. ब्राह्मण वेदवेत्ते किंवा वेदशून्य, सुसंस्कृत किंवा प्राकृत, कसेंहि असले तरी त्यांचा अपमान करूं नये. कारण ते भस्माच्छादित अग्नीप्रमाणें आहेत. प्रदीप्त अग्नि श्मशानांत जरी असला तरी तो जसा दूषित होत नाहीं, तसा ब्राह्मण विद्वान् असो किंवा अविद्वान् असो तो मोठें दैवतच होय.

हे पांडवा, नगरें, मोठाले वाडे, नगरद्वारें व विविध प्रकारचे प्रासाद यांनीं जरी युक्त असलीं तरी तीं उत्तम ब्राह्मणावांचून शोभत नाहींत. हे राजा, जेथें वेदवेत्ते, वृत्तसंपन्न, ज्ञानी व तपस्वी विप्र रहातात तेंच खरें नगर होय. शहरांत किंवा अरण्यांत जेथें बहुश्रुत द्विज रहातात, त्याच प्रदेशाला ‘ नगरी ’ असें म्हणतात आणि हे पार्था, तेंच तीर्थ होय.

प्रजेचें रक्षण करणारा नृपति व तपस्वी ब्राह्मण यांच्या समीप जाऊन त्यांचा बहुमान करणारा पापापासून तत्काल मुक्त होतो. पुण्यप्रद तीर्थांत स्नान, पवित्र त्रिसुपर्णादि मंत्रांचें संकीर्तन आणि सज्जनांशीं संभाषण यांस विद्वानांनीं प्रशस्त कर्म म्हटलें आहे.

सत्पुरुषांच्या समागमानें पावन झालेल्या शुभवचनरूपी जलानें आपण पवित्र होतों, असें सज्जन नित्य मानितात.

हे युधिष्ठिरा, ज्याचें अंतःकरण निर्मल नाहीं, त्यानें त्रिदंड, मौन व जटाभार धारण केला, मुंडन केलें, वल्कलें परिधान केलीं, तीव्र व्रतें आचरून तीर्थस्थान किंवा अवभृत स्नानें केलीं, अग्निहोत्र ठेविलें, वनांत वास केला व शरीर कृश केलें, तरी तें सर्व व्यर्थ होय. हे राजा, चक्षुरादि इंद्रियांचे विषय जरी शुद्ध नसले तरी त्या विषयांचा भोग सुकर आहे. विषयोपभोगांना विषयशुद्धीची अपेक्षा नसते. परंतु अमृतत्व स्वभावतःच दुष्कर असल्यामुळें तें, भोग वर्ज्य केल्यावांचून, सुलभ नाहीं. कारण हे राजेंद्रा, मन अतिशय दुर्जय आहे.

जे पुरुष मन, वाणी व बुद्धि यांनीं पाप करीत नाहींत, तेच महात्मे खरें तप करितात. शरीरशोषण हें तप नव्हे. ब्राह्मणाला विहित असलेल्या वृत्तीनें उपजीविका करणारा पुरुष स्त्री-पुत्रादिकांना उचित अन्न-वस्त्र न देतां त्यांना जर पीडा देत असेल तर तो पापरहित न होतां उलट त्यांचा हिंसकच होतो.

कारण अन्नत्याग करणें हें तप नव्हे. नित्य शुचिर्भूतपणानें अलंकृत व सदैव दयावान् असलेला योगी घरांत बसूनच सर्व पापांपासून मुक्त होतो. केवल उपवासादि व्रतानें पापकर्मांचा क्षय होत नसतो. कारण अन्नत्यागानें रक्तमांसानें युक्त असलेला देह कृश होतो, पण चित्तशुद्धि होत नाहीं.

शास्त्रांत न सांगितलेलीं तप्तशिलारोहणादि कर्में स्वतःच कल्पून तीं आचरिल्यानें शरीराला क्लेश मात्र होतात. त्यांच्या योगानें कोणत्याहि पापाचा परिहार होत नाहीं. चित्तशुद्धीवांचून हा सर्व देहदंड व्यर्थ आहे. हे राजा, अंतःकरण शुद्ध नसलेल्या माणसाच्या पापकर्मांना ज्ञानाग्नि कदापि दग्ध करीत नाहीं. दयालुत्व आणि वाणी, मन व काय यांच्या शुद्धिरूप वैराग्यानेंच मोक्षप्राप्ति होते. ती केवल फलमूलाहारानें, मौनव्रतानें किंवा वायुभक्षण करून होत नसते. मस्तकाचें मुंडन, गृहत्याग, जटाधारण, स्थंडिलशय्या, नित्य उपोषण, अग्निसेवा, उदकप्रवेश व भूमिशयन, इत्यादि केल्यानें जरा, मरण व व्याधि यांतून मुक्त होतां येत नाहीं. तर ज्ञानयुक्त कर्मानेंच उत्तम पदाची प्राप्ति होतें.

अग्नीनें दग्ध झालेलीं बीजें पेरिलीं असतां तीं जशीं पुनः उगवत नाहींत, तद्वत्च जीवाचे अविद्यादि क्लेश ज्ञानानें दग्ध झाले असतां तो पुनः जन्म घेत नाहीं. काष्ठ किंवा भिंत यांप्रमाणें जड असलेलीं शरीरें एकदा आत्म्याशीं वियुक्त झालीं म्हणजे महासागरांतील फेनाप्रमाणें तीं विनाश पावतात. रज्जूचें ज्ञान झालें असतां रज्जुसर्प जसा असत्—मिथ्या ठरतो, त्याप्रमाणें आत्महीन शरीरें निरात्मक—मिथ्या ठरतात. या कथनानें 'जें जें दृश्य तें तें मिथ्या' हा नियम प्रदर्शित केला आहे आणि ज्या अर्थीं जें जें दृश्य तें तें विनाशी अशी लोकप्रसिद्धिहि आहे, त्या अर्थीं साक्षिभास्य असलेलीं आकाशादि भूतें व अहंकारहि, घटादि इतर दृश्य पदार्थांप्रमाणें विनाशी आहे.

जो मानव एक अथवा अर्ध्या श्लोकानें कां होईना, सर्व भूतांच्या हृदयाकाशांत स्थित असलेल्या आत्म्याला जाणतो म्ह० मी हा देहादि दृश्यरूप किंवा अहंकारादि द्रष्टृरूप नाहीं व हें मत्संबंधीं देहाहंकारादि माझे नव्हे असें ज्याला ज्ञान होतें, त्याचें कोणतेंच प्रयोजन उरत नाहीं.

'तत् त्वम्' या दोन अक्षरांनीं युक्त असलेल्या वाक्यापासून प्रत्यगात्म्याचें केवल स्वरूप कळतें व 'सत्यं ज्ञानं अनंतम्' इत्यादि मंत्रपदांनीं युक्त अस-

लेल्या उपनिषद्रूप शेकडों ब्राह्मणवाक्यांनीं 'मी ब्रह्म आहें' अशाप्रकारचा साक्षात् अनुभव येतो. अशा ज्ञानी पुरुषांचें वैराग्य, शांति इत्यादि धर्म अवलोकन करून लोकांनाहि त्यांच्या ज्ञानित्वाचा प्रत्यय येतो. अशाप्रकारचा आत्मानुभव हेंच मोक्षाचें लक्षण—ज्ञापक प्रमाण आहे. ज्याला असा आत्मप्रत्यय आलेला नसतो, त्याचें मन परमार्थाविषयीं साशंक असतें. तो स्वभावतःच संशयी असल्यामुळें हा लोक, परलोक व निरतिशय सुख यांविषयीं निश्चय करूं शकत नाहीं. यास्तव ज्ञानवृद्ध ब्रह्मज्ञ 'स्वात्मानुभव हेंच मोक्षलक्षण आहे' असें समजतात. ज्याला आत्मतत्त्व पूर्णपणें कळलें आहे, त्याला वेदोक्त कर्माचें दावाग्नीप्रमाणें भय वाटतें. तस्मात् 'प्रपंच सत्य आहे, विषयोपभोग हेंच निरतिशय सुख आहे,' इत्यादि शुष्क तर्क टाकून तूं जगाच्या मिथ्यत्वाचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुति-स्मृतींचा आश्रय कर आणि अद्वितीय अखंड एकरूप ब्रह्मतत्त्वाशीं संबद्ध असलेल्या श्रुति-स्मृतितत्त्वाचा श्रुत्युक्त युक्तींनीं व क्षमादि साधनांनीं तत्त्वज्ञान संपादन कर.

शास्त्र व साधनें यांच्या अभावीं तत्त्वज्ञान कधींहि होणार नाहीं. तें ब्रह्मतत्त्व वेदपूर्वकच जाणावें आणि प्रणव हेंच तें तत्त्व आहे. कारण प्रभव हें त्याचें शरीर आहे. प्रणवाच्या द्वाराच त्या तत्त्वाचें ज्ञान होतें, ही गोष्ट सर्वत्र प्रसिद्ध आहे व प्रश्नोपनिषदांतहि 'ओंकार हेंच पर व अपर ब्रह्माचें ज्ञानसाधन आहे' (प्र. भा. प्र. ५. पृ. ५५) असें म्हटलें आहे. वेदच तत्त्वसाक्षात्काराचें निमित्त आहे. वेदाचें प्रलयस्थान असा जो आत्मा, तो घटाप्रमाणें स्वतःला प्रकाशित करीत नाहीं. कारण तो स्वप्रकाश आहे व तो स्वतःलाच जर प्रकाशित करूं लागला तर त्याचें स्वप्रकाशत्वच बाधित होईल.

'तर मग त्याचें ज्ञान साध्य आहे असें कसें म्हणतां ?' असें विचाराल तर त्याचें उत्तर सांगतों—तो आत्मा विषयभूत असलेली जी बुद्धि तिचा विषय होतो. कारण शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानें सुसंस्कृत झालेली बुद्धि हेंच आत्मज्ञानाचें साधन सांगितलें आहे. वेदोक्त आयुष्य, देवांचे आशीर्वाद, कर्मांचीं फलें व देहवानांचा प्रभाव हीं या लोकीं युगानुरूप परिणत होतात. यास्तव इंद्रियांना प्रसन्न करून बहिर्वृत्तीचा त्याग करावा. चित्त व इंद्रियें यांचा निरोध हेंच दिव्य तप आहे व त्याच्या योगानेंच इंद्रियें निर्मल होतात.

स्वधर्माख्य तपाचें आचरण केलें असतां पुरुष स्वर्गलोकीं जातो. दानानें सुखोपभोग घेतो, तीर्थस्नानानें पापाचा नाश करितो व ज्ञानानें मुक्त होतो.

( ८ ) वैशंपायन—जनमेजया, मार्कंडेयाच्या मुखानें अशाप्रकारचें धर्मविवेचन ऐकून महायशस्वी युधिष्ठिर पुनः म्हणाला—" हे भगवन् , या उत्तम दानधर्माचा मुख्यविधि ऐकण्याची माझी इच्छा आहे."

मार्कंडेय—हे राजन्, तुला दानधर्माची जी इच्छा आहे, ती मला सर्वदा इष्टच आहे. कारण धर्माचें महत्त्व अवर्णनीय आहे. यास्तव श्रुति व स्मृति यांनीं प्रतिपादिलेलें दानाचें रहस्य ऐक. युधिष्ठिरा, गुरुवारीं अमावास्या आली असतां अश्वत्थच्छायेला गजच्छाया असें म्हणतात. अशा गजच्छायापर्वकालीं, अश्वत्थवृक्षांनीं युक्त असल्यामुळें, वायूनें पल्लव हालत असलेल्या व जलाच्या समीप असलेल्या प्रदेशांत श्राद्ध केलें असतां, तें पुण्यफल दहा सहस्र कल्पपर्यंत इहलोकीं क्षीण होत नाहीं.

हे राजन् , प्राण्यांच्या जीवनासाठीं जलयुक्त अन्नादि द्रव्य दिल्यानें पुरुष या लोकीं पूज्य होतो. जो अतिथींना आपल्या गृहामध्यें धर्मार्थ वासस्थान देतो त्याला सर्व यज्ञ केल्याचें श्रेय मिळतें. ज्या ठिकाणीं पूर्ववाहिनी नदी पश्चिमाभिमुख होते, त्याला 'प्रतिस्रोत' तीर्थ म्हणतात. त्या स्थानीं सत्पात्र ब्राह्मणाला दिलेले अश्व दात्याला श्रेष्ठ फल देतात. अन्नासाठीं सर्वत्र संचार करणारा इंद्रहि अतिथिरूपानें तृप्त होऊन अक्षय स्वर्ग देतो आणि पुरुष नौकेच्या साह्यानें मोठ्या प्रवाहांतून जसा तरून जातो, त्याप्रमाणें तो महापापापासून मुक्त होतो.

सूर्यग्रहणाच्या वेळीं ब्राह्मणांना दिलेली दह्यावरील साय व पूर्वोक्त सर्व दानें अक्षय फल देतात. तात्पर्य गजच्छायादि पर्वकालीं श्राद्धादि कर्मेंहि मुक्त होतात. पर्वकालीं दिलेलें दान द्विगुण फल देतें. ऋतुकालीं दिलेलें दशगुण; मकर, कर्क, तुला, मेष, मिथुन, कन्या व मीन या संक्रांतिकालीं आणि सूर्यचंद्र-ग्रहणाच्या वेळीं दिलेलें दान अक्षय फल देतें.

कोणी 'ऋतुकालीं दिलेलें दान दशगुण, ऋत्वयनादिकांमध्यें दिलेलें दान शतगुण, ग्रहणाच्या वेळीं दिलेलें सहस्रगुण व तुला आणि मेष संक्रांतीस दिलेलें दान अक्षय फल देतें ' असें म्हणतात.

हे राजा, जो भूमिदान देत नाहीं, तो भूमीचा उपभोग घेत नाहीं. जो वहानाचें दान देत नाहीं, त्याला वहान मिळत नाहीं. जो दाता ब्राह्मणांना जे जे इष्ट विषय देतो, त्याला पुढील जन्मीं ते ते विषय प्राप्त होतात. सुवर्ण हें

अग्नीचें प्रथम अपत्य आहे. भूमि हें विष्णूचें अपत्य असून गायी सूर्यकन्या आहेत. यास्तव जो दाता सुवर्ण, गायी व पृथ्वी यांचें दान देतो, त्यानें तिन्ही लोकांचें दान केलें आहे, असें होतें. भूतकालीं या त्रिभुवनांत दानाहून अधिक शाश्वत असें कांहीं नव्हतें व भविष्यत्कालींहि नसेल. मग वर्तमानकालीं कोठून असणार ? म्हणूनच विद्वान् लोक या लोकीं दानाला श्रेष्ठ मानितात. ३.१२.२००

---

## अध्याय २०१ ला.

[ १ मार्कंडेयानें केलेला धुंधुमार-उपाख्यानाचा आरंभ. २ उत्तंकाचें तप. ३ भगवत्स्तवन ४ वरप्राप्ति. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, महाभाग मार्कंडेयाच्या मुखानें राजर्षि इंद्रद्युम्नाची स्वर्गप्राप्ति ऐकून युधिष्ठिरानें त्या तपोवृद्ध दीर्घायु मुनीला पुनः प्रश्न केला—" हे धर्मज्ञा, तूं सर्व देव-दानव-राक्षस, विविध राजवंश व शाश्वत ऋषिवंश जाणतोस. या लोकीं तुला अज्ञात असें कांहींच नाहीं. हे निष्पाप मुनिवरा, मनुष्य, राक्षस, देव, गंधर्व, यक्ष, अप्सरा इत्यादिकांच्या दिव्य कथा तुला माहित आहेत. यास्तव हे द्विजसत्तमा, इक्ष्वाकुवंशांतील ' कुवलाश्व '-नांवानें प्रसिद्ध असलेल्या अपराजित राजाला ' धुंधुमार ' हें नांव कसें प्राप्त झालें, तो वृत्तान्त ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्या बुद्धिमान् कुवलाश्वाच्या नांवाचा विपर्यास कसा झाला, तें मला सांग. "

युधिष्ठिराचा हा प्रश्न ऐकून ' ऋषि व राजे यांनीं लोककंटकाचा उच्छेद केला असतां ते परमेश्वराला प्रिय होतात ' हें व्यक्त करण्याच्या आशयानें मार्कंडेयानें धुंधुमाराचें उपाख्यान सांगण्यास आरंभ केला.

( २ ) **मार्कंडेय**—हे राजन्, ठीक आहे. धुंधुमाराचें हें धर्मयुक्त आख्यान मी तुला सांगतों. इक्ष्वाकु राजा कुवलाश्व धुंधुमारत्वाला कसा प्राप्त झाला तें ऐक. हे भारता, पूर्वीं ' उत्तंक '-नामक एक महर्षि होता. ( उत्तंकाचा पूर्वेतिहास आदिपर्व अध्याय ३ मध्यें आलेला आहे. भाग १ ला पृ. ५०-५८ पहावें ) त्यानें मरुधन्व्याच्या रम्य आश्रमांत राहून अतिशय दुश्चर तप आचरिलें व अनेक वर्षें भगवान् विष्णूची आराधना केली. तेव्हां त्याजवर प्रसन्न झालेल्या भगवानानें त्या तपोनिष्ठाला प्रत्यक्ष दर्शन दिलें.

त्या वेळीं साक्षात् परमात्म्याला पाहून तो ऋषि संतुष्ट झाला. त्यानें नम्र होऊन विविध स्तवनांनीं त्या विभूची स्तुति केली.

(३) **उत्तंक**—हे देवाधिदेवा, देव, असुर, मानव यांसह या सर्व प्रजा, स्थावर-जंगम चराचर भूतें व ब्रह्म, वेद आणि वेद्य हें सर्व तूंच निर्माण केलें आहेस. हे मधुसूदना, हें आकाश तुझें मस्तक असून चंद्र-सूर्य नेत्र आहेत. वायु तुझा निःश्वास व अग्नि तेज आहे. सर्व दिशा तुझे बाहु असून महासागर तुझी कुक्षि आहे. पृथ्वीवरील हे सर्व पर्वत तुझ्या मांड्या व अंतरिक्ष जंघा आहेत. तुझे चरण देवी पृथ्वी असून तिच्यावरील सर्व औषधि तुझ्या शरीरावरील रोम आहेत.

हे भुवनेश्वरा, इंद्र, सोम, अग्नि, वरुण, देव, असुर व महोरग नम्र होऊन विविध स्तोत्रांनीं तुझी उपासना करीत तुझ्यापुढें उभे रहातात. हे प्रभो, तूं सर्व भूतांना व्यापिलें आहेस. महा सामर्थ्यवान् योगी व महर्षि तुझें स्तवन करितात. हे पुरुषोत्तमा, तूं प्रसन्न असतां जगताचें स्वास्थ्य असतें व तूं क्रुद्ध होतांच महद्भय उत्पन्न होतें. हे जगच्चालका, तूं एकटाच भयाचें निवारण करण्यास समर्थ आहेस. तूं देव, मनुष्य व सर्व भूतें यांना सुख देणारा आहेस.

हे आदिदेवा, तूं तीन पावलांनीं बलीपासून त्रैलोक्य हरण केलेंस. समृद्ध असुरांचा नाश केलास. तुझ्या पराक्रमानें देव परम सुखाला प्राप्त झाले. हे महाद्युते, तूं क्रुद्ध होतांच दैत्येन्द्र पराभूत होतात. सर्व भूतांचा सर्व प्रकारें कर्ता विकर्ता तूंच आहेस. देव तुझी आराधना करून परम ऐश्वर्याला प्राप्त होतात.

( ४ ) राजा, याप्रमाणें महात्म्या उत्तंकानें हृषीकेशाचें स्तवन केलें असतां संतुष्ट झालेला विष्णु त्याला म्हणाला—" हे ब्रह्मन् , मी तुजवर प्रसन्न झालों आहें, वर माग. "

**उत्तंक**—हे प्रभो, तुज जगत्स्रष्टया, दिव्य व शाश्वत हरीचें मला दर्शन झालें, हाच श्रेष्ठ वर मला मिळाला. माझे सव मनोरथ पूर्ण झाले.

**विष्णु**—हे ऋषिसत्तमा, तुझ्या या अनासक्तीनें व भक्तीनें मी सतुंष्ट झालों आहें. यास्तव तूं मजपासून वर अवश्य मागून घे.

हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें हरीनें वर मागून घेण्याचा आग्रह केला असतां उत्तंकानें हात जोडून असा वर मागितला—" हे कमलनयन भगवन्, ज्या अर्थी तूं मजवर प्रसन्न झाला आहेस, त्या अर्थीं माझी मति सर्वदा धर्म, सत्य

व दम यांत स्थिर होवो आणि हे ईश्वरा, तुजवरील भक्तीनें मला सतत तुझेंच स्मरण होवो. "

**भगवान्**—हे द्विजा, माझ्या प्रसादानें तुझी ही प्रार्थना पूर्ण होईल आणि ज्या योगानें देव संपन्न असतात, तो योग तुला स्फुरेल. तूं त्रिभुवनाचेंहि महत्कार्य करशील. लोकांचा उच्छेद करण्यासाठीं 'धुंधु'-नामक महा असुर घोर तप आचरील. त्या दैत्याचा वध कोण करील तें ऐक.

वत्सा, इक्ष्वाकुवंशांत 'बृहदश्व'-नांवाचा एक प्रसिद्ध राजा होईल. त्या पराक्रमी व अजिंक्य पृथ्वीपतीला 'कुवलाश्व-'नामक एक शुचिर्भूत व दांत पुत्र होईल. तो नृपश्रेष्ठ माझ्या योगबलाचा आश्रय करून तुझ्या आज्ञेनें धुंधुमार होईल.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या विप्राला बोलून विष्णु तेथेंच अंतर्धान पावला. ३.१२.२०१.

---

## अध्याय २०२ रा

[ १ इक्ष्वाकुवंशजांचें कथन. २ बृहदश्वाचें वनगमन. ३ त्याचा उत्तंकाशीं संवाद. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे धर्मराजा, इक्ष्वाकुराजा परम गतीस प्राप्त झाला असतां शशादाला या पृथ्वीची प्राप्ति झाली. तेव्हां तो परम धार्मिक नृपति अयोध्येंत राज्य करूं लागला. शशादाला 'ककुत्स्थ'-नामक वीर्यवान् पुत्र होता. ककुत्स्थाचा पुत्र 'अनेना' व त्याचा पृथु, पृथूचा विष्वगश्व, त्याचा अद्रि, अद्रीचा युवनाश्व, त्याचा पुत्र श्राव व श्रावाचा आत्मज श्रावस्त होय. त्याच वीर्यवान् राजानें 'श्रावस्ती'-नगरी निर्माण केली. याच श्रेष्ठ नृपाचा पुत्र महा बलाढ्य बृहदश्व झाला. बृहदश्वाचा पुत्र 'कुवलाश्व'-नांवानें प्रसिद्ध झाला. कुवलाश्वाला एकवीस हजार पुत्र असून ते सर्वहि विद्येंत निष्णात, बलाढ्य व दुरासद होते. कुवलाश्व तर पित्याहूनहि अधिक गुणवान् होता.

( २ ) युधिष्ठिरा, अशा प्रकारच्या या शूर व धार्मिक 'कुवलाश्व'-पुत्राला पित्यानें योग्य समयीं राज्याभिषेक केला आणि आपली 'श्री' पुत्राकडे सोंपवून तो ज्ञानसंपन्न पृथ्वीपति बृहदश्व तप करण्याकरितां तपोवनांत निघून गेला.

**मार्कंडेय**—हे पांडवा, इकडे बृहदश्व राजा वनगमनास निघाल्याचें वृत्त द्विजश्रेष्ठ उत्तंकाच्या कानीं आलें. तेव्हां तो महातेजस्वी ब्राह्मण त्या सर्वास्त्रवेत्त्या श्रेष्ठ भूपालापाशीं जाऊन त्याचें निवारण करूं लागला.

( ३ ) उत्तंक—हे राजन्, प्रजेचें रक्षण करणें, हें तुझें कार्य आहे, तें तूं अगोदर करणें योग्य होय. तुझ्या प्रसादानेंच आम्ही येथें निर्भयपणें रहात आहों. तुज महात्म्याकडून रक्षण केली जाणारी ही पृथ्वी उद्वेगरहित होईल. यास्तव तुला अरण्यगमन उचित नाहीं. इहलोकीं प्रजापालनांत जसा महान् धर्म आहे, तसा अरण्यवासांत नाहीं. यास्तव तुला अशी बुद्धि न होवो.

हे नराधिपा, प्राचीन राजर्षींनीं आचरिलेल्या प्रजापालनरूप धर्मासारखा दुसरा कोणताहि धर्म नाहीं. राजानें प्रजेचें रक्षण करावें, हेंच त्याला विहित कर्म आहे. यास्तव तूं प्रजेचें संरक्षण कर. आम्ही निर्भय झाल्यावांचून तपश्चर्या करण्यास समर्थ होणार नाहीं.

हे महाराज, माझ्या आश्रमासमीप ‘ मरुधन्वाख्य ’ समप्रदेश आहे. त्यांत ‘ उज्जालक ’ या नांवानें प्रसिद्ध असलेला एक वालुकामय समुद्र आहे. तो अनेक योजनें विस्तीर्ण व रुंद आहे. तेथें मधु-कैटभांचा महा वीर्यवान् व भयंकर पुत्र ‘ धुंधु ’ रहातो. तो अमित पराक्रमी दैत्येंद्र भूमीच्या आंत वास करीत आहे. त्याचा वध करून मग तूं वनांत जा.

हे पार्थिवा, तो दैत्य देव आणि मानव यांचा विनाश करण्यासाठीं घोर तप करून आतां शयन करीत आहे. तो दारुण असुर देव, दैत्य, राक्षस, नाग, यक्ष, गंधर्व, इत्यादि सर्वांना अवध्य आहे. लोकपितामहापासून त्यानें वर मिळविलेला आहे. यास्तव हे नृपश्रेष्ठा, तूं त्याचा नाश कर. अन्य विचार करूं नको; तुझें कल्याण असो. त्याचा विनाश केल्यानें तुझी अव्यय, शाश्वत, ध्रुव व फार मोठी कीर्ति होईल.

राजा, तो क्रूर दैत्येंद्र वालुकेच्या अंतर्भागांत स्वस्थ शयन करीत पडला आहे. त्याचा निःश्वास एक संवत्सराच्या शेवटीं जेव्हां बाहेर पडतो तेव्हां पर्वत व अरण्यें यांसह ही पृथ्वी कांपूं लागते, त्याच्या श्वासोच्छ्वासापासून उत्पन्न होणाऱ्या वायूनें उडालेल्या धूलीमुळें आदित्याचा मार्ग आच्छादित होतो. एक सप्ताहपर्यंत भूकंप चालू असतो. त्यांतून भयंकर धूम, ज्वाला व विस्फुलिंग निघत असतात. त्या वेळीं हे राजन्, मला स्वाश्रमांत रहाणेंहि अशक्य होतें. तस्मात् हे महीपते, लोकहितासाठीं तूं त्याच्या वधाला प्रवृत्त हो.

त्या असुराचा नाश झाला असतां सर्व लोक स्वस्थ होतील आणि हे राजा, त्याचा नाश करण्यास तूंच समर्थ आहेस, असें माझें निश्चित मत आहे.

साक्षात् विष्णूच्या तेजानें तुझें तेज वृद्धि पावेल 'जो महीपति या क्रूर महासुराचा वध करील, त्याच्यामध्यें माझें दुर्धर्ष वैष्णव तेज प्रवेश करील' असा विष्णूनें मला पूर्वींच वर दिला आहे. यास्तव हे राजेंद्रा, तूं त्या दिव्य तेजानें युक्त होऊन भूमीला दुःसह झालेल्या या भयंकर पराक्रमी दैत्याला गतप्राण कर. हे पृथ्वीपाला, कोणाहि अल्पतेजस्वी प्राण्याकडून हा महातेजस्वी 'धुंधु'-दैत्य शेकडों वर्षांनींहि नाश पावणार नाहीं. ३. १२. २०२.

---

## अध्याय २०३ रा.

[ १ बृहदश्वाची पुत्राला उत्तंकाचें कार्य करण्याची आज्ञा व त्याचें वनगमन. २ मधु-कैटभांचा वृत्तान्त व शेषशायी भगवान् यांचें परस्परदर्शन. त्यांचे परस्परांस वर. ३ मधुसूदनानें केलेला त्या दैत्यांचा वध. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, उत्तंकाचें हें भाषण ऐकून त्या अपराजित राजर्षीनें हात जोडून त्याला म्हटलें—"हे ब्रह्मन्, तुझें हें आगमन व्यर्थ होणार नाहीं. माझा हा 'कुवलाश्व'-नांवानें प्रसिद्ध असलेला पुत्र धृतिमान्, चपल, तत्पर व या भूतलावर अप्रतिम वीर्यवान् आहे! तो तुझें सर्व प्रिय करील, यांत संशय नाहीं. तो आपल्या सर्व विशालबाहु शूर पुत्रांसह तुझें कार्य करण्यास समर्थ आहे. यास्तव मला जाऊं दे. सांप्रत मीं शस्त्रत्याग केला आहे." यावर त्या अमित तेजस्वी मुनीनें 'तथास्तु' असें म्हटलें असतां तो राजर्षि आपल्या पुत्राला महात्म्या उत्तंकाचें कार्य करण्याची आज्ञा करून वनांत निघून गेला.

**युधिष्ठिर**—हे तपोधना, हा महावीर्यवान् दैत्य कोण होता? तो कोणाचा पुत्र व कोणाचा नातु, हें जाणण्याची माझी इच्छा आहे. अशाप्रकारचा बलवान् दैत्य असल्याचें मीं कधीं ऐकलें नाहीं. हे भगवन्, त्याचा सर्व यथार्थ वृत्तान्त ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव मला तो सविस्तर सांग.

(२) **मार्कंडेय**—हे नराधिपा, ठीक आहे, मी तुला तो सर्व वृत्तान्त जसा घडला तसाच सविस्तर कथन करितों, तो ऐक. ऐकार्णवामध्यें[1] स्थावर-जंगमांसह सर्व लोक व भूतें नष्ट झालीं असतां सर्वांचा उत्पादक, लोककर्ता, शाश्वत, अव्यय, विष्णु, ज्याला मुनि व सिद्ध 'सर्वलोकमहेश्वर' म्हणतात, त्या भगवंतानें अमित तेजस्वी शेषाच्या अंकावर आपल्या योगबलानें शयन केलें.

---

१ एकार्णवाचें सविस्तर वर्णन अ. १८७ पृ. ९ वर आलेलें आहे.

हे महाभागा, तो भगवान्, अच्युत प्रचंड शेषाच्या शरीरानें पृथ्वीचें आकलन करून निद्रा घेत असतां त्याच्या नाभींतून सूर्यप्रभेप्रमाणें देदीप्यमान कमल उत्पन्न झालें व त्या दिव्य कमलांतून लोकपितामह ब्रह्मदेव प्रकट झाला. तो साक्षात् लोकगुरु असून त्याला चार मुखें आहेत. तो चतुर्मूर्ति चारी वेद जाणतो. तो महा बलवान् व पराक्रमी ब्रह्मदेव स्वप्रभावानें दुराधर्ष आहे.

राजा, त्यानंतर कांहीं कालानें मधु व कैटभ हे दोघे दैत्य तेथें आले व त्यांनीं अनेक योजनें विस्तृत असलेल्या महाभुजंगावर शयन करणाऱ्या त्या हरीला पाहिलें. तो किरीट, कौस्तुभ व पीतांबर धारण करणारा प्रभु आपल्या कांतीनें व तेजस्वी शरीरानें अतिशय शोभत होता. त्या भगवंताच्या देहाची देदीप्यमान् कांति व सहस्र सूर्यांप्रमाणें अद्भुत तेज पाहून ते दोघेहि दैत्य अतिशय विस्मित झाले. तसेंच, कमलांत वास करणाऱ्या कमलनयन पितामहाला पाहूनहि त्यांना महदाश्चर्य वाटलें.

हे पृथापुत्रा, ते दोघे मधु-कैटभ दैत्य ब्रह्मदेवाला त्रास देऊं लागले. तेव्हां त्यांच्याकडून वारंवार अतिशय त्रास होऊं लागल्यामुळें महा यशस्वी ब्रह्मदेवानें कमलाचा देंठ हलविला. त्यायोगें केशव जागृत झाला. त्यानें नेत्र उघडतांच हे दोघे अतिशय वीर्यवान् दानव त्याच्या दृष्टीं पडले.

( ३ ) तेव्हां त्यांना पाहून मुरारीनें म्हटलें—हे महाबलाढ्य दैत्यांनो, तुमचें स्वागत असो. मी तुमच्यावर प्रसन्न झालों आहें, मी तुम्हांला श्रेष्ठ वर देतों.

हे महाराज, मधुसूदनाचें हें वचन ऐकून ते महाबलाढ्य व अतिशय गर्विष्ठ दैत्य हंसून त्यास म्हणाले—"हे सुरोत्तमा, आम्हीच वरद आहों. आम्हांपासून तूंच इष्ट वर मागून घे. तूं कांहीं विचार न करितां हवा तो वर माग, आम्ही तो देण्यास समर्थ आहों."

त्यांची ही दर्पोक्ति ऐकून **भगवान्** म्हणाला—हे वीरहो, मला वराची इच्छा आहे, यास्तव मी तुमच्याकडून मिळणाऱ्या वराचा स्वीकार करितों. तुम्ही दोघेहि वीर्यवान् अहां. तुमच्यासारखा दुसरा कोणीहि पुरुष नाहीं. यास्तव लोकहितासाठीं 'मला तुम्ही वध्य व्हावें' हाच वर मी मागत आहें. हे सत्यपराक्रमी दैत्य हो, एवढी माझी मनीषा पूर्ण करा.

**मधुकैटभ**—हे पुरुषोत्तमा, आम्ही स्वैर-थट्टेनेंहि कधीं असत्य भाषण केलेलें नाहीं, मग अन्य प्रसंगीं कोठून करणार ? आम्ही सत्यधर्मांत स्थित

आहों. बल, रूप, शौर्य, शम, धर्म, तप, दान, शील, सत्त्व व इंद्रियनिग्रह, यांत आमच्या तोडीचा दुसरा कोणीहि नाहीं. हे केशवा, आम्हांवर हें मोठेंच संकट ओढवलें आहे. परंतु तूं जें म्हटलेंस त्याप्रमाणें खुशाल कर. कारण कालाचें अतिक्रमण करतां येत नाहीं.

पण हे विभो, तूं आमच्या वधासाठीं एक गोष्ट करावीस ! कशानेंहि आवृत नसलेल्या आकाशांत तूं आमचा वध करावास अशी, आमची इच्छा आहे आणि हे सुरश्रेष्ठा, अन्यजन्मीं आम्हांला तुझे पुत्र होण्याचें भाग्य लाधावें. हा वर आम्ही तुजपाशीं मागतों. हे देवा, तूं आम्हांला जें म्हटलें आहेस तें असत्य होऊं नये.

**भगवान्**—हे दानवश्रेष्ठहो, ठीक आहे, मी तें सर्व करीन व तुमच्या इच्छे-प्रमाणें सर्व घडून येईल.

( ४ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, त्यानंतर मधुसूदनानें पुष्कळ विचार केला. परंतु त्यास पृथ्वी व स्वर्ग यांत अनावृत असा प्रदेश कोठेंहि आढळेना. तेव्हां आपल्या दोन्हीं मांड्या अनावृत–अनाच्छादित आहेत, असें पाहून त्या महा-यशस्वी अरिंदमानें आपल्या तीक्ष्ण सुदर्शन चक्रानें त्या मधु-कैटभ दैत्यांचीं मस्तकें तोडून टाकिलीं. ३. १२. २०३.

---

## अध्याय २०४ था.

[ १ कुवलाश्वानें केलेला धुंधु-दैत्याचा वध. २. त्याची धुंधुमार-नांवानें प्रसिद्धि. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, त्या मधु-कैटभांचा 'धुंधु'-नामक पुत्र महा द्युतिमान् व पराक्रमी होता. त्यानें एका पायावर उभे राहून उग्र तप आच-रिलें. त्या सतत तपश्चरणानें तो इतका कृश झाला कीं, वाळलेल्या पानाप्रमाणें त्याच्या शरीरांतील शिरा स्पष्ट दिसूं लागल्या.

त्याचें तें घोर तप पाहून ब्रह्मदेव त्याच्यावर प्रसन्न झाला व त्यानें त्याला वर दिला. त्यावेळीं त्या दैत्यानें 'देव, दानव, यक्ष, सर्प, गंधर्व व राक्षस या सर्वांस मीं अवध्य व्हावें' असा वर मागितला. तेव्हां ब्रह्मदेवानें 'ठीक आहे, तूं आतां जा' असें म्हटलें असतां तो दानव पितामहाच्या चरणांवर मस्तक ठेवून निघून गेला.

अशाप्रकारें वर मिळवून तो महापराक्रमी धुंधु पितृवधाचें स्मरण करीत सत्वर विष्णूपाशीं गेला. तो असहिष्णु धुंधु-दैत्य गंधर्वांसह सर्व देवांना जिंकून देव आणि विष्णु यांना वारंवार त्रस्त करूं लागला. नंतर तो दुष्ट असुर उज्जालक नांवानें प्रसिद्ध असलेल्या वालुकामय समुद्राच्या समीप येऊन त्या प्रदेशांतील उत्तंकाच्या आश्रमास आपल्या परम शक्तीनें पीडा देऊं लागला: त्या मधु-कैट-भाच्या भयंकर पराक्रमी धुंधु-पुत्रानें लोकांचा विनाश करण्यासाठीं तपोबलाचा आश्रय करून वालुकेच्या अंतर्भागांत सुखानें शयन केलें. त्याच्या निःश्वासानें उत्तंकाश्रमासमीप अग्नीच्या ज्वाला निघत असत.

हे कुंतीपुत्रा, याच वेळीं पृथ्वीपति कुवलाश्व आपले एकवीस हजार पुत्र, सैन्य, वहानें इत्यादि परिवार व उत्तंक यांसह तेथें आला. तेव्हां उत्तंकाच्या आज्ञेनें लोकहितासाठीं त्या बलवान् नृपतीचें तेज भगवान् विष्णूच्या तेजानें वृद्धि पावलें. याप्रमाणें तो दुर्धर्ष राजा तेथून निघाला असतां ‘ हा अवध्य श्रीमान् भूपाल आज धुंधुमार होईल ’ अशी प्रचंड आकाशवाणी झाली. चोहोंबाजूंनीं पुष्पवृष्टि होऊं लागली व देवदुंदुभि कोणीं न वाजवितांच वाजूं लागल्या. त्या धीमान् राजाच्या प्रयाणसमयीं शीतल वायु वाहूं लागला. सुरेश्वर इंद्रानें पर्जन्यवृष्टीनें सर्व पृथ्वी धूलिरहित करून टाकिली.

हे युधिष्ठिरा, जेथें महासुर धुंधु होता, तेथें अंतरिक्षांत देवतांचीं विमानें दिसूं लागलीं. कुवलाश्व व धुंधु यांचें युद्ध देव-गंधर्वांसहित महर्षि कुतूहलानें अव-लोकन करूं लागले. त्या वेळीं नारायणाच्या तेजानें समृद्ध झालेल्या त्या नृपतीनें आपले सर्व पुत्र दाही दिशांत मोठ्या त्वरेनें पाठविले आणि त्यांच्याकडून कुवलाश्व-महिपतीनें सर्व सागर खणविला.

कुवलाश्वाच्या पुत्रांनीं सतत सात दिवस तो वालुकार्णव खणला, तेव्हां बलाढ्य धुंधुदैत्य त्यांच्या दृष्टीं पडला. त्या वालुकेच्या अंतर्भागांत त्या घोर दानवाचा विशाल देह पसरला होता. तो आपल्या तेजानें सूर्याप्रमाणें देदीप्यमान दिसत होता. प्रलयकालीन अग्नीप्रमाणें कांति असलेला तो प्रचंड दैत्य पश्चिम दिशा आवृत करून निजला होता.

अशा त्या महाबलाढ्य दैत्याला कुवलाश्वाच्या पुत्रांनीं सर्व बाजूंनीं वेढलें व ते सर्व तीक्ष्ण धारेचीं विविध आयुधें घेऊन त्यावर धांवून गेले. तेव्हां त्या राजपुत्रांनीं विद्ध केलेला तो महाबलाढ्य दैत्य अतिशय क्रुद्ध होऊन

उठला व त्यानें त्यांचीं सर्व विविध शस्त्रें भक्षण करून टाकिलीं. त्या वेळीं त्या दानवाच्या मुखांतून प्रलयाग्नीप्रमाणें प्रदीप्त वह्नि उत्पन्न झाला व त्यानें आपल्या तेजानें त्या नृपात्मजांना दग्ध केलें. राजा, पूर्वी क्रुद्ध झालेल्या कपिल प्रभूनें जसें सगरपुत्रांना दग्ध केलें तसेंच या क्रोधी 'धुंधु'-दैत्यानें आपल्या मुखांतून उत्पन्न केलेल्या अग्नीनें जणुं काय सर्व लोकांचा संहार करीतच एका क्षणांत त्या राजकुमारांचें भस्म करून टाकिलें.

(२) युधिष्ठिरा, याप्रमाण ते राजपुत्र दैत्याच्या क्रोधाग्नीनें नाश पावले असतां महातेजस्वी कुवलाश्व-भूपति जागृत झालेला जणुं काय दुसरा कुंभकर्णच अशा त्या महात्म्याच्या समीप आला. त्या वेळीं त्या दैत्याच्या देहांतून विपुल जलाचा स्राव होत होता. तें जलरूपी तेज त्या नृपश्रेष्ठानें प्राशन केलें आणि त्या योगसंपन्न राजानें योगबलानें उदक निर्माण करून तो अग्नि शांत केला. नंतर त्या राजर्षीनें सर्व लोकांच्या हितासाठीं त्या क्रूर पराक्रमी दैत्यावर ब्रह्मास्त्र सोडून त्याला दग्ध करून टाकिलें. तेव्हां तो देवांच्या शत्रूचा नाश करणारा कुवलाश्व इंद्राप्रमाणें शोभला. अशाप्रकारें धुंधूचा वध करणारा तो अद्वितीय रथी कुवलाश्व राजा 'धुंधुमार-'नांवानें प्रसिद्ध व अप्रतिरथ झाला.

हे धर्मज्ञ पांडवा, याप्रमाणें लोकांना निर्भय करणाऱ्या त्या राजावर महर्षीं-सह सर्व देव संतुष्ट झाले व त्याला 'वर माग' असें म्हणाले.

तेव्हां अतिशय हृष्ट झालेला तो नृपाल हात जोडून नम्रपणें असें वचन बोलला—"हे सुरश्रेष्ठहो, मीं द्विजश्रेष्ठांना दान द्यावें, शत्रूंना अजिंक्य व्हावें, श्रीविष्णूशीं सख्य करावें आणि भूतांशीं द्रोह करूं नये, त्याचप्रमाणें माझी धर्मांतच सर्वदा रति असावी आणि मला स्वर्गांत अक्षय निवास घडावा."

हें ऐकून प्रसन्न झालेल्या देवांनीं 'तथास्तु' असें म्हटलें. नंतर गंधर्व, ऋषि व ज्ञानसंपन्न उत्तंक यांनीं त्या पराक्रमी पार्थिवाशीं संभाषण करून त्याला अनेक आशीर्वाद दिले आणि ते देव, महर्षि इत्यादि सर्व आपापल्या स्थानीं निघून गेले.

धर्मराजा, त्या वेळीं कुवलाश्व राजाचे दृढाश्व, कपिलाश्व व चंद्राश्व हे तीनच पुत्र अवशिष्ट राहिले होते. या अमित तेजस्वी राजांपासूनच इक्ष्वाकुकुलाची परंपरा सुरू झाली. युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या गुणसंपन्न कुवलाश्वानें मधु-कैट-भांच्या धुंधुपुत्राचा वध केला व तेव्हांपासून तो 'धुंधुमार'-नांवानें प्रसिद्ध झाला.



"मी कांहीं बलाका नव्हे. अशा क्रुद्ध दृष्टीनें पाहून तूं माझें काय करणार ?" (पृष्ठ ७६.)

युधिष्ठिरा, तूं विचारिलेलें हें 'धुंधुमार'-आख्यान असें आहे. ज्याच्या पराक्रमानें हें धौंधुमार-उपाख्यान प्रसिद्ध झालें, त्याचें सर्व चरित्र मीं तुला कथन केलें. हें पुण्यप्रद आख्यान विष्णूचें नामसंकीर्तनच आहे. जो धर्मात्मा पुरुष पर्व-कालीं याचें श्रवण करितो तो पुत्रवान्, आयुष्मान् व ऐश्वर्ययुक्त होतो. त्रितापरहित झालेल्या त्याला व्याधींपासून यत्किंचित्‌हि भय प्राप्त होत नाहीं. ३.१२.२०४.

---

## अध्याय २०५ वा.

[ १ पतिव्रतामाहात्म्याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, नंतर युधिष्ठिरानें महाबुद्धिमान् मार्कंडेयाला अतिशय गहन असा धर्मयुक्त प्रश्न केला.

**युधिष्ठिर**—हे भगवन्, तुझ्या मुखानें अतिशय सूक्ष्म व धर्म्य असें श्रेष्ठ स्त्रीमाहात्म्य ऐकण्याची मला इच्छा आहे. हे विप्रा, या लोकीं प्रत्यक्ष देव, सूर्य, चंद्र, वायु, पृथ्वी, अग्नि, पिता, माता, भगवान् गुरु आणि तत्तुल्य असलेले इतरहि सर्व दृष्टीं पडतात. हे सर्व गुरु आणि पतिव्रता स्त्रिया हीं सर्व मान्यच आहेत. परंतु पतीची शुश्रूषा करणारी स्त्री मला अतिशय दुर्लभ दिसते. यास्तव हे प्रभो, आम्हांला पतिव्रतांचें माहात्म्य कथन कर.

हे निष्पाप भृगुनंदना, इंद्रियांचें नियमन व मनाचें संयमन करून ज्या साध्वी स्त्रिया पतीचें दैवताप्रमाणें चिंतन करीत असतात, त्यांचें हें कर्म अतिशय दुष्कर आहे, असेंच मला वाटतें. हे भगवन्, माता, पिता व भर्ता, यांच्या सेवेहून अधिक दुष्कर स्त्रीधर्म कांहीं असेल असें मला वाटत नाहीं.

हे ब्रह्मन्, सदाचारसंपन्न स्त्रिया माता व पिता यांच्याशीं जें आदरयुक्त वर्तन करितात, तें खरोखरच दुःसाध्य आहे. पतिव्रतांना एकच पति असतो, त्या त्यांच्याशीं सत्य भाषण करितात व त्या योग्य कालीं आपल्या उदरांत दहा महिनेपर्यंत गर्भधारण करितात. याहून अधिक आश्चर्य तें कोणतें! हे विभो, स्त्रिया प्राणान्तक वेदना सहन करून, अतिशय क्लेश भोगून पुत्रांना प्रसवतात.

---

१ युधिष्ठिराने विचारलेल्या स्त्री-माहात्म्यादिकांच्या निर्णयासाठीं यापुढें पतिव्रताख्यानास आरंभ केला आहे.

त्या वेळीं त्यांच्या जीविताचाहि संशयच असतो. हे द्विजश्रेष्ठा, पुढें त्या अपत्यांचें अतिशय स्नेहानें पोषण करितात.

त्याचप्रमाणें हे मुने, सर्वदा क्रूर कर्मांत प्रवृत्त झाल्यामुळें निंद्य मानले जाणारे लोकहि स्वकर्म समजून त्याच कर्मांत सतत आसक्त होतात, हें त्यांचें कृत्यहि अत्यंत दुर्घट आहे, असें मला वाटतें. यास्तव क्षत्रियांच्या धर्माचरणाचें तत्त्वहि मला कथन कर. कारण हे विप्रा, क्रूरकर्मानें महात्म्यांना धर्मप्राप्ति होणें दुर्लभ आहे. तस्मात् हे भृगुकुलश्रेष्ठ सुव्रता, तुझ्या मुखानें या प्रश्नांचें उत्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**मार्कंडेय**—हे भरतश्रेष्ठा, ठीक आहे. तुझ्या या रहस्यपूर्ण प्रश्नाचें मी तत्त्वतः उत्तर देतों तें ऐक. राजा, कोणी मातेला श्रेष्ठ मानितात तर कित्येक पित्याला प्राधान्य देतात. परंतु अपत्याचे संगोपन करून त्यांना वाढविणाऱ्या मातेचें कर्तव्य अतिशय दुष्कर आहे.

पिता तप, देवतार्चन, वंदन, तितिक्षा, आणि जारण-मारणादि अन्य उपाय यांच्या योगानें पुत्रप्राप्तीचे यत्न करितो. याप्रमाणें अतिशय कष्ट सोसून दुर्लभ असलेला पुत्र प्राप्त झाला असतां ‘ तो पुढें कसा निपजेल ’ याची तो सदोदित चिंता करीत असतो. हे वीरा, अशाप्रकारें माता व पिता हीं उभयतांहि पुत्राला यश, कीर्ति, ऐश्वर्य व सुसंतति प्राप्त व्हावी आणि त्यानें धर्मनिष्ठ व्हावें, अशी आशा करीत असतात. जो पुत्र त्यांची ही आशा सफल करितो, तोच खरा धर्मवेत्ता होय.

हे युधिष्ठिरा, ज्याच्यावर माता-पिता नित्य संतुष्ट असतात, त्याची इह व पर लोकीं कीर्ति होऊन त्याला शाश्वत धम प्राप्त होतो. त्याचप्रमाणें हे युधिष्ठिरा, साध्वी स्त्रियांना यज्ञकर्में, श्राद्ध, उपवास, व्रतें, इत्यादिकांची कांहीं आवश्यकता नाहीं. केवल पतिशुश्रूषापरायण झाल्यानेंच त्या स्वर्ग जिंकितात. हे राजन्, या प्रकरणाचें विवरण करून मी तुला पतिव्रतांचा नियतधर्म सांगतों. तो सावधान चित्तानें ऐक. ३. १२. १०५.

---

## अध्याय २०६ वा.

[ १ मार्कंडेयानें वर्णिलेला बलाकेचा वृत्तान्त. २ पतिव्रताचरित्र. ३ ब्राह्मण्याचीं लक्षणें. ४ ब्राह्मणाला धर्मव्याधाकडे जाण्याचा उपदेश. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे भरतश्रेष्ठा, पूर्वी ' कौशिक '-नांवाचा एक वेदाध्यायी, तपोनिष्ठ, धर्मशील ब्राह्मण होता. सांग उपनिषदें व वेद यांचें अध्ययन करणारा तो श्रेष्ठ विप्र एकदा वेदोच्चार करीत एका वृक्षाखालीं बसला होता. त्या वृक्षावर एक बलाका बसली होती. तिनें त्या ब्राह्मणाच्या अंगावर विष्ठात्याग केला. तेव्हां त्या क्रुद्ध झालेल्या ब्राह्मणानें तिच्याकडे पाहून अनिष्ट चिंतन केलें. त्या विप्रानें ' हिचा नाश होवो ' असें मनांत आणून तिच्याकडे क्रोधानें अवलोकन करितांच ती बलाका गतप्राण होऊन भूमीवर पडली. तेव्हां त्या मृत होऊन पडलेल्या बलाकेकडे पाहून त्याच्या मनांत दया उत्पन्न झाली आणि तो द्विज ' अरेरे मीं क्रोधवश होऊन केवढें हें अकार्य केलें !' असें म्हणून पश्चात्तापानें शोक करूं लागला.

( २ ) **मार्कंडेय**—राजा, याप्रमाणें अनेक प्रकारें स्वतःला दोष देत तो विद्वान् ब्राह्मण गांवामध्यें भिक्षा मागण्यासाठीं निघाला. त्या गांवांतील पवित्र गृहांतून भिक्षा घेत घेत फिरत असलेला तो पूर्वी जेथून भिक्षा घेतली होती त्या शेवटच्या गृहापाशीं आला आणि ' भिक्षां देहि ' असें म्हणाला.

तेव्हां त्या गृहांतील स्त्रीनें त्याला ' थांब ' असें म्हटलें व ती गृहिणी भिक्षा घालण्याचें पात्र स्वच्छ करीत आहे तोंच तिचा भर्ता अकस्मात् घरीं आला. त्या वेळीं तो क्षुधेनें अतिशय पीडला होता. हे राजन्, तेव्हां त्या साध्वीनें पतीला पहातांच ब्राह्मणाची भिक्षा बाजूला ठेविली व प्रथम क्षुधाक्रांत झालेल्या पतीला पाद्य, आचमनीय व आसन देऊन त्याची शुश्रूषा केली आणि मधुर व मिष्ट भोजनानें त्याला तृप्त केलें.

युधिष्ठिरा, ती पतिव्रता, नित्य पतीनें भोजन केल्यावर त्याचें अवशिष्ट उरलेलें अन्न सेवन करीत असे. ती पतीच्या मनाप्रमाणें वागणारी साध्वी, पति हेंच आपलें दैवत आहे, असें मानीत असे. काया-वाचा-मनानें पतीलाच अनुसरणारी ती अन्य कशाचेंहि चिंतन करीत नसे. पतिसेवापरायण होऊन तिनें त्याला सर्वस्वीं वाहून घेतलें होतें.

ती सदाचरणी, शुचिर्भूत, दक्ष व कुटुंबाचें कल्याण इच्छिणारी सुव्रता ज्यांत पतीचें हित असेल त्याचेंच सतत अनुवर्तन करीत असे. ती जितेंद्रिय गृहिणी सर्वदा देवता, अतिथि, भृत्य, श्वश्रू-श्वशुर यांच्या सेवेंत तत्पर असे.

अशा त्या पतिसेवारत साध्वीनें भिक्षेकरी ब्राह्मण अद्यापि दारांतच भिक्षेसाठीं उभा आहे, हें जेव्हां पाहिलें तेव्हां तिला त्याच्या भिक्षेचें स्मरण झालें व ती लज्जित होऊन त्याला भिक्षा घालावयास आली.

तेव्हां ब्राह्मण म्हणाला—हे भवति, तूं मला थांब म्हटलेंस आणि तिष्ठत ठेवलेंस, हें काय? यापूर्वींच तूं मला भिक्षा घालून मार्गाला कां लाविलें नाहींस!

मार्कंडेय—राजा, त्या वेळीं तो ब्राह्मण जणुं काय आपल्या तेजानें प्रज्वलित झाल्याप्रमाणें क्रोधसंतप्त झाला आहे, असें पाहून ती साध्वी सांत्वपूर्व वचनानें त्यास असें म्हणाली.

स्त्री—हे विद्वन्, मला क्षमा कर. माझा पति माझें परम दैवत आहे. तो क्षुधित व श्रांत होऊन आल्यामुळें मी अगोदर त्याच्या शुश्रूषेंत गुंतलें.

ब्राह्मण—हे आर्ये, तुला ब्राह्मणाहून पति श्रेष्ठ वाटतो काय? गृहस्थाश्रमांत राहून तूं ब्राह्मणांचा असा अवमान करितेस! हे मूढे, स्वर्गांतील इंद्रहि ब्राह्मणांना प्रणाम करितो, मग या मर्त्यलोकींच्या मानवांची काय कथा! ब्राह्मण अग्नितुल्य असून ते या पृथ्वीला दग्ध करण्यासहि समर्थ आहेत, हे तूं जाणस नाहींस काय? किंवा तूं हें तत्त्व वृद्धांच्या मुखानें कधीं ऐकलें नाहींस काय?

स्त्री—हे तपोधना, मी कांहीं बलाका नव्हे. यास्तव हा क्रोध सोडून दे. अशा क्रुद्ध दृष्टीनें पाहून तूं माझें काय करणार? मी ज्ञानी विप्रांचा केव्हांहि अवमान करीत नाहीं. ते देवतुल्य आहेत, हें मी जाणतें. यास्तव हे विप्रा, माझ्या या अपराधाची क्षमा कर.

धीमान् विप्रांचें तेज व माहात्म्य मला माहित आहे. अगस्त्यमुनीनें क्रोधानें सागर प्राशन केला व तें जल खारट करून पिण्यास अयोग्य करून टाकिलें, त्याचप्रमाणें दंडकारण्यांतील ज्यांचा क्रोधाग्नि अद्यापि शांत झाला नाहीं, अशा शुद्धचित्त प्रखर तेजस्वी मुनींचा प्रभावहि मी जाणत्यें. ब्राह्मणांच्या अवमानामुळेंच दुरात्मा क्रूर वातापि अगस्त्यमुनीच्या पचनीं पडला.

तसेंच महात्म्या ब्राह्मणांचे अनेक प्रभाव, विपुल क्रोध व प्रसाद मीं ऐकले आहेत. यास्तव हे अनघा, या अतिक्रमाबद्दल मला क्षमा कर.

हे द्विजश्रेष्ठा, पतिसेवेनें जो धर्म प्राप्त होतो, तोच धर्म मला रुचतो. सर्व दैवतांमध्यें पतीच माझें परम दैवत आहे. मी हा पतिसेवेचा धर्म आचरीत असत्यें. हे द्विजोत्तमा, मला पतिसेवेचें फल कशा प्रकारचें मिळालें आहे तें पहा. तूं रोपानें बलाकेला दग्ध केलेंस हें मला घरीं बसून कळलें. पतिशुश्रूषेमुळेंच मला हें सर्वज्ञत्व प्राप्त झालें आहे.

( ३ ) हें सर्वज्ञत्व ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांच्या ठिकाणींच असतें, म्हणून मी आतां तुला त्यांचीं लक्षणें सांगतें, ऐक. वस्तुतः येथें ब्रह्मवेत्त्याचीं लक्षणें सांगणें व्यर्थ आहे, परंतु विद्वानाचीं लक्षणें विद्येचीं साधनें आहेत, म्हणून ब्राह्मण्याची इच्छा करणारानें सत्यवाक्, गुरुभक्त व क्षमावान् व्हावें. द्विजोत्तमा, क्रोध हा मनुष्याच्या शरीरांत रहाणारा शत्रु आहे. जो क्रोध-मोहांचा त्याग करितो, त्यालाच देव 'ब्राह्मण' असें म्हणतात. जो सत्यवक्ता गुरूला संतुष्ट करितो, कोणीं क्लेश दिले तरी त्याला उलट पीडा देत नाहीं, जो जितेंद्रिय, धर्मपरायण, स्वाध्यायनिरत व शुचिर्भूत असतो, ज्या धर्मज्ञ विद्वानाचे काम-क्रोध स्वाधीन असतात, जो सर्व लोकांना आत्मवत् मानितो, सर्व धर्मांत रत असतो, जो अध्ययन-अध्यापन, यजन-याजन व यथाशक्ति दान करितो त्यालाच देव 'ब्राह्मण' समजतात. हे विप्रा, जो द्विज ब्रह्मचारी, दान देणारा, अध्ययन करणारा, स्वाध्यायवान् व अप्रमत्त असतो, त्यालाच देव ब्राह्मण मानितात.

ब्राह्मणांचें जें हित तेंच त्यांना सांगत जावें. त्यांचें मन सदा सत्यामध्येंच आसक्त व्हावें व अनृतामध्यें रत होऊं नये. हे द्विजोत्तमा, स्वाध्याय, दम, आर्जव व इंद्रियनिग्रह हाच ब्राह्मणांचा शाश्वत धर्म म्हटला आहे. धर्मवेत्ते लोक सत्य व आर्जव यालाच परम धर्म म्हणतात. हे ब्रह्मन्, हा आत्मदर्शनरूप शाश्वतधर्म त्रिकालाबाधित ब्रह्मवस्तूमध्यें पर्यवसान पावला आहे. तो अतिशय दुर्ज्ञेय आहे. उपनिषद्रूप श्रुति हेंच त्याविषयीं प्रमाण आहे व वृद्धांनींहि त्याविषयीं असेंच सांगितलें आहे.

( ४ ) हे विप्रश्रेष्ठा, हा सूक्ष्म असलेला धर्म अनेकांना अनेक प्रकारचा दिसतो. तूंहि धर्मज्ञ, स्वाध्यायनिरत व शुचि आहेस, पण हे भगवन्, तूं तत्त्वतः

१ इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणां । अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥ (याज्ञस्मृ. १.८.) पूजा, आचार, इद्रियनिग्रह, अहिंसा, दान व स्वाध्याय या सर्व कर्मामध्यें चित्तैकाग्र्यानें आत्मसाक्षात्कार संपादन करणें हाच परम धर्म होय.

धर्म जाणत नाहींस, असें मला वाटतें. हे ब्राह्मणा, तूं जर परम धर्म जाणत नसशील तर मिथिलानगरीस जाऊन धर्मव्याधाला विचार. तो माता-पितरांची शुश्रूषा करणारा, सत्यवादी व जितेंद्रिय धर्मात्मा व्याध मिथिलेंत राहतो. तो तुला धर्म सांगेल. तुझ्या इच्छेप्रमाणें तूं तेथें जा. तुझें कल्याण असो. हे द्विजोत्तमा, मीं तुझ्याशीं जें अमर्याद भाषण केलें त्याची मला क्षमा कर. कारण धर्मज्ञांना स्त्रिया अवध्य आहेत.

ब्राह्मण—हे साध्वि, तुझें कल्याण असो, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. माझा क्रोध शांत झाला आहे. तूं जरी माझी निंदा केलीस तरी मला माझें परम श्रेयच सांगितलेंस. यास्तव तुझें कुशल असो. हे पतिव्रते, मी आतां जातों आणि स्वकार्य साधितों.

मार्कंडेय—युधिष्ठिरा, याप्रमाणें तो द्विजश्रेष्ठ त्या स्त्रीचा निरोप घेऊन तेथून निघाला व तो कौशिक ब्राह्मण स्वतःची निंदा करीत घरीं परत आला. ३. १२. २०६.

---

## अध्याय २०७ वा.

[ १ ब्राह्मणाचा मिथिलानगरीत प्रवेश व त्याचें धर्मव्याधापाशीं गमन. २ व्याधाला प्रश्न. ३ व्याधाचें स्वकर्मसमर्थन. ४ शिष्टाचाराचें वर्णन. ]

( १ ) मार्कंडेय—धर्मराजा, तो ब्राह्मण त्या पतिव्रतेच्या आश्चर्यकारक भाषणाचा विचार करीत स्वतःची निंदा करूं लागला व स्वतःला अपराधी मानूं लागला. धर्माच्या सूक्ष्म गतीचा विचार करून तो स्वतःशींच म्हणाला —" मी श्रद्धावान् होऊन आज मिथिला नगरींत जातों. तेथें धर्मज्ञ व कृतात्मा व्याध रहात आहे. त्या तपोधनाला धर्म विचारण्यासाठीं मी आतांच निघतों. "

असा मनांत विचार करून आणि बलाकेचा प्रत्यय व धर्म्य शुभ वचनें यांवरून त्या साध्वी स्त्रीच्या वचनावर श्रद्धा ठेवून तो मोठ्या कुतूहलानें मिथिलेस जावयास निघाला. त्या ब्राह्मणानें अनेक अरण्यें, ग्राम व नगरें यांचें उल्लंघन करून जनकानें संरक्षण केलेल्या मिथिलेंत प्रवेश केला.

ती शुभ नगरी धर्माच्या आधारभूत असलेल्या यज्ञोत्सवांनीं व्याप्त झाली होती. ती अनेक प्रवेशद्वारें, विशाल भुवनें, रम्य प्रासाद, तट व सात मजली

प्रचंड गृहें, यांनीं शोभत होती. तेथें विविध वस्तूंचे बाजार असून, विशाल राजमार्ग होते. ती रम्य नगरी अश्व, रथ, गज व योद्धे यांनीं व्यापिली होती. हृष्ट-पुष्ट जनांनीं समाकीर्ण असलेली ती पवित्र नगरी सतत विविध उत्सवांनीं युक्त होती.

याप्रमाणें त्या नगरींतील विविध प्रकार अवलोकन करीत तो ब्राह्मण मार्गानें चालला असतां त्यानें धर्मव्याधाची चौकशी केली. तेव्हां द्विजांनीं त्याला त्याचें रहाण्याचें स्थल सांगितलें.

कौशिक ब्राह्मण तेथें जाऊन पहातो तों वधस्थानासमीप हरिण-महिषादि पशूंचें मांस विकीत असलेला तो तपस्वी व्याध त्याच्या दृष्टीं पडला. तेथें मांस घेणाऱ्या लोकांची अतिशय गर्दी असल्यामुळें हा विप्र एका बाजूला जाऊन उभा राहिला. इतक्यांत तो व्याधहि ब्राह्मण आल्याचें जाणून गडबडीनें उठला व एकीकडे जेथें तो द्विज उभा होता, तेथें आला.

( २ ) व्याध—हे भगवन्, मी तुला नमस्कार करितों. तुझें स्वागत असो. मी व्याध आहें. मीं तुझें कोणतें कार्य करावें, त्याची आज्ञा कर. तुझें कल्याण असो. हे अनघा, तुला त्या पतिव्रतेनें 'तूं मिथिलेंत जा' असें सांगितलें व तूं कशाकरितां येथें आला आहेस, तें सर्व मला कळलें आहे.

व्याधाचें हें भाषण ऐकून तो ब्राह्मण अतिशयच विस्मित झाला व हें आणखीं दुसरें आश्चर्य आहे, असें तो मनांत म्हणाला. इतक्यांत व्याध पुनः त्याला म्हणाला—"हे ब्रह्मन्, हें स्थान अयोग्य आहे, यास्तव तुला वाटत असेल तर आपण घरीं जाऊं या."

मार्कंडेय—हे पांडवा, तें ऐकून ब्राह्मण संतोषानें 'ठीक आहे' असें बोलला. तेव्हां ब्राह्मणाला पुढें करून व्याध आपल्या गृहाकडे निघाला. त्यानें गृहांत प्रवेश करून द्विजाचा रम्य आसन, पाद्य, आचमनीय इत्यादिकांनीं सत्कार केला. नंतर सुखासनावर बसलेल्या ब्राह्मणानें व्याधाला प्रश्न केला—"बा व्याधा, तुझ्यासारख्याला हें कर्म अनुचित आहे, असें मला वाटतें. तुझें हें घोर कर्म पाहून मला फार खेद होत आहे.

( ३ ) व्याध—हे द्विजा, पूर्वपरंपरेनें चालत आलेलें व माझ्या कुलाला उचित असें हें कर्म आहे. मी माझ्या स्वधर्मांत स्थित आहें. यास्तव तूं असा

खिन्न होऊं नकोस. विधात्यानें सृष्टीच्या आरंभापासून जें कर्म नेमून दिलं आहे, त्याचें पालन करून मी माझ्या पूज्य वृद्ध माता-पितरांची सेवा करीत असतों.

हे विप्रश्रेष्ठा, मी सर्वदा सत्य भाषण करितों, कोणाची असूया करीत नाहीं व यथाशक्ति दान देतों. देवता, अतिथि व भृत्य यांना अर्पण करून अवशिष्ट राहिलेल्या अन्नावर उपजीविका करितों. मी कोणाच्याहि दोषांचा उच्चार करीत नाहीं व कोणावर वृथा दोषारोप करीत नाहीं. हे द्विजसत्तमा, पूर्वी केलेलें कर्म कर्त्याला अनुसरतें. कृषि, गौरक्ष्य व वाणिज्य हें या लोकींचें जीवन आहे आणि दंडनीति व वेदविद्या परलोकाचें साधन आहे.

शूद्राचें कर्म परिचर्या, वैश्याची कृषि, क्षत्रियाचा संग्राम आणि ब्रह्मचर्य, तप, मंत्र व सत्य हे ब्राह्मणाचे धर्म श्रुत आहेत. राजा स्वकर्मनिरत प्रजेचें धर्मानें शासन करितो व विकर्म करणारांस स्वकर्मांत नियुक्त करितो. प्रजेनें राजाचें सर्वदा भय बाळगावें. कारण नृपाल प्रजेचा अधिपतिच आहे. नृपति बाणांनीं निवारण केलेल्या मृगांप्रमाणें निषिद्ध कर्म करणाऱ्या प्रजेचा प्रतिषेध करितात.

परंतु हे विप्रर्षे, जनकाच्या या नगरींत प्रतिषिद्ध कर्म करणारा कोणीहि नाहीं. चारी वर्णांतील प्रजा स्वकर्मांत स्थित आहेत. हा धर्मनिष्ठ जनक-राजर्षि स्वतःचा पुत्र जरी दुराचरणी असला तरी त्यालाहि योग्य दंड करितो. त्याच-प्रमाणें धार्मिकाला कदापि पीडा देत नाहीं. त्या नृपतीनें आपल्या हेरांची उत्तम योजना केलेली असून तो क्षत्रियांचें ऐश्वर्य, राज्य व दंड या सर्वांकडे धर्मदृष्टीनें पहातो. हे द्विजश्रेष्ठा, धर्मज्ञ भूपति स्वधर्मानेंच विपुल संपत्ति मिळ-विण्याची इच्छा करितात. सर्व वर्णांचें संरक्षण करणारा राजाच आहे.

हे भगवन्, मी स्वतः कधींच पशूंची हिंसा करीत नाहीं. मी नेहमीं दुस-ऱ्यानें वध केलेल्या या वराह-महिषादिकांचें मांस विकीत असतों. त्याचप्रमाणें मी केव्हांहि मांस भक्षण करीत नाहीं व विहित कालींच स्त्रीसमागम करितों. सर्वदा उपवास व नक्तभोजन करीत असतों. हे ब्रह्मन्, अशा आचरणानें दुःशील पुरुषहि शीलवान् होतो आणि प्राण्यांची हिंसा करण्यांत रत असले-लाहि धार्मिक बनतो. स्वैरवृत्तीनें वागणाऱ्या नरेंद्राच्या राज्यांत धर्मसंकर होतो आणि फार मोठा अधर्म वाढून प्रजेचाहि संकर वाढतो. पार्थिवांच्या अधर्मा-चरणानें भयंकर, खुजी, कुबडी, मोठ्या मस्तकाची, क्लीब, अंध, बधिर व बेडकासारख्या बटबटीत नेत्रांची प्रजा निपजते व सर्वदा प्रजेचा क्षय होतो.

हा धर्मात्मा जनकराजा सदैव स्वधर्मरत असलेल्या आपल्या सर्व प्रजेवर अनुग्रह करून तिचें धर्मानें पालन करितो.

हे विप्रा, जे मानव माझी प्रशंसा करितात व जे निंदा करितात, त्या सर्वांना मी शुभकर्मानेंच संतुष्ट करीत असतों. जे नृपति योग्यप्रकारें सेनेची योजना करितात, तेच खरे भूपाल होत. इतर सर्व राजे नसून चोरच होत. जे स्वधर्मनिष्ट, दमनशील व उद्योगी असतात ते दुसऱ्यावर उपजीविका करीत नाहींत. यथाशक्ति अन्नदान, तितिक्षा, धर्मनिष्ठा, सर्वभूतांचा यथाविधि व यथान्याय सत्कार हे मानवांना अवश्य असलेले गुण त्यागावांचून पुरुषांच्या अंगीं येत नाहींत.

यास्तव मनुष्यानें वृथा वाद करूं नये. सर्वांचें अयाचित प्रिय करावें. काम, भय व द्वेष या कारणांनीं धर्माचा त्याग करूं नये. अतिशय प्रिय घडलें तरी हृष्ट होऊं नये व अप्रिय घडल्यानें संतप्त होऊं नये. द्रव्यहानि झाली असतां मोहित होऊं नये व धर्मत्याग करूं नये. धर्मविरुद्ध कर्म आचरूं नये. त्याच्या विरुद्ध असलेलें दुसरें कोणतेंहि कर्म करूं नये. आपल्याला व दुसऱ्याला जें शुभावह असेल तेंच कर्म करावें व त्यांतच मन लावावें. आपल्याशीं कोणीं निंद्य वर्तन केल्यास त्याच्याशीं आपण तसेंच निंद्य आचरण करूं नये. सर्वदा शुभच करीत असावें व सौजन्यानेंच वागावें. कारण जे लोक पाप करण्याची इच्छा करितात ते पातकी स्वतःचाच नाश करितात. चोरादि व्यसनी लोकां-प्रमाणें हें असज्जनाचें कर्म त्यांनाच शोभतें. 'धर्म नाहीं' असें मानणारे जे नास्तिक पवित्र लोकांना हंसतात ते धर्मावर अश्रद्धा ठेवणारे लोक निःसंशय नाश पावतात. लोहाराच्या भात्याप्रमाणें ते व्यर्थ पुष्ट झालेले असतात.

मूढ व गर्विष्ठ लोकांचा संकल्प निष्फल होतो. सूर्य ज्याप्रमाणें दिवसा आपलें रूप स्पष्ट दाखवितो, त्याप्रमाणें हे मूढजन आपल्या मूर्खपणाचें स्वरूप स्वतःच प्रकट करितात. मूर्खाचा[1] केवल आत्मप्रशंसेनें प्रकाश पडत नाहीं, पण विद्यावान् मलीन असला तरी सर्वत्र प्रकाशतो. कोणाचीहि निंदा न करणारा व आपली कीर्ति न गाणारा असा कोणीहि गुण-संपन्न पुरुष लोकांमध्यें प्रसिद्धीस येत नाहीं. पूर्वी केलेल्या दुष्कर्मांचा पश्चात्ता-

१ न लोके राजते मूर्खः केवलात्मप्रशंसया ।
अपि चेह मृजा हीनः कृतविद्यः प्रकाशते ॥

पानें नाश होतो व मी पुनः असलें पापकर्म करणार नाहीं, अशा निश्चयानें पुढील पापापासून मुक्त होतो.

जप, तप, तीर्थ इत्यादि पुण्यकर्मांतील कोणत्याहि कर्मानें पूर्वपापाची निवृत्ति होऊन धर्मोत्पत्ति होते, असें प्रतिपादन करणारें श्रुतिवचन आहे. ज्ञानोत्पत्तीचा मात्र श्रवणादि हा एकच मार्ग आहे. पूर्वजन्मीं केलेल्या पापांचें ज्ञान जरी नसलें, तरी धर्मशील पुरुष त्यांचा नाश करूं शकतो. पुरुष या जन्मीं अनवधानानें जें पाप करितो त्याचीहि धर्माचरणानें निवृत्ति होते.

जो पुरुष पाप करूनहि, 'माझें हें पापकृत्य कोणीं पाहिलें नाहीं ' असें समजतो, त्याला आदित्यादि देव व त्याचाच अंतरात्मा पहातो. धर्मावर श्रद्धा ठेवून, गुणांमध्यें दोषदृष्टि न करून व साधूंचीं छिद्रें वस्त्राप्रमाणें आच्छादित करून सर्वदा कल्याणाचरणच करावें. म्हणजे धनहीन साधूंचीं श्राद्धादि कर्में यथाशास्त्र होत नसल्यास त्यांना धनादि देऊन त्यांची न्यूनता पूर्ण करावी व त्यांचें तें पुण्यकर्म यथाशास्त्र घडविण्याचें पुण्य जोडावें. पुरुषानें पापाचरण करूनहि मोक्षोपाय संपादन करण्याची इच्छा करावी. साधूंची सेवा केल्यानें मोक्षेच्छा उत्पन्न होते व महा अभ्रापासून मुक्त होणाऱ्या चंद्राप्रमाणें तो सर्व पापांपासून मुक्त होतो. ज्याप्रमाणें आदित्य उदय पावतांना प्रथम अंधकाराची निवृत्ति करितो त्याप्रमाणें शुभाचरण करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो.

हे द्विजोत्तमा, लोभच सर्व पापांचें मूळ आहे, असें तूं जाण. अविद्वान् लोक लुब्ध होऊन पापाचरण करितात. ते वस्तुतः धर्मशून्य जरी असले तरी तृणाच्छादित कूपाप्रमाणें बाह्यतः मोठे धार्मिक दिसतात. ते दांभिक धार्मिकतेचा मोठा आव आणितात. त्यांचीं सर्व पवित्र चिह्नें व धर्मसंबंधीं भाषणें हा सर्व शुद्ध दंभ असतो. कारण त्यांच्या ठिकाणीं साधूंचीं सर्व बाह्य चिह्नें दिसतात. पण शिष्टाचाराचा अभाव असतो. कारण बाह्य धर्मचिह्नांचें जसें सोंग आणतां येतें, तसें सदाचाराचें सोंग आणतां येत नाहीं.

( ४ ) **मार्कंडेय**–धर्मराजा, त्या व्याधाचें हें धर्मप्रवचन ऐकून तो महाप्राज्ञ कौशिक-ब्राह्मण म्हणाला—"हे धर्मज्ञा, तुझें कल्याण असो, मला शिष्टाचाराचें ज्ञान कसें होईल ? तुझ्या मुखानें शिष्टाचार ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव हे महाबुद्धिमान् व्याधा, मला तो यथार्थ निवेदन कर."

**व्याध** म्हणाला—हे द्विजसत्तमा, शिष्टाचारांत यज्ञ, दान, तप, वेद आणि सत्य हीं पांच पवित्र कर्में नित्य असतात. आतां अगोदर शिष्टांचें लक्षण

सांगतों, तें ऐक. काम, क्रोध, दंभ, लोभ व मनाचें अनृजुत्व यांच्या अधीन न होतां त्यांस पूर्णपणें आपल्या वश ठेवून केवल धर्मानेंच संतुष्ट असणारे जे शिष्ट तेच शिष्टांना संमत आहेत.

हे भूदेवा, पुष्कळ द्विज यज्ञ व स्वाध्याय नित्य करितात. पण स्वेच्छेप्रमाणें त्यांना त्याचें स्मरण होत नाहीं, यास्तव सदाचारपालन हें द्वितीय शिष्टलक्षण आहे. गुरुशुश्रूषा, सत्य, अक्रोध व दान हीं चार शिष्टाचाराचीं नियत लक्षणें आहेत. हे ब्रह्मन्, शिष्टाचाराकडे मन लावून सर्वप्रकारें त्याचें आचरण केल्यानें जी वृत्ति लाभते, ती गुरुशुश्रूषादिकांच्या अभावीं प्राप्त होणें शक्य नाहीं.

सत्य हें वेदाचें रहस्य आहे, दम हें सत्याचें रहस्य आहे व त्याग हें दमाचें रहस्य आहे. सत्य, दम व त्याग शिष्टाचारामध्यें सतत वास करितात. जे पुरुष बुद्धिमोहामुळें धर्माची असूया करितात, ते अमार्गगामी होत. त्यांचें अनुवर्तन करणारा पुरुष क्लेश भोगतो. जे शिष्ट अतिशय नियत होऊन श्रुति व त्याग यांचा आश्रय करितात, धर्ममार्गावरच आरूढ होतात व सत्यधर्मांत तत्पर असतात, तेच शिष्टाचारयुक्त जन परम विरक्त होऊन आत्माकार वृत्तीचाहि निग्रह करितात. ते आचार्यानें उपदेशिलेल्या ज्ञानामध्यें स्थिर होतात व शिष्टांच्या मर्यादेचा विचार करून धर्म व अर्थ यांचाहि विचार करितात.

हे ब्राह्मणा, तूंहि धार्मिक वृद्धांची सेवा कर. ज्ञानाचा आश्रय कर आणि नास्तिक, मर्यादाशून्य, क्रूर व पापनिश्चयी दुर्जनांचा संसर्ग सोड. काम व लोभ या मकरांनीं जिला व्यापिलें आहे व पंचेंद्रियें हें ज्यांतील जल आहे, अशा या घोर संसार-नदीला धैर्यरूप नौकेचा आश्रय करून तरून जा आणि जन्मरूपी संकटांतूनहि पार पड.

शुक्ल वस्त्रावर रंग जसा स्पष्ट दिसतो, त्याप्रमाणें क्रमानें संपादन केलेला बुद्धियोगमय महद्धर्म शिष्टाचारामध्यें विशेषतः प्रकट होतो. अहिंसा, सत्यवचन व सर्व भूतांचें हित हा परम धर्म आहे. अहिंसा हा परम धर्म सत्यामध्यें स्थिर होतो. सत्याच्या आधारानें मनुष्याच्या सर्व प्रवृत्ति होतात. शिष्टाचाराला अनुसरून सत्याचें पालन करणें हा सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म आहे. आचार हा सज्जनांचा धर्म आहे व सज्जन हेंच आचाराचें स्वरूप आहे.

ज्या प्राण्याचा जसा स्वभाव असतो, तसाच तो व्यवहार करितो. अनात्मज्ञ, पापात्मा, पुरुष काम-क्रोधादि दोषांनाच प्राप्त होतो. परंतु जी न्याययुक्त

प्रवृत्ति तिलाच धर्म म्हटलें आहे आणि अनाचार हाच अधर्म आहे. धर्माधर्मांविषयीं शिष्टांनीं हाच उपदेश केला आहे. क्रोध, असूया, अहंकार व द्वेष यांचा त्याग करणें व निष्कपटपणें शमसंपन्न होणें हाच शिष्टांचा आचार होय.

वेदविद्येंत निष्णात, शुचिर्भूत, आचारसंपन्न, मनोनिग्रही, गुरुशुश्रूषु व दमनशील पुरुष शिष्टाचारसंपन्न असतात. त्यांचें अंतःकरण अतिशय उदार आणि आचार व कर्में दुष्कर असतात. स्वकर्मांचें आदरानें अनुष्ठान करणारे ते शिष्ट घोर वृत्ति सोडून शांतवृत्ति होतात. सदाचार हें एक सनातन आश्चर्य आहे. त्यानें युक्त असलेला पुरुष धर्मानेंच धर्म जाणतो व असे धर्मज्ञ पुरुषच स्वर्गलोकीं जातात.

आस्तिक, निरभिमान, ब्राह्मणपूजक, विद्या आणि आचार यांनीं युक्त असलेले शिष्ट स्वर्गामध्यें निवास करितात. वेदोक्त परम धर्म, धर्मशास्त्रांत सांगितलेला स्मार्त धर्म व शिष्टांचा आचार असें हें त्रिविध धर्मलक्षण आहे. सर्व विद्यांचें संपादन, सर्व तीर्थांतील स्नान, क्षमा, सत्य, आर्जव आणि शुचिर्भूतपणा हाच सदाचार आहे.

ब्राह्मणांना पूज्य मानणारे शिष्ट सर्वदा सर्व भूतांवर दया करितात. ते अहिंसानिरत असतात व कठोर भाषण करीत नाहींत. जे शुभ व अशुभ कर्मांच्या फलाचा क्षय कसा होतो, हें जाणतात व त्यामुळें पुण्यक्षयाला कारण होणाऱ्या सुखाची इच्छा करीत नाहींत, पापक्षयाला कारण होणारें दुःख सहन करितात, शमदमादि न्याय्य गुणांचा आश्रय करितात, सर्व प्राण्यांचें हित इच्छितात, निर्दोष धर्माचरण करितात, सन्मार्गांत स्थित असतात, कुटुंबांतील लोकांना सुख देऊन यथाशक्ति दान देतात, दीनांवर अनुग्रह करितात, सर्वांच्या आदरास पात्र होतात, विद्येला धन मानितात व सर्व भूतांवर दया करितात तेच तपस्वी शिष्य सर्व शिष्टांना संमत होतात.

दीनांवर दया करणारांना या लोकीं सुख व ऐश्वर्य प्राप्त होतें. जे कलत्रादि स्वजन व भृत्य वर्ग यांच्या ऐहिक सुखाकडेहि दुर्लक्ष करून आपल्या शक्तीच्या बाहेर दानादि देतात तेच खरे शिष्ट होत. ज्यांनीं सज्जनांचा सहवास केला आहे, जे लोकव्यवहार, धर्म व आत्महित यांकडे दृष्टि देऊन धर्माचरण करितात, ते दीर्घकाल उत्कर्ष पावतात.

अहिंसा, सत्यवचन, आर्जव, दया, अद्रोह, निरभिमानता, अकार्याविषयीं लज्जा, तितिक्षा, दम, शम, संतोष, भूतानुकंपा, राग-द्वेषराहित्य या श्रेष्ठ गुणांनीं युक्त असले सज्जनच तिन्ही लोकांना साक्षात् जाणतात.

भूतांचा द्रोह करूं नये, यथाशक्ति दान द्यावें व सत्य भाषण करावें. सज्जनांचीं हींच तीन मुख्य साधनें होत. त्यांच्या योगानेंच ते इष्टपद प्राप्त करून घेतात. सर्वांवर दया करणारे व दुसऱ्यांच्या दुःखानें दुःखी होणारे सज्जन अनायासानें सर्वोत्कृष्ट धर्ममार्गानें गमन करितात. शिष्टाचारसंपन्न महात्म्यांचा धर्म निश्चित आहे.

क्षमा, शांति, संतोष, प्रिय भाषण इत्यादि आचार हें शिष्टांचें लक्षण आहे. ज्ञानयुक्त कर्म हाच शिष्टांचा उत्तम मार्ग होय. धार्मिक लोक त्याचेंच अनुवर्तन करितात. ते ज्ञानासारख्या उच्चस्थानीं आरूढ होऊन सांसारिक महद्भयापासून मुक्त होतात आणि लोकांचीं विहित व निषिद्ध पुण्य-पापें तेथून पहात रहातात.

हे द्विजश्रेष्ठा, मीं तुला हा शिष्टाचारयुक्त सर्व धर्म यथामति व यथाज्ञान सांगितला आहे. ३. १२. २०७.

---

## अध्याय २०८ वा.

[ १ व्याधानें केलेला हिंसानिर्णय. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, नंतर व्याध त्या विप्राला म्हणाला—" हे ब्रह्मन्, मी जें हें मांसविक्रयाचें कर्म आचरीत आहें, तें निःसंशय घोर आहे. परंतु पूर्वकर्म दुस्तर आहे व दैवहि बलवत्तर आहे. पूर्वजन्मीं आचरिलेल्या पापकर्माचें हें फल आहे. मी या दोषाचा परिहार करण्याचा प्रयत्न करीत असतांहि दैवाच्या प्राबल्यामुळें या घोर कर्माचा त्याग करण्यास समर्थ नाहीं. हे भगवन्, आपण या कर्माचें शराप्रमाणें केवल निमित्तमात्र आहों आणि शरसंधान करणाऱ्या पुरुषाप्रमाणें दैवच या सर्वांचा कर्ता आहे. प्राण्यांचें दैवच प्रथम त्यांचा नाश करीत असतें. त्याचा घात करणारा मनुष्य केवल निमित्तमात्र होतो.

हे द्विजश्रेष्ठा, मी वध केलेल्या ज्या पशूंचें मांस विकतों, त्या प्राण्यांनाहि धर्म घडतो, कारण त्यांच्या मांसाचा उपयोग देवता, अतिथि व भृत्यवर्ग यांच्या भक्षणाकडे व पितरांच्या पूजनाकडे होतो. ओषधि, लता, पशु व मृगपक्षी हें सर्व प्राण्यांचें अन्नच आहे, अशी श्रुति श्रुत आहे.

क्षमाशील औशीनर शिबिराजाला स्वदेहाचें मांस अर्पण केल्यामुळें दुष्प्राप्य स्वर्गाची प्राप्ति झाली. हे ब्राह्मणा, पूर्वी नृपश्रेष्ठ रंतिदेवाच्या पाकशाळेंत नित्य दोन हजार पशूंचा वध होत असे. त्याचप्रमाणें तो रंतिदेव जेव्हां समांस अन्नाचें दान करीत असे, तेव्हां त्यासाठीं दोन सहस्र धेनूंची हिंसा होत असे. परंतु त्या नृपाची अतुल कीर्ति होत आहे. त्याच्या गृहीं चातुर्मास्यांत नित्य पशुवध होत असे.

हे ब्रह्मन्, अग्नि मांसेच्छा करीत असतात. यास्तव त्यांत मांसाची आहुति द्यावी, असेंहि श्रुतिवचन ऐकण्यांत येतें. त्याचप्रमाणें ब्राह्मण यज्ञामध्यें मंत्रांनीं संस्कृत केलेल्या पशूंचा वध करीत असतात, परंतु तेहि स्वर्गाला प्राप्त होतात. पूर्वी अग्नीनें जर मांसाची इच्छा केली नसती तर कोणींहि मांसभक्षण केलें नसतें. म्ह० मांस हें भक्ष्यच झालें नसतें.

मुनींनीं मांसभक्षणाचा विधि सांगून ठेविला आहे. जो ब्राह्मण देवतांना व पितरांना श्राद्धामध्यें यथाविधि मांस अर्पण करून मग स्वतः तें भक्षण करितो, त्याल त्याचा दोष लागत नाहीं. तो मांसाशन न करणाराच आहे, अशी श्रुति आहे. कलियुगांत मांसानें पितरांच्या तर्पणाचा निषेध केला आहे व देवतांना अर्पण केलेल्या यज्ञिय मांसाच्या अवशेषावांचून अन्य प्रसंगीं मांसाशन निषिद्ध मानिलें आहे. यज्ञिय मांस भक्षण करणारा अमांसाशी व विहितकालीं भार्यागमन करणारा ब्रह्मचारी म्हटला जातो.

हे द्विजा, त्याचप्रमाणें सत्य व असत्य या ज्ञान-कर्ममार्गाच्या निश्चयाचाहि विधि सांगितला आहे. कर्तृत्वादि अभिमान बाळगणाऱ्या मूढ कर्मठानें यज्ञिय मांस तरी भक्षण करावें, परंतु ज्ञानवानानें तें मुळींच सेवन करूं नये.

मागें रंतिदेवाच्या मांस-दानादिकांचा जो निर्देश केला आहे, तो कलियुगाहून अन्य युगाच्या अभिप्रायानें आहे. मला मांसाशनाची मोठी घृणा वाटते. त्यामुळेंच मी स्वतः प्राण्यांची हिंसा करीत नाहीं किंवा मांसभक्षण करीत नाहीं, हें मीं तुला पूर्वींच सांगितलें आहे.

'तर मग तूं मांसविक्रय कां करितोस ! कारण प्रत्यक्ष हिंसा करणाराला जो प्रेरणा करितो, त्यालाहि हिंसादोष लागतोच,' असें म्हणशील तर त्याचें उत्तर ऐक—" हे ब्राह्मणा, पूर्वी शापग्रस्त झालेल्या सौदासराजानें मनुष्यें भक्षण केलीं होतीं. त्यांतहि मला दोषच वाटतो. परंतु मी मात्र मांसविक्रय

हें स्वकर्म समजून त्याचा त्याग करीत नाहीं, हें माझें पूर्व कर्म जाणून त्यावर मी उपजीविका करितों.

हे ब्रह्मन्, इहलोकीं स्वकर्माचा त्याग करणें हा अधर्म मानिला आहे आणि स्वकर्मनिरत होणें, यास धर्माचरणच म्हटलें आहे. पूर्वजन्मींचें कर्म प्राण्याला कदापि सोडीत नाहीं. विधात्यानें कर्मनिर्णयाचा असा विधि सांगितला आहे कीं क्रूर कर्मांत प्रवृत्त होणाऱ्या माणसानें 'मी शुभ कर्म कसें करीन व या पापकर्मांपासून मुक्त कसा होईन?' असा विचार मनांत नेहमीं करीत असावें. म्हणजे त्याच्या घोर कर्मांचा अनेकप्रकारें परिहार होतो.

हे विप्रश्रेष्ठा, मी सर्वदा दान, सत्यवचन, गुरुशुश्रूषा व ब्राह्मणांचा सत्कार यांत तत्पर असतों आणि अभिमान व अतिवाद यांपासून निवृत्त असतों. 'तथापि हें हिंसामिश्र कर्म तुलाहि अयोग्यच आहे,' असें जर म्हणशील, तर बाबारे, सर्वत्र हिंसा अपरिहार्यच ठरते. कशी ती पहा—कोणते पुरुष हिंसा करीत नाहींत? सर्वच करितात. कृषि निर्दोष म्हणूनच उत्तम मानिली आहेना? पण तिच्यांतहि हिंसा घडतेच. मनुष्य नांगरांनीं भूमि नांगरीत असतां जमीनींत रहाणाऱ्या असंख्य जीवांचा संहार करितो. त्याचप्रमाणें अन्य कितीतरी प्राण्यांचा नाश होत असतो. व्रीहि-यवादि धान्यबीजांतहि जीव असतो. या सर्वांची हिंसा पाहून मला घृणा येते.

मानव पशूंचें आक्रमण करून त्यांचा प्राण घेतात व मांस भक्षण करितात. त्याचप्रमाणें वृक्ष, औषधि, वनस्पति, यांचाहि छेद करितात. हे ब्रह्मन्, वृक्ष, फलें व जल यांत अनेक जीव असतात. प्राण्यांवर उपजीविका करणाऱ्या जीवांनींच हें सर्व विश्व व्यापिलें आहे. विशाल मत्स्य क्षुद्र मत्स्यांना ग्राशीत असतात. एक हिंस्र प्राणी दुसऱ्या दुर्बल प्राण्यावर निर्वाह करितो. प्राणी परस्परांचें भक्ष्यच आहेत. पण यांतहि मला दोषच दिसतो.

पृथ्वीवर पायांनींच संचार करणारे लोक भूमीचा आश्रय करून राहिलेल्या अगणित जीवांना आपल्या पावलांनीं चिरडून त्यांची हिंसा करीत असतात. त्याचप्रमाणें ज्ञानी व अज्ञजन बसतां, उठतां, निजतां, अनेक प्राण्यांचा नाश करीत असतात, त्यांतहि मला दोष वाटतो.

आकाश व पृथ्वी यांतील हें विशाल अंतर जीवांनीं व्यापिलें आहे. त्यांची अज्ञानानें हिंसा होत असते. पूर्वीं विस्मित झालेल्या लोकांनीं 'अहिंसा'

असें म्हटलें आहे. परंतु या लोकांत जीवांची हिंसा कोण करीत नाहीं, याचा पूर्ण विचार केला असतां कोणीच अहिंसक नाहीं, असा निश्चय होतो.

हे द्विजश्रेष्ठा, अहिंसापरायण असलेल्या यतींच्या हातूनहि हिंसा घडतेच! परंतु प्रयत्नामुळें ती अत्यल्प असते. आपाततः सत्कुलीन व महागुणवान् दिसणारे पुरुषहि घोर कर्मे करितात आणि त्याची त्यांना लज्जाहि वाटत नाहीं. मित्र मित्राच्या व शत्रु शत्रूच्या सद्वर्तनाची प्रशंसा करीत नाहीं. सदाचरणी मनुष्याच्या सन्मार्गाकडे प्रायः सर्व लोक दोषदृष्टीनेंच पहात असतात. समृद्ध बांधवालाहि आपल्या बांधवाचा उत्कर्ष पाहून आनंद होत नाहीं. पंडितंमन्य मूढजन गुरूंचीहि निंदा करितात.

याप्रमाणें या लोकीं धर्मयुक्त अधर्माचा पुष्कळ विपरीत प्रकार दिसत असतो. पण तो पाहून मला मोठा खेद वाटतो. हे विप्रश्रेष्ठा, या धर्माधर्मरूप कर्माविषयीं पुष्कळ बोलतां येणें शक्य आहे. सारांश जो स्वकर्मनिरत असतो तोच महद्यशाला प्राप्त होतो. ३. १२. २०८.

---

## अध्याय २०९ वा.

[ १ व्याधानें वर्णिलेलें पूर्वकर्म. २ जीवाचें अमरत्व. ३ मनुष्यजन्म. ४ पुण्य-पापांचा संबंध ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, याप्रमाणें तो निपुण धर्मव्याध शांत्यादि ज्ञानांगभूत धर्म सांगून आतां 'ज्ञानावांचून कृतकृत्यता नाहीं,' असें प्रतिपादन करण्यासाठीं धर्मतत्त्वाचें दुर्ज्ञेयत्व आणि प्रपंचाचें निःसारत्व प्रतिपादन करण्याच्या इच्छेनें म्हणाला—

व्याध—हे विप्रर्षभा, हा धर्म श्रुतिसंमत आहे, असें वृद्धांचें अनुशासन आहे. या धर्माची गति सूक्ष्म असून तो अंतरहित अनेक शाखांनीं युक्त आहे. हे ब्रह्मन्, प्राणान्तसमयीं व विवाहकालीं असत्य भाषण करणें प्राप्त होतें, तेव्हां तें असत्य सत्य होतें व सत्य भाषण अनृत ठरतें. कारण ज्यांत प्राण्यांचें अत्यंत हित आहे, तेंच सत्य होय, असा निश्चय आहे. धर्माचें स्वरूप कसें सूक्ष्म आहे तें पहा! त्यानें धर्मालाहि विपरीत करून टाकिलें आहे.

हे ब्रह्मन्, पुरुष जें शुभ किंवा अशुभ कर्म करितो, त्याच्या अनुरूप फलालाच तो अवश्य प्राप्त होतो, यांत संशय नाहीं. मनुष्य जेव्हां विपन्नावस्थेस

प्राप्त होतो, तेव्हां तो मूढ देवांचीच अतिशय निंदा करूं लागतो, परंतु स्वतःचे कर्मदोष मात्र जाणत नाहीं. चंचलवृत्ति, कपटी व मूर्ख मनुष्य नेहमीं सुख-दुःखांचा विपर्यास करीत असतो म्ह० त्याला वास्तविक जें सुख तें दुःख भासतें व दुःख सुखप्रद वाटतें. त्याची बुद्धि, गुरूनें दिलेलें शिक्षण, किंवा पराक्रम हीं त्याचें रक्षण करूं शकत नाहींत.

हे द्विजोत्तमा, कर्मफल जर उद्योग किंवा पराक्रम यांवर अवलंबून असतें, तर मनुष्यानें जी जी कामना केली असती, ती ती त्याला प्राप्त झाली असती! परंतु जितेंद्रिय, दक्ष व बुद्धिमान् मानव इष्ट कर्म करून श्रांत झाले तरीहि त्यांस फलप्राप्ति झालेली दिसत नाहीं. कांहीं लोक निरंतर भूतांची हिंसा व लोकांची वंचना करीत असतात, तरीहि ते सर्वदा सुखच भोगितात.

कांहीं लोकांना सत्कर्में आचरूनहि इष्ट फल प्राप्त होत नाहीं. कांहीं पुत्रेच्छेनें दीन होऊन, देवांचें पूजन व तप करून पुत्र संपादन करितात, परंतु ते मातेनें दहा महिने गर्भांत वाढविलेले पुत्र कुलकलंक निपजतात. दुसरे कांहीं लोक पित्याच्या शुभ कर्मांनीं जन्म पावून पूर्वजांनीं संचय करून ठेविलेल्या विपुल धन-धान्यादि भोगांनीं समृद्ध होतात.

मनुष्यांच्या कर्मापासूनच रोगांची उत्पत्ति होते, यांत संशय नाहीं. क्षुद्र मृगांचें निवारण करणाऱ्या व्याधाप्रमाणें मनुष्यें कुशल वैद्य व औषधांचा संग्रह यांच्या योगानें व्याधीचें निवारण करितात. हे धर्मनिष्ठा, ज्यांच्या पाशीं अन्नादिकांची समृद्धि असते, ते बद्धकोष्ठानें पीडित होऊन आहार करण्यास असमर्थ होतात. एखादा ग्रास अधिक भक्षण केल्यास त्यांस अपचन होतें. पण दुसरे कित्येक अतिशय बलवान् असून अन्न पचविण्यास समर्थ असतांनाहि त्यांना मोठ्या कष्टानें अन्न मिळतें.

याप्रमाणें शोक-मोहांत बुडालेल्या व आधि-व्याधींनीं ग्रस्त झालेल्या या असहाय लोकांना हा कर्मप्रवाह अवश करून बलात्कारानें वाहून नेत असतो. अशाप्रकारें हे सर्व लोक कर्माधीन जर नसते व स्वतंत्र असते तर कोणी मरण पावला नसता, कोणी जराग्रस्त झाला नसता आणि कोणीं स्वतःचें अप्रियहि पाहिलें नसतें. प्रत्येक मनुष्याला सर्व लोकांहून आपला अधिक उत्कर्ष व्हावा अशी इच्छा असते व तो यथाशक्ति प्रयत्नहि करीत असतो. परंतु त्याच्या इच्छेप्रमाणें घडत मात्र नाहीं.

हे ब्रह्मन्, फलज्योतिषावर विश्वास ठेवणारे पुष्कळ लोक अनुकूल ग्रह-नक्षत्रादि पाहून प्रत्येक कर्म करीत असतात, परंतु शेवटीं त्यांना विपरीतच फल प्राप्त होतें. किंवा एकाच मंगलनक्षत्राच्या समान शुभ योगावर उत्पन्न झालेले लोक भिन्न भिन्न फल भोगीत असलेले दिसतात. पूर्वकर्मवशात् कित्ये-कांची स्वतःच्या वस्तूवरहि सत्ता चालत नाहीं.

हे विप्रा, 'या जन्मांतील कर्माचें फल इहलोकींच प्राप्त होतें' हें चार्वाकाचें मत आहे. परंतु वस्तुस्थिति तशी असणें शक्य नाहीं. कारण त्यायोगानें कृतहानि अकृत-अभ्यागम (खं. ३. पृ. ३२ पहा) दोष येतो. यास्तव पूर्वकर्मच प्रधान मानावें लागतें. हे ब्रह्मन्, हा जीव शाश्वत असून सर्व प्राण्यांचीं शरीरें अशाश्वत आहेत. अशी श्रुति आहे. शरीराचा वध केला असतां केवल देहाचा नाश होतो आणि कर्मबंधानें बद्ध झालेला जीव अन्य देहांत प्रवेश करितो.

( २ ) ब्राह्मण—हे श्रेष्ठ कर्मज्ञा, जीव शाश्वत कसा आहे, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे, यास्तव मला तें तत्त्वतः कथन कर.

व्याध—हे भगवन्, देहभेद झाला असतां जीवाचा नाश होत नाहीं. तस्मात् मूढजन 'मनुष्य मरण पावला' असें जें म्हणतात तें मिथ्या होय. शरीरभेद झाला असतां जीव अन्य शरीर घेतो. त्यालाच पंचत्वप्राप्ति म्हणतात.

'अहो पण, कृष्यादि फलांतहि कृतनाश दिसतो. अन्य देहांत स्वतःचा अभाव असल्यामुळें जन्मांतरीं कृतकर्माचें फल कसें प्राप्त होईल?' असें जर म्हणाल, तर सांगतों. भोजनाचें फल तृप्ति जशी अवश्य प्राप्त होते, तसेंच पूर्वकर्म अपरिहार्य आहे. ज्या कर्माचें फल तत्काल मिळत नाहीं, तें अन्य जन्मांत अवश्य प्राप्त होणार, असेंच अनुमान करावें लागतें. त्याचप्रमाणें या जन्मीं उद्योग न करतां अकस्मात् धनादिकांची प्राप्ति होत असलेलीहि दिसते. अशा प्रसंगीं तें पूर्वजन्मींच्या कर्माचें फल मानावें लागतें.

हे ब्रह्मन्, मनुष्यानें इहलोकीं आचरिलेल्या कर्माचें फल त्याच्यावांचून अन्य कोणीहि भोगीत नसतो. ज्याचें कर्म त्यालाच भोगावें लागतें. केलेल्या कर्माचा भोगावांचून नाश कदापि होत नाहीं. या जन्मांत पुण्य कर्म करणारे लोक अन्य जन्मीं पुण्यवान् होतात व पापकर्म करणारे नराधम पातकी निप-जतात. या लोकीं मनुष्याला त्याचीं कर्में अनुसरतात व अन्य जन्मीं त्याच्या पूर्वकर्माचे संस्कार प्रादुर्भूत होतात. पूर्वकर्माच्या अनुसार मनुष्याची बुद्धि व

विद्या या जन्मीं प्रवृत्त होते. स्वकर्म स्वतःलाच भोगावें लागतें. एकाचें कर्मफल दुसऱ्याला मिळत नसतें. तस्मात् कृतकर्माचा भोगावांचून नाश होत नाहीं, हेंच सिद्ध होतें.

( ३ ) ब्राह्मण—हे धर्मज्ञा, जीव जन्म कसा घेतो ? पुण्य-पापांच्या योगानें पुण्यवान् व पापयुक्त जाती कशा निर्माण होतात, हें मला कथन कर.

वैशंपायन—हे पारिक्षिता, त्या कौशिक-ब्राह्मणानें असा प्रश्न केला असतां व्याध स्थूल शरीराहून आत्मा भिन्न आहे, हें सिद्ध करून, आतां लिंगशरीराहूनहि तो पृथक् आहे, हें सिद्ध करण्यासाठीं व वैराग्योत्पत्त्यर्थ जन्मादिकांचें दुःखरूपत्व सांगण्यास आरंभ करीत आहे. “ हे द्विजोत्तमा, आपल्याला या स्थूल देहापासून तृणादिकांपर्यंत जें कांहीं दिसत आहे, तें कर्मच आहे. तें कसें हेंच मी तुला आतां संक्षेपतः सांगतों.

मरणोन्मुख झालेला प्राणी विद्या, कर्म व पूर्ववासना आणि पंचप्राण, मन, बुद्धि व दशेंद्रियें, अशा सतरा वस्तूंनीं बनलेलें एक लिंगशरीर, यांसह प्रस्तुत देहांतून उत्क्रमण करून कर्माप्रमाणें स्वर्ग किंवा नरक या भोगभूमींमध्यें जाऊन, त्यांत सुखादि भोग भोगून अवशिष्ट राहिलेल्या कर्मांच्या बलानें पुनः बीजभावास प्राप्त होतो व अन्नाच्या द्वारा क्रमानें मातृशरीरांत शरीराकारानें परिणत होतो. पण बीजामध्यें लिंगशरीरानें प्रवेश करून व त्याच पूर्व संस्कारांनीं युक्त होऊन जो जन्म घेतो, तो कोठें व कोणत्या कारणानें उत्पन्न होतो, तेंच मी आतां तुला सांगतों.

( ४ ) ज्यांनीं कर्मसंचय केलेला आहे, तीं मनुष्यें पुनः जन्म घेतात. शुभकर्में करणारे शुभ योनींत व पाप कर्में करणारे पापयोनींत उत्पन्न होतात. शुभकर्मांनीं देवत्वप्राप्ति होते. पुण्य-पापांच्या मिश्र कर्मांनीं मनुष्ययोनि आणि तामस कर्मांनीं नरक व तिर्यग्योनि प्राप्त होते. जन्म, मृत्यु, जरा, व्याधि इत्यादि दुःखें मनुष्याचा सर्वदा पाठलाग करीत असतात. त्यांनीं पीडित होऊन मनुष्यें स्वतःच्या कर्मदोषानेंच अनेक योनींत संचार करीत दुःखानें होरपळत असतात. स्वकर्मानें बद्ध झालेले जीव हजारों तिर्यग्योनींत उत्पन्न होऊन सतत संचार करीत असतात. प्राणी स्वकर्मानेंच मरणोत्तर दुःख भोगितो व दुःख भोगण्यासाठींच त्याला अशुभ योनीची प्राप्ति होते. परंतु त्या योनींतहि तो नवीन कर्मांचा संग्रह करितो व त्यामुळें कुपथ्य करणाऱ्या रोग्याप्रमाणें पुनः पुनः पापफल भोगितो.

भयंकर दुःखांनीं ग्रस्त झालेला मानव दुःखाच्या अभावालाच सुख मानितो. वस्तुतः संसारांत सुख नाहीं. परंतु मस्तकावरील भार उतरला असतां भार वहाणारास जसें सुख वाटतें, तद्वत्च दुःख नाहींसें झालें म्हणजे मनुष्याला सुख वाटत असतें. मनुष्य वासनाशून्य झाला तरीहि तो पूर्व कर्मांच्या उदयामुळें क्लेश भोगीत संसारांत चक्राप्रमाणें भ्रमण करीत असतो. तो आसक्तिरहित झाल्यामुळें पवित्र कर्मांनीं ज्ञानरूप तप व ध्यानरूप तप यांचें सामर्थ्य त्याला प्राप्त होतें व अनेक शुभ कर्मांच्या योगानें तो विविध पुण्यलोकांतील भोग भोगितो.

याप्रमाणें पुण्य कर्में व वैराग्य यांच्या योगानें मनुष्य जेथें गेल्यावर शोक होत नाहीं, अशा शुभलोकांस प्राप्त होतो. पातकी मनुष्य पाप करून पापाच्या अंताला कधींच प्राप्त होत नाहीं. तस्मात् पुण्यकर्मांचाच यत्नानें संचय व पातकांचा त्याग करावा. असूयाशून्य व कृतज्ञ पुरुषाचें कल्याण होतें व त्याला सुख, धर्म, अर्थ आणि स्वर्ग यांचा लाभ होतो. गर्भाधानादि कर्मोपयोगी व शमादि आत्मज्ञानोपयोगी अठ्ठेचाळीस संस्कारांनीं युक्त, बाह्येंद्रियांना जिंकणारा, शौचादिपर व संयमी अशा विद्वानाला इह व परलोकीं सर्व विषयसुख सुलभ होतें.

हे ब्रह्मन्, मनुष्यानें सज्जनांच्या धर्मानें वागावें व शिष्टाप्रमाणें कर्माचरण करावें. लोकांना क्लेश न देतां निर्वाह करावा. स्वधर्मोचित कर्म केल्यानें धर्माचा संकर होत नाहीं; कारण शास्त्रामध्यें निष्णात व ज्यांना आगमाचें पूर्ण ज्ञान आहे, असे धर्मोपदेश करणारे लोक आहेत. यास्तव तूं उचित आचार पाळून कर्म कर. विद्वान् धर्माचरणानेंच संतुष्ट होतो व धर्मावर उपजीविका करितो. धर्मानें संपादन केलेल्या धनावर आपला निर्वाह चालवितो. तो ज्या धर्मात गुण पहातो, त्यालाच मोठ्या आस्थेनें वाढवितो. त्यामुळें तो थोड्याच अवकाशांत मोठा धर्मात्मा होतो. त्याचें चित्त प्रसन्न होतें. तो आपले मित्र व आप्तजन यांसह या लोकीं सुख भोगतो व परलोकींहि आनंदाचा अनुभव घेतो. इष्ट शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध आणि अप्रतिहत-इच्छात्व त्याला प्राप्त होतें, हें धर्माचें फल आहे.

हे विप्रा, अशाप्रकारें चित्तशुद्धीच्या द्वारा भोगेच्छा क्षीण झाली असतां मुमुक्षूला स्वर्गप्राप्तीचीहि विरक्ति येते व विषयांवर प्रीति न ठेवणारा तो ज्ञान-

दृष्टीनें वैराग्ययुक्त होऊन राग-द्वेषादिकांच्या वश होत नाहीं. तो आपल्या सर्व इच्छा सोडून देतो, पण धर्म सोडीत नाहीं. या अशाश्वत लोकांकडे पाहून सर्वत्याग करण्याचा प्रयत्न करितो आणि मोक्षप्राप्तीचे उपाय योजितो. दैवाचा आश्रय करून स्वस्थ बसत नाहीं. याप्रमाणें तो वैराग्य प्राप्त करून घेतो व पापकर्माचा त्याग करितो. त्यामुळें तो धार्मिक होतो व मोक्षाचें परमपद संपादितो.

हे द्विजश्रेष्ठा, ज्ञान हेंच मानवांच्या मोक्षाचें साधन आहे. शम व दम त्या ज्ञानाचें मूळ आहे. त्या ज्ञानाच्या योगानें त्याच्या मनांतील सर्व कामना पूर्ण होतात आणि इंद्रियनिग्रह, सत्य व दम यांच्या योगानें ब्रह्माचें जें परम पद तें त्याला प्राप्त होतें.

ब्राह्मण—हे नियतव्रत व्याधा, ज्यांना इंद्रियें म्हणतात तीं कोणतीं ? त्यांचा निग्रह कसा करावयाचा ? त्या निग्रहाचें फल काय ? व तें फल कसें प्राप्त होतें ? तें मला सांग. हा सर्व धर्म तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे. ३. १२. २०९.

---

## अध्याय २१० वा.

[ १ मनुष्य पापी होण्याचें कारण. २ व्याधानें उपदेशिलेलें ब्रह्मज्ञान. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, विप्रानें असा प्रश्न केला असतां धर्मव्याधानें त्याला काय उत्तर दिलें तें ऐक.

सूक्ष्म शरीरापासूनहि आत्म्याला विविक्त–पृथक् करण्यासाठीं व इंद्रियांचा निग्रह न केल्यास त्यांत कोणता दोष उद्भवतो तें सांगण्यासाठीं व्याध म्हणाला—"हे ब्रह्मन्, महांधकारांत निमग्न झालेल्या घटादिकांना प्रकट करण्यासाठीं घटच्छिद्रांतून बाहेर पडणाऱ्या दीपप्रभेप्रमाणें ब्रह्माच्या आधारानें रहाणाऱ्या रूपादि विषयांना प्रकट करण्यासाठीं मन इंद्रियच्छिद्रांच्या द्वारा बाहेर पडून प्रथम त्यांच्या विषयांकडे जातें, आणि त्यांचें विज्ञान संपादन करून जीवाला त्यांचा बोध करून देतें. नंतर तो जीव ज्ञात झालेल्या अर्थाच्या आनुकूल्य-प्रातिकूल्याप्रमाणें काम, राग, क्रोध व द्वेष या वृत्तींस धारण करितो.

त्यानंतर तो अनुकूल विषयांच्या प्राप्तीसाठीं व प्रतिकूल विषयांच्या परिहारासाठीं यत्न करितो. फार मोठें कर्म आरंभितो. इष्ट विषयांचें पुनः पुनः सेवन करितो. त्यामुळें त्यांविषयीं राग म्ह० आसक्ति उद्भवते. त्यानंतर द्वेष, द्वेषा-

पासून लोभ व त्याच्या मागोमाग मोह उत्पन्न होतो. मोह उत्पन्न झाला म्हणजे पुरुष लोभ, राग व द्वेष यांच्या योगानें अविवेकी बनतो. त्यामुळें त्याची बुद्धि धर्मामध्यें प्रवृत्त होत नाहीं आणि तो जो कांहीं अल्प-स्वल्प धर्म आचरितो, तो केवल दंभानें आचरितो. कपटानें धनसंचय करितो आणि अमार्गानें मिळविलेल्या त्या द्रव्याचा अमार्गानेंच व्यय करितो.

अधर्माचरणानें विपुल धन मिळूं लागलें म्हणजे त्याची बुद्धि त्यांतच रत होते आणि हे ब्राह्मणा, विद्वान् सुहृदांनीं त्याचें जरी निवारण केलें, तरी तो पापाचरणाचीच इच्छा करितो. स्वतः शमादि ज्ञानसाधनांनीं रहित असूनहि श्रुतिसिद्ध वचनांचा अस्थानीं विनियोग करितो. आत्म्याचें शास्त्रीय असंगत्व व उदासीनत्व, शान्त्यादि श्रुतिमार्गात न योजतां ‘ मी असंग आहें, उदासीन आहें ’ इत्यादि शब्दांनीं तें प्रकट मात्र करितो.

अशा दांभिकाचा राग-दोषामुळें कायिक, मानसिक व वाचिक असा त्रिविध अधर्म प्रवृत्त होतो. तो मनानें पापाचेंच चिंतन करितो, वाणीनें पापच बोलतो व शरीरानें पापाचरण करितो. अशा त्रिविध अधर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या पुरुषाचे शमादि शुभ गुण नष्ट होतात. तो स्वतः पापकर्म करीत असल्यामुळें त्याची समानशीलांशींच मैत्री जडते आणि त्यामुळें तो इहलोकीं दुःख भोगितो व परलोकीं पुरुषार्थहीन होतो.

हे कौशिका, याप्रमाणें पुरुष पापात्मा होतो. आतां धर्मलाभ कसा होतो, तेंहि मी तुला सांगतों ऐक. जो आपल्या बुद्धीनें हे दोष पूर्वीच जाणतो, सुख-दुःखप्रसंगीं कुशलतेनें त्यांचा परिहार करितो व साधूंचें सेवन करितो, त्याची बुद्धि धर्मामध्यें विराजमान होते. कारण तो सर्वदा शुभ कर्मेंच आरंभितो.

ब्राह्मण—व्याधा, तूं प्रिय व धर्म्य असेंच भाषण करितोस. या जगांत असा वक्ता दुर्लभ आहे. दिव्य प्रभावानें युक्त असलेला तूं कोणी महर्षिच आहेस, असें मला वाटतें.

व्याध—महाभाग्यवान् ब्राह्मण हेच पितर असून ते सर्वदा सर्वांच्या पूर्वीं भोजन करण्यास योग्य आहेत. विवेकी मनुष्यानें या लोकीं त्यांचें सर्वमनोभावानें प्रिय करावें. आतां त्यांना काय प्रिय असतें, तेंहि मी तुला सांगतों. द्विजश्रेष्ठा, ब्राह्मणांस नमस्कार करून मी कथन करीत असलेली ही ब्राह्मी विद्या तूं ऐक.

( २ ) प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध असलेलें हें सर्व चराचरात्मक जगत् कर्मानें सर्व प्रकारें प्राप्त होणें शक्य नाहीं. कारण हें सर्व केवल आत्ममात्र आहे. ' तर मग पशुबंध याग करणारा सर्व लोकांस जिंकितो, असें म्हणून श्रुतीनें सर्व जगाला कर्मानें संपादन करितां येतें, असें जें म्हटलें आहे तें कसें ?' असा तूं प्रश्न करशील तर त्याचें समाधान सांगतों ऐक.

त्रिविध परिच्छेदशून्य ब्रह्मच आकाशादि महाभूतें, भोक्ता जीव आणि सर्वांचा नियामक ईश्वर आहे. त्या महाभूतादिरूप ब्रह्माहून अन्य अधिक श्रेष्ठ प्राप्य वस्तु नाहीं. ' पशुबंधयाजी सर्व लोकांना जिंकतो ' अशा अर्थाची जी श्रुति आहे, ती अविद्यावान् कर्माधिकारी पुरुषाला उद्देशून आहे. अर्थात् त्यांतील सर्वलोकजय हें फल नित्य व निरतिशय नाहीं.

'तर मग विद्या म्हणजे काय ?' असें विचारशील तर 'आत्म्याचें एकत्व-ज्ञान हीच विद्या आहे' असें मी सांगतों. आकाश, वायु, अग्नि, जल व पृथ्वी हीं पंचमहाभूतें व शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे त्या भूतांचे गुण हें सर्व त्या ब्रह्माच्याच आश्रयानें रहातें. कारण भूतें व गुण यांना त्रिगुणात्मक मायाकार्यत्व असल्यामुळें तें सर्व कार्य कारणभूत मायेच्या आश्रयानें रहातें व माया ब्रह्माच्या आश्रयानें रहाते. त्यामुळें चंद्रापासून अति दूर व विलक्षण असलेलें जलहि जसें चंद्रांतील चंचलत्व, अनेकत्व, भूतलत्व, इत्यदि आरोपांचें कारण होतें, त्याचप्रमाणें प्रत्यगात्म्याहून अतिशय विलक्षण असल्यामुळें त्याच्याशीं कधींव संबद्ध न होणारी माया प्रत्यगात्म्यांतील दुःखित्व, अनेकत्व इत्यादि आरोपांचें कारण होते.

यास्तव रज्जुसर्पन्यायानें ब्रह्म जगाचें अधिष्ठान आहे. त्यामुळेंच चराचर जगत् आत्म्याहून पृथक् नाहीं. त्याला आत्ममात्रत्व आहे. यास्तव अविद्याव-स्थेमध्यें कर्मकांड, उपासनाकांड व ज्ञानकांड यांना प्रामाण्य आहे आणि आत्मज्ञान झाल्यावर वेदानें स्वतःच्याच प्रामाण्याचा निषेध केला आहे. यास्तव आकाशादि व शब्दादि सर्व भूत-भौतिक पदार्थ आत्म्याचे आरोपित गुण आहेत, स्वाभाविक नव्हेत, असेंच मानणें युक्त आहे.

याविषयीं तार्किक ' शब्दादि हे आकाशादि भूतांचे गुण आहेत व आत्मा ज्ञान, इच्छा, प्रयत्न इत्यादि चौदा गुणांनीं युक्त आहे आणि तो आकाशादि भूतांहून पृथक् आहे. आत्मा आणि आकाशादि व शब्दादि यांच्यामध्यें परस्पर

गुणगुणिभाव नाहीं' असें म्हणतात. म्हणून त्यांचें निरसन करण्यासाठीं व्याध म्हणतो—

' आकाशादिकांचे जे शब्दादि गुण त्यांचे तारत्व, मंद्रत्व, मृदुत्व इत्यादि गुण आहेत व ते सर्व दृश्य-अनुभवाला येणारे आहेत. त्यामुळें त्यांना साक्षात् किंवा परंपरेनें ग्राह्यत्व आहे आणि ग्राह्यत्व हा पंचभूतें व भौतिक यांचाच गुण आहे. ज्याप्रमाणें लोखंड अग्नीमध्यें तापविलें असतां अग्नीचें दाहकत्व लोखंडांत येतें व लोखंडाचा वर्तुळ, त्रिकोनी, चौकोनी, इत्यादि आकार अग्नीला प्राप्त होतो त्याप्रमाणें गुणांचा परस्पर आरोप झालेला दिसतो. त्याच-प्रमाणें आत्मा व अनात्मा यांच्या धर्मांचाहि परस्पर आरोप होतो.

आनंद, विषयानुभव व नित्यत्व हे आत्म्याचे धर्म आहेत. ते वस्तुतः चैत-न्याहून जरी पृथक् नसले तरी जणुंकाय पृथक् असल्याप्रमाणें अंतःकरणांत भासूं लागतात आणि दुःखित्वादि अंतःकरणाचे धर्म आत्म्यावर भासतात. याप्रमाणें आत्मा व अनात्मा—अंतःकरण यांच्या गुणांचा अविद्येनें परस्परांवर आरोप होतो. त्यामुळें आकाशादि आत्म्याहून पृथक् नाहींत, तर रज्जुसर्पाप्रमाणें आत्म्यावर आरोपित आहेत.

मायोपाधिक ईश्वर, लिंगशरीरसमष्ट्युपाधिक सूत्रात्मा व स्थूल शरीरसम-ष्ट्युपाधिक विराट्, यांच्या ठिकाणीं परस्पराध्यास जरी होत असला, तरी त्यांतील पूर्व पूर्व कारणांचे सर्व गुण पुढल्या पुढल्या कार्यांत येतात. पण पुढल्या पुढल्या कार्यांचे कांहीं थोडे गुणच पूर्व पूर्व कारणांत येतात. जसें—जपाकुसुमाच्या सान्निध्यामुळें शुद्ध स्फटिकाच्या ठिकाणीं त्या फुलाचा रक्त वर्ण भासूं लागतो. त्यामुळें स्फटिकाचें अभान होऊन त्यावर पद्मरागमण्याचा आरोप होतो. त्याच्याशीं इंदीवर कमलाचें सांनिध्य झाल्यानें इंद्रनील मण्याचा आरोप होतो व या चार प्रकारच्या स्फटिकांमध्यें गुणांनीं युक्त असलेल्या सोपाधिक तीन रूपांमध्यें सर्व पूर्व पूर्व गुणांचा पुढील पुढील रूपामध्यें अध्यास दिसतो.

' कसा ' म्हणशील तर ऐक—स्फटिकाची सत्ता अनिर्वचनीय आरक्तते-मध्यें आरोपिली जाते. पण स्फटिकावर त्या आरक्ततेचा अनिर्वचनीयत्व हा धर्म आरोपिला जात नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्माचे सत्, चित् व आनंद हे धर्म स्थूल शरीरामध्येंहि प्रतीत होतात. यावरून कारणाचे सर्व कल्पित धर्म कार्यांमध्यें अनुवृत्त होतात. अर्थात् सर्व दृश्य भौतिक असून त्याचा ब्रह्मावर

अभेदानें अध्यास झाला आहे. त्यांतहि स्थूल कार्यामध्यें शुद्ध चैतन्य, ईश व सूत्रात्मा यांची अनुवृत्ति होते. सूत्रामध्यें शुद्ध चैतन्य व ईश यांची आणि ईश्वरामध्यें शुद्ध चैतन्याची अनुवृत्ति होते. शुद्ध चैतन्यांत मात्र कशाचीहि अनुवृत्ति होत नाहीं.

ब्राह्मणा, वर सांगितलेल्या शब्दादि पांच विषयांच्या अपेक्षेनें काम, संकल्प इत्यादि वृत्तींनीं युक्त असलेली चेतना हेंच मन होय. तें विषयांची कल्पना करितें, कारण स्वप्नांत आपल्याला तसा अनुभवहि येतो. त्या अंतःकरणाची बुद्धिसंज्ञक दुसरी वृत्ति मनानें कल्पिलेल्या विषयाला प्रकाशित करिते. अहंकार 'मीं या विषयाला जाणलें' असा अभिमान धारण करितो. वास्तव हें सर्व जगत् मनोमात्र आहे. मनाचा अभाव झाला असतां जगत् आहे, असें म्हणण्यास कांहीं प्रमाण नाहीं.

'अहो पण, जगाच्या अस्तित्वाविषयीं प्रत्यक्ष हेंच प्रमाण आहे,' म्हणून म्हणशील तर सांगतों, ऐक. पांच इंद्रियें, जीव, सत्त्व, रज व तम, शब्दादि पांच विषय, मन, बुद्धि व अहंकार या सतरा तत्त्वांचा एक राशि, हीच 'अव्यक्त'-संज्ञक माया आहे. अर्थात् प्रमाता, प्रमाण व प्रमेय, एतद्रूप हें सर्व आहे, त्यामुळें ही सर्व माया आहे, असें स्वप्नदृष्टान्तानें जाणावें.

पांच इंद्रियें, मन व बुद्धि अशीं सात इंद्रियें, मन्तव्य, बोधव्य व शब्दादि हे त्यांचे सात विषय; त्यांतील ज्यांचें बाह्येंद्रियांनीं ग्रहण केलें जातें तें व्यक्त व जे अन्तरिंद्रियांनीं ग्रहण केलें जातें तें अव्यक्त, अशा या व्यक्ताव्यक्त विषयांसह सात इंद्रियें व सात विषय अंतःकरणरूप गुहेंत लीन होऊन राहतात. या चौदा तत्त्वांमध्यें आकाशादि पंचभूतें, जीव, अहंकार व तीन गुण मिळून चोवीस तत्त्वांचा व्यक्ताव्यक्तरूप समूह बनतो. हा सर्व भोग्य वर्ग आहे. या भोग्य वर्गाहून पृथक् असलेला जो एक भोक्ता, तोच सर्वात्मक पुरुष आहे व तेंच भोग घेणारें ब्रह्म होय. ब्राह्मणा, याप्रमाणें सर्व ज्ञान मीं तुला सांगितलें. आतां आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ? ३. १२. २१०.

---

## अध्याय २११ वा.

[ १ पंचमहाभूतांचें गुणवर्णन. २ इंद्रियनिग्रह हेंच मोक्षसाधन. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे युधिष्ठिरा, धर्मव्याधानें अशाप्रकारें ब्रह्मज्ञान सांगितलें असतां ब्राह्मणानें त्याच्या मनाला संतोष देणारा असा प्रश्न विचारिला.

**ब्राह्मण**—हे धार्मिक श्रेष्ठा, विद्वान् लोक आकाशादि जीं पंच महाभूतें सांगतात, त्यांतील एकेकाचे गुण तूं मला सांग.

**व्याध**—हे विद्वन्, भूमि, जल, तेज, वायु व आकाश हीं पांच भूतें आहेत. यांतील पुढल्या पुढल्या तांचे गुण पूर्व पूर्व भूतामध्यें अनुवृत्त होतात. त्यामुळें हे ब्रह्मन्, भूमि पंचगुणांनीं युक्त आहे. उदक चार गुणांनीं, तेज तीन गुणांनीं, वायु दोन गुणांनीं व आकाश एक गुणानें युक्त आहे.

हे द्विजोत्तमा, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच, म्ह० सर्वांहून, अधिक गुण भूमीमध्यें स्थित आहेत. शब्द, स्पर्श, रूप आणि रस हे चार गुण जलाचे; शब्द, स्पर्श व रूप, हे तीन तेजाचे; शब्द व स्पर्श हे दोन गुण वायूचे आहेत आणि शब्द हा एकच गुण आकाशाच्या ठिकाणीं आहे. याप्रमाणें पांच भूतांमध्यें मिळून एकंदर पंधरा गुण होतात. ते सर्व भूतांमध्यें राहतात. या पंधरा गुणांमध्यें सर्व लोक प्रतिष्ठित आहेत. ते एकमेकांचें अतिक्रमण करीत नाहींत. ते जेव्हां शरीरांमध्यें असतात तेव्हां ते एकत्वाला प्राप्त होतात व परस्परांस अनुकूल होऊन रहातात.

चराचर भूतें जेव्हां पूर्व देह जीर्ण झाल्यामुळें अन्य देहाची भावना करितात तेव्हां कालवशात् देही आत्मा अन्य देहावर आरूढ होतो. त्या देहाच्या दृढाभिमानानें त्याला पूर्व देहाची अत्यंत विस्मृति होते. त्यामुळें ते भूतगुण क्रमानें पूर्व पूर्व गुणांत लीन होतात व दुसऱ्या नवीन देहांत कारणगुणांच्या क्रमानें अभिव्यक्त होतात. प्रत्येक देहामध्यें पांच भौतिक धातु प्रतीत होतात. त्या धातूंनींच हें चराचरात्मक जगत् व्यापिलें आहे.

इंद्रियें ज्याचें ज्याचें ग्रहण करितात, त्याला ‘ व्यक्त ’ असें म्हणतात आणि जें अतींद्रिय व रूपदर्शनादि लिंगावरून अनुमेय असतें, त्याला अव्यक्त असें

१ पूर्वाध्यायांत व्याधानें ‘हें महाभूतात्मक जगत् ब्रह्म आहे’ असें सांगितलें. आतां त्याचेंच व्याख्यान करण्यासाठीं व्याध भूतगणांचा विभाग करून ब्रह्माचें सर्वात्मकत्व सांगत आहे.

म्हणतात. पण हा देही आत्मा जेव्हां त्या त्या विषयाचें अतिक्रमण करून सर्व इंद्रियांचा निग्रह करितो, तेव्हां त्याच तपाच्या बलानें या सर्व लोकांमध्यें व्यापून राहिलेल्या सोपाधिक आत्म्याला सुवर्णकुंडलांतील सुवर्णाप्रमाणें पहातो आणि सर्व लोक आत्म्यावर आरोपित आहेत, असाहि त्याला अनुभव येतो. म्हणजे हे सर्व लोक चिदेकरस आत्म्यामध्यें विलीन झाले आहेत, असें पहातो.

याप्रमाणें सोपाधिक व निरुपाधिक ब्रह्माला जाणणारा हा विद्वान् प्रारब्ध कर्मानें बद्ध होऊन देहपात होईपर्यंतच सोपाधिक अवस्थेचा अनुभव घेतो. विदेह कैवल्यामध्यें त्याला सोपाधिक अवस्थेचा अनुभव येत नाहीं. सर्व अवस्थांमध्यें सर्व भूतांना सर्वदा आत्ममय पहाणाऱ्या त्या ब्रह्मभूत विद्वानाचा पुण्य-पापफलांशीं संबंध होत नाहीं. कारण संप्रज्ञात समाधीमध्यें जशी त्याची एकात्मबुद्धि दृढ असते, तशीच ती जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थांमध्येंहि दृढ रहाते. त्यामुळें तो पुण्य-पापकर्मफलांनीं लिप्त होत नाहीं.

ब्रह्माकार अंतःकरणवृत्ति हें मायेचें कार्य आहे. त्यामुळें विद्येचें मूळ मायाच आहे. मायाकार्यरूप विद्येच्या बलानें ज्या योग्यानें अविद्यादिरूप मिथ्या क्लेशांचें अतिक्रमण केलें आहे, त्याला ज्ञानमार्गानें पुरुषार्थ व मोक्ष प्रतीत होतो. म्हणजे अंतःकरणवृत्तिरूप विद्येच्या योगानें अंतःकरणवृत्तिरूप अविद्येची निवृत्ति झाली असतां तो मुक्त होतो. जन्म-मरणरहित, जीवस्वरूपभूत, अव्यय, निरुपम व निरतिशय सूक्ष्म चैतन्यात्मरूप जीवात्म्यालाच भगवानानें ज्ञानी असें म्हटलें आहे. देह, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि व मूलाविद्या या सर्वांहून विलक्षण आत्म्याला जाणून जो तद्रूप होऊन रहातो, तोच मुक्त होय.

( २ ) हे ब्राह्मणा, हें सर्व ऐश्वर्य ध्यानरूप तपानेंच प्राप्त होतें. हे विप्रा, तूं मला ज्ञानाचें साधन विचारिलें होतेंस, तेंच मी आतां तुला सांगत आहें. इंद्रियांचें संयमन केल्यानेंच चित्तैकाग्र्यरूप तप होतें. त्यावांचून ध्यान किंवा चित्तैकाग्र्य संभवत नाहीं. स्वर्ग व नरक हीं दोन्हीं फळें इंद्रियाधीन आहेत. इंद्रियांच्या निग्रहानें सुख होतें व त्यांना विषयोन्मुख केल्यानें असह्य दुःख भोगावें लागतें. इंद्रियांचा निग्रह हें स्वर्गसाधन असून त्यांना स्वाधीन न ठेवणें हें नरकाचें साधन आहे.

हे ब्रह्मन्, सर्व इंद्रियांचें धारण हाच समग्र योगविधि आहे. इंद्रियें हेंच सर्व तपाचें व नरकाचें मूळ आहे. इंद्रियांच्या आसक्तीनें राग-द्वेषादि दोष प्राप्त

होतात, यांत संशय नाहीं. यास्तव जो पुरुष त्यांचें नियमन करितो, तोच सिद्धीला प्राप्त होतो. श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन हीं रज्जुसर्पाप्रमाणें आत्म्यामध्यें कल्पिलीं असल्यामुळें तीं आदि-अंतरहित आहेत. यास्तव जो जितेंद्रिय पुरुष त्यांचें नियमन करितो, तो पापानें लिप्त होत नाहीं. मग प्रमातृत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि संसारधर्मांनीं कसा लिप्त होईल !

हे विद्वन्, शरीर हा पुरुषाचा रथ आहे. बुद्धि त्याचा सारथि आहे. इंद्रियें हेच त्याला जोडलेले अश्व आहेत. यास्तव जो दक्ष व कुशल सारथि असतो तो सुसंस्कृत व नियमित अश्वांच्या योगानें रथी पुरुषाला इष्टस्थानीं अनायासानें घेऊन जातो. (काठक व. ३ मं. ३. पृ. ५६.) जो बुद्धिमान् पुरुष शरीररथाला जोडलेल्या पण व्याकुल करून सोडणाऱ्या इंद्रियाश्वांना मनोरूप रश्मींच्या द्वारा स्वाधीन ठेवितो, तोच श्रेष्ठ सारथि होय.

अशिक्षित अश्वांना मार्गांमध्यें जसें यथेष्ट गमन करूं द्यावें त्याप्रमाणें इंद्रियांना यथेष्ट वावरूं दिल्यास शास्त्राभ्यासानें उत्पन्न झालेली बुद्धि नष्ट होते. यास्तव त्यांना आपल्या स्वाधीन ठेवण्याचा यत्न करावा आणि धैर्यानें त्यांना जिंकावें. इंद्रियें आपापल्या विषयांकडे जाऊं लागलीं असतां त्यांतील जें इंद्रिय मनाला स्ववश करून घेतें, तें त्याच्या बुद्धीचें हरण करितें.

अगाध जलांतून संचार करणाऱ्या नौकेला वायु ज्याप्रमाणें अमार्गानें नेतो त्याप्रमाणें तें इंद्रिय पुरुषाच्या बुद्धीला अमार्गांत प्रवृत्त करितें. कामी लोक शब्दादि विषयांमध्यें सुखप्राप्ति होते व तें सुख सर्वथा ग्राह्य आहे, असें मानितात. पण विरक्त लोक विषयजन्य सुखाला त्याज्य समजतात. याप्रमाणें सुखाविषयीं मतभेद असतांनाहि जो पुरुष विषयसुख तत्त्वतः त्याज्य आहे, असें निश्चयानें जाणतो व त्याचें सतत ध्यान करितो, तोच विषयदोषदर्शनामुळें विरक्त होतो आणि त्यालाच ध्यानजन्य फल प्राप्त होतें. ३. १२. २११.

---

## अध्याय २१२ वा.

[ १ व्याधानें वर्णिलेले सत्त्वादिगुण व त्यांचें कार्य. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, याप्रमाणें धर्मव्याधानें सूक्ष्म ब्रह्माचें प्रतिपादन केलें असतां त्याच्या प्राप्तीचें साधन असा जो गुणत्रयविभाग त्याविषयीं ब्राह्मणानें प्रश्न केला.

ब्राह्मण—हे धर्मज्ञा, सत्त्व, रज व तम हे तीन गुण कार्यांसह तत्त्वतः जाणण्याची माझी इच्छा आहे, यास्तव ते मला कथन कर.

ब्राह्मणाचा हा प्रश्न ऐकून त्या गुणत्रयाहून ब्रह्म पृथक् आहे, हें प्रतिपादन करण्याच्या इच्छेनें व्याध म्हणाला—"हे ब्रह्मन्, ठीक आहे, तूं जें मला विचारीत आहेस, तें मी तुला सांगतों. हे गुण मी तुला पृथक् पृथक् कथन करितों, ते लक्षपूर्वक ऐक. या तीन गुणांतील तम मोहात्मक आहे, रज प्रवर्तक आहे आणि सत्त्व अतिशय प्रकाशयुक्त आहे. त्यामुळें सत्त्वगुणाला येथें श्रेष्ठ म्हटलें आहे.

तमोगुणानें व्यापलेला मूढ अतिशय अज्ञ असतो. तो तामस, आळशी, विवेकहीन, क्रोधी व इंद्रियनिग्रह करण्यास असमर्थ असतो.

हे विप्रर्षे, जो नरश्रेष्ठ प्रवृत्तीचाच उपदेश करितो व मुत्सद्दी, असूयक, महत्त्वाकांक्षी, नमस्कारादि न करणारा, आढ्य व मानी असतो, तो राजस होय.

जो दमनशील पुरुष ज्ञानसंपन्न, गंभीर, तृष्णाशून्य, असूयारहित व अक्रोधी असतो तो बुद्धिमान् सात्त्विक होय.

ज्ञानसंपन्न सात्त्विक मनुष्याला रजस्तमःकार्यांपासून क्लेश सहन करावे लागतात. तो जेव्हां ज्ञेय वस्तु जाणतो व रजस्तमःकार्यांची निंदा करूं लागतो तेव्हां त्याच्या मनांत विरक्तीचीं लक्षणें पूर्वीपासूनच प्रवृत्त होतात. त्याचा अहंकार व आढ्यता नष्ट होते. अंतःकरणाचा सरलपणा व अकौटिल्य प्रकट होतें, त्याचप्रमाणें मानापमानादि सर्व द्वंद्वें परस्परांस शांत करितात. त्याच्या मनांत कोणत्याच प्रकारचा संशय उद्भवत नाहीं.

हे ब्रह्मन्, शूद्रयोनींत उत्पन्न झालेल्या एखाद्या मनुष्यानें सद्गुणांचें अवलंबन केल्यास तो सदाचारानें वैश्यत्व किंवा क्षत्रियत्व यांस प्राप्त होतो. आर्जवादि गुणांचा आश्रय केल्यास तो ब्रह्मवेत्ता होतो. याप्रमाणें मीं तुला सर्व गुण कथन केले. आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ? ३. १२. २१२.

---

## अध्याय २१३ वा.

[ १ ध्यान व ज्ञान या मोक्षोपायांचें वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्यानंतर ब्राह्मणानें प्रश्न केल्यामुळें ज्ञानशक्ति मन व क्रियाशक्ति प्राण यांहून आत्मा पृथक् आहे, हें 'अग्निर्मूर्धा दिवः ककुत्०' या मंत्रानें सांगितलेलें तत्त्व कथन करण्यासाठीं व्याध बोलूं

लागला. पण अगोदर कौशिक ब्राह्मण त्यास म्हणाला—" हे व्याधा, पृथ्वी धातूचें ज्यांत आधिक्य आहे, अशा त्वगिंद्रियादिरूप देहास प्राप्त होऊन प्रकाश, प्रवृत्ति व मोह यांचा आश्रयभूत अग्नि म्ह० विज्ञानसंज्ञक शरीराभिमानी तेजोधातु कसा संभवतो व वायु अवकाशविशेषरूप भिन्न भिन्न नाडीमार्गांनें शरीराकडून चेष्टा कशी करवितो ! "

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, ब्राह्मणानें असा प्रश्न केला असतां धर्मव्याध त्या महात्म्या ब्राह्मणाला असें सांगूं लागला–

**व्याध**—हे विप्रा, सर्वश्रेष्ठ चिदात्म्याच्या आश्रयानें रहाणारा विज्ञानात्मा विज्ञान याच उपाधीला प्राप्त होऊन म्ह० चित्प्रतिबिंबत्वास प्राप्त होऊन शरीराला चेतनायुक्त करितो. हेंच बुद्धिप्रधान विज्ञानात्म्यानें केलेलें शरीराचें परिपालन होय. ( या व्याख्यानानें मंत्रांतील ' अग्निः ' व ' मूर्धा ' या दोन पदांचें प्रवचन केलें. ) प्राण चिदात्मा व विज्ञानात्मा यांच्या आधारानें राहून सर्व शरीराची हालचाल करवितो. या ' सूत्रात्म '-संज्ञक प्राणामध्यें ज्ञान व क्रिया या दोन्ही शक्ति एकरूप झाल्या आहेत. म्हणूनच त्याला पूर्वोक्त मंत्रांत ' दिवः ककुत् ' असें म्हटलें आहे. ' त्याला ककुत्त्व-श्रेष्ठत्व कसें ?' म्हणून विचारशील तर सांगतों.

भूत, भविष्यत् व वर्तमान कार्यजात या सूत्रात्मसंज्ञक प्राणामध्येंच प्रतिष्ठित आहे. सर्व भूतांमध्यें तोच श्रेष्ठ आहे. विराडादि सर्व स्थूल कार्यांचें तें करण आहे व स्वतः ब्रह्माचें कार्यहि आहे. चित्, विज्ञान व प्राण यांच्या संघातरूप असलेला तो समष्टि जीव कार्य-कारणात्मक सर्व भूतांचा आत्मा आहे. त्या सर्वांना तोच चेतना देतो. तोच सनातन पुरुष आहे. सर्व उपाधिरहित असलेला तोच परब्रह्म आहे. उपाधीशीं संयुक्त झालेला तोच समष्टिबुद्धि, व्यष्टिबुद्धि, अहंकार व सर्व भूतांचा शब्दादि विषय आहे. ( या वर्णनानें मंत्रांतील ' पतिः पृथिव्या अयं ' या द्वितीय पादाचें वर्णन झालें. हा चिद्विज्ञान-प्राणसंघात पृथ्वीचा–क्षेत्राचा स्वामी आहे, असा याचा भावार्थ. )

याप्रमाणें शरीराच्या आंत व बाहेर स्थित असलेलें सर्व ' देहलिदीप '-न्यायानें शरीराच्या मध्यभागीं स्थित असलेल्या या प्राणाकडून रक्षिलें जातें. ( उंबरठ्यांत ठेवलेला दीप आंतील व बाहेरील सर्व पदार्थांना जसा प्रकाशित करतो, त्याप्रमाणें देहाच्या मध्यभागीं स्थित असलेला हा ज्ञान-क्रियाशक्ति

प्राण, आन्तरविज्ञान व बाह्य देहेंद्रियादिक, यांचें पालन करितो. आतां मंत्रांतील ' अपां रेतांसि जिन्वति ' या अन्त्य पादाचें व्याख्यान करितात—)

हा ज्ञान-क्रियाशक्ति प्राण साक्षात् किंवा परंपरेनें शरीरस्थ प्राण, मन व इंद्रियें यांस तृप्त करितो. तो उपाधीमध्यें प्रवेश केल्यामुळें जीवत्वाला प्राप्त होऊन आपल्या पृथक् गतीला प्राप्त होतो. तो समान वायुत्वाला प्राप्त होऊन जाठराग्नि, बस्तिमूल, मूत्राशय व पुरीपाशय याचा आश्रय करितो. जाठरस्थ समान खाल्लेल्या अन्न-जलांचा परिपाक करितो आणि तोच अपानरूप होऊन मूत्र-पुरीपांना स्व-स्वस्थानीं नेतो.

तोच गमनादि कर्म, तदनुकूल प्रयत्न, भार वहाणें, इत्यादिकांचें सामर्थ्य, हें सर्व होतो. अध्यात्मज्ञ विद्वान् याला ' उदान ' असें म्हणतात. मनुष्यांच्या सर्व शरीरांतील प्रत्येक संधीमध्यें प्रविष्ट झालेल्या त्या वायूला ' व्यान ' असें म्हणतात. त्वगादि शारीर धातूंमध्यें व्यापून रहाणाऱ्या जाठराग्नीला ' समान ' वायु प्रेरणा करितो. त्यामुळें तो अन्नादि रस, त्वगादि धातु व पित्तादि दोष यांचें शरीरांत सतत परिवर्तन करितो. प्राणांच्या संघर्षामुळें जो ऊष्मा उत्पन्न होतो तोच जाठराग्नि होय. हा जाठराग्नि प्राण्यांच्या अन्नादिकांचा परिपाक करितो.

नाभिस्थ ' समान ' व कंठस्थ ' उदान ' यांच्या मध्यें म्ह० हृदय व गुदा, या स्थानीं ' प्राण ' व ' अपान ' हे वायु स्थित आहेत. त्यामुळें नाभिप्रदेशीं प्राण, अपान व समान यांचा संघर्ष होतो. त्या संघर्षापासून उत्पन्न झालेला जाठराग्नि सप्तधातुमय शरीराचे वृद्ध्यादि परिणाम घडवून आणितो. याच अग्नीचा पायूपर्यंत जो गुदप्रवेश तोच ' गुद '-संज्ञक अपानवायु होतो. त्या अपानापासून प्राण्यांच्या पांची प्राणांमध्यें नाडीमार्ग उत्पन्न होतात. म्ह० प्राणादिकांपासून अग्नीची उत्पत्ति होते. अग्नीपासून अपानद्वारा प्राणादिकांची उत्पत्ति होते.

आतां मी याचेंच उपपादन करितों. अग्नीच्या वेगानें प्राण गुदांतीं प्रतिबद्ध होतो व वर उडविलेल्या चेंडूप्रमाणें पुनः वर उडालेला तो प्राण अग्नीला उडवितो. अग्नीच्या वेगानें बाष्पवायूची वृद्धि होते व वायुवेगानें अग्नीची वृद्धि होते, हें आपण व्यवहारांत पहातोंच. यास्तव या प्राणाचा निरोध करावा. जाठराचा निरोध केला असतां सर्व इंद्रियांचा रोध होतो. कारण नाभीच्या खालीं पक्वाशय व वर आमाशय स्थित आहे व नाभीमध्यें सर्व इंद्रियें प्रतिष्ठित आहेत.

सर्व अन्नरस हृदयास प्राप्त होऊन दहा प्राणांनीं प्रेरित होत्साते शरीरांत खालीं, वर व आजुबाजूस पसरलेल्या नाड्यांतून सर्व शरीरभर वहातात. पांच प्राण प्रसिद्धच आहेत. शिवाय नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हे दुसरे उपप्राण आहेत. हे दहाहि प्राण हृदयांत आलेल्या अन्नरसाला नाड्यांच्या द्वारा सर्व शरीरभर पसरवितात. प्राणनिरोध हा योग्यांचा मार्ग आहे. या मार्गानें ते परम पदाला प्राप्त होतात. योगी क्लेशरहित, समवृत्ति व धीर असतात. ते योगाभ्यासबलानें आत्म्याला मूर्धास्थानीं स्थापितात.

हे विप्रा, याप्रमाणें सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं प्राण व अपान हे वायु सर्व शरीरभर पसरलेले आहेत. यास्तव जे योगी आपल्या प्राणोपाधिक आत्म्याला मूर्धास्थानीं स्थापितात तेच परम पदाला जातात असें नाहीं, तर जिवंत असलेल्या देहामध्यें सर्वांलाच हा मार्ग स्वीकारणें उचित होय. तथापि हे ब्रह्मन्, प्राणनिरोध हाच पुरुषार्थ आहे, असें नाहीं तर प्राणनिरोधानें साध्य होणारें विज्ञानहि पुरुषार्थ आहे. हा आत्मा वस्तुतः जरी निराकार आहे तरी लिंग शरीराशीं तादात्म्य पावून व सोळा कलांनीं युक्त होऊन साकार झाल्या-प्रमाणें भासतो. पण योगाभ्यासानें ज्यानें आपल्या बुद्धीला वश करून घेतलें आहे व एखाद्या पात्रांत ठेवलेल्या अग्नीप्रमाणें जो या कलासमूहामध्यें स्थित आहे, तोच प्राणादिकांहून विलक्षण असलेला जीवात्मा होय. कमलपत्रांवरील बिंदूप्रमाणें जो देव या कार्यकरणसमूहांत स्थित आहे. तोच क्षेत्रज्ञ असून संसारी जीव व असंसारी ईश्वर यांचें बिंब-प्रतिबिंबन्यायानें ऐक्य संभवतें.

जीव सत्त्वादि तीन गुणांनीं सगुण आहे. त्यामुळें जलांतील चंद्रबिंबाप्रमाणें चांचल्यादि गुणांनीं युक्त असून बिंबस्थानीय ईश्वर असंग चिद्रूप आहे, असें तूं समज. सचेतनत्व हा जीवगुण असून तेंच जीवाचें भोग्य आहे, असें म्हण-तात. आत्मा जीवरूपानें स्वतः व्यवहार करतो व इतरांकडून करवितो. पण त्या सर्वांचें अधिष्ठान त्याहून पृथक् आहे. त्यालाच ईश्वर व पुरुषोत्तम असें म्हणतात.

तोच सर्वांचें अधिष्ठान असल्यामुळें भूर्भुवादि सप्त लोकांना उत्पन्न करितो. कारण हा नित्यसिद्ध आनंदाख्य आत्मा सर्व भूतांचा आत्मा होऊन त्यांमध्यें अभिव्यक्त होतो व विद्वान् लोक एकाग्र बुद्धीनें त्याला पहातात. ज्ञानी पुरुष चित्ताच्या प्रसादानें आपल्या शुभाशुभ कर्मांचा नाश करितो व ज्याचें चित्त



" ब्राह्मणाला व्याधाच्या मातापितरांचें दर्शन. " ( पृष्ठ १०७. )

अतिशय प्रसन्न झालें आहे, तो चित्तसारूप्यहि टाकून आत्मस्वरूपांत तादात्म्य पावतो व अनायासानें मोक्षाचा अनुभव घेतो.

आतां 'चित्तप्रसादाचें लक्षण काय आहे?' म्हणून म्हणशील तर तेंहि सांगतों, ऐक. ज्याप्रमाणें सर्व प्रकारें तृप्त झालेला पुरुष सुखानें शयन करितो, किंवा कुशल पुरुषानें लावलेला निवात प्रदेशांतील दीप अविच्छिन्न तेवत रहातो, त्याप्रमाणें समाहित चित्त विद्यमान असूनहि तें भासत नाहीं. हीच गोष्ट आणखीं एका दृष्टान्तानें स्पष्ट करितों. जलांत स्नान करून वर आलेल्या मनुष्याच्या शरीराला चिकटून असलेलें सूक्ष्म वस्त्र शरीरावर असूनहि तें जसें त्याला भासत नाहीं, तसें विद्यमान असलेलेंहि चित्त समाहित पुरुषाला भासत नाहीं.

युक्ताहार होऊन पूर्व रात्रीं व अपर रात्रीं नित्य नियमानें मनाला समाहित करणारा विशुद्धात्मा आपल्या हृदयांत ब्रह्म पहातो. अंधकारांतील वस्तु दीपाच्या साह्यानें जशी दृष्टीं पडते, त्याप्रमाणें तो मनोदीपानें ब्रह्म पहातो. ज्याच्यामध्यें चित्त लीन झालें आहे, अशा आत्म्याला पाहून तो ज्ञानी तत्काल मुक्त होतो. तात्पर्य, चित्तक्षय हेंच आत्मदर्शन आहे. यास्तव सर्व उपायांनीं लोभ व क्रोध यांचा निरोध करावा. मुमुक्षूंचें हेंच पवित्र तप आहे व हाच परमात्म्याची प्राप्ति करून देणारा मार्ग आहे.

क्रोधापासून तपाचें, मत्सरापासून धर्माचें, मानापमानांपासून विद्येचें व प्रमादापासून आत्म्याचें नित्य रक्षण करावें. दया हा परम धर्म, क्षमा हें परम बल, आत्मज्ञान हें श्रेष्ठ ज्ञान व सत्य हेंच परम व्रत आहे. सत्यवचन श्रेयस्कर असून सत्य हेंच हितावह ज्ञान आहे. भूतांचें हित करणारें अनृत भाषणहि सत्य असून त्यांचें अहित करणारें सत्य भाषणहि अनृत होय. ज्याचीं सर्व कर्में आशाबंधरहित असतात व ज्याचें होम-यज्ञ-दानादि सर्वदा फलत्यागयुक्त असतें तोच संन्यासी व ज्ञानी होय.

---

१ नित्यं क्रोधात्तपो रक्षेद्धर्मं रक्षेच्च मत्सरात् ।
विद्यां मानापमानाभ्यामात्मानं तु प्रमादतः ॥
आनृशंस्यं परो धर्मः क्षमा च परमं बलं ।
आत्मज्ञानं परं ज्ञानं सत्यं व्रतपरं व्रतम् ।

गुरूनेंहि हा ब्रह्मयोग साक्षात् शब्दानें ऐकवूं नये. तर लक्षणेनेंच त्याचा बोध करावा. कारण या अवस्थेंत चित्ताचा वियोग होत असतो. पण त्या वियोगालाच विद्वान् लोक विरुद्ध लक्षणेनें योग म्हणतात. कोणत्याहि प्राण्याला पीडा देऊं नये. तर सर्वांशीं मित्रत्वानें वागावें. अशा शुभ जीविताला प्राप्त होऊन कोणाशीं वैर करूं नये. कशाचाहि संग्रह न करणें, संतोषवृत्ति ठेवणें, सर्व आशा व चापल्य यांचा त्याग करणें, हेंच ज्ञानाचें परम साधन आहे व हेंच उत्तम ज्ञान आहे. ऐहिक स्त्री-पुत्रादि व पारलौकिक सर्व परिग्रह यांचा त्याग करून व निश्चल वैराग्य धारण करून आपल्या बुद्धीन नियतव्रत व्हावें. सतत तपोनिष्ठ व संयतचित्त दमनशील मुनीनें अजित स्थान जिंकण्यासाठीं सर्व आसक्तींचा त्याग करावा. लोक-वेदादि गुण हेहि ज्यामध्यें अगुण आहेत, अशा संगहीन केवल प्रत्यगात्मरूपानेंच संपन्न असलेलें व केवल अज्ञानाच्या निवृत्तीनेंच प्राप्त होणारें जें ब्रह्माचें नित्यसिद्ध स्वरूप तेंच सुखरूप एक स्थान आहे. तें स्वर्गादि सुखाप्रमाणें कर्मानें प्राप्त होणारें नाहीं व त्यामध्यें ज्ञान-ज्ञेयादिविभागहि नाहींत. यास्तव मुमुक्षूनें वैराग्य व ज्ञान यांच्या योगानें त्या स्वरूपाची प्राप्ति करून घ्यावी. जो पुरुष सुख व दुःख या दोहोंचाहि त्याग करितो तो ब्रह्माला प्राप्त होतो व अत्यंत असंग स्थानीं जातो. हे ब्रह्मन्, मीं विद्वानांच्या मुखानें जसें ऐकलें होतें तसें सर्व तुला निवेदन केलें आहे. आतां आणखीं काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे? ३. १२. २१३.

---

## अध्याय २१४ वा.

[ १ ब्राह्मणाला व्याधाच्या माता-पितरांचें दर्शन. २ त्याची मातृपितृशुश्रूषा. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या धर्मव्याधानें समग्र मोक्ष-धर्म कथन केला असतां अतिशय संतुष्ट झालेला विप्र व्याधाला म्हणाला— "हे धर्मज्ञा, तूं हें सर्व यथान्याय बोलत आहेस. तुला अविदित असें एकहि धर्मतत्त्व राहिलें असेलसें दिसत नाहीं."

त्यावर व्याध म्हणाला—हे ब्राह्मणश्रेष्ठा, ज्यांच्यायोगानें मला ही सिद्धि प्राप्त झाली, तो माझा धर्म तूं प्रत्यक्षच अवलोकन कर. हे धर्मवेत्त्या, ऊठ आणि सत्वर माझ्या अंतर्गृहांत प्रवेश कर. तेथें असलेल्या माझ्या वृद्ध माता-पितरांस पहाण्यास तूं योग्य आहेस.

मार्कंडेय—राजा, व्याधाचें हें भाषण ऐकून ब्राह्मणानें त्याच्या गृहांत प्रवेश केला. तेथें त्याला एक मनोरम व स्वच्छ चौकोनी सोपा दिसला. तो देवतांनीं पूज्य मानिलेल्या पवित्र देवगृहासारखा होता. शयन-आसनादिकांनीं युक्त असलेल्या त्या जागेंत उत्तम सुगंध पसरला होता. अशा त्या अत्यंत रम्य व पवित्र मंदिरांत शुभ्र वस्त्रें परिधान केलेलीं त्याचीं वृद्ध माता-पितरें भोजन करून श्रेष्ठ आसनावर सुखानें बसलीं होतीं. धर्मव्याधानें त्यांना पहातांच त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून त्यांस साष्टांग प्रणिपात केला.

तेव्हां तें वृद्ध दांपत्य म्हणालें—हे वत्सा, ऊठ, ऊठ. धर्म तुझें रक्षण करो. तुझ्या पवित्र आचरणांनीं आम्ही संतुष्ट झालों आहों. तूं दीर्घायु हो. तूं इष्ट गति, तप, ज्ञान व उत्तम बुद्धि यांस प्राप्त झाला आहेस. तुज सत्पुत्राकडून आमचा योग्य कालीं नित्य सत्कार होत असतो. सर्व दैवतांमध्यें आम्हां-वांचून तूं अन्य दैवत मानीत नाहींस.

तूं शुचिर्भूत व द्विजांच्या इंद्रियनिग्रहानें युक्त आहेस. हे पुत्रा, आमची सतत सेवा व इंद्रियदमन यांच्या योगानें तुझे सर्व पूर्वज तुजवर प्रसन्न झाले आहेत. तूं काया-वाचा-मनानें आमच्या शुश्रूषेंत यत्किंचित्‌हि न्यून पडूं देत नाहींस आणि आमच्या सेवेवांचून तुझें मन अन्य कोणत्याहि विषयांत आसक्त होत नाहीं. बाळा, परशुरामानें जशी वृद्ध माता-पितरांची उत्तम सेवा केली होती, तशी किंबहुना त्याहूनहि अधिक तूं आमचा सत्कार करीत आहेस.

राजा, त्यानंतर व्याधानें त्यांना त्या ब्राह्मणाचें निवेदन केलें. तेव्हां त्या वृद्ध दांपत्यानें विप्राचें स्वागत आणि यथाविधि पूजन केलें. त्या सत्काराचा स्वीकार करून विप्रानें त्या उभयतांस विचारिलें—"पुत्र व भृत्य यांसह तुमचें सर्व कुशल आहे ना? तुम्हांला सदैव शरीरस्वास्थ्य मिळतें ना?"

वृद्ध—हे भगवन्, आमच्या गृहांतील भृत्य व आम्ही कुशल आहों. तूं निर्विघ्नपणें येथें आलास ना? मार्गांत कांहीं त्रास झाला नाहीं ना?

मार्कंडेय—युधिष्ठिरा, त्या वृद्धांचा तो कुशल प्रश्न ऐकून संतुष्ट झालेल्या विप्रानें त्यांस 'होय, सर्व क्षेम आहे' असें उत्तर दिलें.

( २ ) नंतर धर्मव्याध ब्राह्मणाकडे पाहून म्हणाला—हे ब्रह्मन्, माता व पिता हीं दोघेंच माझें परम दैवत असून, देवतांना उद्देशून करावयाचें जें

कर्तव्य तें सर्व मी या उभयतांस अर्पण करीत असतों. सर्व लोकांना इंद्रासह समग्र तेहतीस देव जसे पूज्य आहेत, तसे माझे हे वृद्ध माता-पितर मला वंद्य आहेत.

हे विप्रा, ब्राह्मण गंध-पुष्पांनीं देवतांची जशी पूजा करितात तशी मी निरलसपणें माझ्या जनक-जननींची सेवा करितों. परम दैवत असलेल्या या माझ्या मातापितरांस मी पुष्पें, फळें व रत्नें यांनीं सर्वदा संतुष्ट करितों. ज्ञानी लोक ज्या गार्हपत्यादि अग्नींना वंदन करितात, ते अग्नि, यज्ञ व चार वेद हें सर्व माझ्या या वृद्ध माता-पितरांतच स्थित आहे, असें मी समजतों. माझे प्राण, भार्या, पुत्र, व आप्तमित्र हीं सर्व या उभयतांसाठींच आहेत, असें मानून मी स्त्री-पुत्रांसह नित्य त्यांची शुश्रूषा करितों.

हे द्विजश्रेष्ठा, मी स्वतः त्यांना स्नान घालतों, त्यांचे पाय धुतों, आणि त्यांना जेवूं घालतों. त्यांना अनुकूल असेंच भाषण करितों व प्रतिकूल वर्ज करितों. अधर्मयुक्त कर्मानेंहि मी त्यांचें प्रिय करितों. हाच श्रेष्ठ धर्म आहे, असें मानून मी अत्यंत दक्षतेनें त्यांची शुश्रूषा करितों.

हे विप्रर्षे, उत्कर्षेच्छु मनुष्यांचे पिता, माता, अग्नि, आत्मा व आचार्य हे पांच गुरु आहेत. यांच्याशीं जो यथान्याय वर्तन करितो, त्याला नित्य अग्निसेवेचें फल प्राप्त होतें. गृहस्थाश्रमी मनुष्याचा हाच सनातन धर्म आहे. ३. १२. २१४.

---

## अध्याय २१५ वा.

[ १ व्याधानें विप्राचें पूर्ववृत्त सांगून त्याला केलेला उपदेश. २ व्याधाला पूर्वजन्मीं झालेल्या शापाचें कथन. ]

( १ ) मार्कंडेय—धर्मराजा, याप्रमाणें त्या विप्राला आपल्या पूज्य माता-पितरांची ओळख करून देऊन तो धर्मात्मा व्याध ब्राह्मणाला पुनः म्हणाला—"हे ब्रह्मन्, त्या सत्यशील दांत पतिव्रतेनें तुला ज्यासाठीं 'मिथिलेस जा, तेथें रहाणारा व्याध तुला धर्म सांगेल' असें सांगितलें, तें वृत्त मला पितृशुश्रूषात्मक तपाच्या योगानें प्राप्त झालेल्या दिव्यदृष्टीनें कळलें."

ब्राह्मण—हे धर्मज्ञा, त्या सत्यवचनी सुशील पतिव्रतेच्या वचनाचें स्मरण केलें असतां तूं गुणवान् आहेस, असें मला वाटतें.

व्याध—हे प्रभो, त्या पतिव्रतेनें तुला मजविषयीं जें सांगितलें होतें, त्याचा तुला प्रत्यक्षच प्रत्यय आला आहे, यांत संशय नाहीं. तुझ्यावर अनुग्रह करण्यासाठींच मीं तें तुझ्या प्रत्ययास आणून दिलें. आतां मी तुझ्या हिताचें वचन सांगतों, तें ऐक.

हे विप्रा, तूं आपल्या माता-पितरांच्या संमतीवांचून त्यांचा त्याग केलास व वेदाध्ययनासाठीं गृहांतून बाहेर पडलास, हें फार अयोग्य केलेंस. तुझ्या शोकानें तीं दोघें तपस्वी वृद्ध अंध झालीं आहेत. यास्तव त्यांना प्रसन्न करण्यासाठीं तूं सत्वर जा. धर्मत्याग करूं नको.

हे विद्वन्, तूं तपस्वी व महात्मा आहेस. तूं सर्वदा धर्मांत रत असतोस. परंतु हें सर्व व्यर्थ आहे. तस्मात् अगोदर जा व आपल्या जनक-जननींस प्रसन्न कर. माझ्या या वचनावर श्रद्धा ठेव. याच्या विरुद्ध वागूं नको. हे ब्रह्मन्, आजच तूं त्यांच्याकडे जा. यांत तुझें कल्याण आहे.

ब्राह्मण—हे श्रेष्ठा, तूं जें सांगितलेंस तें सर्व सत्य आहे, यांत संशय नाहीं. खरोखर तूं धर्माचारगुणान्वित आहेस, मी तुजवर संतुष्ट झालों आहें. तुझें कल्याण असो.

व्याध—हे द्विजसत्तमा, तूं धर्माचें अनुवर्तन करणारा आहेस. त्यामुळें तूं देवतुल्य आहेस. यास्तव दुरात्म्यांना दुष्प्राप्य असलेल्या या सनातन, दिव्य, शाश्वत धर्माचें आचरण करून तूं सत्वर मातापित्यांच्या समीप जा व त्यांची निरलसपणें सेवा कर. कारण याहून अधिक श्रेष्ठ असा दुसरा कोणताहि धर्म नाहीं.

ब्राह्मण—हे पुरुषसत्तमा, मी येथें आलों हें माझें परम भाग्य होय. महद्भाग्यानेंच मला तुझा सहवास घडला. कारण अशा प्रकारचें धर्मदिग्दर्शन करणारे पुरुष इह लोकीं दुर्लभ आहेत. हजारांत असा श्रेष्ठ ज्ञानी एखादा तरी असेल किंवा नाहीं, याचाहि संशयच आहे. हे व्याधा, तुझ्या या सत्यभाषणानें मी संतुष्ट झालों आहें. तुझें कल्याण असो. नरकामध्यें पडणाऱ्या माझा तूं उद्धार केलास. हे अनघा, मला तुझें दर्शन झाल्यामुळेंच हें सत्कर्म घडून आलें.

ज्याप्रमाणें पतित झालेल्या ययातिराजाला त्याच्या सुशील दौहित्रांनीं तारिलें, (भा.१. अ.८८-९३ पहा.) त्याप्रमाणें तूं आज मला अधर्मापासून वांचविलेंस. हे धर्मनिष्ठा, मी तुझ्या सांगण्याप्रमाणें माता-पित्यांची शुश्रूषा अवश्य करीन. धर्मा-

धर्मांचा निश्चय आत्मज्ञान्यावांचून इतर कोणालाहि करतां येत नाहीं आणि शूद्र-योनींत शाश्वत धर्मवेत्ता संभवत नाहीं. यास्तव तूं वस्तुतः शूद्र नाहींस, तुला ही योनि प्राप्त होण्याचें कांहीं तरी कारण असावें, असें मला वाटतें. तस्मात् हे धर्मज्ञा, कोणत्या विशिष्ट कर्मामुळें तूं या शूद्रत्वाला प्राप्त झालास हें तत्त्वतः जाणण्याची माझी इच्छा आहे. तरी शुद्ध चित्तानें खरा वृत्तान्त मला सांग.

( २ ) व्याध—हे द्विजोत्तमा, ब्राह्मणाच्या शब्दाचें अतिक्रमण करतां येत नाहीं. यास्तव माझें सर्व पूर्वजन्मवृत्त तुला सांगतों, तें ऐक. मी पूर्वजन्मीं एका श्रेष्ठ ब्राह्मणाचा पुत्र असून वेदाध्यायी, वेदांगांत पारग व तीव्र बुद्धिमान् होतों. परंतु हे ब्रह्मन्, मी स्वतःच्या दोषानेंच या जन्मीं या अवस्थेला प्राप्त झालों आहें. कोणी एक धनुर्वेदपरायण राजा माझा मित्र होता. त्याच्या संग-तीनें मीहि धनुर्विद्येंत प्रवीण झालों.

एकदा, तो राजा आपला अमात्यादि परिवार व योद्धे यांसह मृगयेला निघाला. तेव्हां मीहि त्याच्याबरोबर गेलों. त्या राजपरिवारानें अरण्यांतील एका आश्रमासमीप जाऊन अनेक मृगांचा वध केला. त्या वेळीं मींहि एक घोर बाण सोडिला. त्या तीक्ष्ण धारेच्या शरानें एका ऋषीला वेध केला. तेव्हां तो शरपीडित ब्राह्मण भूमीवर पडला व ' मीं कोणाचा यत्किंचित्हि अपराध केला नसतांना हें पापकर्म कोणीं केलें ?' असें बोलून आक्रोश करूं लागला.

तेव्हां हे प्रभो, त्याला मृग समजणारा मी त्वरेनें त्याच्या समीप गेलों व पाहतों, तों माझ्या शरानें विद्ध झालेला ऋषि माझ्या दृष्टीं पडला. या अकार्यामुळें मला अतिशय खेद वाटला व भूमीवर आक्रोश करीत पडलेल्या त्या उग्र तपस्वी मुनीला मी म्हणालों—" हे भगवन्, माझ्या हातून अज्ञा-नानें हें घोर कर्म घडलें, यास्तव माझ्या या अक्षम्य अपराधाचीहि तूं मला क्षमा कर. "

पण हे ब्रह्मन्, माझें हें करुण वचन ऐकूनहि क्रोधसंतप्त झालेला ऋषि मला म्हणाला—"हे क्रूरा, तूं शूद्रयोनींत व्याध उत्पन्न होशील." ३.१२.२१५.

---

## अध्याय २१६ वा.

[ १ व्याधावर मुनीनें केलेला अनुग्रह. २ व्याध व ब्राह्मण यांचा संवाद. ]

( १ ) **व्याध**—हे ब्रह्मन्, याप्रमाणें त्या मुनीनें मला शाप दिला असतां मी त्याला प्रसन्न करीत म्हटलें—" हे भगवन्, माझें रक्षण कर. हे मुने, मीं आज न जाणतां हें अकार्य केलें. त्या सर्वांची मला क्षमा करून मजवर प्रसन्न हो. "

तेव्हां तो ऋषि म्हणाला—हे द्विजा, माझा शाप कदापि अन्यथा होणार नाहीं. माझ्या वचनाप्रमाणें निःसंशय घडून येईल. परंतु दयालुत्वामुळें मी तुजवर आतां किंचित् अनुग्रह करितों. तूं शूद्रयोनींत जरी उत्पन्न झालास तरी धर्मज्ञ होशील व माता-पितरांची सेवा करशील. त्या शुश्रूषेच्या प्रभावानें तुला महत्सिद्धि प्राप्त होईल. तुला पूर्वजन्मींचें स्मरण राहील व तूं शेवटीं स्वर्गलोकीं जाशील. शापाचा क्षय झाल्यावर तूं त्या हीन योनींतून मुक्त होऊन पुनः द्विज होशील.

**व्याध**—हे द्विजश्रेष्ठा, याप्रमाणें त्या उग्र तेजस्वी ऋषीनें अगोदर शाप देऊन पुनः मजवर अनुग्रह केला. तेव्हां मीं त्याच्या शरीरांतील शर ओढून काढिला व त्याला आश्रमांत नेलें. तेथें त्याचें तत्काल प्राणोत्क्रमण झालें. याप्रमाणें माझ्या पूर्वजन्मींचा वृत्तान्त मीं तुला कथन केला. आतां मी अल्पकालांतच स्वर्गलोकीं जाईन.

( २ ) **ब्राह्मण**—हे महाबुद्धे, अशा प्रकारचीं सुख-दुःखें सर्व मनुष्यांना प्राप्त होतात, यास्तव तू त्यांचा विचार करून खिन्न होऊं नको. तुला पूर्वजन्मींचें ज्ञान असल्यामुळें तूं केलेल्या दुष्कर कर्मांचें तुला स्मरण झालें. तूं लोकवृत्तान्ततत्त्वज्ञ असून धर्मपरायण आहेस. स्वजातीला उचित असलेलें कर्म केल्यानें दोष लागत नाहीं, हेंहि तूं जाणतोस. यास्तव तूं कांहीं काल इहलोकीं वास्तव्य कर, त्यानंतर तूं ब्राह्मण कुलांत जन्म घेशील. सांप्रतहि तूं माझ्या मतें निःसंशय ब्राह्मणच आहेस.

हे धर्मज्ञा, ब्राह्मण जेव्हां अधःपात करणाऱ्या निषिद्ध कर्मांत प्रवृत्त होऊन दांभिक बनतो व दुष्कर्में करूं लागतो, तेव्हां तो प्राज्ञहि शूद्रतुल्यच होतो आणि इंद्रियनिग्रह करून सतत सत्यधर्मांत स्थित असलेल्या शूद्रालाहि मी ब्राह्मणच मानतों. कारण तो जन्मतः नसला तरी स्वतःच्या आचरणानें द्विज असतो. केवल कर्मदोषामुळेंच मनुष्याला दारुण गति प्राप्त होत असते.

हे नरोत्तमा, आतां तुझे दोष सर्वप्रकारें क्षीण झाले आहेत, असें मी समजतों. यास्तव तूं आतां त्याविषयीं चिंता करूं नको. तुझ्या सारख्या नित्य धर्मपरायण व लौकिक आचरण जाणणाऱ्या विषादशून्य धर्मात्म्यानें खेद करणें योग्य नव्हे.

व्याध—हे विप्रश्रेष्ठा, ज्ञानानें मानसिक दुःखांचा व औषधानें शारीर व्याधींचा नाश करावा. यांतच मनुष्याच्या ज्ञानाचें खरें सामर्थ्य आहे. त्यानें मूर्खांसारखें स्वस्थ बसूं नये. अल्पबुद्धि मनुष्याला अनिष्टप्राप्ति व प्रिय वस्तूंचा वियोग यांच्या योगानें मानसदुःख प्राप्त होतें. सुख-दुःख-मोहादि गुणकार्याशीं भूतांचा संयोग व वियोग घडतच असतो. परंतु यांतील एकाहि गुणकार्यासाठीं शोक करणें योग्य नव्हे.

अनिष्टप्राप्ति पहातांच मनुष्य लगेच विरक्त होतो व त्याला प्रतीकार करण्याचा प्रयत्न करितो. केवल शोक केल्यानें कांहीं निष्पन्न होत नसून त्यापासून उलट संताप मात्र होतो. ज ज्ञानसंपन्न बुद्धिमान् लोक सुख व दुःख या दोहोंचा त्याग करितात, तेच खऱ्या सुखाला प्राप्त होतात. मूढ नेहमीं असंतुष्ट असतात व पंडित सर्वदा संतुष्ट दिसतात. असंतोषाचा अंत कधींच होत नसतो. परंतु संतोष हेंच परम सुख आहे.

ज्ञानमार्गाला प्राप्त झालेले लोक परमगति जाणतात व शोक करीत नाहींत. मन केव्हांहि खिन्न होऊं देऊं नये. कारण विषाद तीव्र विषाप्रमाणें असून तो क्रुद्ध झालेल्या सर्पाप्रमाणें अविवेकी मूढांचा नाश करितो. पराक्रमाचा समय प्राप्त झाला असतां ज्याला विषाद ग्रासतो, त्या तेजोहीन मनुष्याच्या हातून पुरुषार्थ कधींच होत नाहीं. कर्म करणारास त्याचें फल अवश्य मिळतें, परंतु खिन्न होऊन स्वस्थ बसणारास यत्किंचित्‌हि शुभ प्राप्त होत नाहीं. दुःखमुक्त होण्याचा उपाय दिसला असतां शोक सोडून द्यावा आणि तो उपाय आरंभून क्लेशरहित व सुखी व्हावें.

तत्त्वज्ञानानें परम ब्रह्माला प्राप्त झालेले ज्ञानी पंचभूतात्मक लोकांचें नश्वरत्व जाणून कदापि शोक करीत नाहींत. त प्रज्ञावान् परम गति कोणती

---

परित्यजन्ति ये दुःखं सुखं वाप्युभयं नराः ।
त एव सुखमेधन्ते ज्ञानतृप्ता मनीषिणः ।
असंतोषपरा मूढाः संतोषं यान्ति पण्डिताः ।

हें जाणतात. हे ब्रह्मन्, मीहि शोक करीत नसून अपेक्षित कालाची प्रतीक्षा करीत आहें.

ब्राह्मण—हे मेधाविन्, तूं ज्ञानसंपन्न असून तुझी बुद्धि अगाध आहे. तूं ज्ञानानें तृप्त झाला आहेस, हें पाहून मला तुजविषयीं खेद वाटत नाहीं. आतां मी तुझी अनुज्ञा घेतों. तुझें कुशल असो. धर्म तुझें संरक्षण करो. हे धर्मज्ञा, तूं असेंच दक्षतेनें सतत धर्माचरण कर.

मार्कंडेय—युधिष्ठिरा, त्या विप्राचें हें वचन ऐकून व्याधानें हात जोडिले व त्याला 'ठीक आहे.' असें म्हटलें. तेव्हां तो ब्राह्मण आपला उपदेशक गुरु या बुद्धीनें व्याधाला प्रदक्षिणा करून मार्गस्थ झाला. नंतर त्या प्रशंसनीय विप्रानें आपल्या वृद्ध मातापित्यांकडे जाऊन त्यांची यथान्याय सर्वप्रकारें सेवा केली.

याप्रमाणें हे धर्मराजा, तूं विचारलेलें हें समग्र आख्यान मीं तुला सांगितलें. पतिव्रता व ब्राह्मण यांचें माहात्म्य व धर्मव्याधानें कथन केलेली मातापितरांची शुश्रूषा यांचेंहि मीं तुला सविस्तर निवेदन केलें.

युधिष्ठिर—हे ब्रह्मन्, तूं मला कथन केलेलें हें उत्कृष्ट धर्माख्यान अतिशय अद्भुत आहे. हे भगवन्, तें ऐकत असतांना माझा काल एका क्षणासारखा गेला. हे विद्वन्, असा उत्तम धर्म ऐकत असतां माझी कधींहि तृप्ति होत नाहीं. ३. १२. २१६.

---

## अध्याय २१७ वा.

[ १ अंगिरामुनीला अग्नीच्या वरानें पुत्रप्राप्ति. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें व्याधानें सांगितलेल्या धर्मांत मुमुक्षूंसाठीं माता, पिता, अग्नि, आत्मा व गुरु या पांच सेव्य वस्तु सांगितल्या. धर्मव्याधाच्या वृत्तान्तांत माता-पितरांच्या सेवेचें व पतिव्रतेच्या चरित्रांत पतिसेवेचें फल दाखविलें. त्या आख्यानांतील मोक्षधर्माच्या प्रस्तावांत आत्मचिंतन व त्याचें फल कथन केलें. ती धर्मयुक्त शुभ कथा ऐकून धर्मराजानें पुनः प्रश्न केला असतां मार्कंडेयानें अवशिष्ट राहिलेल्या अग्नीच्या उपासनेचा मोक्षहेतुत्वप्रकार सांगण्यासाठीं आंगिरस-आख्यानास आरंभ केला.

युधिष्ठिर—हे भगवन्, पूर्वीं अग्नीनें जलांत कसा प्रवेश केला व तो अग्नि नष्ट झाला असतां महा तेजस्वी अंगिरामुनीनें स्वतः अग्नि होऊन हवि-

द्रव्यें वह्नीला कशीं पोंचतीं केलीं? वस्तुतः अग्नि एकच असून कर्मांमध्यें त्याला बहुत्व कसें प्राप्त झालें? हें जाणण्याची मी इच्छा करीत आहें. त्याचप्रमाणें कुमार कार्तिकेय अग्नीपासून कसा उत्पन्न झाला? रुद्रापासून गंगा व कृत्तिका यांच्या ठिकाणीं त्याची उत्पत्ति कशी झाली? हे महामुने, हा सर्व वृत्तान्त ऐकण्याची मला फार उत्सुकता वाटत आहे. यास्तव मला तो समग्र वृत्तान्त यथावत् कथन कर.

मार्कंडेय—हे युधिष्ठिरा, पूर्वीं एकदां क्रुद्ध झालेल्या अग्नीनें तप करण्यासाठीं जलांत कसा प्रवेश केला व भगवान् अग्नीच स्वतः आंगिरा कसा झाला आणि आपल्या प्रभेनें लोकांना संताप देऊन तिमिराचा नाश कसा करूं लागला, याविषयीं असा एक पुरातन इतिहास श्रुत आहे. हे महाबाहो, पूर्वीं अंगिरा-मुनीनें आपल्या आश्रमांत स्थित होऊन उत्तम तप आचरिलें आणि तो महर्षि आपल्या आश्रमांतच स्थित असतांना अग्नीहूनहि अधिक तेजस्वी होऊन सूर्याप्रमाणें जगाला प्रकाशित करूं लागला. तपश्चर्या करणारा अग्निहि त्याच्या तेजानें संतप्त झाला. तो तेजस्वी अग्नि अतिशय म्लान झाला. त्याला कांहींच कळेनासें झालें. तेव्हां त्यानें आपल्या मनांत असा विचार केला—"ब्रह्मदेवानें या लोकांसाठीं दुसरा अग्नि उत्पन्न केला असावा. त्यामुळेंच मला हा ताप होत आहे. तप करणाऱ्या माझें अग्नित्व नष्ट झालें आहे. तें आतां मला कसें बरें प्राप्त होईल! पूर्वींप्रमाणेंच मी अग्नि कसा होऊं शकेन? असा विचार करून तो त्या दुसऱ्या अग्नीचा विचार करूं लागला. तेव्हां त्यानें अग्नीप्रमाणें लोकांना ताप देत असलेल्या त्या महामुनीला पाहिलें व तो भयभीत होऊन हळुहळू त्याच्या समीप गेला."

तेव्हां अंगिरा त्यास म्हणाला—हे अग्ने, तूं पुनरपि लोकांची वृद्धि करणारा अग्नि सत्वर हो. कारण त्रिभुवनांतील चराचर भूतांमध्यें आणि उत्तम, मध्यम व अधम लोकांमध्यें तूं संचार करितोस, अशी तुझी प्रसिद्धि आहे. ब्रह्मदेवानें तिमिराचा नाश करणाऱ्या तुला प्रथम उत्पन्न केलें आहे. यास्तव हे तमोनुदा, तूं सत्वर स्वस्थानास प्राप्त हो.

त्यावर अग्नि म्हणाला—हे मुने, तूं हुताशन झाल्यामुळें या लोकांतील माझी कीर्ति नष्ट झाली आहे. यापुढें लोक तुलाच अग्नि म्हणून ओळखतील. यास्तव मी आतां आपलें अग्नित्व सोडून देतों. म्हणजे मी आपला सूक्ष्मसंज्ञक

हिरण्यगर्भ भाव सोडून कारणरूपानें अवस्थित होतों आणि तूं दिक्, देश, काल इत्यादिकांचा प्रथम उत्पन्न झालेला कर्ता सूत्रसंज्ञक हिरण्यगर्भ हो. हे प्रजापतिपुत्रा, मी दुसरा ' क ' या नांवाचा विराडात्मा होईन.

हें ऐकून अंगिरामुनि पुनः म्हणाला—हे प्रभो, तूंच तिमिराचा नाश करणारा अग्नि हो व प्रजांच्या स्वर्गप्राप्तीला हितावह होणारे हविर्वहनरूप पुण्य कर आणि हे अग्निदेवा, तूं मला आपला बृहस्पतिसंज्ञक प्रथम पुत्र कर.

मार्कंडेय—हे कुंतीपुत्रा, अंगिराचें हें वचन ऐकून अग्नीनें तें मान्य केलें व स्वतः कारणभावास प्राप्त होऊन त्यानें अंगिराला आपला पुत्र केलें व त्याचा ' बृहस्पति '-नांवाचा पुत्रहि तो स्वतःच झाला. तो अंगिरापुत्र बृहस्पति वह्नीचा प्रथमज पुत्र आहे, असें जाणून देव त्याच्यापाशीं आले. त्या बृहस्पतीला कारण ब्रह्माचें ज्ञान असल्यामुळेंच कारणत्व प्राप्त झालें. तें जाणूनच देव त्याच्यापाशीं आले व त्याची परीक्षा पहाण्यासाठीं कारणब्रह्माविषयीं त्याला प्रश्न करूं लागले.

देवांनीं प्रश्न केले असतां बृहस्पतीनें त्यांना कारणब्रह्माचें ज्ञान करून दिलें व देवांनींहि त्याचें ग्रहण केलें. तेव्हां त्याचा पिता अंगिरा त्यास म्हणाला—"हा तुमचा गुरु आहे." तेव्हां देवांनींहि मोठ्या संतोषानें त्याचें गुरुत्वानें ग्रहण केलें.

तेव्हां बृहस्पति म्हणाला—कर्मविधिवाक्यामध्यें अनेक कर्मांच्या योगानें प्रसिद्ध झालेले व पृथक् पृथक् फल देणारे अग्नि मी तुम्हांला सांगेन. ३. १२. २१७.

---

## अध्याय २१८ वा.

[ १ अंगिरापासून बृहस्पत्यादि अपत्यांची उत्पत्ति.]

(१) वैशंपायन—राजा जनमेजया, इतर कालाभिमानिनी देवताहि अंगिरासंज्ञक सूत्रात्म्यापासून उत्पन्न झाल्या, हें सांगण्यासाठीं मार्कंडेय म्हणाला—"युधिष्ठिरा, कारण ब्रह्मापासून सूत्रात्मा व त्याच्यापासून सूत्रात्म्याच्या

१ ईश, सूत्र व विराट् यांच्या उपासनांनीं सिद्ध झालेले उपासक क्रमानें हिरण्यगर्भ, प्रजापति व बृहस्पति होतात. त्यांतील बृहस्पतीच्या ऐश्वर्याहून प्रजापतीचें ऐश्वर्य शतपट अधिक व प्रजापतीच्या ऐश्वर्याहून हिरण्यगर्भाचें ऐश्वर्य शतपट अधिक असतें. असें तैत्तिरीय व बृहदारण्यक या उपनिषदांत सांगितलें आहे. तै. भा. अ. २. ८. पृ. १३९. बृ. अ. ४. ३. ३३. पृ. २१७.

उपासनेनेंच सिद्ध झालेला अंगिरा झाला. हा कार्य ब्रह्मापासून तृतीय पुरुष होय. त्याची पत्नी 'सुभा'-नामक कालाभिमानिनी देवता होती. संवत्सरादि किंवा अहो-रात्रादिरूपानें ती फारच शोभत असल्यामुळें तिला 'सुभा' किंवा 'शुभा' असें म्हणतात.

आतां तिच्या ठिकाणीं झालेल्या प्रजेचें मी वर्णन करितों, तें ऐक. तिला बृहत्कीर्ति, बृहज्जोति, बृहद्ब्रह्मा, बृहन्मना, बृहन्मंत्र, बृहद्भास व बृहस्पति असे सात पुत्र झाले. तिच्या सर्व प्रजेमध्यें रूपानें अप्रतिम असलेली जी देवी भानुमती ती अंगिराची पहिली कन्या होय. तीच सूर्ययुक्त दिवसाची अभिमानिनी देवता आहे. जिच्या ठिकाणीं सर्व भूतांची सर्वदा आसक्ति असते ती 'रागा' ही तिची दुसरी कन्या होय. ती रात्रीची अभिमानिनी देवता असल्यामुळें व रात्र हा श्रमहारक सुषुप्तिकाल असल्यामुळें तिच्या ठिकाणीं सर्व भूतांची स्वभावतःच प्रीति असते. किंवा ती संध्यारागानें युक्त असल्यामुळें तिला 'रागा' असें नांव प्राप्त झालें आहे.

रुद्रानें ललाटप्रदेशीं धारण केल्यामुळें जिला रुद्राची जणुंकाय कन्याच म्हणतात व जी अति सूक्ष्म असल्यामुळें प्राण्यांना केव्हां दिसते व केव्हां दिसतहि नाहीं, अशी चतुर्दशीयुक्त अमावास्या हीच सिनीवाली असून ती अंगिराची तिसरी कन्या आहे. पूर्ण चंद्रानें युक्त असलेली शुद्ध पौर्णमासी हीच अंगिराची चवथी कन्या असून तिच्या कांतीनें लोक रात्रींहि पाहूं शकतात. प्रतिपदेनें युक्त असलेली जी पौर्णमासी तिला 'राका' असें नांव असून ती अंगिराची पांचवी कन्या 'हविष्मती' या नांवानें प्रसिद्ध आहे.त्या हविष्मतीमध्यें हवींच्या योगानें इंद्रादि देव पूजिले जातात. अंगिरामुनीची सहावी कन्या व्रतार्ह असून तिला 'महिष्मती' असें म्हणतात.

चतुर्दशीनें युक्त असलेल्या पौर्णमासीला 'अनुमती' असें नांव आहे. तीच ही पुण्य महिष्मती होय. हे युधिष्ठिरा, दीप्तिमान् सोमयागादिकांमध्यें विहित असलेली जी अंगिराकन्या—महामती ती त्याची सातवी कन्या होय. कारण अमावास्येला दीक्षा घेणारा प्रत्यहीं वाढणारा चंद्र अग्रभागीं दिसतो आणि पौर्णिमेस दीक्षा घेणाराला तो उत्तरोत्तर क्षीण झालेला दिसतो. म्हणून, उत्तरोत्तर वृद्धि पावणाऱ्या व प्रकाशानें युक्त असलेल्या दिवसांमध्यें विहित असलेल्या तिला 'महामती' असें म्हणतात. ज्या पूज्य कन्येला पाहून लोक

विस्मित होतात, त्या अंगिरामुनीच्या कन्येला 'कुहू' असें म्हणतात. ती एकाच कलेनें युक्त असल्यामुळें तिचें 'अनंशा' असेंहि दुसरें नांव आहे. ३. १२. २१८.

---

## अध्याय २१९ वा.

[ १ बृहस्पति-अग्नीचें सहा पुत्र व एक कन्या यांचें वर्णन. ]

( १ ) मार्कंडेय—राजा युधिष्ठिरा, बृहस्पतीची 'तारा' या नांवाची जी यशस्विनी भार्या होती, तिचें चंद्रानें आक्रमण केलें व तिला त्यापासून 'शंयु'-प्रभृति सहा अग्नि हे पुत्र व 'स्वाहा'-नांवाची एक कन्या झाली. प्रधानाहुतींमध्यें व दर्शपूर्णमासांमध्यें ज्या अग्नीचा पहिला हवि विहित आहे, तो 'शंयु'-नांवाचा महाव्रत अग्नि हा बृहस्पतीचा ज्येष्ठ पुत्र होय.

चातुर्मास्य यागामध्यें वैश्वदेव, वरुणप्रघास, शाकमेध व शुनासीरीय या नांवाच्या चार पर्वांमध्यें जो एकच अग्नि प्रतीत होतो व अश्वमेधामध्यें ज्याच्या दृष्टीसमीप प्रथम पशु होतो, तो अनेकाकार दीप्तज्वालांनीं युक्त असलेला एकच अग्नि वीर्यवान् शंयु होय. त्या शंयूची अप्रतिम रूपवती धर्मकन्या 'सत्यासत्या' ही भार्या होय. तिच्या ठिकाणीं त्याला 'अग्नि' हा दीप्त पुत्र व तीन सुव्रत कन्या झाल्या.

दर्शादिकांमध्यें प्रथम आज्य भागाची देवता असलेला हा अग्नि 'भरद्वाज' या नांवानें प्रसिद्ध झाला. सर्व पौर्णमासांमध्यें स्रुवेनें घेतलेलें हविरूप आज्य ज्याला अर्पण केलें जातें, तो 'भरत'-नामक अग्नि हा शंयूचा दुसरा पुत्र होय. त्याला तीन कन्या असून त्यांचें पोषण हा भरतच करितो. या भरताला 'भरत' या नांवाचाच पुत्र व 'भरती' या नांवाची एक कन्या, अशीं दोन अपत्यें झालीं.

पोषण करणाऱ्या त्या भरतप्रजापतीचा 'पावक' हा पुत्र असून तो महाफल देणारा असल्यामुळें ज्या आग्रायणादि कर्मांमध्यें प्रथम अग्नि नाहीं, त्यांतहि हा

---

१ गेल्या अध्यायांत यज्ञांगभूत काल सांगितला. आतां ऋषि यज्ञांगभूतदेवता सांगण्यासाठीं विराडुपासनेच्या फलावस्थेंत स्थित असलेल्या बृहस्पतीची विभूतिरूप संतति सांगण्यास आरंभ करितो.

पूजिला जातो. त्यामुळें या पावकाग्नीला 'महान्' असेंहि म्हणतात. भरद्वाज हा शंयूचा कनिष्ठ पुत्र आहे, हें मीं सांगितलेंच आहे, त्याची 'वीरा' या नांवाची पत्नी असून तिनें 'वीर'-संज्ञक अग्नीला जन्म दिला.

याज्ञिक ब्राह्मण सोमाबरोबर आज्यानें त्याचीहि उपांशु पूजा करावी असें सांगतात. दर्श-पूर्णमासांमध्यें अग्निषोमांना उद्देशून उपांशु याग विहित आहे. त्यांतील अग्नि हा भरद्वाजपुत्र वीरच होय. तो सोमासह हवीला पात्र होतो. यालाच रथप्रभु, रथाध्वान आणि कुंभरेता असेंहि म्हणतात.

त्या वीराला शरयूच्या ठिकाणीं 'सिद्धि' या नांवाचा पुत्र झाला. त्यानें आपल्या दीप्तींनीं सूर्याला दीपवून सोडलें. अग्निदैवत्य यागाचा मान करणारा हा अग्नि 'अग्निमग्न आवह' या मंत्रांत अग्नियुक्त संबोधनानें संबोधिला जातो. जो आपलें यश, वर्चस् व श्री यांपासून केव्हांहि च्युत होत नाहीं तो 'निश्चवन'-नामक अग्नि बृहस्पतीचा दुसरा पुत्र होय. तो केवल पृथ्वीची स्तुति करितो, त्यामुळें हा वागभिमानी देवतारूप आहे.

निश्चवनाचा पुत्र 'सत्य.' तो पापरहित व सर्व दोषांपासून मुक्त झालेला, त्यामुळेंच विशुद्ध, आपल्या ज्वालांनीं प्रदीप्त होणारा व शब्दाचा अर्थाशीं संबंध जोडणारा आहे. तो आक्रोश करणाऱ्या भूतांच्या शोकाचा परिहार करितो. म्हणून त्याला 'निष्कृति' असेंहि म्हणतात. तो गृह, आराम, इत्यादि स्थानीं शोभा उत्पन्न करितो. ज्याच्या योगानें लोक दुःखपीडित होऊन अतिशय आर्त होतात, तो प्राण्यांना पीडा देणारा, 'स्वन'-नांवाचा अग्नि बृहस्पतीच्या 'सत्य'-नामक पुत्राचा पुत्र होय.

याप्रमाणें बृहस्पतीच्या दोन पुत्रांचें कर्मेंद्रियव्यापित्व हें कार्य सांगितलें. आतां त्याच्याच तिसऱ्या पुत्राचें कार्यादि ऐक. जो सर्व जगाच्या बुद्धीचें आक्रमण करून रहातो, त्या बृहस्पतीच्या तिसऱ्या पुत्राला अध्यात्मवेत्ते 'विश्वजित्'-नामक अग्नि म्हणतात. ज्याला 'अंतराग्नि' असें म्हटलें आहे व जो प्राण्यांनीं भक्षण केलेल्या अन्नादिकांचा परिपाक करितो, तो 'विश्वभुक्' या नांवानें सर्व लोकांमध्यें प्रसिद्ध असलेला बृहस्पतीचा चवथा पुत्र ब्रह्मचारी, नियतचित्त व सतत विपुल व्रतें आचरणारा असून ब्राह्मण या अग्नीची पाकयज्ञामध्यें पूजा करितात. पवित्र 'गोमती'-नदी याची प्रिय भार्या झाली. धर्माचरण करणारे याज्ञिक याच अग्नीमध्यें सर्व स्मार्त कर्में करितात.

जो परम दारुण 'वडवाग्नि' सर्वदा जलप्राशन करीत रहातो तो बृहस्पतीचा पांचवा पुत्र होय. तोच या शरीरांतील ऊर्ध्वगति उदानाग्नि आहे. त्याला ऊर्ध्वभाक् व 'कवि–ब्राह्मण' असेंहि म्हणतात. हा अग्नि प्राणवायूची अभिमानी देवता आहे.

स्त्रीसंबद्ध कर्मांमध्यें ज्याला उद्देशून सतत उत्तरदिशेमध्यें हवि अर्पण केला जातो व त्यामुळेंच आज्यादिकांनीं केलेला होम यथाविधि पूर्ण होतो. तो स्विष्टकृत् अग्नि हा बृहस्पतीचा सहावा पुत्र आहे. सर्व भूतें शांत झालीं असतां बृहस्पति अग्नि क्रोधरूपी होतो. क्रुद्ध झालेल्या याच्यापासून जें 'स्वेद'-नामक तेज उत्पन्न झालें, त्यालाच तो आपली कन्या मानूं लागला. 'स्वाहा' या नांवाची ती क्रूर व दारुण कन्या सर्व भूतांमध्यें रहाते. बृहस्पतीची ही पूर्वोक्त सातवी कन्या होय.

ती स्वतः त्रिगुणात्मक असल्यामुळें तिला तशीच संतति झाली. रजोगुण-प्रधान स्वाहेपासून एक पुत्र झाला. त्याच्यासारखा रूपवान् पुरुष या त्रिभुवनांत कोणी नाहीं. असा तो अनुपम असल्यामुळें देवांनीं त्या अग्नीचें 'काम' हें नांव ठेविलें. तामसी स्वाहेपासून तिला दुसरा पुत्र झाला. 'मी सर्वांना जिंकीनच' असा ज्याचा निश्चय होता, त्याला 'क्रोध' असें म्हणतात. हातांत धनुष्य व कंठांत पुष्पमाला धारण करून तो रथस्थ क्रोध समरामध्यें शत्रूंचा नाशच करितो. त्यामुळें तो अग्नि 'अमोघ' या नांवानें प्रसिद्ध आहे.

सात्त्विक स्वाहेला 'उक्थ' या नांवाचा तिसरा पुत्र झाला. तो मोक्षपदाला पोंचवितो. म्हणून त्याला उक्थ असें म्हणतात. कर्मफल तीन प्रकारें उत्पन्न होतें, म्हणून तें उक्थ होय. शरीरापासून कर्म उद्भवतें म्हणून 'शरीर' हें एक उक्थ. शरीराला वर उठविणारा प्राण हें दुसरें उक्थ व प्राणाला उत्थापित करीत असल्यामुळें परमात्माहि उक्थच होय. हा जन्य अग्नि तीन्ही उक्थांकडून स्तुति केला गेल्यामुळें तद्रूपानेंच स्थित आहे. त्यानें तुर्य ब्रह्माच्या कलारूप असलेल्या परासंज्ञक वाणीला उत्पन्न केलें. तो प्राचीन अग्न्युपासकांना विश्रांति देतो, म्हणून वेदाचार्य त्याला मोक्षहेतु समाश्वास असें म्हणतात. ३. १२. २१९.

---

## अध्याय २२० वा.

[ १ तप व तपाची संतति यांचें वर्णन. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, या पूर्वोक्त उक्थानें पुत्रासाठीं अनेक वर्षें तीव्र तप आचरिलें. 'मला ब्रह्मदेवासारखा यशस्वी व धर्मनिष्ठ पुत्र व्हावा' अशी त्याची इच्छा होती. ज्याला काश्यप असें दुसरें नांव आहे, तो उक्थ, वासिष्ठ, प्राणपुत्र प्राण, अग्नि, आणि आंगिरस च्यवन या पांचजणांनीं ' भूरन्न-मग्नये पृथिव्यै स्वाहा' इत्यादि महा व्याहृतींनीं भूः, भुवः, स्वः, महस्, अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, पृथ्वी, अंतरिक्ष, द्यु व दिक् इत्यादिकांनीं उपलक्षित होणाऱ्या सर्वात्मकरूपानें त्या पुत्राचें ध्यान केलें. तेव्हां तो प्रदीपाप्रमाणें पुत्ररूपानें आविर्भूत झाला. त्यामुळें तो ज्वालायुक्त अग्नीप्रमाणेंच शोभत होता.

त्याचे पांच वर्ण असून तो जगत्सृष्टिकर्ता होता. प्रदीप्त अग्नि हेंच त्याचें शिर असून त्याचे दोन्ही बाहु व त्वचा सूर्यासारखी, नेत्र सुवर्णासारखे व जंघा कृष्णवर्ण होत्या. तो उत्पन्न झालेला पुत्र अशा पांच वर्णांनीं युक्त असून त्या पांच अग्नींनीं तपानें उत्पन्न केलेल्या त्याचें नांव 'तप' असेंच ठेविलें. पांच वंश उत्पन्न करणाऱ्या त्या देवाला पांचजन्य असेंहि म्हणत. त्या महातपस्वी पांच-जन्यानें दहा सहस्र वर्षें तप केलें. नंतर प्रजा उत्पन्न करणाऱ्या त्यानें पितरांच्या घोर दक्षिणाग्नीला जन्म दिला. त्यानें आपल्या मस्तकापासून 'बृहत्' व मुखा-पासून ' रथंतर ' या दोन अहोरात्र देवतांना उत्पन्न केलें. ते त्याचे दोन्ही पुत्र मोठ्या वेगानें प्राण्यांच्या आयुष्यादिकांचें हरण करणारे होते. नाभीपासून अहंकाराभिमानी रुद्र, बलापासून इंद्र व प्राणापासून वायुसंज्ञक अग्नि, यांना उत्पन्न केलें. त्यानें आपल्या बाहूपासून प्राकृत व भाषिक असे दोन अनुदात्त स्वर, अर्थात् त्या स्वरांनीं युक्त असलेले सर्व वेद, मनासह सर्व देवता व पांच भूतें यांस उत्पन्न करून नंतर पितरांच्या पांच पुत्रांना उत्पन्न केलें.

वासिष्ठाचा पुत्र प्रणिधि, काश्यपाचा महत्तर, अंगिरस च्यवनाचा भानु, त्रिसुवर्चाचा सौभर आणि प्राणाचा अनुदात्त. याप्रमाणें आपल्या पांच पितरांचे पांच पुत्र उत्पन्न केले. या सर्वांची मिळून पंचवीस संख्या भरते. त्यानंतर त्यानें देवांच्या यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या पंधरा असुरांना उत्पन्न केलें.

सुभीम, अतिभीम, भीम, भीमबल आणि अबल हे त्यांतील पांच मुख्य असुर असून सुमित्र, मित्रवान्, मित्रज्ञ, मित्रवर्धन व मित्रधर्मा, हे पांच

त्याचप्रमाणें सुरप्रवीर, वीर, सुरेश, सुवर्चस व सुरहंता असे एकंदर पंधरा असुर निर्माण केले. त्यांतील पांच पांच असुर आपले पृथक् पृथक् तीन संघ करून या लोकीं रहातात. स्वर्गांतून यज्ञ करणाऱ्या यजमानाचें इष्ट हरण करितात व देवांच्या महत् हवींचा नाश करितात. ते अग्नीच्या स्पर्धेनेंच यज्ञ-कर्त्यांचें इष्ट व देवांचे हवि यांचें हरण व नाश करितात.

पण हें पाहून कुशल याज्ञिक असुरांचा भाग वेदीच्या बाहेर देऊं लागले. त्यामुळें जेथें अग्नि असतो, त्या अंतर्वेदींत ते येईनासे झाले. अग्निचयन सुरू झालें असतां ते यजमानानें अग्नीमध्यें अर्पण केलेलें आज्य खालीं पडूं न देतां तें वरच्यावर हरण करीत असतात. पण ऋत्विजांनीं रक्षोघ्न मंत्रांनीं त्यांचें प्रशमन केलें, म्हणजे ते असुर यज्ञिय हुतद्रव्य हरण करीत नाहींत.

तपाचाच पुत्र बृहदुक्थ भूमीचा आश्रय करून राहिला आहे. सज्जन लोक अग्निहोत्राचें हवन करीत असतांना पृथ्वीमध्यें त्यांना उद्देशून याग करितात. रथंतराग्नि हाहि तपाचाच पुत्र आहे, हें वर सांगितलेंच आहे. अध्वर्यु त्या मित्रविंदास उद्देशून होमद्रव्यें अर्पण करितात. याप्रमाणें तो उक्थपुत्र तप असे वीर्यवान् पुत्र उत्पन्न करून मोठ्या आनंदानें राहूं लागला. ३. १२. २२०.

---

## अध्याय २२१ वा.

[ १ शंयूचा पौत्र भरत व इतर अग्नि यांची स्तुति. २ तपाचे पुत्र मनु व भानु यांची संतति. ३ अग्निहोत्रांतील दोषांच्या निवृत्तीचे उपाय. ]

( १ ) **मार्कंडेय**—राजा, शंयूचा पुत्र जो ऊर्ज त्याला अनेक नियमांनीं 'भरत-' नामक अग्नि हा पुत्र झाला. त्याला 'पुष्टिमति' असेंहि म्हणतात. तो संतुष्ट झाला असतां प्राण्यांना पुष्टि देतो. हा सर्व प्रजेचें भरण करितो म्हणून त्याला भरत म्हणतात. तपाचा तृतीय पुत्र जो 'शिव'-नामक अग्नि तो चिच्छक्तीच्या निर्विकल्प समाधिरूप पूजेमध्यें तत्पर असतो. तो सर्व दुःखार्त जीवांचें कल्याण करितो. म्हणून त्याला 'शिव' असें म्हणतात.

( २ ) तपाला चाळीस पुत्र झाले, असें पूर्वाध्यायांत सांगितलें. त्यालाच पुरंदरादि आणखी पांच पुत्र होते. त्यांचा वृत्तांत मी तुला सांगतों—'तप' या अग्नीचें ऐश्वर्य तपामुळें अतिशय वाढलें आहे, असें पाहून त्याचें ऐश्वर्य प्राप्त करून घेण्यासाठीं त्याला 'पुरंदर' या नांवाचा पुत्र झाला. 'ऊष्मा'

हाहि तपाचाच पुत्र होय. तो सर्व भूतांतील ऊष्म्याच्या योगानें सर्वांच्या प्रतीतीला येतो.

'मनु'-नामक अग्नि तपाचाच पुत्र असून त्यानें प्रजापत्य कर्म केलें. वेदपारग ब्राह्मण 'शंभु-'संज्ञक अग्निहि तपाचाच पुत्र आहे, असें म्हणतात. महाप्रभेनें युक्त असलेल्या 'आवसथ्य-'संज्ञक दीप्त अग्नीलाहि द्विज तपाचाच पुत्र समजतात. याप्रमाणें तपानें पांच यज्ञसुत उत्पन्न केले. कारण त्यांच्यापासूनच यज्ञ प्रवृत्त होतो. त्या सर्वांची अंगकांति सुवर्णासारखी असून त्यांना यज्ञामध्यें सोमाचा भाग मिळतो व तेच देवांना हवि पोंचवितात. अस्तसमयीं शांत झालेला सूर्य अग्नि होतो व तो घोर असुर आणि भिन्न भिन्न जातीचे मर्त्य यांस जिंकतो.

हा सूर्यहि तपाचाच पुत्र होय. तपाच्या मनु व भानु या दोन पुत्रांना अंगिरानें उत्पन्न केलें. वेदपारग ब्राह्मण त्या भानूलाच बृहद्भानु असें म्हणतात. हे जरी तपाचे पुत्र असले तरी त्यांचें मूल कारण अंगिराच आहे, हें सांगण्या-साठीं मीं त्यांना अंगिरापुत्र म्हटलें आहे. राजा, याप्रमाणें मीं तुला तपाचे 'बृहत्'-नामक पुत्रापासून 'भानू'-पर्यंत सर्व पुत्र सांगितले. आतां त्यांच्या पौत्रांचीं नांवें सांगतों, तीं ऐक.

भानूला सुप्रजा आणि सूर्यकन्या बृहद्भासा अशा दोन भार्या होत्या. त्यांतील सुप्रजेला बलद, मन्युवान् व विष्णु असे तीन पुत्र झाले. जो दुर्बल प्राण्यांना बल देतो, तोच बलद अग्नि भानूचा ज्येष्ठ पुत्र होय. जो अति शांत स्वभावाच्या प्राण्यांमध्येंहि दारुण क्रोधरूपानें उद्भवतो, तो 'मन्युमान्' या नांवाचा भानूचा दुसरा पुत्र होय. दर्श व पौर्णमास या दोन्ही यागांमध्यें ज्याला उद्देशून हवि अर्पिला जातो, तो विष्णु या नांवाचा भानूचा तिसरा पुत्र होय.

भानूच्या 'बृहद्भासा'-नामक भार्येलाहि तीन पुत्र झाले. आग्रयणामध्यें इंद्रासह ज्याला उद्देशून हवि विहित आहे, तो आग्रयण अग्नि भानूचा चवथा पुत्र होय. जो चातुर्मास्य इष्टीमध्यें नित्य हवीचें उत्पत्तिस्थान असून वैश्वदेव पर्वामध्यें 'विश्वदेव'-संज्ञक मुख्य अग्नि मानलेला आहे, तोच भानूपासून झालेला बृहद्भासेचा दुसरा पुत्र होय. तो चार पुत्रांनीं युक्त व गृहरहित आहे. 'स्तुभ' हा बृहद्भासेचा तिसरा पुत्र आहे.

मनूच्या ‘ विशा-’नामक भार्येला एकंदर आठ अपत्यें झालीं. एक कन्या, अग्नि व सोम या देवता आणि पांच अग्नि. चातुर्मास्यामध्यें पर्जन्यासह जो श्रीमान् अग्नि श्रेष्ठ हवीनें पूजिला जातो, तो वैश्वानर होय. जो समर्थ अग्नि सर्व लोकांच्या अन्नाचें पचन करितो, तो ‘ विश्वपति ’-अग्नि मनूचा दुसरा पुत्र होय. अग्नीमध्यें होमिलेलें आज्य ज्याच्यायोगानें शुभ फलदायक होतें, तो ‘ स्विष्टकृत्-’नामक श्रेष्ठ अग्नि हा मनूचाच तिसरा पुत्र आहे.

हिरण्यकशिपूची ‘ रोहिणी ’-नांवाची जी कन्या ती कर्मसंज्ञक अग्नीची भार्या होऊन अतिशय शोभूं लागली. हा कर्मसंज्ञक अग्नि सुप्रसिद्ध प्रजापतीच होय. सन्निहित, अकल्मष, कपिल व अग्रणी हे मनूचेच चार पुत्र होत. जो प्राण्यांचा आश्रय करून सर्वांच्या देहांना प्रवृत्त करितो व शब्द आणि रूप यांचें ज्ञान करून देतो, तोच सन्निहिताग्नि होय. जो अग्नि देवयान व पितृयाण या दोन मार्गांचें धारण करितो, सर्व पातकांची निवृत्ति करितो आणि क्रोधाचा आश्रय करून रहातो, तोच ‘ अकल्मष ’-अग्नि होय. यति ज्याला परमर्षि कपिल म्हणतात, तो सांख्ययोगप्रवर्तक कपिल अग्नि हा मनूचा सातवा पुत्र होय.

द्विज प्रत्यहीं वैश्वदेवाच्या शेवटीं मनुष्य यज्ञासाठीं ज्याला ‘ अग्र ’-संज्ञक आहुति अर्पण करितात, त्या विविध कर्मांमध्यें अनुवृत्त होणाऱ्या अग्नीला ‘ अग्रणी ’ असें नांव आहे. दूषित झालेल्या अग्निहोत्राच्या प्रायश्चित्तासाठीं मनूनें आणखी आठ अग्नि उत्पन्न केले. ते अतिशय उग्र व भूलोकीं प्रसिद्ध आहेत.

( ३ ) अग्नींनीं वायूच्या योगानें परस्परांस स्पर्श केल्यास ‘ शुचि ’-नामक अग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाशानें इष्टि करावी. दक्षिणाग्नीचा गार्हपत्य व आहवनीय या दोन अग्नींशीं संसर्ग झाल्यास ‘ वीति ’-नामक अग्नीला उद्देशून अष्टाकपाल इष्टि करावी. अग्नि स्व-स्वस्थानीं असतांना त्यांना दावाग्नीचा संसर्ग झाल्यास ‘ शुचि ’-अग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाश इष्टि करावी.

अग्निहोत्रांतील अग्नीला रजस्वला स्त्रीचा स्पर्श झाल्यास ‘ वसुमान् ’-नामक अग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाशानें इष्टि करावी. पशु किंवा मनुष्य मृत झाल्याची वार्ता कानीं आल्यास अग्निहोत्र्यानें ‘ सुरभिमान् ’-अग्नीला उद्देशून

आठ कपालांवर संस्कृत केलेल्या पुरोडाशानें इष्टि करावी. जो ब्राह्मण रोगादि कारणांनीं आर्त झाल्यामुळें तीन रात्रीं अग्निहोत्र होम करण्यास समर्थ झाला नसेल त्यानें उत्तराग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाशानें इष्टि करावी. ज्याचे दर्श व पौर्णमास याग मध्येंच विच्छिन्न झाले असतील, त्यानें पथिकृत अग्नीला उद्देशून पूर्वोक्त इष्टि करावी. अग्निहोत्रांतील अग्नीला सूतिकाग्नीचा स्पर्श झाल्यास 'अग्निमान्'-अग्नीला उद्देशून पूर्वोक्त इष्टि करावी. ३. १२. २२१.

---

## अध्याय २२२ वा.

[ १ अद्भुत-अग्नीचा वंशवृत्तान्त. ]

( १ ) मार्कंडेय—राजा, तूं पूर्वी 'अग्नीनें जलांत प्रवेश कसा केला?' असा प्रश्न केला होतास. तोच वृत्तान्त तुला सांगतों ऐक. जलामध्यें असलेल्या प्रसिद्ध 'सह'-नामक अग्नीची 'मुदिता' या नांवाची अतिप्रिय भार्या होती. तो 'सह'-संज्ञक अग्नीच भूलोक व भुवर्लोक यांचा स्वामी होता. म्ह० ज्या लोकीं गेलें असतां पुनः परत यावें लागत नाहीं, त्या ब्रह्मलोकाच्या अलीकडील सर्व लोकांचा तो स्वामी होता. त्यानें परम 'अद्भुत' या नांवाच्या अग्नीला उत्पन्न केलें. तो परमाद्भुत अग्नि सव प्राण्यांचा अधिपति असून त्यांच्या ठिकाणीं आत्मरूपानें वास्तव्य करितो व जगाचें पोषण करितो, अशी उपदेशपरंपरनें युक्त असलेल्या द्विजांमध्यें त्याची प्रसिद्धि आहे. तो केवल जरायुजादिकांचाच आत्मा नाहीं. तर तो आकाशादि सर्व महाभूतांचा स्रष्टा असल्यामुळें त्यांचाहि स्वामी आहे. तो षड्गुणैश्वर्यसंपन्न महातेजस्वी पावक सतत सर्वत्र संचार करीत असतो. तोच अग्नि यज्ञांतील त्रेताग्नि व देहांतील जाठराग्नि होऊन यज्ञ व जठर या दोन स्थानीं राहतो आणि पिंडस्थ व ब्रह्माण्डस्थ देवांना अन्न व हवि यांच्यायोगानें तृप्त करितो. त्याचें नांव गृहपति असें असून तोच यज्ञामध्यें नित्य पूजिला जातो. लोकांनीं अग्नीमध्यें होमिलेलें हविर्द्रव्य देवतांना पोंचवितो. आपसंज्ञक सहाचा हा महाभाग पुत्र शरीरांतील बुद्धीचा व त्रैलोक्याचा संहार करणारा आहे. त्याला 'महाद्भुत' अशी संज्ञा आहे. या महाद्भुत अग्नीचा पिता जो सह, त्याला भूपति व भूवर्लोकाचा पोषक असें म्हणतात.

आतां या 'सह'-संज्ञक अग्नीचें जलांत प्रवेश करण्याचें कारण काय तेंच सांगतों, ऐक. 'सहा-'च्या अद्भुत पुत्राला 'भरत-'संज्ञक अग्नि हा पुत्र

झाला. तो मृत प्राण्यांना दग्ध करितो. अग्निष्टोमांतील महाक्रतूचा साधनभूत जो 'नियत-'संज्ञक अग्नि तो भरताचा पुत्र होय. भोगार्थी देव व इंद्रियें पहिल्या 'सह'-संज्ञक अग्नीचा नेहमीं शोध करीत असतात. तो 'सह'-संज्ञक अग्नि नियताग्नि आपल्याकडे येत आहे असें पाहून भीतीनें समुद्रांत शिरला. पण देव सर्व दिशांमध्यें आपला शोध करीत तेथेंहि आले आहेत, असें पाहून तो अथर्वांगिरसास म्हणाला—"हे वीरा, मी अतिशय दुर्बल झालों आहें. यास्तव तूं देवांचें हव्य त्यांना पोंचीव. तूं स्वतःच अग्नि हो. माझें एवढें हें प्रिय कर."

याप्रमाणें अथर्वांगिरसाला आज्ञा करून तो अग्नि तेथून अन्यत्र गेला. तेव्हां मत्स्यांनीं तो कोठें आहे हें देवांना सांगितलें. तत्काल तो क्रुद्ध होऊन त्यांस म्हणाला—'तुम्ही विविधाकारांनीं सर्व प्राण्यांचें भक्ष्य व्हाल.' मत्स्यांना असा शाप देऊन तो अग्नि अथर्वणाला पूर्वींप्रमाणेंच 'तूं अग्नि हो' असें म्हणाला.

तथापि त्या अथर्वानें देवांच्या सांगण्यावरून त्याची पुष्कळ प्रार्थना केली. पण त्यानें देवांचा हवि वहाण्याचें मान्य केलें नाहीं. उलट त्यानें आपलें तें आग्नेय शरीर टाकून पृथ्वींत प्रवेश केला व पृथ्वीला स्पर्श करून विविध धातु उत्पन्न केले. त्यानें आपल्या शरीरांतील पुवापासून तेजोमय गंधक, अस्थींपासून देवदारु व कफापासून स्फटिक उत्पन्न केला. त्याच्या पित्तापासून 'मारकत रत्न' म्ह० पाचु, यकृतापासून काष्ठ, पाषाण व लोखंड यांसह पोलाद, नखांपासून अभ्रक व शिरांच्या समूहापासून पोवळीं उत्पन्न झालीं. हे राजा, त्याच्या शरीरापासून दुसरेहि सुवर्णादि विविध धातु उत्पन्न झाले.

याप्रमाणें आपलें शरीर टाकून तो परम तपामध्यें स्थित झाला. तेव्हां भृगु, अंगिरा, इत्यादि मुनींनीं आपल्या तपःसामर्थ्यानें त्याला समाधीपासून च्युत केलें. तेव्हां तपानें वृद्धि पावलेला तो तेजस्वी अग्नि अतिशय प्रज्वलित झाला. पण 'अंगिरा'-ऋषीला पाहून तो पुनः महार्णवांत शिरला. कारण त्याला हा एक अग्नि असतांना मला कोणी मानणार नाहीं, अशी भीति वाटली. त्यामुळें भृग्वादिकांच्या तपःसामर्थ्यानें तो जरी आपलें कार्य करण्यास पुनः प्रवृत्त झाला होता, तरी समुद्रांत शिरला.

त्याचा नाश झाला असतां सर्व जगत् भयभीत झालें व त्यानें अथर्वांगिरसाचाच आश्रय केला. देवादिकांनींहि त्याचेंच पूजन केलें. तेव्हां अंगिरामुनीनें

सर्व लोकांचा संहार होत आहे, असें पाहून समुद्राचें मंथन केलें व स्वतः अग्नीचें अवलोकन करून सर्व लोकांना उत्पन्न केलें. याप्रमाणें पूर्वी नष्ट झालेल्या अग्नीला पूज्य अथर्वांगिरसानें बोलावून आणिलें व तो देवांचें हव्य वाहूं लागला.

राजा, विविध देशामध्यें संचार करणाऱ्या त्यानें अग्नीपासून अंगिरा, त्याच्यापासून बृहस्पति, त्याच्यापासून शंयु इत्यादि क्रमानें वेदोक्त नानास्थानें उत्पन्न केलीं ( अध्यात्मपक्षीं समाधीपासून उत्थान पावलेला प्रत्यगात्मा अहंकाराला पुढें करून वृत्तिरूप नद्यांतून संचार करूं लागला असा याचा भावार्थ).

सिंधुनद, पंचनद, देविकानदी, सरस्वती, गंगा, शतकुंभा, शरयु, गंडसा, चर्मण्वती, मही, मेध्या, मेधातिथि, ताम्रावती, वेत्रवती, कौशिकी, तमसा, नर्मदा, गोदावरी, वेणोपवेणा, भीमा, वडवा, भारती, सुप्रयोगा, कावेरी, मुर्मुरा, तुंगवेणा, कृष्णवेणा, कपिला आणि शोण या नद्या पूर्वोक्त अग्निस्थानांच्या माता आहेत.

अद्भुताची जी प्रिया भार्या तिचाच 'विभूरसिः' हा पुत्र होय. ( 'विभूरसि प्रवाहणो वह्निरसि हव्यवाहनः' या अनुवाकामध्यें वर सांगितलेले व इतरहि अग्नि प्रदर्शित केले आहेत. त्या सर्वांमध्यें 'विभु' हा ज्येष्ठ अग्नि होय. ) जेवढे हे धिष्ण्य पावक आहेत, तेवढे सोमयाग आहेत व ही गोष्ट याज्ञिकांना ठाऊक आहे. अत्रीच्या वंशांत झालेली ब्रह्मदेवाची ही सर्व मानस प्रजा आहे. अत्रिपुत्रांस उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या त्या प्रजापतीनें अग्नीचें ध्यान केलें व त्यापासून अग्निच प्रजारूपानें प्रकट झाला.

इतर ऋषिहि याच न्यायानें प्रजापतीपासून उत्पन्न झाले. यास्तव अग्निच सर्व कर्मांची देवता असून सर्व ब्राह्मण ही अग्निसंतति आहे. त्या ' अत्रि '-संज्ञक ब्राह्मणाच्या शरीरापासून अग्नि बाहेर पडतात. राजा, याप्रमाणें मीं तुला महात्म्या अग्नींचें कथन केलें. तें उत्पन्न झालेले सर्व अग्नि अप्रमेय, तेजस्वी व तिमिराचा नाश करणारे आहेत. ' अद्भुत'-अग्नीचें माहात्म्य जसें वेदामध्यें वर्णिलेलें आहे, तसेंच या सर्व अग्नींचेंहि आहे, असें तूं जाण. या सर्वांमध्यें एकच अग्नि आहे. भगवान् अंगिरा, हा एकच पहिला अग्नि आहे. तो प्रजापतिपुत्र अंगिरा प्रजापतीच्या शरीरापासून प्रथम उत्पन्न झाला. एकच ज्योतिष्टोम उद्भिदादि ऋतुरूपानें जसा अनेकाकार होतो, त्याप्रमाणें अंगीरापासून विविध अग्नि उत्पन्न झाले.

युधिष्ठिरा, याप्रमाणें मीं तुला अग्नींचा फार मोठा वंश कथन केला. त्या मध्यें विविध मंत्रांनीं हवन केलें असतां तो तें प्राण्यांचें हव्य देवांना नेऊन पोंचवितो. ३. १२. २२२.

---

## अध्याय २२३ वा.

[ १ इंद्रानें केशि दैत्यापासून देवसेनेचें कलेलं संरक्षण. ]

( १ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, याप्रमाणें अग्नीचे विविध वंश मी तुला सांगितले. आतां क्रमप्राप्त कुमाराची उत्पत्ति व तो अग्नीचा पुत्र कसा झाला, हें तुला कथन करावयाचें आहे. पण त्यांतील प्रथम धीमान् कार्तिकेयाचें जन्मवृत्त सांगतों, तें ऐक. अग्नीला ब्रह्मर्षींच्या भार्यांच्या ठिकाणीं एक अभिनव पुत्र झाला. तो अतिशय ओजस्वी कुमार ब्राह्मणप्रिय व कीर्तिवर्धक निपजला.

राजा, पूर्वी देव व दानव परस्परांचा वध करीत असतां घोररूप दानव देवांचा सर्वथा पराभव करूं लागले. त्यामुळें देवसैन्याचा संहार होत असलेला पाहून इंद्र योग्य सेनापति मिळविण्याविषयीं चिंता करूं लागला.

दैत्यानें पराभूत केलेल्या देवसेनेचें स्वपराक्रमानें रक्षण करील असा महाबलाढ्य पुरुष मला प्राप्त व्हावा, असा विचार करीत तो पुरंदर मानसशैलावर गेला.

तेथें ‘ कोणी तरी पुरुष धांवून येवो व माझें संरक्षण करो. तो मला योग्य पति तरी देवो किंवा स्वतःच माझा पति होवो’ असा देवसेनाभिमानिनी देवतेचा आर्त व घोर स्वर त्याच्या कानीं पडला.

तो ऐकून इंद्रानें ‘ भिऊं नको, तुला आतां कोणापासूनहि भय नाहीं, असें म्हटलें. इतक्यांत पुढें उभा असलेला ‘ केशी ’ दैत्य त्याच्या दृष्टीं पडला. तो मस्तकावर किरीट व हातांत गदा धारण करणारा भीषण दैत्य गेरूनें माखलेल्या पर्वताप्रमाणें दिसत होता.

तेव्हां त्या कन्येला हातीं धरून वासव त्या दैत्याला म्हणाला—“अनार्यकर्म करणाऱ्या दैत्या, तूं या कन्येचें हरण करण्याची इच्छा कां करीत आहेस ? मी वज्र धारण करणारा इंद्र आहें, हें जाणून तूं तिला पीडा देऊं नको. या अनार्य कर्मापासून निवृत्त हो. ”

**केशी**—हे शक्रा, मीं हिचा अभिलाष केला आहे. यास्तव तूंच हिला सोडून दे. म्हणजे तूं आपल्या नगरीस जिवंत परत जाऊं शकशील.

कौंतेया, असें बोलून त्या केशी दैत्यानें इंद्राचा वध करण्यासाठीं आपली गदा त्याच्या अंगावर फेंकली. परंतु इंद्रानें आपल्या वज्रानें तिचा मध्येंच छेद केला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या दैत्यानें एक शैलशिखर उचलून, तें इंद्रावर फेंकलें. त पहातांच वासवानें वज्रप्रहारानें त्याचा भेद करून तें भूमीवर पाडलें. त्या पडणाऱ्या शैलशृंगानें केशीलाच ताडन केलें. तेव्हां तो अतिशय पीडित झालेला दैत्य त्या कन्येला सोडून पळून गेला.

याप्रमाणें तो असुर पळाला असतां इंद्रानें त्या कन्येला विचारिलें—" हे शुभानने, तूं कोण ? कोणाची आहेस ? व येथें काय करीत असल्येस ? " ३. १२. २२३.

---

## अध्याय २२४ वा.

[ १ देवसेनेचा वृत्तान्त. २ तिनें केलेली वरप्रार्थना. ३ ब्रह्मदेवाचा वर. ४ अग्नीनें केलेला ऋषिपत्नींचा अभिलाष. ]

( १ ) **कन्या**—हे पाकशासना, मी ' देवसेना ' या नांवानें प्रसिद्ध असलेली प्रजापतीची कन्या आहें. माझ्या ' दैत्यसेना- 'नामक भगिनीचें पूर्वी केशि-दैत्यानें हरण केलें. आम्ही दोघी भगिनी आपल्या सख्यांसह प्रजापतीच्या आज्ञेनें या मानस सरोवरावर विहारार्थ येत असतों. हा महासुर केशी नित्य आमचें हरण करण्याची इच्छा करीत असतो.

दैत्यसेना त्याची कामना करिते, परंतु मी मात्र त्याची इच्छा करीत नाहीं. त्या दानवानें तिचें हरण केल आणि हे भगवन्, तुझ्या पराक्रमानें मी आज मुक्त झालें. आतां हे देवेंद्रा, तूं योजिलेल्या दुर्जय पतीला वरण्याची मी इच्छा करीत आहें.

**इंद्र**—हे शुभे, तूं माझ्या मावशीची कन्या आहेस. कारण दक्षकन्या अदिति माझी माता आहे. तूं मला आत्मबल कथन करावेंस, अशी माझी इच्छा आहे.

**कन्या**—हे महाबाहो, मी अबला आहें; परंतु माझ्या पित्याच्या वरानें मला सुरासुरांना वंद्य असलेला बलवान् पति प्राप्त होईल.

**इंद्र**—हे देवि, तुझ्या पतीचें सामर्थ्य कशा प्रकारचें असावें, हें तुझ्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे.

( २ ) कन्या—हे प्रभो, जो महा बलाढ्य पराक्रमी वीर देव, दैत्य, यक्ष, किन्नर, उरग, राक्षस व दुष्ट दैत्य यांचा पराभव करून तुझ्यासह सर्व भूतांना जिंकील, असा ब्राह्मण-भक्त कीर्तिमान् नर माझा भर्ता होईल.

मार्कंडेय—युधिष्ठिरा, तिचें हें भाषण ऐकून इंद्र उद्विग्न झाला आणि 'ही देवी जशा पतीचें वर्णन करीत आहे, तसा पुरुष मला तर या त्रिभुवनांत कोणीच दिसत नाहीं' असा मनांत विचार करूं लागला. इतक्यांत सूर्यतुल्य तेजस्वी इंद्रानें उदय पर्वतावर भास्कर व त्याच्या मंडलांत प्रवेश करणारा चंद्र यांस पाहिलें आणि अमावास्या प्रवृत्त झाली असतां त्या रौद्र मुहूर्तावर उदयगिरीवर चाललेला देव-दानवांचा भयंकर संग्रामहि त्याच्या दृष्टीं पडला. त्या वेळीं शतक्रतूला पूर्वदिशा आरक्तवर्ण मेघानें युक्त असून त्यामुळें समुद्राचें जलहि आरक्तवर्ण झालेलें दिसलें. भृगु व अंगिरा यांच्या कुलांत उत्पन्न झालेल्या पुरुषांनीं दिलेल्या विविध मंत्रयुक्त आहुत्या घेऊन अग्नि आदित्यामध्यें प्रवेश करीत असलेला त्यानें पाहिला. त्या समयीं सूर्य चोविसाव्या पर्वास म्ह० वर्षांतील शेवटल्या अमावास्येस असून तो घोर स्थानीं आहे व सूर्यमंडलांत प्रवेश करणारा चंद्रहि क्रूरस्थानीं आहे, असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. याप्रमाणें चंद्र व सूर्य एका राशीस येऊन त्यांचा योगहि भयजनक आहे, असें पाहून इंद्र सचिंत झाला. 'ज्याअर्थीं सूर्य व चंद्र यांच्या सभोंवार हें भयंकर खळें पडलेलें दिसत आहे, त्याअर्थीं आज रात्र संपतेवेळीं भयंकर युद्ध होईल, असेंच तें सूचवीत आहे. त्याचप्रमाणें सिंधुनदीचा जलप्रवाह रक्तवर्ण दिसत आहे, अग्निवत् प्रज्वलित मुखानें भालु सूर्याकडे पाहून ओरडत आहे. हा सर्व योग मोठा भयंकर आहे व चंद्र, सूर्य आणि अग्नि यांचा हा समागमहि अतिशय तेजस्वी व अद्भुत आहे. यांतील चंद्रानें उत्पन्न केलेला पुत्र या देवीचा पति होईल. अग्नि सर्व गुणांनीं युक्त असून देवताहि आहे. हा जर पुत्र निर्माण करील, तर तोहि या देवीचा पति होण्यास योग्य होईल.' असा विचार करून इंद्र देवसेनेला घेऊन ब्रह्मलोकीं गेला आणि पितामहाला म्हणाला—' हे भगवन्, या देवीला सुशील व शूर पति दे.'

( ३ ) ब्रह्मदेव—हे दानवसूदना, या कार्याचा मीं तुजप्रमाणेंच विचार करून ठेविला आहे. जन्म पावणारा तो पुत्र बलाढ्य व अतिशय पराक्रमी निपजेल आणि हे शतक्रतो, तुझ्यासह देवांचा सेनापति होईल. तोच वीर्यवान् कुमार या देवीचा पति होईल.

पितामहाचें हें भाषण ऐकून व त्याला नमस्कार करून इंद्र त्या कन्येसह निघाला आणि जेथें वसिष्ठादि महाबलवान् श्रेष्ठ विप्रर्षि व देवर्षि होते, तेथें त्यांनीं यज्ञामध्यें समर्पिलेल्या सोमाचें पान करण्यासाठीं आणि त्यांच्या तपाचा भाग ग्रहण करण्यासाठीं प्राप्त झाला. याप्रमाणें सोमपानाच्या इच्छेनें इंद्रादि देवता जमल्यानंतर त्या महात्म्या ब्रह्मर्षींनीं यथाविधि इष्टि करून प्रदीप्त अग्नी-मध्यें सर्व देवतांना उद्देशून हवि अर्पण केला.

ब्राह्मणांनीं आह्वान करितांच अद्भुत तेज असलेला अग्नि सूर्यमंडलांतून बाहेर पडला व विधियुक्त मौन धारण करून तेथें आला. त्या प्रभु हव्यवाहनानें ऋषींनीं मंत्रयुक्त हवन केलेलीं विविध होमद्रव्यें देवांना अर्पण केलीं.

( ४ ) हे भरतश्रेष्ठा, तेथून परत जातेवेळीं त्या महात्म्या ऋषींच्या स्त्रिया अग्नीच्या दृष्टीं पडल्या. त्या सर्व आपापल्या आसनावर बसून सुखानें निद्रा घेणाऱ्या ऋषिपत्न्या सुवर्णवेदीप्रमाणें कांतियुक्त, चंद्रकलेप्रमाणें निर्मल, अग्नि-प्रभेप्रमाणें उज्ज्वल आणि तारकांप्रमाणें अद्भुत होत्या. हे राजा, त्या तेजस्वी ऋषिपत्नींना अवलोकन करतांच अग्नीचें मन त्यांच्यावर गेलें व तो क्षुब्ध झालेला वह्नि कामवश झाला.

परंतु त्या हुताशनानें पुनः विचार केला कीं, मी क्षुब्ध झालों हें योग्य नव्हे. मी या द्विजश्रेष्ठांच्या साध्वी व निष्काम भार्यांचा अभिलाष करणें न्याय्य नाहीं. मला योग्य निमित्तावांचून या पतिव्रतांचा स्पर्श किंबहुना दर्शनहि घडणें अशक्य आहे. यास्तव मी आतां गार्हपत्यामध्यें प्रवेश करून त्या निष्पाप स्त्रियांना वारंवार अतृप्त दृष्टीनें पहातों.

मार्कंडेय—हे कुंतीपुत्रा, मनांत असा संकल्प करून त्या अग्नीनें गार्हप-त्याचा आश्रय केला व आपल्या ज्वालेनें त्या कांचनतुल्य कांति असलेल्या स्त्रियांना जणुंकाय स्पर्शच करीत तो प्रज्वलित अग्नि त्यांच्याकडे पाहून आनं-दित झाला. त्या श्रेष्ठ स्त्रियांवर मन जडल्यामुळें त्यांची कामना करणारा तो वह्नि परवश होऊन दीर्घकाल तेथेंच राहिला. परंतु ब्राह्मणस्त्रियांची प्राप्ति न झाल्यामुळें कामसंतप्त झालेल्या त्या अग्नीनें देहत्यागाचा निश्चय करून जलांत प्रवेश केला.

त्या वेळीं ' स्वाहा-'नामक दक्षकन्येचें मन प्रथम त्या अग्नीवर गेलें. ती भाविनी दीर्घकालापासून त्याचें छिद्र पहात होती. परंतु त्या अप्रमत्त देवाला

वश करण्याची तिला संधि सांपडली नाहीं. त्या निष्पाप सुंदरीनें जेव्हां कामविह्वल झालेल्या अग्नीचा वनप्रवेश जाणला तेव्हां त्या कन्येनें मनांत विचार केला कीं कामार्त झालेली मी सप्तर्षींच्या भार्यांची रूपें धारण करून त्यांच्या रूपानें मोहित झालेल्या अग्नीला तृप्त करीन. त्यायोगानें त्याचें प्रिय होईल व माझीहि मनःकामना पूर्ण होईल. ३. १२. २२४.

---

## अध्याय २२५ वा.

[ १ स्वाहादेवीचा विविधरूपानें अग्निसमागम. २ कार्तिकेयाचा जन्म व अद्भुत पराक्रम. ]

(१) **मार्कंडेय**—राजा, अंगिरसाची 'शिवा-'नामक सुशील भार्या होती. ती ऋपिपत्नी रूपवती व गुणवती होती. तिचें रूप धारण करून ती स्वाहादेवी प्रथम अग्नीपाशीं गेली व म्हणाली—"हे अग्ने, मी कामसंतप्त होऊन तुझ्या कामनेनें आल्यें आहे. तूं जर मला कृतकार्य केलें नाहींस, तर मी निःसंशय मरण पावेन. हे हुताशना, मी अंगिरामुनीची 'शिवा'-नांवाची भार्या आहे. मी सव ऋपिस्त्रियांशीं संकेत करून या निश्चयानें तुजपाशीं आल्यें आहें."

**अग्नि**—हे शुभे, मी कामार्त झालों आहें, हें तूं आणि तूं सांगत असलेल्या दुसऱ्या सर्व सप्तर्षींच्या प्रिय भार्या यांनीं कसें जाणलें ?

**शिवा**—हे पावका, आम्हांला तूं सर्वदा प्रियच आहेस, पण तुझें मोठें भय वाटतें. तुझ्या चर्येवरून तुझें इंगित जाणून मला इतर स्त्रियांनीं तुझ्या समीप पाठविलें आहे. मी तुझ्या समागमेच्छेनें येथें आल्यें आहें, यास्तव तुला जें योग्य वाटेल तें सत्वर कर. कारण माझ्या सख्या माझी प्रतीक्षा करीत आहेत. तेथें मला त्वरित गेलें पाहिजे.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, त्यानंतर अग्नीनें मोठ्या आनंदानें त्या शिवेशीं प्रेमयुक्त समागम केला. त्या वेळीं त्या देवीनें त्याचें वीर्य प्रीतीनें हातांत धारण केलें आणि मनांत विचार केला कीं, या अरण्यांत माझें हें रूप कोणाच्या दृष्टीं पडलें, तर ते अग्निसमागमाचा मिथ्या दोप ब्राह्मणस्त्रियांवर लादतील. तस्मात् हा प्रकार गुप्त राखण्यासाठीं मी गरुडीचें रूप धारण करित्यें. म्हणजे मी या वनांतून सुखानें बाहेर पडेन.

( २ ) मार्कंडेय—हे भरतसत्तमा, असा निश्चय करून ती देवी गरुडीचें रूप घेऊन त्या महावनांतून बाहेर पडली. तेव्हां 'शर-'नांवाच्या तृणांनीं आच्छादिलेला पर्वत तिच्या दृष्टीं पडला. विषारी दृष्टीचे व सातफणांचे अद्भुत नाग त्या पर्वताचें रक्षण करीत होते. तो शैल राक्षस, पिशाच, भयंकर भूत-गण, राक्षसी व अनेकप्रकारचे पशु-पक्षी यांनीं व्याप्त झाला होता. राजा, त्या दुर्गम शैलाच्या पृष्ठभागावर मोठ्या त्वरेनें जाऊन त्या देवीनें एका सुवर्णकुंडांत तें वीर्य वेगानें फेंकून दिलें.

याप्रमाणें महात्म्या मरीची, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ, या सप्तर्षींच्या साती भार्यांचें रूप धारण करून आपण अग्निसमागम करावा, असें त्या स्वाहेनें मनांत योजिलें. परंतु हे कुरुसत्तमा, वसिष्ठपत्नी अरुंध-तीची अप्रतिम पतिसेवा व अगाध तपःप्रभाव यांच्या योगानें ती देवी तच्चि दिव्य रूप धारण करण्यास समर्थ झाली नाहीं. त्यामुळें तिनें इतर सहाच ऋषींच्या भार्यांचीं पृथक् पृथक् रूपें धारण करून अग्निसमागम केला व सहा-वेळां तें वीर्य कुंडांत टाकिलें.

याप्रमाणें त्या स्वाहादेवीनें अग्नीचें वीर्य प्रतिपदेच्या दिवशीं सहा वेळां त्या कुंडांत टाकिलें असतां तें तेजानें व्याप्त झालें व त्यापासून एक पुत्र उत्पन्न झाला. अशाप्रकारें ऋषींना पूज्य असलेलें तें अग्नीचें वीर्य स्कंदत्वाला प्राप्त झाल्यामुळें त्या पुत्राचें 'स्कंद' हें नांव प्रसिद्ध झालें. तो कुमार सहा मस्तकें, बारा कर्ण, नेत्र आणि बाहु, एक कंठ व उदर यांनीं युक्त होता.

द्वितीयेला त्या कुमाराचे अवयव व्यक्त झाले, तृतीयेला तो शिशु शोभूं लागला आणि चतुर्थीला त्याचीं सर्व अंगें व प्रत्यंगें प्रकट झालीं. त्या वेळीं विद्युद्युक्त प्रचंड रक्तवर्ण मेघांनीं आच्छादिलेल्या आरक्त बालसूर्याप्रमाणें तो बालक शोभला. शंकरानें दैत्यांचा नाश करणारें जें श्रेष्ठ धनुष्य ठेविलें होतें तें अंगावर रोमांच उत्पन्न करणारें भयंकर धनुष्य त्या कुमारानें धारण केलें व त्याच्या टणत्कारानें चराचरासह सर्व त्रैलोक्याला मोहित केलें. मेघगर्जने-सारखा त्याचा प्रचंड निःस्वन ऐकून 'चित्र' व 'ऐरावत' या नांवाचे महा-गज त्याच्यावर धांवून आले.

त्या वेळीं ते दोन गज आपल्यावर चाल करून येत आहेत, असें पाहून बालरवी-प्रमाणें कांति असलेल्या त्या अग्निपुत्रानें त्या उभयतां गजांना दोन हातांत धरिलें.

तिसऱ्या हातानें शक्ति आणि चवथ्या हातानें बलाढ्य व धिप्पाड ताम्रचूड कुक्कुट धरून त्यानें भयंकर ध्वनि केला व तो त्यांच्याशीं खेळूं लागला. त्या बलवानानें दोन हातांनीं शंख धरून तो वाजविला. त्यामुळें बलाढ्य भूतेंहि भयभीत झालीं. त्यानें दोन भुजांनीं आकाशावर अनेक प्रहार केले. याप्रमाणें क्रीडा करणारा तो महात्मा आपल्या मुखानें त्रैलोक्य प्राशन करीत आहे, असें भासलें.

तो प्रचंड शरीरानें युक्त असलेला अद्भुत पराक्रमी अग्निपुत्र उदयाचलावरील आदित्याप्रमाणें त्या पर्वताच्या अग्रभागीं बसला व आपल्या नानाविध मुखांनीं विविध दिशा अवलोकन करीत असतां नानाप्रकारच्या वस्तु पाहून पुनः गर्जना करूं लागला. त्याचा तो प्रचंड निनाद ऐकून लोक भीतीनें अडखळून पडले आणि भयभीत होऊन उद्विग्न मनानें त्याला शरण गेले.

ज्या अनेक वर्णांच्या लोकांनीं त्याचा आश्रय केला होता, त्या महा बलाढ्य पुरुषांना ब्राह्मणांनीं ' पारिषद ' हें नांव दिलें. नंतर त्या महाबाहु कुमारानें उठून त्या शरणार्थी जनांचें सांत्वन केलें व आपलें महत् धनुष्य घेऊन ' श्वेत-'नामक महापर्वतावर बाणवृष्टि केली. त्यानें आपल्या शरांनीं हिमालयाचा पुत्र जो क्रौंच त्याचा भेद केला. स्कंदाच्या शरवृष्टीनें त्या पर्वताला जें छिद्र पडलें त्यांतूनच हंस व गृध्र पक्षी मेरुपर्वताकडे जातात.

युधिष्ठिरा, तो पर्वत विशीर्ण होतांच भयसूचक प्रचंड ध्वनि करीत खालीं पडला. जणुंकाय तो आर्तस्वरानें रोदनच करीत होता. तो पर्वत अशाप्रकारें खालीं पडतांच इतर पर्वतहि उच्च स्वरानें आक्रोश करूं लागले. त्या अतिशय पीडित झालेल्या शैलांचा तो प्रचंड शब्द ऐकून बलवानांतील श्रेष्ठ कुमार यत्किंचित्‌हि डगमगला नाहीं. त्यानें मोठ्यानें गर्जना करून आपली देदीप्यमान् शक्ति त्या पर्वताकडे मोठ्या वेगानें फेंकली आणि श्वेतपर्वताचें घोर शिखर त्वरेनें छेदून टाकिलें.

त्या वेळीं त्या पराक्रमी बालकाच्या प्रहारानें विदीर्ण झालेला श्वेतपर्वत त्या महात्म्याच्या भीतीनें पृथ्वीचा त्याग करून वर उडाला. तेव्हां व्यथित झालेली भूमि चोंहोंकडून विदीर्ण झाली व अत्यंत आर्त होऊन स्कंदाला शरण गेली. तेव्हां ती त्याच्या आश्रयानें पुनः बलयुक्त होऊन शोभली. त्यानंतर पर्वतहि त्या कुमाराला नमस्कार करून पुनः भूमीवर स्थिर झाले आणि तेव्हांपासून शुक्ल पक्षांतील पंचमीला लोक स्कंदाचें पूजन करूं लागले. ३. १२. २२५.

---

## अध्याय २२६ वा.

[ १ सप्तर्षींनीं केलेला भार्यात्याग. २ देवांनीं केलेली इंद्राची प्रार्थना. ३ लोकमातांचें कुमाराच्या वधार्थ गमन व त्यांनीं कुमारवात्सल्याने केलेलें त्याचें पोषण. ]

(१) **मार्कंडेय**—राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या महाबलाढ्य व प्रतापवान् महासेनाचा जन्म झाला असतां पृथ्वीवर नानाप्रकारचे घोर उत्पात होऊं लागले. स्त्री व पुरुष यांत वैर उत्पन्न झालें. अति शीत व अति उष्ण इत्यादि द्वंद्वांचाहि स्वभाव बदलला. ग्रह, दिशा व आकाश हीं प्रदीप्त झालीं, पृथ्वी अतिशय आक्रोश करूं लागली. लोकांचें हित चिंतिणारे ऋषि सर्वत्र उद्भवलेले हे उत्पात पाहून उद्विग्न झाले व लोकस्वास्थ्यासाठीं शांति करूं लागले.

त्या चैत्ररथ वनांत रहाणारे लोक 'अग्नीनें सप्तर्षींच्या सहा भार्यांशीं समागम केल्यामुळें आमच्यावर हा महान् अनर्थ ओढवला आहे' असें म्हणूं लागले. ज्यांनीं स्वाहादेवीला गरुडीच्या रूपानें संचार करतांना पाहिलें होतें, त्यांनीं त्या गरुडीस 'तूंच आम्हांवर हें संकट आणिलेंस' असें म्हटलें. पण स्वाहेचें हें कर्म आहे, असें मात्र कोणींहि जाणलें नाहीं.

तेव्हां लोकांचें तें भाषण ऐकून गरुडी 'हें माझें अपत्य आहे' असें समजून स्कंदापाशीं हळूच गेली व 'मी तुझी माता आहें' असें म्हणाली. सप्तर्षींनीं जेव्हां 'हा महा ओजस्वी पुत्र आपल्या भार्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाला आहे' असें ऐकलें, तेव्हां अरुंधतीवांचून बाकीच्या सहाहि ऋषिपत्न्यांच्या पतींनीं त्यांचा त्याग केला. तेथील वनवासी जनहि 'सहा ऋषिभार्यांच्या ठिकाणींच या पुत्राचा जन्म झाला' असें म्हणूं लागले असतां स्वाहादेवीनें 'हा माझा पुत्र आहे, तुम्ही समजतां तसा प्रकार घडलेला नाहीं, हें मी जाणतें' असें पुनः पुनः सप्तर्षींना सांगितलें.

त्या वेळीं विश्वामित्रानें सप्तर्षींना उद्देशून इष्टि केली व अदृश्यरूपानें कामसंतप्त अग्नीच्या मागोमाग जाऊन सर्व प्रकार जसा घडला होता तसा समग्र जाणला. नंतर त्या महामुनीनें प्रथम त्या कुमाराला शरण जाऊन त्याची दिव्य स्तवनानें स्तुति केली व त्या वीर्यवान् महासेनाचे जातकर्मादि-विवाहापर्यंत मंगल संस्कारहि करून टाकिले. त्याचप्रमाणें लोकहितासाठीं त्या षण्मुखाचें माहात्म्य वर्णन करून त्याला कुक्कुट, शक्ति, देवी आणि पारिषद हीं साधनें प्राप्त करून दिलीं. त्यामुळें विश्वामित्र-ऋषि कुमाराला प्रिय झाला.

त्यानंतर 'स्वाहादेवीनेंच सर्व ऋषिस्त्रियांचीं रूपें धारण केलीं होतीं;' हें जेव्हां विश्वामित्राला कळलें तेव्हां त्यानें 'तुमच्या स्त्रियांचा यांत कांहीं अपराध नाहीं, त्या निर्दोष आहेत' असें सर्व मुनींना सांगितलें. परंतु तो सत्य वृत्तान्त ऐकूनहि त्या ऋषींनीं श्रीरामचंद्राप्रमाणें केवळ लोकापवादाच्या भीतीनें भार्यांचा त्याग केला.

(२) **मार्कंडेय**—हे पांडुपुत्रा, इकडे स्कंदाचा प्रभाव ऐकून सर्व देव एकत्र जमून इंद्राला म्हणाले—"हे देवेंद्रा, या स्कंदाचें बल असह्य आहे. यास्तव या शत्रूचा तूं सत्वर वध कर. विलंब करूं नको. तूं जर याचा नाश केला नाहींस तर हा बलाढ्य वीर आमच्यासह सगळ्या त्रैलोक्याचा निग्रह करून स्वतःच शक्र होईल."

देवांचें हें भाषण ऐकून व्यथित झालेला इंद्र म्हणाला—"हे सुरहो, हा बालक महा बलाढ्य आहे. तो युद्धामध्यें स्वतःच्या पराक्रमानें साक्षात् विधात्याचाहि नाश करण्यास समर्थ आहे. त्यामुळें मला या बालकाच्या वधास उद्युक्त होण्याचें धैर्य होत नाहीं."

पण इंद्राचें हें वचन देवांना रुचलें नाहीं. ते म्हणाले—हे पुरंदरा, ज्याअर्थी तूं असे निरुत्साहाचे उद्गार काढीत आहेस, त्या अर्थी तुझ्यामध्यें सामर्थ्य नाहीं, हेंच खरें. यास्तव आतां इच्छेस येईल तसा पराक्रम करण्यास समर्थ असलेल्या या लोकमाता त्या स्कंदाकडे जाऊन त्याचा वध करोत.

(३) तेव्हां 'ठीक आहे,' असें देवांना सांगून त्या लोकमाता स्कंदाकडे गेल्या. परंतु त्या अप्रतिम बलवान् कुमाराला पाहून त्या खिन्न झाल्या व 'याचा नाश होणें अशक्य आहे,' असा विचार करून व त्यालाच शरण जाऊन म्हणाल्या—"हे बलवान् कुमारा, तूं आमचा पुत्र हो, आम्ही तुजविषयींच्या स्नेहानें व्याकुल होऊन तुझ्याकडे मोठ्या प्रेमानें आलों आहों, यास्तव तूं आम्हां सर्वजणींचें अभिनंदन कर."

त्यांचें हें स्नेहपूर्ण वचन ऐकून त्या प्रभूनें त्यांचा सत्कार केला व त्यांचें दुग्धपान करून त्यांची इच्छा पूर्ण केली. इतक्यांत बलवानांतील श्रेष्ठ असा आपला पिता अग्नि येत असल्याचें त्याच्या दृष्टीं पडलें. तेव्हां त्या कुमारानें मातृगणांसह अग्नीचें पूजन केलें. तो त्या महासेनाचें सर्वतः रक्षण करीत राहिला. त्या सर्व लोकमातांच्या क्रोधापासून जी स्त्री उत्पन्न झाली होती, ती

हातांत शूल धारण करून धात्री झाली व स्कंदाचें स्वपुत्रवत् पालन करूं लागली. रक्तप्राशन करणारी रक्तसमुद्राची कन्या क्रूरा त्या कुमाराला आलिंगन देऊन त्याचें पुत्राप्रमाणें संरक्षण करूं लागली. अग्नीनें ज्याला बकऱ्याचें मुख आहे, असें लौकिक रूप धारण करून व विपुल प्रजेनें युक्त होऊन त्या शैलस्थ बालकास क्रीडनकांप्रमाणें रमविलें. ३.१२.२२६.

---

## अध्याय २२७ वा.

[ १ इंद्राचें महासेनाच्या वधार्थ गमन. २ देवसेनेचा पराभव. ३ देवासह इंद्राची शरणागति. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, त्यानंतर राहुप्रभृति उपग्रहांसह सर्व ग्रह, ऋषि, लोकमाता, दृप्त झालेले हुताशनादि पारिषद व स्वर्गांत निवास करणारे इतरहि घोर प्राणी मातृगणांसह स्कंदाच्या सभोंवार त्याचें रक्षण करीत राहिले आहेत. त्यामुळें विजय मिळणें संशयित आहे, हें जाणून विजयेच्छु सुरेश्वर ऐरावतावर आरूढ होऊन देवतांसह निघाला.

याप्रमाणें सर्व देवगणांनीं परिवृत झालेला बलवान् इंद्र हातांत वज्र घेऊन महासेनाच्या वधार्थ मोठ्या त्वरेनें चालला असतां अतिशय उग्र देवसैन्य प्रचंड गर्जना करीत त्याला अनुसरलें. नानाप्रकारचीं वाहनें, धनुष्यें, चित्रविचित्र ध्वज, उत्कृष्ट वस्त्रालंकार व अनेक आयुधें यांनीं युक्त असलेलें तें सैन्य त्या वेळीं अतिशय शोभलें.

राजा, इंद्र आपला वध करण्याच्या इच्छेनें येत आहे, हें पाहून कुमार त्याच्यावर धांवून गेला. तेव्हां देव व ऋषि यांनीं सत्कार केलेला महाबलाढ्य देवेश मोठ्यानें सिंहनाद करून देवसेनेला आनंदित करीत पावकात्मजाच्या नाशार्थ मोठ्या वेगानें त्याच्यासमीप प्राप्त झाला आणि देवसमुदायांसह वासवानें सिंहनाद केला. त्यांचा तो शब्द ऐकून कार्तिकेयानेंहि समुद्राप्रमाणें प्रचंड गर्जना केली. तो भयंकर ध्वनि कानीं पडतांच सर्व देवसेना भीतीनें विवेकशून्य होऊन इतस्ततः पळूं लागली.

( २ ) नंतर हे पांडवा, आपल्या वधाच्या इच्छेन आलेल्या त्या देवांना पाहून क्रुद्ध झालेल्या अग्निसुतानें आपल्या मुखांतून प्रदीप्त अग्निज्वाला उत्पन्न केल्या व त्यांच्यायोगानें भूतलावर कांपत असलेल्या सर्व देवसैन्याला दग्ध

करून टाकिलें. त्या वेळीं शरीरें, मस्तकें, आयुधें व वाहनें प्रदीप्त होऊन एकदम खालीं पडलेली ती देवसेना सर्वत्र पसरलेल्या तारकांच्या समूहाप्रमाणें भासली. राजा, आपलें सैन्य दग्ध झालेलें पाहून सर्व देव वज्रधर शक्राला सोडून अग्निपुत्राला जेव्हां शरण गेले, तेव्हां त्यांना शांति प्राप्त झाली.

( ३ ) सर्व देव आपला त्याग करून गेले आहेत असें पाहून इंद्रानें आपलें वज्र स्कंदावर सोडिलें, तेव्हां हे महाराज, त्या वज्रानें स्कंदाच्या दक्षिण बाजूचा छेद केला. परंतु त्या महात्म्याच्या उजव्या कुशीचा छेद करणाऱ्या त्या वज्रप्रहारापासून एक पुरुष निर्माण झाला. तो तरुण सुवर्णाचें कवच, शक्ति व दिव्य कुंडलें यांनीं युक्त होता. स्कंदाच्या देहांत वज्र गुप्त होऊन त्याच्या बाहूपासून हा पुरुष उत्पन्न झाल्यामुळें त्याला ‘ विशाख ’ हें नांव प्राप्त झालें. याप्रमाणें कालानलतुल्य प्रखर तेजस्वी पुरुष उत्पन्न झालेला पाहून इंद्र भयभीत झाला व हात जोडून स्कंदाला शरण गेला. तेव्हां सैन्यासह शरण आलेल्या इंद्राला त्या श्रेष्ठ कुमारानें अभय दिलें. त्यामुळें सब देव अतिशय हृष्ट होऊन विविध वाद्यें वाजवूं लागले. ३. १२. २२७.

---

## अध्याय २२८ वा.

[ १ स्कंदाच्या पारिषदांचें वर्णन. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, आतां अद्भुत दर्शन असलेल्या घोर स्कंदपारिषदांचें वर्णन ऐक. इंद्रानें स्कंदावर वज्रप्रहार करतांच त्याच्या देहापासून जे दारुण कुमार उत्पन्न झाले, ते गर्भस्थ व जन्मलेल्या बालकांचें हरण करणारे होते. त्याचप्रमाणें त्या वज्रप्रहारामुळें महाबलाढ्य कन्याहि उत्पन्न झाल्या. ते सर्व कुमार विशाखालाच आपला पिता मानूं लागले. तेव्हां आपल्या कन्यापुत्रांच्या परिवारांनीं परिवेष्टित झालेला तो छागमुख भगवान् विशाख संग्रामांत देवांचें रक्षण करूं लागला. नंतर मातृगण अवलोकन करीत असतां तो कोसलदेशांत जाऊन तेथें ‘ भद्रशाख-’नांवानें प्रसिद्ध झाला.

हे पांडवा, पुढें भूलोकीं लोक स्कंदालाच त्या कुमाराचा पिता म्हणूं लागले. तसेंच महाबलवान् रुद्रालाच स्कंदपिता अग्नि व पार्वतीलाच स्कंदमाता स्वाहा समजूं लागले. राजा, त्यानंतर पुत्रेच्छु व पुत्रवान् लोक सर्वदा त्याचीच उपासना करूं लागले. ‘ तपः ’-संज्ञक अग्नीपासून ज्या कन्या उत्पन्न झाल्या होत्या,

त्या स्कंदाच्या समीप आल्या असतां त्यानें 'मीं काय करावें ?' असें त्या कुमारींना विचारिलें.

तेव्हां कुमारी म्हणाल्या—हे प्रभो, तुझ्या प्रसादानें आम्हीं सर्व लोकांच्या पूज्य व श्रेष्ठ माता व्हावें, अशी आमची इच्छा आहे. यास्तव आमचें एवढें प्रिय कर.

त्यावर त्या उदारबुद्धि कुमारानें म्हटलें—ठीक आहे. तुमची इच्छा पूर्ण होईल. तुम्ही शुभा व अशुभा अशा पृथग्विधा व्हा.

तें ऐकून स्कंदाला स्वपुत्र समजून त्या सर्व मातृका निघून गेल्या. त्या सात शिशुमातांचीं काकी, हलिमा, मालिनी, बृंहिता, आर्या, पलाला व वैमित्रा अशीं नांवें होतीं. त्यांना स्कंदाच्या प्रसादानें 'शिशु'-नामक अति दारुण व वीर्य-संपन्न पुत्र झाला. त्याचे नेत्र आरक्त असून तो भयंकर होता. तो पुत्र व त्या सात माता 'वीराष्टक'-नांवानें प्रसिद्ध आहेत आणि छागाचें मुख असलेल्या वीरासह त्यांस 'नवक' असें म्हणतात. स्कंदाचें सहावें छागमय मुख हेंच होय. राजा, स्कंदाच्या सहा मुखांपैकींच हें मुख असून मातृका नित्य त्याचें पूजन करितात. हें मुख त्याच्या सहा मुखांत श्रेष्ठ असून, त्याच्याच योगें भद्र-शाखानें दिव्य शक्ति निर्माण केली.

हे जनाधिपा, याप्रमाणें विविध वृत्तान्त शुक्लपंचमीस घडला आणि षष्ठीला महाघोर युद्ध झालें. ३.१२.२२८.

---

## अध्याय २२९ वा.

[ १ कार्तिकेयाची इंद्रपद स्वीकारण्याविषयीं प्रार्थना, त्याचा अस्वीकार. २ इंद्रानें त्याला केलेला देवसैनापत्याचा अभिषेक. ३ कार्तिकेयानें केलेलें देवसे-नेचें पाणिग्रहण. ]

( १ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, त्या स्कंदानें सुवर्णकवचमाला, ज्याला सुवर्णाचा तुरा आहे असा मुकुट व दिव्य कुंडलें धारण करून तांबडें वस्त्र परिधान केलें. त्या वेळीं तो हिरण्याक्ष, कांतिमान्, तीक्ष्णदाढांनीं युक्त, मनोरम व सर्वलक्षणसंपन्न कुमार त्रैलोक्याला अतिशय प्रिय झाला. याप्रमाणें तो वरद शूर कुमार बसला असतां त्याच्यापाशीं पद्मरूपा साक्षात् 'श्री' देहधारण करून आली व तिनें त्याचा स्वीकार केला. तेव्हां श्रीनें युक्त झालेला तो अतिशय यशस्वी कुमार पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें शोभला.

त्यानंतर महात्म्या ब्राह्मणांनीं त्याची पूजा केली व तेथें असलेल्या महर्षींनीं स्कंदाचें सूत्रात्ममूर्तित्व दर्शविण्यासाठीं त्याला म्हटलें—" हे हिरण्यगर्भा, तुझें कल्याण असो. तूं लोकांना शुभदायक हो. सहा दिवसांत उत्पन्न झालेल्या तूं सर्व लोकांना वश करून त्यांना अभयहि दिलेंस. तस्मात् हे सुरोत्तमा, त्रैलोक्याला अभय देणारा तूं इंद्र हो."

**स्कंद**—हे तपोधनहो, येथें इंद्र सर्व लोकांचें कोणतें कार्य करितो ? तो सुरेश्वर देवगणांचें नित्य रक्षण कसें करितो ?

**ऋषि**—हे प्रभो, सुरेश्वर इंद्र, भूतांना बल व तेज देतो, प्रजेला सुखी करितो, तो प्रसन्न झाला असतां सर्व कामना पूर्ण करितो. दुर्जनांचा संहार करून धार्मिक सज्जनांना इष्ट फल देतो. तो बलसूदन भूतांना सर्व कार्यांत नियुक्त करितो, तो इंद्र सूर्याच्या अभावीं सूर्य व चंद्राच्या अभावीं चंद्र होतो. त्याचप्रमाणें तो शक्र कारणपरत्वें अग्नि, वायु, पृथ्वी, व आपहि होतो. इंद्राचीं हीं कर्तव्यें आहेत व तो अतुल सामर्थ्यानें युक्त आहे. हे वीरा, तूं श्रेष्ठ बलवान् आहेस, तस्मात् आमचा इंद्र हो.

**शक्र**—हे महाबाहो, आम्हां सर्वांना सुखावह होणारा तूं इंद्र हो. तुला आजच इंद्रपदीं अभिषेक होवो.

**स्कंद**—हे इंद्रा, विजयामध्यें अव्यग्र चित्तानें रत होऊन तूंच त्रैलोक्याचें पालन कर. हे शक्रा, मी तुझा किंकर आहें. मला इंद्रत्वाची इच्छा नाहीं.

**शक्र**—हे वीरा, तुझें सामर्थ्य अद्भुत आहे. तूं देवांच्या शत्रूंचा नाश कर. तुझ्या पराक्रमानें विस्मित झालेले सर्व लोक आतां माझी अवज्ञा करितील. हे विभो, बलहीन व पराजित झालेला मी जर आतां इंद्रपदावर राहिलों तर लोक निरलसपणें आपणां उभयतांमध्यें वृथा भेद उत्पन्न करतील आणि तुझ्या मनांत भेद उद्भवला असतां लोकांत द्वेष उत्पन्न होईल. हे महाबल, याप्रमाणें आमच्या विषयीं लोकांचा असा निश्चित द्विधाभाव झाला असतां त्यांच्या भेदामुळें युद्ध प्रवृत्त होईल आणि हे वत्सा, त्या संग्रामांत तूं मला निश्चयानें जिंकशील. यास्तव तूंच इंद्र हो, आतां कांहीं विचार करूं नको.

**स्कंद**—हे देवेंद्रा, तूं सर्व त्रैलोक्याचा व माझाहि राजा आहेस. तुझें कल्याण असो. मी तुझी कोणती आज्ञा मान्य करूं, तें सांग.

इंद्र—हे महाबल, तुझ्या वचनाप्रमाणें मी इंद्र राहीन. परंतु तूं आतां जें म्हटलेंस, तें जर सत्य असेल तरच मी देवेंद्र होईन. मीं तुला आज्ञा करावी अशी जर तुझी इच्छा असेल, तर ऐक. हे पराक्रमी वीरा, तूं देवांच्या सेनापतित्वाचा स्वीकार कर. तुजवर सैन्यापत्याचा अभिषेक होवो.

स्कंद—हे अमरेंद्रा, दानवांच्या नाशासाठीं, देवांच्या इष्टसिद्धीसाठीं आणि गो-ब्राह्मणांच्या हितासाठीं, तूंच मला सेनापतिपदाचा अभिषेक कर.

( २ ) मार्कंडेय—राजा, त्यानंतर सर्व देवगणांसह वासवानें स्कंदाला अभिषेक केला व महर्षींनीं त्याचें पूजन केलें. तेव्हां तो अतिशय शोभला. त्या वेळीं त्याच्या मस्तकावर धरलेलें सुवर्णाचें छत्र प्रज्वलित अग्नीच्या प्रभेप्रमाणें भासलें. हे परंतपा, त्या शुभसमयीं साक्षात् त्रिपुरघ्न शंकरानें उमादेवीसह तेथें येऊन विश्वकर्म्यानें केलेली दिव्य सुवर्णमय माला स्वतः त्याच्या गळ्यांत घातली आणि मोठ्या प्रेमानें त्याचा सत्कार केला.

हे भरतश्रेष्ठा, श्रुतिवेत्ते द्विज अग्नीलाच रुद्र म्हणतात, त्यामुळें हा कुमार रुद्राचाच पुत्र झाला. रुद्रानें जें स्ववीर्य टाकून दिलें होतें, त्याचाच श्वेत पर्वत झाला. त्या पर्वतावरील अग्नीचें तें वीर्य कृत्तिकांनीं ग्रहण केलें.

रुद्रानें कार्तिकेयाचा सत्कार केलेला पाहून सर्व देव त्या गुणसंपन्न कुमाराला 'रुद्रपुत्र' असें म्हणूं लागले. रुद्रानें अग्नींत प्रवेश केल्यामुळें हा बालक उत्पन्न झाला. म्हणूनहि या स्कंदाला 'रुद्रसुत' म्हणतात. रुद्ररूपी अग्नीपासून सहा स्त्रियांचें रूप धारण केलेल्या स्वाहेच्या ठिकाणीं हा सुरश्रेष्ठ स्कंद जन्म पावला. म्हणून त्याला 'रुद्रपुत्र' म्हटलें जातें.

हे राजेंद्रा, त्या श्रीमान् पावकात्मजाची अंगकांति देदीप्यमान असून त्यानें रक्तवर्ण निर्मल वस्त्र परिधान केलें होतें. त्यामुळें तो रुद्रात्मज आरक्त अभ्रांतून प्रकाशणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभला. अग्नीनें त्याला कुक्कुटचिह्नित व अलंकृत ध्वज दिला. तो त्याच्या रथाग्रावर उभारला असतां तो रथ प्रलयकालीन प्रदीप्त अग्नीप्रमाणें दिसला.

सर्व भूतांच्या चेष्टा, प्रभा, शांति व बल यांमध्यें स्थित असणारी व देवतांच्या विजयाची वृद्धि करणारी शक्ति त्या कुमाराच्या अग्रभागीं असते. त्याच्या शरीरांत सहज कवचानें प्रवेश केला असून, तें हा देव युद्ध करूं लागला असतां सर्वदा प्रादुर्भूत होतें. हे जनाधिपा, स्कंदाच्या ठिकाणीं शक्ति, धर्म, बल, तेज,

सौंदर्य, सत्य, उन्नति, ब्राह्मणत्व, असंमोह, भक्तरक्षण, शत्रुसंहार व प्रजापालन हे गुण स्वभावतःच आहेत.

पांडवा, याप्रमाणें त्या अग्निपुत्राला सर्व देवगणांनीं अभिषेक करून अलंकारांनीं भूषित केलें असतां तो प्रसन्नचित्त कुमार पूर्ण चंद्राप्रमाणें शोभला. त्या वेळीं त्याच्या सभोंवार याग व स्वाध्यायाचा घोष होऊं लागला. देवांचीं उत्कृष्ट वाद्यें वाजूं लागलीं. सर्व अप्सरांच्या गणांसह देवगंधर्व गायन करूं लागले. याप्रमाणें हे व इतरहि संतुष्ट झालेले व अलंकार धारण केलेले अनेक देवगण व पिशाचगण त्या कुमाराच्या भोंवतीं जमले. त्या वेळीं देवांनीं देवसेनापत्यावर अभिषिक्त केलेला तो पावकात्मज त्यांच्याशीं क्रीडा करीत असतां अतिशय शोभला.

राजा, महासेनाला सेनापतिपदाचा अभिषेक झाल्यावर सर्व देवता अंधकाराचा नाश करून उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें त्याच्याकडे पाहूं लागल्या. त्यानंतर सर्व दिशांतून सहस्रावधि देवसेना त्याच्यासमीप येऊन ' तूं आमचा पति आहेस ' असें म्हणूं लागल्या व त्या देवसेनांनीं सर्वभूतगणांनीं परिवेष्टित असलेल्या त्या भगवानाचें पूजन व स्तवन केलें असतां त्यानें त्यांचें सान्त्वन केलें.

( ३ ) इकडे स्कंदाला सैन्यापत्याभिषेक केल्यानंतर शतक्रतूनें पूर्वीं केशीदैत्यापासून मुक्त केलेल्या ' देवसेना '-नामक कन्येचें स्मरण केलें आणि स्वतः ब्रह्मदेवानें तिच्यासाठीं हाच पति योजिला असावा असा विचार करून त्यानें अलंकृत झालेल्या देवसेनेस व स्कंदास म्हटलें—"हे सुरोत्तमा, स्वयंभू पितामहानें तुझा जन्म होण्याच्या पूर्वींच ही तुझी पत्नी योजून ठेविली आहे. तस्मात् तूं आपल्या हस्तकमलानें या देवीचा उजवा हात धरून तिचें विधिवत् व मंत्रयुक्त पाणिग्रहण कर."

राजा, इंद्रानें असें सांगितलें असतां महासेनानें त्या कन्येचें यथाविधि मंत्रपूर्वक पाणिग्रहण केलें. त्या समयीं मंत्रवेत्त्या बृहस्पतीनें जप व होम केला. अशाप्रकारें देवसेना स्कंदाची महिषी झाल्याचें लोकांत प्रसिद्ध आहे. ब्राह्मण या सुखप्रद स्कंदपत्नीला षष्ठी, लक्ष्मी, सिनीवाली, कुहू, सद्वृत्ति व अपराजिता असें म्हणतात. ज्या वेळीं देवसेनेला हा शाश्वत स्कंदपति प्राप्त झाला त्या वेळीं साक्षात् देवी लक्ष्मीनें त्याचा आश्रय केला. पंचमीला श्रीनें स्कंदाचा आश्रय

केला, यास्तव त्या पंचमीला ' श्रीपंचमी ' म्हणतात आणि षष्ठीला तो कृतार्थ झाला म्हणून षष्ठी महातिथि मानली जाते. ३.१२. २२९.

---

## अध्याय २३० वा.

[ १ कार्तिकेयाने ऋषिभार्यांचा मातृत्वानें केलेला स्वीकार. २ स्कंदग्रहांचीं कर्मे.]

(१) **मार्कंडेय**—धर्मराजा, याप्रमाणें महासेनाला देवसेनापति केल्यानंतर श्रीनें त्याचा आश्रय केला असतां सहा सप्तर्षिभार्या कुमारापाशीं आल्या. पतींनीं त्याग केलेल्या त्या धर्मनिष्ठ व महाव्रतधारण करणाऱ्या देवी मोठ्या त्वरेनें त्या देवसेनापतीच्या समीप येऊन त्याला म्हणाल्या–" हे वत्सा, आमच्या देवतुल्य पतींनीं निष्कारण क्रोधानें आमचा त्याग केला आहे. त्यामुळें आम्ही त्या पुण्यस्थानापासून च्युत झालों आहों. हे विभो, ' आम्हीं तुला जन्म दिला ' असें आमच्या पूज्य पतींना कोणीं तरी जाऊन सांगितलें आणि तें वृत्त सत्य मानून त्यांनीं आमचा त्याग केला. तस्मात् आतां आमचें रक्षण करण्यास तूंच समर्थ आहेस. हे प्रभो, तुझ्या प्रसादानें आम्हांला अक्षय स्वर्ग प्राप्त व्हावा. तूं आमचा पुत्र व्हावास अशी आमची इच्छा आहे. यास्तव ती पूर्ण करून तूं अनृणी हो. "

**स्कंद**—हे अनिंद्य मातांनो, तुम्ही माझ्या जननी असून मी तुमचा पुत्रच आहें. तुमची जशी इच्छा आहे, तसेंच सर्व होईल.

( २ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, त्यानंतर ' अभिजित नक्षत्राच्या पतनानें कमी झालेली नक्षत्रसंख्या पूर्ण कशी होईल ?' असें विचारण्याच्या इच्छेनें आलेल्या इंद्राला स्कंद म्हणाला–"हे देवेंद्रा, तुझें काय कार्य आहे ? तें सांग."

स्कंदाचा हा प्रश्न ऐकून वासव म्हणाला—हे कार्तिकेया, रोहिणीशीं स्पर्धा करणारी तिची कनिष्ठ भगिनी अभिजित् अधिकाराचा त्याग करून ज्येष्ठत्वाच्या इच्छेनें तप करण्यासाठीं वनांत निघून गेली. ती देवी ज्येष्ठतेच्या स्पर्धेनें गगनांतून च्युत झाल्यामुळें नक्षत्रसंख्या पूर्ण कशी करावी हें कळेनासें होऊन मी मूढ बनलों आहें. देव तुझें कल्याण करो. हे स्कंदा, तूं ब्रह्मदेवासह या परम कालाचें चिंतन कर.

ज्या नक्षत्राच्या आद्यक्षणीं चंद्र, सूर्य व गुरु यांचा योग असतो त्याला युगादिनक्षत्र म्हणतात. पूर्वीं तें नक्षत्र रोहिणी होतें, पण जेव्हां अभिजित्-नक्ष-

त्राचें पतन झालें तेव्हां एका न्यून अहोरात्रांनीं ' नक्षत्रगणाचा भोग झाल्यानें कृतयुगताचें आदि नक्षत्र धनिष्ठा झालें. त्यामुळें नक्षत्रसंख्या पूर्ण झाली.'

इंद्रानें असें म्हटलें असतां ' कृत्तिकांच्या योगानेंच तूं नक्षत्रसंख्या पूर्ण कर ' हा त्याचा आशय जाणून कृत्तिका स्वर्गांत गेल्या. त्यामुळें वह्नि ज्याची देवता आहे, असें तेंच कृत्तिकानक्षत्र सप्तशीर्षाकार भासतें.

(' कृत्तिका सहा असतांना तें नक्षत्र सप्तशीर्ष कसें भासतें ?') उत्तर—स्वाहेनें ऋषिपत्नींचें रूप जसें धारण केलें होत, तसेंच गरुडीचेंहि घेतलें होतें. म्हणून विनता स्कंदाला म्हणाली—" हे वीरा, तूं माझा पिंडद पुत्र आहेस. यास्तव मीं सतत तुझ्या बरोबर रहाण्याची इच्छा करितें." ( याप्रमाणें गरुडमातेच्या साहचर्यामुळें कृत्तिकांची संख्या सात झाली. )

स्कंद—हे देवि, तुला नमस्कार असो. तुझ्या इच्छेप्रमाणेंच होवो. तूं पुत्रस्नेहानें मला आज्ञा कर. ही तुझी स्नुषा देवसेना तुझा सत्कार करील व तूं नित्य माझ्यासमीप रहाशील.

मार्कंडेय—हे पांडवा, नंतर, सर्व मातृका स्कंदापाशीं येऊन म्हणाल्या—" हे वत्सा, विद्वान् लोक ' आम्ही सर्व लोकांच्या माता आहोंत ' अशी आमची स्तुति करितात. यास्तव आम्हीं तुझ्या माता व्हावें अशी आमची इच्छा आहे. तस्मात् तूं आमचा सत्कार कर."

स्कंद—हे देवतांनो, तुम्ही माझ्या माता आहांत व मी तुमचा तनय आहें. आतां मीं तुमचें कोणतें इष्ट काय करावें, तें सांगा.

मातृका—हे सुरश्रेष्ठा, पूर्वा ब्राह्मी, माहेश्वरी, इत्यादि ज्या लोकमाता कल्पिलेल्या आहेत, त्यांचें स्थान आम्हांला प्राप्त व्हावें व त्यांची त्या स्थानावर सत्ता नसावी. आम्हीं सर्व लोकांना पूज्य व्हावें व त्या वंद्य नसाव्या. तुजसाठीं त्या ब्राह्मीप्रभृतींनीं आमच्या पतींना मिथ्यादोषानें कोपविलें आणि पतींनीं आमचा त्याग केल्यामुळें आम्ही प्रजाहीन झालों आहों. यास्तव हे प्रभो, आम्हांला पतींच्या आनुकूल्यानें संतति होऊं दे.

स्कंद—हे पतिव्रतांनो, मीं जरी प्रार्थना केली तरी ते मुनि तुमचा स्वीकार करणार नाहींत. त्यामुळें तुम्हांला त्यांच्यापासून प्रजा होणें शक्य नाहीं. तुम्ही अन्य कोणत्या प्रजेची इच्छा करीत असल्यास सांगा. म्हणजे मी ती तुम्हांला देईन.

**मातृका**—हे विभो, तुझ्यासह त्या ब्राह्मीप्रभृतींची प्रजा आणि पित्रादि पृथक् पृथक् अधिपति यांना भक्षण करण्याची आम्ही इच्छा करितों; यास्तव तूं तेवढी प्रजा आम्हांला दे.

**स्कंद**—हे देवींनो, तुम्हीं दर्शविलेली प्रजा मी तुम्हांला देतों. परंतु तुमची दुसरी इच्छा पूण होणें कठिण आहे. मी तुम्हांला आदरानें वंदन करितों. तुमचें कल्याण असो. तुम्ही माझ्यासह सव प्रजांचें रक्षण करा.

**मातृका**—हे स्कंदा, तुझें कल्याण असो, तूं दिलेल्या त्या प्रजेचें आम्ही रक्षण करूं. हे प्रभो, आम्हांला तुझा चिरसहवास प्रिय वाटतो.

**स्कंद**—हे मातृगणहो, मनुष्यांची प्रजा सोळा वर्षांची तरुण होईपर्यंत तुम्ही विविधप्रकारचीं रूपें धारण करून त्यांना बाधा करीत जा. मी तुम्हांला आपला अव्यय उग्रपणा अर्पण करितों. त्याच्या योगानें तुम्ही सत्कार पावून परम सुखी व्हाल.

**मार्कंडेय**—कौंतेया, त्यानंतर स्कंदाच्या शरीरांतून एक अग्नीसारखा तेजस्वी पुरुष बाहेर पडला. तो अतिशय उग्र असून मानवांच्या प्रजा भक्षण करण्यासाठीं उत्पन्न झाला होता. तो क्षुधेनें पीडित झाल्यामुळें मूर्च्छित होऊन एकदम भूमीवर पडला. नंतर स्कंदाच्या आज्ञेनें तो उग्रस्वरूपी ग्रह झाला. त्यालाच श्रेष्ठ द्विज 'स्कंदापस्मार' असें म्हणतात.

महाभयंकर विनतेला 'शकुनिग्रह' असें नांव पडलें व 'पूतना'-नामक जी राक्षसी होती तीच 'पूतनाग्रह'-नांवानें प्रसिद्ध झाली. घोररूपी, दारुण व कष्टदायक अशी एक निशाचरी आहे. त्या दारुण आकाराच्या पिशाचीला 'शीतपूतना' म्हणतात. ती घोर रूपा पिशाची मानुषींचे गर्भ हरण करिते. अदितीला 'रेवती' असें नांव आहे. तिचा 'रैवत' हा ग्रह आहे. तोहि घोर महाग्रह बालकांना पीडा देतो.

दैत्याची जी 'दिति'-नामक माता तिला 'मुखमंडिका' म्हणतात. ती दुरासदा बालकांच्या मांसभक्षणानें अतिशय संतुष्ट होते. त्याचप्रमाणें हे कुरु-श्रेष्ठा, जे कुमार व कुमारिका स्कंदापासून उत्पन्न झाले, असें म्हटलें आहे, तेहि गर्भभक्षण करणारे महा ग्रह आहेत. ते सर्व स्कंदाचे कुमार स्कंदकन्यांचेच पति आहेत, असें म्हणतात. ते क्रूर कम करणारे ग्रह बालक जन्म पावतांच त्याचें ग्रहण करितात.

हे नृपते, विद्वान् जिला धेनूची माता सुरभि असें म्हणतात, तिजवर रूढ होऊन 'शकुनि'-ग्रह या लोकीं बालकांना भक्षण करितो. तशीच नमाता 'सरमा'-संज्ञक देवी मानुषींचे गर्भ सर्वदा हरण करिते.

परंतु हे जनाधिपा, वृक्षांची जी 'करंजनिलया'-नामक माता आहे, ती द, सौम्य आणि सर्वदा भूतांवर दया करणारी आहे. यास्तव पुत्रार्थी नर रंज'-वृक्षाला नमस्कार करितात. राजा, यांशिवाय दुसरे अठरा ग्रह आहेत. ना मद्य व मांस प्रिय असून ते दहा दिवस सूतिकागृहांत सतत वास रेतात.

नागमाता कद्रू सूक्ष्मरूपानें गर्भिणीच्या देहांत प्रवेश करून तिचा गर्भ ण करिते, त्यामुळें ती गर्भिणी सर्प प्रसवते. गंधर्वमाता स्त्रियांचा गर्भ ण करून निघून जाते, त्यायोगें गर्भिणीचा गर्भ विलीन झाल्याचें दिसून . 'अरिष्टा'-नामक अप्सरांची माता स्त्रियांच्या शरीरांत प्रवेश करिते व गर्भ ण करून रहाते. त्यामुळें दीर्घकाल प्रसूति होत नाहीं. विद्वान् लोक त्यालाच र्भ स्तब्ध झाला असें म्हणतात.

लोहित समुद्राची जी कन्या लोहितायनी तिलाच स्कंदाची दाई मानली हे. 'कदंब'-वृक्षाच्या ठिकाणीं तिचें पूजन करितात. पुरुषांत जसा रुद्र ी स्त्रियांमध्यें ही आर्या आहे. ही आर्या स्कंदमाता असल्यामुळें कामना- द्धीसाठीं तिचें पृथक् पूजन केलें जातें. याप्रमाणें हे कुमारांचे महाग्रह मीं ग सांगितले. हे ग्रह बालकांना सोळा वर्षेपर्यंत अनिष्ट असतात.

मीं आतां जे मातृगण व पुरुष सांगितले, ते सर्व 'स्कंदग्रह' होत, असें नुष्यांनीं जाणावें. त्या ग्रहांच्या शांतीसाठीं अभिषेक, धूप, अंजन, बलिकर्म, ान आणि विशेषेंकरून स्कंदाचें अर्चन करावें. याप्रमाणें योग्य अर्चन व नस्कारादि यांच्या योगानें पूजन केलें असतां सव ग्रह पुरुषांना आयुष्य, मर्थ्य व शुभफल देतात.

हे राजेंद्रा, आतां मी महेश्वराला नमस्कार करून मनुष्यांचे सोळा वर्षांच्या ल्ले ग्रह कथन करितों, ते ऐक. जो मनुष्य जाग्रतींत किंवा स्वप्नांत देवांना ातो व सत्वर उन्माद पावतो, तो देवग्रह[1] जाणावा. बसल्या जागीं किंवा

१ देवांनीं ज्याच्या देहांत आवेश केला आहे, तो देवग्रह, पितरांनीं आवेश केला पितृग्रह इत्यादि जाणावें.

निद्रेंत पितरांना पहाणारा पितृग्रह होय. सिद्धांचा अवमान करणारा व क्रुद्ध झालेल्या सिद्धांनीं शाप दिला असतां उन्मत्त होणारा मनुष्य सिद्धग्रह समजावा. अनेक प्रकारच्या गंधांचें अवघ्राण व विविध रसांचें पान करून तत्काल उन्मत्त होणारा 'राक्षसग्रह' जाणावा. दिव्य गंधर्व भूलोकीं ज्या नराच्या देहांत प्रवेश करितात, तो मनुष्य तत्काल उन्मत्त होतो, त्याला 'गांधर्वग्रह' असें म्हणतात. नित्य पिशाच पुरुषाला अधीन करून त्याला उन्मत्त बनवितात. त्याला 'पैशाचग्रह' म्हणतात. यक्ष विशिष्ट कालीं पुरुषामध्यें प्रवेश करितो व तत्क्षणीं त्याला उन्मत्त बनवितात, तो 'यक्षग्रह' समजावा.

राजा, जो मनुष्य राग-द्वेषादि दोषांच्या योगानें चित्त मोहित होऊन तत्काल उन्मत्त होतो, त्याला शास्त्रतः योग्य उपाय आहेत. खेद, भय किंवा भयंकर पदार्थांचें दर्शन यांच्यायोगानें मनुष्य सत्वर उन्मत्त होतो. त्यावेळीं त्याचें सान्त्वन करणें हाच त्यांच्या शांतीचा उपाय आहे.

कोणी क्रीडेची इच्छा करितात, कोणी भोगाची, तर कित्येक अपहाराची. असे ग्रहांचे तीन प्रकार आहेत. हे ग्रह मानवांना त्यांच्या वयाच्या सत्तराव्या वर्षापर्यंत पीडा देत असतात. त्यापुढें 'ज्वर' प्राण्यांना ग्रहाप्रमाणेंच पीडा देत असतो. राजा, याप्रमाणें मिथ्या दोपारोपानें ग्रस्त झालेल्याहि स्कंदमातांना बालग्रहत्वादिकांची प्राप्ति झाली. मग साक्षात् दोपाचरण करणाऱ्याविषयीं काय सांगावें! यास्तव सर्व दोपपरिहारार्थ महेश्वराची उपासना करावी.

युधिष्ठिरा, जे पुरुष जितेंद्रिय, दमनशील, शुचिर्भूत, निरलस, आस्तिक व श्रद्धावान् असतात, त्यांना हे ग्रह सर्वदा वर्ज करितात. याप्रमाणें मीं तुला मानवांच्या ग्रहांचें कथन केलें. पण देवाधिदेव महेश्वराच्या भक्तांना हे ग्रह कधीं स्पर्शहि करीत नाहींत. ३.१२.२३०.

---

## अध्याय २३१ वा.

[ १ स्वाहादेवीस स्कंदापासून इष्टवरप्राप्ति. २ श्वेतपर्वतावर कार्तिकेयाचा निवास. ३ शंकराचें भद्रवटाकडे प्रयाण. ४ कार्तिकेयास शंकराचा वर. ५ देव-दानवसंग्राम. ६ कार्तिकेयानें केलेला महिषासुरवध व देवादिकांचें स्वस्थानीं गमन. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे राजा धर्मपुत्रा, याप्रमाणें स्कंदानें मातृगणांचें प्रिय केलें असतां स्वाहादेवी त्याच्यापाशीं येऊन म्हणाली—"हे वत्सा, तूं माझा

औरस पुत्र आहेस, यास्तव तूं माझी एक परम दुर्लभ पण प्रिय कामना पूर्ण करावीस, अशी माझी इच्छा आहे."

त्यावर स्कंदानें 'मी तुझें कोणतें प्रिय करूं?' असें तिला विचारिलें.

**स्वाहा**—हे महाबाहो, मी 'स्वाहा'-नांवाची दक्षाची प्रिय कन्या आहें. बालपणापासून मी सर्वदा अग्नीची कामना करीत आहें. तथापि हे पुत्रा, मी त्याची इच्छा करीत आहें, हे अग्नीला कळलेलें नाहीं. यास्तव मला अग्नीचा शाश्वत सहवास घडावा अशी माझी इच्छा आहे.

**स्कंद**—हे देवि, ठीक आहे. आजपासून सन्मार्गी व सदाचरणी ब्राह्मण अग्नीमध्यें हव्य-कव्यादि ज्या कशाचा होम करण्यास उद्युक्त होतील, तें सर्व 'स्वाहा' असें बोलून अर्पण करितील. त्यायोगें हे शोभने, अग्नि सदैव तुझ्या-सह राहील.

**मार्कंडेय**—राजा, या भाषणानें संतुष्ट झालेल्या त्या स्वाहेचें कुमारानें पूजन केलें आणि तिनें पावकाशीं पतित्वानें युक्त होऊन स्कंदाचा सत्कार केला.

(२) युधिष्ठिरा, त्यानंतर प्रजापति ब्रह्मदेव महासेनाला म्हणाला—"वत्सा, तूं आपला पिता जो त्रिपुरारि महादेव त्याच्याकडे जा. हे कुमारा, रुद्रानें अग्नी-मध्यें व उमादेवीनें स्वाहेमध्यें प्रवेश करून लोकहितासाठीं तुज अपराजित कुमा-राला उत्पन्न केलें. महात्म्या रुद्रानें उमेच्या ठिकाणीं जें वीर्याचें सिंचन केलें, तें या पर्वतावर पडून त्यापासून मिंजिका-मिंजक उत्पन्न झाले. त्या वीर्याचा कांहीं अंश लोहितसागरांत पडला, कांहीं सूर्य किरणांत गेला, कांहीं भूमीवर व कांहीं वृक्षांमध्यें आसक्त झाला. याप्रमाणें तें वीर्य पांच प्रकारें विभागलें. तेथें त्यापासून विविधाकाराचे प्राणी उत्पन्न झाले, असें विद्वान् म्हणतात. हे स्कंदा, तुझे जे हे रक्तप्राशन करणारे घोर पारिषद आहेत, ते तेच होत!"

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून पितृवत्सल महासेनानें आपल्या अप्रमेय महेश्वर पित्याचें पूजन केलें.

राजा, धनार्थी पुरुषांनीं रुयीच्या पुष्पांनीं त्या पंचगणाची पूजा करावी. व्याधीच्या शांतीसाठींहि त्यांची अवश्य पूजा करावी. रुद्रापासून उत्पन्न झालेली मिंजिका व मिजक यांस बालकांचें हित इच्छिणाऱ्या पुरुषानें सर्वदा नमस्कार करावा. 'वृद्धिका' या नांवाच्या मनुष्यमांस भक्षण करणाऱ्या स्त्रिया वृक्षामध्यें उत्पन्न झाल्या आहेत. प्रजार्थी स्त्री-पुरुषांनीं त्या देवीला नमस्कार करावा. याप्रमाणें पिशाचांचे असंख्य गण सांगितले आहेत.

हे पांडवा, आतां पताकेसह घंटेचा जन्म कसा झाला, हें माझ्या मुखानें ऐक. ऐरावताच्या 'वैजयंती'-नामक दोन घंटा प्रसिद्ध आहेत. ऐरावतानें त्या दोन्ही घंटा क्रमानें गुहाला आणून दिल्या. त्यांतील एक लोहिता घंटा विशाखानें व दुसरी पताका स्कंदानें घेतली. देवतांनीं त्याला जीं खेळणीं आणून दिलीं होतीं, त्यांच्याशीं तो महाबलाढ्य देव महासेन क्रीडा करीत असे. देवगण व पिशाचगण यांनीं परिवेष्टित झालेला तो कुमार मेरुपर्वतावर आपल्या कांतीनें प्रकाशत राहिला. शुभ अरण्यांनीं युक्त असलेला तो पर्वतहि त्या वीराच्या योगानें किरणयुक्त आदित्यानें शोभणाऱ्या मंदरपर्वताप्रमाणें शोभला.

प्रफुल्ल संतानक, करवीर, पारिजात, अशोक इत्यादि वनांनीं, कदंबादि वृक्षसमूहांनीं व दिव्य पशु-पक्षिगणांनीं तो श्वेतपर्वत अतिशय शोभला. त्या पर्वतावर मेघांच्या, दिव्य मंगल वाद्यांच्या किंवा क्षुब्ध सागराच्या ध्वनीप्रमाणें ज्यांचा ध्वनि आहे, असे सर्व देवगण व सर्व देवर्षि निवास करीत असत. दिव्य गंधर्व व अप्सरा नृत्य व गान करीत असत आणि हृष्ट झालेल्या भूतांचा फार मोठा नाद ऐकूं येत असे.

याप्रमाणें त्या श्वेतपर्वतावर येऊन राहिलेलें व हृष्ट झालेलें सर्व जगत् इंद्रासह स्कंदाला सतत पहात असे. पण त्याच्या दर्शनानें त्यांची तृप्ति होईना.

( ३ ) हे पांडुपुत्रा, ज्यावेळीं भगवान् अग्निपुत्र महासेनाला सैनापत्याचा अभिषेक केला, तेव्हां हृष्ट झालेला श्रीमान् हर पार्वतीसह आदित्यतुल्य तेजस्वी रथांतून भद्रवटाकडे जाण्यास निघाला. त्याच्या त्या उत्तम रथाला शंभर सिंह जोडले होते. कालानें ज्याला प्रेरणा केली आहे, असा तो सिंहयुक्त रथ शुभ्र आकाशांतून जाऊं लागला. रथाला जोडलेले ते सिंह आकाशाचें आक्रमण करीत व चराचर भूतांना भयभीत करीत वेगानें जाऊं लागले. ते सिंह आकाशांतून संचार करीत असतां त्यांचीं अंगें रोमांचित होऊन त्यांच्या मानेवरील आयाळें उभीं राहिलीं.

इंद्रधनुष्यांनीं युक्त असलेल्या मेघांवर विद्युद्युक्त सूर्य जसा स्थित होतो, तसा त्या रथावर पशुपति उमेसह स्थित झाला व विद्युद्युक्त सूर्याप्रमाणेंच भासला. भगवान् धनेश गुह्यकांसह त्याच्या अग्रभागीं चालला. तो नरवाहन आपल्या 'पुष्पक'-विमानांत बसून त्याच्यापुढें दीर्घकाल चालला होता. इंद्रहि ऐरावतावर बसून देवांसह पुढें जाणाऱ्या वरद वृषभध्वजाच्या मागून चालला.

पुष्पमालांनीं अलंकृत झालेला अमोघ महायक्ष जृंभक-ग्रह, यक्ष व राक्षस यांसह त्याच्या उजव्या बाजूनें चालला होता. त्याच्याहि दक्षिणेस वसु व रुद्र यांसह विचित्र युद्ध करणारे असंख्य देव चालले होते. मृत्यूसह सहस्रावधि घोर व्याधींनीं सर्वतः परिवेष्टित झालेला घोररूप यमहि निघाला. यमाच्या मागून रुद्राचा अलंकृत केलेला व तीन तीक्ष्ण अग्रांनीं युक्त असलेला ‘ विजय ’-नामक शूल चालला.

ज्याच्या हातांत उग्र पाश आहे, असा भगवान् जलेश्वर वरुण विविध जल-जंतूंनीं परिवेष्टित होत्साता हळुहळू निघाला. रुद्राच्या ‘ विजय ’-नामक शूलाच्या मागून त्याचा पट्टिश गदा, मुसल, शक्ति, इत्यादि उत्तमोत्तम आयुधांसह जात होता. त्या पट्टिशाच्या मागून रुद्राचें अति तेजस्वी छत्र, त्याच्यामागून महर्षि-गणसेवित कमंडलु व त्याच्या उजवीकडून तेजस्वी दंड जात असतांना तो फार शोभला.

भृगु, अंगिरा यांसह सर्व देवता त्या दंडाचें पूजन करीत होते. या सर्वांच्या मागून विमल रथावर बसलेला रुद्र सर्व देवांना आनंद देत चालला होता. ऋषि, देव, गंधर्व, भुजग, नद्या, ऱ्हद, समुद्र, अप्सरांचे गण, नक्षत्रें, ग्रह, देवांचे पुत्र व विविधाकार सुंदर ललना त्याच्यावर पुष्पवृष्टि करीत मागून चालल्या होत्या. पिनाकीला नमस्कार करून पर्जन्यहि त्यास अनु-सरला. सोमानें त्याच्या मस्तकावर शुभ्र छत्र धरिलें. अग्नि व वायु त्याच्या-वर चौऱ्या वारूं लागले. राजश्रीनें शोभणारा शक्र सर्व राजांसह त्या वृषभ-ध्वजाची स्तुति करीत त्याच्या मागून चालला होता.

गौरी, विद्या, गांधारी, केशिनी, मित्रसाह्वया व सावित्री या सर्व देवी पार्वतीच्या मागून चालल्या. इंद्रादि देव कवींनीं केलेल्या सर्व स्तुतिपद्यांनीं त्याचें स्तवन करूं लागले. नित्य श्मशानवासी, रुद्रसखा, पिंगल-नामक यक्षेंद्र रुद्रपताका घेऊन पुढें चालला होता. या सर्व परिवारांसह तो भगवान् मोठ्या आनंदानें चालला होता. वस्तुतः त्याच्या अग्रभागीं किंवा पृष्ठतः कोणाचीच गति होत नाहीं. तथापि मानव सत्कर्मांनीं त्या रुद्रदेवाची पूजा करूं शकतात.

कोणी त्याला शिव म्हणतात, कोणी ईश, रुद्र व पितामह म्हणतात. याप्र-माणें अनेक प्रकारच्या भावनांनीं लोक त्याची पूजा करितात. देवसेनांनीं परिवेष्टित झालेला देवसेनापति कृत्तिकापुत्र स्कंदहि त्या देवेशाच्या मागून चालला होता.

( ४ ) त्यानंतर ज्याचा शब्द गंभीर आहे, असा महादेव महासेनास म्हणाला—" हे वीरा, तूं मोठ्या दक्षतेनें सातव्या मारुतस्कंदाचें सतत रक्षण कर."

त्यावर स्कंद म्हणाला—हे प्रभो, मी सातव्या मारुतस्कंदाचें पालन तर करीनच. पण याहून आणखीं कांहीं कार्य असल्यास तेंहि मला सत्वर सांग.

रुद्र—हे पुत्रा, ज्या ज्या वेळीं कांहीं कार्य उपस्थित होईल, त्या त्या वेळीं सर्वदा तूं मला येऊन भेट. तूं भक्तीनें माझें दर्शन घेतलेंस म्हणजे तुला परम श्रेय प्राप्त होईल.

मार्कंडेय—युधिष्ठिरा, महेश्वरानें इतकें बोलून व स्कंदाला आलिंगन देऊन त्याला प्रयाणाची आज्ञा दिली. स्कंद तेथून निघाला असतां भयंकर उत्पात होऊं लागले व त्यामुळें देवांना अकस्मात् मोह पडला. नक्षत्रांसह आकाश प्रज्वलित झालें. सर्व भुवन प्रमूढ झालें. पृथ्वी कांपूं लागली. जगांत अंधकार पसरला. ते दारुण उत्पात पाहून शंकर, उमा, देव व महर्षि क्षुब्ध झाले.

याप्रमाणें ते सर्व प्रमूढ झाले असतां नानाप्रहरणांनीं युक्त आणि पर्वत व मेघ यांसारखें घोर महत्सैन्य पुढें दिसूं लागलें. त्या सैन्यांतील असंख्य वीर भयंकर गर्जना करीत होते. तें दानवसैन्य शंकरासह देवांवर चालून आलें. त्यांनीं देवांवर असंख्य बाणांची वृष्टि केली. पर्वत, शतघ्नी, प्रास, परिघ, गदा यांचा वर्षाव केला. त्यामुळें एका क्षणांत देवांचें सैन्य परान्मुख झालें. वणव्यानें जसें अरण्य दग्ध करावें, तसें असुरांनीं तें देवसैन्य जाळून टाकिलें. त्यामुळें असुराग्नींनीं दग्ध झालेले देवसैन्यांतील वीर महावनांतील दग्ध वृक्षांप्रमाणें भूमीवर पडले. ज्यांचीं मस्तकें व शरीरें छिन्न-भिन्न झालीं आहेत, असे देव दश-दिशांत पळून गेले. त्या महारणांत असुरांच्या हातून वध पावणाऱ्या त्या देवांस आपलें रक्षण करणारा कोणी दिसेना.

तेव्हां देवसैन्य पळून जात आहे, असें पाहून पुरंदर त्यांस धीर देत म्हणाला—" हे शूरांनो, भिऊं नका. शस्त्रें धारण करा व शत्रूंवर चालून जाण्याचा निश्चय करा. तुम्हांला मुळींच व्यथा होणार नाहीं. या दुर्वृत्त व घोर दानवांस जिंका. तुमचें कल्याण असो, मजबरोबर तुम्ही या महासुरांवर चाल करा."

इंद्राचें हें वचन ऐकून देवांना धीर आला व त्याचा अश्रय करून ते दानवांशीं लढूं लागले. सर्व देव, मरुत् आणि वसूंसह साध्य दानवांच्या समोर गेले व क्रुद्ध झालेल्या त्यांनीं त्या दैत्यांवर विविध शस्त्रांचें प्रहार केले. देवांनीं

सोडलेले तीक्ष्ण बाण दैत्यांच्या शरीरांतील रक्त प्राशन करून व त्यांचीं शरीरें फोडून बाहेर पडत असतांना पर्वतांतून निघणाऱ्या सर्पांप्रमाणें शोभले. त्यामुळें बाणांनीं छिन्न-भिन्न झालेलीं दैत्यशरीरें छिन्न अभ्राप्रमाणें भूतलावर सर्वतः पसरलीं. याप्रमाणें सर्व देवगणांनीं भयभीत केलेलें व विविध बाणांनीं विद्ध झालेलें तें दानवसैन्य पराङ्मुख झालें.

तें पाहून सशस्त्र देवांनीं सिंहनाद केले व असंख्य वाद्यें वाजविलीं. राजा, याप्रमाणें देवासुरांचें परस्पर दारुण युद्ध झालें. त्यावेळीं भूमीवर मांस व रुधिर यांचा चिखल झाला. इतक्यांत देवलोकाचा स्त्रीहरणादि अन्याय दृग्गोचर झाला. घोर दानव देवांवर प्रहार करून भयंकर वाद्यें वाजवूं लागले. दानवेंद्रांचे दारुण सिंहनाद ऐकूं येऊं लागले.

नंतर त्या घोर सैन्यांतून 'महिप'-नामक बलाढ्य दानव प्रचंड पर्वत उचलून बाहेर पडला. आदित्याला परिवेष्टित करणाऱ्या मेघांप्रमाणें त्या महिपाला दानवांनीं परिवेष्टित केलें होतें. तो भयंकर राक्षस पर्वत घेऊन आपल्यावर चाल करून येत आहे असें पाहून देव पळूं लागले. तेव्हां त्यांचा पाठलाग करणाऱ्या महिपासुरानें हातांतील पर्वत देवांवर फेकला. त्या वेळीं देवसैन्यावर अकस्मात् पडणाऱ्या त्या पर्वतानें असंख्य देवांना गतप्राण करून भूमीवर पाडलें. सिंह क्षुद्र मृगांवर जसा चवताळून धांवतो, तसा महिपासुर दैत्यसेनेसह देवांवर धांवून गेला. तेव्हां इंद्रासह सर्व देव भयभीत झाले व आयुधादिकांचा त्याग करून पळूं लागले.

त्यामुळें क्रुद्ध झालेला महिप वेगानें रुद्ररथावर चालून गेला व त्यानें त्याच्या रथाची धुरा धरली. याप्रमाणें क्रुद्ध महिपासुर जेव्हां रुद्राच्या रथासमीप येऊन पोंचला, तेव्हां द्यावा-पृथ्वी शब्द करूं लागली. महर्षिगण मोहित झाले व मेघोपम धिप्पाड दैत्य गर्जना करूं लागले. कारण 'आपलाच जय होईल' असें ते निश्चयानें समजत होते. त्या प्रसंगीं भगवान् रुद्रानें त्या सग्रामांत महिषासुरावर प्रहार करून त्या दुरात्म्या राक्षसाचा मृत्यूच, अशा स्कंदाचें स्मरण केलें.

( ६ ) राजा, इकडे भयंकर महिपानेंहि रुद्राचा रथ पाहून घोर गर्जना केली; ती ऐकून देवांना भय व दैत्यांना हर्ष वाटला. तेव्हां देवांच्या पुढें हें घोर भय उपस्थित झालें असतां सूर्याप्रमाणें प्रदीप्त असलेला महासेन तेथें प्राप्त झाला.

हिरण्यकवचानें युक्त असलेल्या त्या प्रभूनें आरक्त वस्त्र धारण केलें होतें. तो महाबाहु रक्तवर्ण मालांनीं भूषित असून त्याचे अश्वहि रक्तवर्णच होते. सुवर्णवत् कांति असलेल्या रथांत तो आदित्यासारखा बसला होता.

हे राजेंद्रा, याप्रमाणें त्या महासेनाला पहातांच तें दैत्यसैन्य संग्रामामध्यें त्याजवर एकदम चाल करून गेलें. त्यावेळीं महाबलाढ्य स्कंदानें महिषाचें विदारण करणारी प्रज्वलित शक्ति सोडली. त्या वीराच्या हातून सुटलेल्या घोर शक्तीनें त्या राक्षसाच्या महत् शिराचा छेद केला व मस्तकाचा भेद होतांच तो महिषासुर गतप्राण होऊन भूमीवर पडला.

राजा, त्या दैत्याचें पर्वतप्राय प्रचंड मस्तक जेव्हां भूमीवर पडलें, तेव्हां उत्तर कुरूंचें सोळा योजनें विस्तीर्ण असलेलें द्वार झांकून गेलें व त्यामुळें त्या द्वारांतून आंत प्रवेश करणें अशक्य झालें. तेव्हांपासून अजूनपर्यंत त्या द्वारानें उत्तरकुरूमध्यें अनायासें प्रवेश करतां येत नाहीं.

युधिष्ठिरा, त्यानंतर महात्म्या स्कंदानें वारंवार सोडलेली ती शक्ति सहस्रावधि शत्रूंचा संहार करून पुनः पुनः स्कंदाच्या हातांत येत आहे, असें देव आणि दानव यांच्या दृष्टीं पडलें. त्या दैत्यसैन्यांतील बहुतेक मुख्य दैत्यांचा बुद्धिमान् महासेनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं वध केला. तेव्हां अवशिष्ट राहिलेले घोर दैत्यगण भ्याले. अजिंक्य स्कंदपारिषदांनीं त्रस्त झालेल्या त्या सहस्रावधि दैत्यांना मारून भक्षण केलें.

याप्रमाणें दानवांना भक्षण करणाऱ्या व त्यांचें रक्त प्राशन करणाऱ्या त्या स्कंदपारिषदांनीं एका क्षणांत जगत् निर्दानव करून सोडिलें. त्यांना परम हर्ष झाला. ज्याप्रमाणें सूर्य अंधकाराचा, अग्नि वृक्षांचा व सूर्य मेघांचा नाश करितो त्याप्रमाणें कीर्तिमान् स्कंदानें आपल्या वीर्यानें शत्रूंस जिंकिलें असतां देवांनीं त्याचें पूजन केलें.

नंतर महेश्वराला अभिवादन करून तो महासेन ज्याचे किरण नभोमंडलांत सर्वत्र पसरले आहेत, अशा आदित्याप्रमाणें शोभला. ज्याचे शत्रु नष्ट झाले आहेत, असा स्कंद जेव्हां महेश्वरापाशीं आला, तेव्हां पुरंदर त्यास आलिंगन देऊन म्हणाला—" हे विजयी महासेना, ज्याला ब्रह्मदेवानें वर दिला आहे व त्यामुळें जो देवांना कस्पटाप्रमाणें मानीत होता, त्या या महिषाख्य देवकंटकाचा तूं नाश केलास. त्याचप्रमाणें ज्या महिषासुरासारख्याच शेंकडों देवशत्रु दान-



" मंत्र-तंत्र, जडी-बुटी, अंगारे-धुपारे इत्यादि उपायांनीं भर्ता स्त्रियांच्या अधीन कदापि होत नसतो." (पृष्ठ १५६.)

यांनीं आम्हांला पूर्वी ताप दिला होता, त्यांनाहि तूं संग्रामांत गतप्राण करून सोडिलेंस. तुझ्या पारिषदांनीं अवशिष्ट राहिलेल्या असंख्य दानवांना भक्षण केलें. तूं प्रभु उमापतीप्रमाणें रणामध्यें शत्रूंना अजेय आहेस. महिषासुराचें मर्दन हें तुझें या लोकीं पहिलें कृत्य म्हणून प्रसिद्ध होईल. या त्रिभुवनांत तुझी अक्षय कीर्ति पसरेल. सर्व देव तुला वश होऊन रहातील."

राजा, महासेनाला असें बोलून, भगवान् त्र्यंबकानें अनुज्ञा दिली असतां शचीपति सर्व देवांसह त्या रणक्षेत्रांतून परत फिरला. रुद्रहि भद्रवटाकडे गेला. पण आपली अनुज्ञा घेऊन परत जाणाऱ्या देवांस तो म्हणाला— " हे देवहो, तुम्ही या स्कंदाला मजप्रमाणेंच पूज्य माना. "

युधिष्ठिरा, याप्रमाणें महर्षींकडून पूजिल्या जाणाऱ्या त्या अग्निपुत्रानें दानवगणांस मारून एकाच दिवसांत सर्व त्रैलोक्य जिंकिलें. जो ब्राह्मण स्कंदाच्या या जन्मवृत्ताचें शांत चित्तानें पठन करील त्याला या लोकीं पुष्टि व परलोकीं स्कंदसालोक्य प्राप्त होईल. ३. १२. २३१.

---

## अध्याय २३२ वा.

[ १ कार्तिकेयाचीं नांवें व स्तुति. २ फलश्रुति. ]

(१) **वैशंपायन**—राजा जनमेजया, सर्व ग्रह स्कंदाच्या अधीन असल्यामुळें त्यांच्या शांतीसाठीं स्कंदाची प्रार्थना करण्याच्या इच्छेनें युधिष्ठिरानें त्याचें नामादिक विचारलें.

**युधिष्ठिर**—हे भगवन्, या महात्म्या स्कंदाचीं जीं नांवें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहेत, तीं सर्व ऐकण्याची माझी इच्छा आहे.

पांडवेया, युधिष्ठिराचा हा प्रश्न ऐकून महातपस्वी भगवान् मार्कंडेय सर्व ऋषींच्या संनिध त्या देवसेनापतीचीं नांवें सांगूं लागला.

**मार्कंडेय**—धर्मराजा, ऐक. आग्नेय[1], स्कंद, दीप्तकीर्ति, अनामय, मयूरकेतु, धर्मात्मा, भूतेश, महिषार्दन, सर्व मनोरथ पूर्ण असल्यामुळें कामजित्, कामद, कांत, सत्यवाक्, भुवनेश्वर, शिशु, शीघ्र, शुचिचंड, दीप्तवर्ण, कन्याभर्ता,

---

१ स्कंद अग्नीचा पुत्र असल्यामुळें अग्निरूप आहे व कन्येच्या विवाहसमयीं जे मंत्र म्हणतात त्यांत 'तृतीयोऽग्निष्टे पतिः' या मंत्रांत अग्नीला कन्येचा तिसरा पति म्हटलें आहे.

शुभानन, अमोघ, अनघ, रौद्र, प्रिय, चंद्रानन, दीप्तशक्ति, प्रशांतात्मा, भद्रकृत्, बालग्रहादि कपटाला मोहित करणारा म्हणून कूटमोहन, षष्ठीप्रिय, धर्मात्मा, पवित्र, मातृवत्सल, विभक्त, स्वाहेय, रेवतीसुत, प्रभु, नेता, विशाख, नैगमेय, सुदुश्चर, सुव्रत, ललित, बालक्रीडनकप्रिय, खचारी, ब्रह्मचारी, शूर, शरवणोद्भव, विश्वामित्रप्रिय, देवसेनाप्रिय, वासुदेवप्रिय, प्रिय आणि प्रियकृत् अशीं कार्तिकेयाचीं दिव्य नांवें आहेत. या नामांचें जो पठन करील त्याला स्वर्ग, कीर्ति व धन यांची प्राप्ति होईल, यांत संशय नाहीं.

**मार्कंडेय**—हे कुरुप्रवीरा, मी आतां त्या देव, ऋषि व शक्ति यांनीं सेवित आणि अप्रमेय अशा षडाननाची त्याच्या नांवांनीं स्तुति करितों, ती श्रवण कर. हे प्रभो, ब्राह्मणभक्त असल्यामुळें ब्रह्मण्य, वेदोक्त गर्भाधानादि संस्कारांनीं उत्पन्न झाल्यामुळें ब्रह्मज, वेदार्थ जाणणारा असल्यामुळें ब्रह्मवित् व तूं कर्म-ब्रह्मरूपामध्यें शयन करणारा म्हणजे कर्म-ब्रह्मनिष्ठ आहेस, म्हणून ब्रह्मेशय, म्हटला जातोस.

तूं ज्ञानवानांत श्रेष्ठ आहेस. कर्मोपासनापर असल्यामुळें ब्रह्मप्रिय आहेस. ब्रह्मवेत्त्यांच्या समान आहेस म्हणून ब्राह्मण, अद्वेष्टृत्वादिरूप गुणांनीं युक्त असल्यामुळें व्रती, त्यामुळेंच ब्रह्मज्ञ व ब्रह्मपदाची प्राप्ति करून देणारा असल्यामुळें ब्राह्मणांचा नेता आहेस. तूंच स्वाहा, स्वधा, परमपवित्र मंत्र व षण्मुखत्वामुळें सहा जिह्वांनीं युक्त आहेस. तूं संवत्सर, सहा ऋतु, अयनें, मास, अर्धमास आणि दिशा आहेस.

तूं कमलनेत्र व कमलमुख असून तुला सहस्रबाहु आहेत. तूं लोकपाल, श्रेष्ठ हवि आणि सर्व सुरासुरांना उत्पन्न करणारा आहेस. तूंच प्रचंड सेनाधिपति असून प्रभु, विभु व शत्रूंना जिंकणारा आहेस. तूं सहस्रावधि प्राण्यांचा स्रष्टा, त्यांना संतुष्ट करणारा व सहस्रावधि पदार्थांचा भोक्ता आहेस. तुला हजारों मस्तकें आहेत. तूं अनंतरूपें धारण करणारा असून तुला असंख्य चरण आहेत. हे शक्तिधर गुहा, तूं स्वतःच गंगा, स्वाहा, पृथ्वी व कृत्तिका यांचा पुत्र झालास.

हे देवा, तूं यथेष्ट नानाप्रकारचीं रूपें धारण करून कुक्कुटाशीं क्रीडा करितोस. हे षण्मुखा, तूंच दीक्षा, सोम, मरुत् व शाश्वत धर्म आणि वायु, पर्वत व इंद्रहि आहेस. हे प्रभो, तूं सनातनाहूनहि शाश्वत व प्रभूंचाहि प्रभु आहेस. तूं उग्र धनुष्य धारण करून सत्याचा प्रवर्तक आहेस. तूं दैत्यांचा अंत करणारा, शत्रूंना जिंकणारा व देवतांमध्यें श्रेष्ठ आहेस.

हे महात्मन्, तूं सूक्ष्म व परम तप असून परावरज्ञ आहेस. धर्म, काम व मोक्ष यांची प्राप्ति तुझ्यापासूनच होत असून हें सर्व विश्व तुझ्या तेजानेंच व्याप्त झालें आहे. हे सुरश्रेष्ठा लोकनाथा, मीं यथाशक्ति तुझी स्तुति केली आहे.

द्वादश नेत्र व बाहु यांनीं युक्त असलेल्या हे देवा, तुला नमस्कार असो. मला तुझ्या स्वरूपाचें याहून अधिक ज्ञान नाहीं.

( २ ) हे धर्मराजा, जो विप्र हें स्कंदाचें जन्मवृत्त शांत चित्तानें पठन करील, किंवा ब्राह्मणांना ऐकवील, किंवा ब्राह्मण पठन करीत असतांना तें जो कोणी तें श्रवण करील, त्याला इहलोकीं धन, आयुष्य, यश, तेज, शत्रुजय, पुष्टि व तुष्टि प्राप्त होऊन अंतीं स्कंदसालोक्य मिळेल. ३. १२. २३२.

येथें बारावें मार्कंडेयसमास्यापर्व समाप्त झालें.

---

# द्रौपदी-सत्यभामासंवादपर्व १३.



## अध्याय २३३ वा.

[ १ सत्यभामेनें द्रौपदीला विचारलेला पतिवशीकरणाचा उपाय. २ द्रौपदीनें असाध्वी स्त्रियांच्या त्या मार्गाचा निषेध करून स्वतःच्या आचरणाचें केलेलें कथन. ३ सत्यभामेनें केलेली क्षमेची प्रार्थना. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, काम्यकवनामध्यें पांडवांना भेटण्यासाठीं आलेला श्रीकृष्ण सत्यभामेसह कांहीं काल तेथेंच राहिला होता. तेव्हां एके दिवशीं ब्राह्मणांसह महात्मे पांडव बसले असतां द्रौपदी व सत्यभामा या दोघी बरोबरच त्या स्थलीं आल्या. त्या दोघी श्रेष्ठ स्त्रिया परस्परांस फार दिवसांनीं भेटल्यामुळें मोठ्या प्रेमानें एकमेकींशीं हास्य-विनोदादि करीत त्या आश्रमांत एकीकडे सुखानें गोष्टी बोलत बसल्या.

त्यांनीं कौरव आणि यादव यांच्या अद्भुत कथा एकमेकींस सांगितल्या. तेव्हां कृष्णाची प्रिय राज्ञी व सत्राजिताची कन्या सत्यभामा पांडवांच्या सम्राज्ञीला असें विचारूं लागली—" हे द्रौपदि, तूं या लोकपालतुल्य बलाढ्य पांडववीरांना कोणत्या उपायानें वश करून घेतलें आहेस ? ते सर्वथा तुझ्या अधीन कसे रहातात व तुझ्यावर रागावत कसे नाहींत ?

हे याज्ञसेनि, पांडव तुझ्यावर अतिशय आसक्त असून ते सर्वदा तुझ्या मुखाकडे पहात असतात, हें मीं तुला अगदीं खरें सांगतें. तेव्हां पतींना वश करून घेण्याचा तुजपाशीं कोणता उपाय आहे, तो मला सांग. हे पांचालि, तूं सोमवारादि व्रतें, पवित्र गंगा-यमुनादिसंगमावरील स्नानें, उपवास इत्यादि तप करितेस, किंवा कामशास्त्रांत वशीकरणार्थ सांगितलेलें भोगकौशल्य व औषधि यांचा उपयोग करितेस, अथवा मंत्र, जप, होम व अंजनादि यांच्या योगानें त्यांना स्वतःच्या अंकित करून घेतलें आहेस ! तुझें हें सौभाग्यवर्धक व्रत मला सांग, म्हणजे मीहि त्यायोगें हा देवकीनंदन नित्य माझ्याच अधीन होऊन राहील, असें करीन."

( २ ) असें बोलून यशस्विनी सत्यभामा स्वस्थ बसली असतां पतिव्रता द्रौपदीनें तिला म्हटलें—"हे भामे, तूं मला हें असाध्वी स्त्रियांचें आचरण विचारीत आहेस ! पण असदाचरणशील असाध्वींच्या मार्गाचें उत्तर मला कसें देतां येणार ! शिवाय तुझ्यासारख्या श्रेष्ठ बुद्धीनें युक्त असलेल्या वासुदेवाच्या प्रिय महिषीच्या मनांत पतीविषयीं असा प्रश्न किंवा संशयहि उद्भवणें योग्य नाहीं. किंवा अशा निंद्य उपायांनीं मीं पांडवांना वश करून घेतलें असेल, अशी तुला शंका येणेंहि उचित नाहीं.

हे सत्यभामे, आपली पत्नी मंत्र-तंत्रादिकांच्या नादीं लागली आहे, असें जेव्हां पुरुषाला कळतें, तेव्हां त्याला घरांत शिरलेल्या सर्पाप्रमाणें तिची भीति वाटूं लागते आणि उद्विग्न झालेल्या पुरुषाला शांति कोठची व शांतीवांचून सुख कोठचें !

[1]मंत्र-तंत्र, जडी-बुटी, अंगारे-धुपारे इत्यादि उपायांनीं भर्ता स्त्रियांच्या अधीन कदापि होत नसतो. उलट त्याचा नाश करण्याची इच्छा करणारे त्याचे शत्रु स्त्रियांच्या अज्ञानाचा उपयोग करून त्यांच्या द्वारा त्यास दारुण रोग उत्पन्न करणाऱ्या मुळ्या किंवा प्राणघातक विष औषधींच्या रूपानें देतात. देव-ऋषींनीं अज्ञ स्त्रियांना दिलेले अंगारे अंगाला लावून व चूर्णें खाऊन पुरुष तत्काल प्राणाला मुकतो, यांत संशय नाहीं.

पापी लोकांच्या अनुरोधानें वागणाऱ्या अनेक मूढ स्त्रिया अशाप्रकारच्या दुष्ट आचरणानें आपल्या पतींना जलोदरानें युक्त, कुष्ठरोगी, वृद्ध, क्लीब, जड,

१ न जातु वशगो भर्ता स्त्रियाः स्यान्मंत्रकर्मणा ॥

अंध, बधिर व रोगग्रस्त करितात. यास्तव हे भामिनि, स्त्रियांनीं पतीला अप्रिय असलेलें आचरण कदापि करूं नये.

हे यशस्विनी, मी महात्म्या पांडवांशीं कशी वागत्यें, तें सर्व तुला सांगत्यें, ऐक. मी अहंकार व काम-क्रोध सोडून पांडवांची त्यांच्या स्त्रियांसह शुद्ध मनानें शुश्रूषा करित्यें. कारण प्रिय पतीसाठीं सपत्नीशींहि प्रेमानें वागणें हें पतिव्रतेचें कर्तव्य आहे. मी ईर्ष्या सोडून व शांत चित्तानें स्वकर्तव्यांत दक्ष राहून निरभिमानानें पतींच्या चित्ताचें रंजन करित्यें. मी दुर्भाषण, असभ्य-पणानें उभें रहाणें, बसणें, चालणें, पहाणें किंवा सांकेतिक नेत्रकटाक्ष करणें इत्यादि सदोष आचरणांनीं माझ्या पतींना केव्हांहि साशंक करीत नाहीं.

हे प्रियवादिनि सत्यभामे, माझे प्रिय पति अतिशय पराक्रमी व प्रतापवान् आहेत. ते सूर्य, अग्नि व चंद्र यांच्या सारखे तेजस्वी असून केवल दृष्टिक्षेपानेंच शत्रूंचा संहार करणारे आहेत. अशा त्या महारथांची मनोभावानें सेवा करून मी त्यांच्या चित्ताचें आकर्षण करित्यें.

देव, गंधर्व, मनुष्य, अलंकारांनीं भूषित असलेला एखादा रूपसंपन्न तरुण, किंवा एखादा धनिक जरी असला तरी तो परपुरुष मला माझ्या पतीहून अधिक प्रिय वाटत नाहीं.

पतींचें स्नान-भोजनादि झाल्यावांचून मी केव्हांहि तें करीत नाहीं. पतींनीं शयन केल्यावांचून शयन करीत नाहीं. इतकेंच नव्हे, तर माझ्या भृत्यादि-कांचेंहि भोजनादि झाल्यावर मी सर्वांच्या मागून भोजन करित्यें व ते सर्व निजल्यावर मग शयन करित्यें.

माझे वीर पति रणक्षेत्रांतून, वनांतून किंवा ग्रामन्तराहून घरीं परत आले असतां मी उठून उभी रहात्यें व त्यांस आसन-उदकादि देऊन त्यांचें अभि-नंदन करित्यें. गृहांतील भांडीं निर्मल ठेवून, योग्यवेळीं त्यांस मिष्टान्नाचें भोजन देत्यें. सडा-संमार्जनानें गृह स्वच्छ ठेवून दक्षतेनें धान्याचें रक्षण करित्यें.

मी तिरस्कारयुक्त भाषण व दुष्ट स्त्रियांचा सहवास कधींहि करीत नाहीं. निरलसपणानें पतींना सदैव अनुकूल होऊन रहात्यें. विनोदाच्या प्रसंगावांचून हंसणें, वारंवार दारांत जाऊन उभें रहाणें, घरांतील उद्यानांत एकटीनेंच विहार करणें इत्यादि असभ्य वर्तनाचा मी तिरस्कार करित्यें.

अतिशय हंसणें, अति क्रोध आणि क्रोधाचें निमित्त यांस मीं वर्ज केलें आहे. मी सर्वदा पतिसेवेंत तत्पर असत्यें. मला पतिवियोग केव्हांहि इष्ट

नसतो. जेव्हां कांहीं कुटुंबकार्यासाठीं पति प्रवासाला जातात, तेव्हां मी पुष्पें, सुगंधी द्रव्यांची उटी इत्यादि सर्व सोडून व्रतचारिणी होऊन रहात्यें. पति जें पेय प्राशन करीत नाहींत, ज्या सेव्य वस्तूचें सेवन करीत नाहींत किंवा जें भक्ष्य भक्षण करीत नाहींत, तें सर्व मीहि वर्ज करित्यें.

हे सुभगे, पूर्वी मला श्रेष्ठ जनांनीं जसा उपदेश केला होता, त्याचप्रमाणें मी नित्य शुचिर्भूत होऊन, सौभाग्यालंकार धारण करून, पतींचें प्रिय व हित करण्यांत तत्पर असत्यें. तसेंच माझ्या प्रिय सासूनें मला श्राद्ध, बलि, भिक्षा, पर्वकाळीं स्थालीपाक इत्यादि कुटुंबांतील जे धर्म सांगितले आहेत आणि मान्य श्रेष्ठांची पूजा, सत्कार इत्यादि जे शिष्टाचार मला माहित आहेत, त्यांचें उल्लंघन मी कधीं करीत नाहीं. तर त्यांस अनुसरून मी रात्रं-दिवस निरलसपणें वागत असत्यें. मी सर्वदा नियमनिष्ठ होऊन माझ्या सौम्य, सत्यशील व सत्यधर्माचेंच पालन करणाऱ्या सज्जन पतींची क्रुद्ध झालेल्या सर्पाप्रमाणें भीति बाळगून विनयपूर्वक परिचर्या करित्यें.

हे भामे, पतीचा[1] आश्रय हाच साध्वी स्त्रियांचा सनातन धर्म आहे, अशी माझी समजूत आहे. स्त्रीचा तोच देव आणि तीच गति आहे. त्याहून अन्य देव किंवा गति नाहीं. मग असें असतांना कोणती साध्वी भार्या आपल्या पतीच्या इच्छेविरुद्ध वागेल ?

मी भोजन व भूषण यांत केव्हांहि पतींचें अतिक्रमण करीत नाहीं. (म्ह० त्यांच्यापेक्षां उत्तम अन्न व उत्कृष्ट वस्त्रालंकारादि यांचें सेवन करीत नाहीं.) मी सर्वदा नियंत्रित राहून आर्या कुंतीची कदापि निंदा करीत नाहीं.

प्रसंगीं मी आपल्या पतींचें कोणतेंहि कार्य सावधान चित्तानें करित्यें. शिवाय गुरुजनांच्या शुश्रूषेंतहि मी नित्य तत्पर असत्यें. त्यामुळें माझे पति मला वश झाले आहेत.

तसेंच, सत्यवादिनी, वीरमाता, आर्या कुंतीचीं स्नान, पान, वस्त्र, भोजन, इत्यादि सर्व कार्यें मी स्वतः करून तिची सतत परिचर्या करित्यें. वस्त्र-भोजनादिकांत मी तिचें केव्हांहि अतिक्रमण करीत नाहीं. किंवा पृथ्वीतुल्य असलेल्या त्या राजमातेची मी केव्हांहि अवज्ञा करीत नाहीं.

---

१ पत्याश्रयो हि मे धर्मो मतः स्त्रीणां सनातनः ।
स देवः सा गतिर्नान्या तस्य का विप्रियं चरेत् ॥

हे पतिव्रते, धर्मात्म्या युधिष्ठिराच्या राजमंदिरांत पूर्वी आठ हजार ब्राह्मण, अठ्ठयायशीं हजार स्नातक व गृहस्थ सुवर्णपात्रांत नित्य भोजन करीत असत. त्या प्रत्येकाच्या सेवेला तीस तीस दासी देऊन धर्मराज त्यांचें पोषण करीत असे. तसेंच, दहा हजार ऊर्ध्वरेत्या यतींनाहि सुवर्णपात्रांतून उत्तम अन्न दिलें जात असे. त्या सर्व वेदवेत्त्या ब्राह्मणांना मी वैश्वदेव होतांच पहिल्या अन्नानें तृप्त करून त्यांचा पान, भोजन व आच्छादन यांच्यायोगानें यथाविधि सत्कार करीत असें.

महात्म्या कुंतीपुत्रांच्या राजगृहांत सुवर्णालंकार, रत्नें, पुष्पमाला व चंदनादि सुवासिक द्रव्यें यांनीं भूषित व नृत्य-गीतविशारद दहा हजार दासी होत्या. त्या सर्वांचीं नांवें, स्वरूप व कार्यें मला माहीत होतीं. त्यांना योग्य भोजन, आच्छादन मिळालें किंवा नाहीं, त्यांनीं कोणतें काम केलें व कोणतें करावयाचें आहे, यांकडे माझें सतत लक्ष असे.

याशिवाय बुद्धिमान् पांडवांच्या दहा हजार दासी रात्रंदिवस हातांत पात्र घेऊन अतिथींना भोजन घालीत असत. इंद्रप्रस्थांत असतांना महाराज युधिष्ठिर सहज बाहेर निघाला तरी त्याच्याबरोबर एक लक्ष अश्व व दहा हजार गज, इतका परिवार असे. धर्मराज पृथ्वीचें पालन करीत असतां त्याच्या आश्रयाला असलेल्या सर्वांची संख्या मी समजून घेत असें व सर्व लहान-थोर अधिकाऱ्यांनीं कोणकोणतीं कामें केलीं व कोणतीं राहिलीं आहेत, हें समजून घेऊन त्यांस इतर योग्य कार्यांतहि मीच नियुक्त करीत असें. अंतःपुरांतील सर्व स्त्रिया, सेवक, गोपाल व धनगरादि या सर्व भृत्यांनीं कोणतें काम केलें व कोणतें केलें नाहीं, यांकडे मी लक्ष ठेवीत असें.

हे यशस्विनि, पांडवांची सर्व संपत्ति, त्यांची प्राप्ति व व्यय यांची माहिती केवल मलाच एकटीला आहे. सुभद्रादि माझ्या इतर सपत्नींना त्यांतील कांहींच अवगत नाहीं. याप्रमाणें माझे प्रिय पति भरतश्रेष्ठ पांडव कुटुंब-व्यवस्थेचा सर्व भार मजवर सोंपवून सदा शस्त्राभ्यास करीत असत. त्यावेळीं दुर्बल व अल्पबुद्धि पुरुषालाहि दुष्कर असलेलें तें सर्व कार्य, मी एकटी आपल्या सुखाचा त्याग करून व रात्रंदिवस झटून पार पाडीत असें.

माझ्या धर्मनिष्ठ पतींचा वरुणाच्या दुधर्ष व निधिपूर्ण सागराप्रमाणें असलेला रत्नकोश मला एकटीलाच ठाऊक होता. मीं त्यांची क्षुधा व तृषा यांचें

निवारण करण्यास अहर्निश तत्पर असत्यें. त्या वीरांची परिचर्या करण्यांत मला दिवस व रात्र सारखींच वाटतात. मी नित्य पतींच्या पूर्वीं उठत्यें व ते निजल्या-नंतर शयन करित्यें.

हे सत्यभामे, माझी ही दिनचर्याच वशीकरण विद्या आहे. हें पतिवशी-करणाचें महत्कार्य मला चांगलें अवगत आहे. यावांचून असाध्वी स्त्रियांचें आचरण मी केव्हांहि करीत नाहीं व त्या निंद्य साधनांची मला इच्छाहि नाहीं."

( ३ ) वैशंपायन—राजा, महाबुद्धिमती पांचालीचें हें धर्मयुक्त भाषण ऐकून सत्यभामा तिचा सत्कार करीत म्हणाली—" हे पतिव्रते द्रौपदि, मला क्षमा कर. मी तुझ्या क्षमेची याचना करित्यें. प्रिय मैत्रिणी आपसांत बुद्धिपूर्व-कच असें विनोदाचें भाषण करीत असतात. त्याप्रमाणें मीं तुला हा थट्टेनें प्रश्न केला होता." ३. १३२. ३३.

---

## अध्याय २३४ वा.

[ १ द्रौपदीचा सत्यभामेला पतिव्रतेच्या कर्तव्याचा उपदेश. ]

(१) द्रौपदी—हे प्रिय सखि, मी तुला आतां पतीचें चित्त वश करून घेण्याचा एक मोहरहित मार्ग सांगत्यें, तो ऐक. त्याप्रमाणें आचरण ठेविल्यास तूं पतीचें मन सपत्नींपासून परतवून स्वतःकडे आकर्षण करून घेशील. हे सत्ये, देवलोकापर्यंत सर्व लोकांमध्यें पतीसारखें अन्य दैवत नाहीं. पति प्रसन्न झाला असतां स्त्रीच्या सर्व इच्छा पूर्ण होतात व तो क्रुद्ध झाला असतां तिच्या सर्व कामनांचा नाश होतो.

स्त्रीला पतीपासूनच अपत्यें, विविध भोग, उत्तम दर्शनीय शय्या, आस-नादि, मूल्यवान् वस्त्रें, भूषणें, सुगंधि द्रव्यें व विपुल कीर्ति यांची प्राप्ति होते. फार काय पण स्वर्गहि त्याच्यामुळेंच लाभतो. या लोकीं सुखानें सुख कदापि प्राप्त होत नाहीं. साध्वी स्त्री दुःख सहन करूनच सुख भोगिते.

यास्तव हे सत्यभामे, तूं स्वदेहाला थोडेसे कष्ट देऊन प्रेमानें व स्नेहानें श्रीकृष्णाची सतत परिचर्या कर. त्याचप्रमाणें सुंदर आसन, सुवासिक पुष्पमाला,

---

१ नैतादृशं दैवतमस्ति सत्ये सर्वेषु लोकेषु सदेवकेषु ।
यथा पतिस्तस्य तु सर्वकामा लभ्या प्रसादात्कुपितश्च हन्यात् ॥
२ सुखं सुखेनेह न जातु लभ्यं दुःखेन साध्वी लभते सुखानि ॥

सुगंधयुक्त विविध द्रव्यें आणि अनुकूल वर्तन यांच्या योगानें वासुदेवाचें प्रेम संपादन कर. ' हिला मी खराच प्रिय आहें ' असें जाणून तो श्रीहरि नित्य तुझ्याच संनिध राहील, असें कर.

दारांत पतीचा शब्द कानीं पडतांच तूं आपल्या मंदिरांतून उठून बाहेर ये आणि त्यानें आंत प्रवेश करतांच पाद्य, आसन इत्यादिकांनीं त्याचा उत्तम सत्कार सत्वर करीत जा. प्रसंगीं दासी कोठें गेली असली, समीप नसली तर तूं स्वतः उठून त्याचें सर्व कार्य कर म्हणजे 'ही मनोभावानें माझी सेवा करीत आहे' असें श्रीकृष्णाला वाटेल व तो तुझ्या अधीन होऊन राहील.

हे मानिनि भामे, पतीनें तुला सांगितलेली एखादी गोष्ट फारशी गुप्त जरी नसली तरी ती तूं दुसऱ्या कोणापाशीं बोलत जाऊं नको, आपल्या मनांतच ठेवीत जा. कारण तुझ्या एखाद्या सपत्नीन ती वार्ता जनार्दनाला सांगितल्यास तुजवर त्याचें प्रेम रहाणार नाहीं.

तुझ्या पतीचे जे स्नेही, त्याच्यावर प्रेम करणारे व त्याचे हितचिंतक असतील त्यांस तूं भोजनादि विविध उपायांनीं संतुष्ट ठेवीत जा आणि पतीचे शत्रु, द्वेष्टे, अहितकर्ते व कपटनिपुण अशा लोकांपासून तूं सदैव दूर रहा. परपुरुषांशीं कांहीं व्यवहार करण्याचा प्रसंग आला असतां तूं यत्किंचित्हि प्रमाद होऊं न देतां, मौन धारण करून, आपल्या मनांतील आशयाचें संयमन कर.

प्रद्युम्न, सांब हे जरी तुझे कुमार आहेत, तरी तूं त्यांच्या जवळहि एकांतांत कधीं बसत जाऊं नको. अतिशय कुलीन व निष्पाप अशा साध्वी स्त्रियांशींच तूं सख्य कर. क्रूर, दुसऱ्याचा पराभव करणाऱ्या, खादाड, चोरी करणाऱ्या, द्वेषादिकांनीं युक्त असलेल्या व चंचल वृत्तीच्या स्त्रियांचा सहवास सर्वथा वर्ज कर. हाच सदाचार यश, भाग्य व स्वार्थ वाढविणारा असून शत्रूचा नाश करणाराहि आहे.

यास्तव हे भाग्यशालिनि, तूं सुगंधी पुष्पमाला व अमूल्य आभरणें धारण करून प्रिय पतीची आराधना कर. ३.१३.२३४.

---

## अध्याय २३५ वा.

[ १ सत्यभामेचें द्रौपदीशीं सान्त्वनपर भाषण. २ श्रीकृष्णाचें भामेसह स्वनगरीस प्रयाण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, त्यानंतर मार्कंडेयादि ऋषि व महात्मे पांडव यांसह अनुकूल गोष्टी बोलत जनार्दनानें कांहीं काल घालविला व

त्यांच्याशीं संभाषणादि करून द्वारकेस परत जाण्यासाठीं रथांत बसतेवेळीं त्यानें सत्यभामेला बोलाविलें.

त्यावेळीं सत्यभामेनें द्रुपदात्मजेला प्रेमानें आलिंगन देऊन असें विचारयुक्त व हृदयंगम भाषण केलें.

सत्यभामा—हे पतिव्रते पांचालि, तूं काळजी करूं नको, खिन्न होऊं नको आणि त्यामुळें जागरणहि करीत जाऊं नको. तुझ्या या देवतुल्य पतींनीं जिंकून घेतलेल्या पृथ्वीची तुला सत्वरच प्राप्ति होईल. तुझ्यासारख्या शील-संपन्न व सुलक्षणी साध्वी स्त्रियांना असले क्लेश फार दिवस भोगावे लागत नाहींत.

या निष्कंटक व प्रतिपक्षरहित भूमीचा तूं पतींसह अवश्य उपभोग घेशील, असें मीं ऐकिलें आहे. हे द्रुपदात्मजे, धृतराष्ट्रपुत्राचा वध करून व वैराचा सूड उगवून ही सर्व पृथ्वी युधिष्ठिराच्या स्वाधीन झाल्याचें तूं पहाशील.

पूर्वीं गर्वानें मोहित झालेल्या ज्या कौरवस्त्रिया वनवासास निघालेल्या तुला हंसल्या होत्या, त्यांचे सर्व मनोरथ भग्न झाल्याचें लवकरच तुला दिसेल. हे कृष्णे, दुःखार्त झालेल्या तुझें ज्यांनीं ज्यांनीं अप्रिय केलें असेल, ते सर्व यम-सदनाच्या मार्गालाच लागले आहेत, असें समज.

प्रतिविंध्य, सोमसुत, अर्जुनाचा पुत्र श्रुतकर्मा, नकुलपुत्र शतानीक आणि सहदेवसुत श्रुतसेन हे सर्व तुझे कुमार अस्त्रविद्येंत प्रवीण झाले असून त्या सर्वांचें कुशल आहे. ते सर्व अभिमन्यूप्रमाणेंच द्वारकेंत अतिशय आनंदांत आहेत. साध्वी सुभद्रा त्या सर्वांशीं तुझ्यासारखीच प्रेमानें वागत असते. त्या सुशील पार्थपत्नीच्या मनांत तुजविषयीं आणि त्या कुमारांविषयीं यत्किं-चित्‌हि द्वेष किंवा भेदभाव नाहीं. उलट ती पुत्रवत्सल सुभद्रा त्यांच्या दुःखानें दुःखी व त्यांच्या सुखानें सुखी होते.

त्याचप्रमाणें हे वीरमाते द्रौपदि, प्रद्युम्नाची जननी रुक्मिणीहि मनोभावानें त्यांचें पालन करीत असते. स्वतः द्वारकाधीशहि भानुप्रभृतींपेक्षां त्यांजवर विशेष प्रेम करितो. माझा श्वशुर त्या सर्वांना योग्य भोजन-आच्छादनादि देण्याविषयीं निरंतर तत्पर असतो. बलरामप्रभृति वृष्ण्यंधक वीरांनाहि ते सर्व कुमार अतिशय आवडतात. त्यांच्यावर त्या सर्वांचें प्रद्युम्नाप्रमाणेंच प्रेम आहे.

(२) याप्रमाणें प्रिय, सत्य व हृदयंगम असें आपलें मनोगत व्यक्त करून सत्यभामा वासुदेवाच्या रथाकडे जावयास निघाली. ती कृष्णभार्या द्रौपदीस

प्रदक्षिणा घालून श्रीकृष्णाच्या रथावर आरूढ झाली. तेव्हां यदुश्रेष्ठ मुकुंदानें स्मित करून पांचालीचें सान्त्वन केलें आणि तो आपले शीघ्रगामी अश्व वळवून द्वारकेस जावयास निघाला. ३. १३. २३५.

( येथें तेरावें द्रौपदी-सत्यभामासंवादपर्व समाप्त झालें. )

# घोषयात्रापर्व १४



## अध्याय २३६ वा.

[ १ पांडवांचे वनांतील क्लेश ऐकून धृतराष्ट्राचे दुःखोद्गार. ]

( १ ) जनमेजय—हे ब्रह्मन्, याप्रमाणें वनांत राहून शीतोष्णादिकांनीं कृश झालेल्या नरश्रेष्ठ पांडवांनीं त्या पवित्र सरोवरासमीप आल्यानंतर काय केलें ?

( जनमेजयाचा हा प्रश्न ऐकून ' दुर्योधनासारख्या द्वेष करणारांचा अपमान होत असतो व युधिष्ठिरासारखे सज्जन शत्रूंवरहि नेहमीं उपकार करीत असतात, ' हें दाखविण्यासाठीं वैशंपायनानें घोषयात्रेचा वृत्तान्त सांगण्यास आरंभ केला. )

वैशंपायन—राजा, त्या सरोवराच्या समीप आल्यावर पांडवांनीं आपल्या बरोबर असलेल्या जनसमुदायाला निरोप दिला व तेथें एक गृह निर्माण करून ते पृथापुत्र रम्य अरण्यें, पर्वत व नद्या, यांतून संचार करूं लागले. याप्रमाणें ते वीर त्या द्वैतवनांत राहूं लागले असतां स्वाध्यायसंपन्न वेदवेत्ते वृद्ध तपस्वी त्यांच्याकडे आले. त्यावेळीं त्या नरश्रेष्ठांनीं त्यांचा सत्कार केला.

इकडे कोणी एक कथा सांगण्यांत कुशल असलेला ब्राह्मण कौरवांकडे गेला व त्यानें यदृच्छेनें विचित्रवीर्यपुत्र धृतराष्ट्राची भेट घेतली. तेव्हां त्या वृद्ध राजानें त्याचा सत्कार केला व सुखासनावर बसलेल्या त्या ब्राह्मणाला धर्मादि पांची भ्रात्यांचा वृत्तान्त विचारला.

तेव्हां ब्राह्मण म्हणाला—हे कुरुसत्तमा, ते पांची भ्राते वारा, उन्ह इत्यादिकांपासून होणाऱ्या क्लेशानें कृश होऊन अतिशय दुःख भोगीत आहेत. त्याचप्रमाणें साध्वी कृष्णेचे वीर नाथ असतांहि ती एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें क्लेश सहन करीत वनवासांतील काल कंठीत आहे.

याप्रमाणें ब्राह्मणमुखानें ते राजपुत्र व राजपौत्र वनवासांतील दुःखनदींत बुडून गेले आहेत, असें ऐकून राजा धृतराष्ट्र कृपेनें आकुल झाला. त्याचें अंतः-करण खिन्न झालें, व कंठ रुद्ध झाला. तेव्हां हें सर्व आपल्याच दुष्कृतींचें फल आहे, असा विचार करून त्यानें मोठ्या यत्नानें वाणीला स्थिर केलें आणि म्हटलें—" अरेरे, माझ्या सर्व पुत्रांत ज्येष्ठ असलेला सत्यनिष्ठ, शुचिर्भूत व सदाचरणी अजातशत्रु धर्मराज जो पूर्वी मऊ शय्येवर निजत असे, तो आज भूतलावरील नुस्त्या अजिनावर कसा शयन करीत असेल ! ज्या इंद्रतुल्य युधि-ष्ठिराला मागध व सूत यांचे समूह स्तुतिपाठानें नित्य जागे करीत असत, त्या भूमीवर शयन करणाऱ्या धर्मात्म्याला वनांतील पक्षिगण आपल्या किलबि-लाटांनीं उत्तर रात्रींच जागा आणीत असतील !

त्याचप्रमाणें वारा व ऊन्ह यांनीं कृश झालेला क्रोधी वृकोदर, अशाप्रकारच्या अनुचित क्लेशांना पात्र नसूनहि द्रौपदीच्या समक्ष भूमीवर कसा बरें शयन करीत असेल ! तसाच सुकुमार अर्जुन अत्यंत विचारी असून तो धर्मराजाच्या आज्ञेंत स्थित असतो. खरोखर भूमीवर पडून त्याचें सर्व अंग ठणकत असेल व क्रोधानें त्याला निद्राहि येत नसेल. उभयतां माद्रीपुत्र, द्रौपदी, युधिष्ठिर व भीम यांना सौख्यापासून वियुक्त झालेलें पाहून तो उग्रतेजस्वी धनंजय सर्पाप्रमाणें फूत्कार टाकीत असेल व त्यायोगें त्याला क्षणभरहि झोंप येत नसेल !

तसेच देवाप्रमाणें रूपसंपन्न असलेले नकुल-सहदेव सुख भोगण्यासच योग्य आहेत. धर्म आणि सत्य यांनीं त्यांचें निवारण केल्यामुळें खरोखर ते क्षुब्ध चित्तानें रात्रीच्या रात्रीं जागून काढीत असतील. वायूप्रमाणें बलवान् असलेला वायुपुत्र ज्येष्ठबंधूच्या धर्मपाशानें जरी बद्ध झाला असला तरी क्रोधानें निश्वास टाकीत असेल व माझ्या पुत्रांच्या वधाची इच्छा करणारा तो भीम धर्म व सत्य यांनीं प्रतिबद्ध होत्साता कालाची प्रतीक्षा करीत भूमीवर संचार करीत असेल !

युधिष्ठिराला द्यूतांत जिंकलें असतां दुःशासनानें जीं कठोर भाषणें केलीं, तीं भीमसेनाच्या मर्मस्थानीं रुतलीं असून वणव्याप्रमाणें त्याच्या अंगाचा दाह करीत असतील. धर्मपुत्र युधिष्ठिर केव्हांहि पापचिंतन करणार नाहीं, धनं-जयहि त्यालाच अनुसरेल, परंतु भीमाचा कोप मात्र वायूनें वाढणाऱ्या अग्नी-प्रमाणें अरण्यवासानें वृद्धिंगत होत असेल. तो क्रोधानें जळणारा वीर हातावर

हात आपटीत असेल व माझ्या पुत्र-पौत्रांना जणुकाय दग्धच करीत दारुण उष्णश्वास टाकीत असेल.

गांडीवधारी अर्जुन आणि वृकोदर हे दोघेहि संहारक अंतकासारखे उग्र आहेत. त्यांच्या अशनितुल्य शरांनीं युद्धामध्यें शत्रुसैन्य निःशेष होऊन जाईल. दुर्योधन, शकुनि, कर्ण व दुःशासन हे सर्व मंदमति कलिपुरुष द्युताचें अवलंबन करून त्यांचें राज्य हरण करीत आहेत. त्यांना मधाचें पोळें दिसत आहे, परंतु पुढील खोल दरी मात्र दिसत नाहीं !! हर हर, काय करावें !!!

खरोखर, पुरुष शुभाशुभ कर्म करितो व त्याच्या फलाची प्रतीक्षा करीत राहतो. कमाधीन झालेला तो स्वर्ग-नरकरूप फलानें मोहित होतो. असला मूढ पुरुष इष्टानिष्ट फलापासून मुक्त कसा होणार !

सुपीक शेतामध्यें पेरलेलें उत्तम बीज उगवलें व वर्षाकालीं देवानेंहि योग्य वृष्टि केली, तरीसुद्धां जेव्हां त्या शेताचें धान्यरूपी फल प्राप्त होत नाहीं, तेव्हां दैवच बलवत्तर आहे, असें म्हणावें लागतें. कारण इतर सर्व दृष्टसामग्री जरी उत्तम असली व दैवप्रतिकूल असलें तर फलप्राप्ति होत नाहीं, असें आपण पाहतों. त्याच न्यायानें वृद्धांचा उपदेश माझ्या व दुर्योधनादिकांच्या चित्तावर न ठसतां तो व्यर्थ होतो.

ज्याला द्यूतांतील फांसेच अतिशय प्रिय आहेत, अशा शकुनीनें सन्मार्गानें प्रवृत्त होणाऱ्या पांडवांशीं कौरवांचें अशुभ होईल असेंच वर्तन केलें आहे. दुष्ट पुत्राच्या अधीन झालेल्या मींहि पांडुपुत्रांशीं ज्याप्रकारें सर्व कौरवांचा अंतकाल समीप येईल असेंच आचरण केलें. वायूला कोणीं प्रेरणा न केली तरी तो वाहणारच, गर्भिणी प्रसूत होणारच, दिवसामागून रात्र येणारच व दिवस उगवतांच रात्रीचा नाश होणारच ! हा सृष्टिक्रम जसा अपरिहार्य आहे, तसेंच पापाचें फलहि अपरिहार्य आहे.

( तर मग तूं पूर्वींच याचा विचार कां केला नाहींस ? उत्तर-) पण मनुष्यांना असा विवेक जर पूर्वींच झाला असता तर आमच्यासारख्या सुज्ञ लोकांनींहि अन्यायानें धन कां संपादन केलें असतें ! (तूं मूर्ख आहेस ! उत्तर-) पूर्वींच्या इतर राजांनींहि वित्त संपादन कां केलें व साधु पुरुषांनींहि संपादिलेल्या धनाचा धर्मादि कार्यांत विनियोग कां केला नाहीं ! तस्मात् वित्त संपादन करून त्याचें रक्षण करण्याची प्राण्यांची स्वाभाविक बुद्धि अपरिहार्य

आहे. ( बरें, द्रव्य संपादनच न केलें तर काय होईल ? उत्तर— ) धनानेंच साध्य असलेल्या विवाहादिकांचा काल प्राप्त झाला असतां निर्धन तरुण व्याकुल होतो. किंवा त्याच्यावर 'मज दैवहीनाला द्रव्य कसें मिळेल ?' असा चिंतारूप अनर्थ ओढवतो.

( बा धृतराष्ट्रा, अन्यायानें हरण केलेली पांडवाची संपत्ति अनर्थकारक आहे, असें जर तुला वाटत असेल तर तुला त्यांचा अंश सहज परत देतां येईल व त्यायोगें नाशाची भीतिहि निवृत्त होईल. उत्तर— ) पुत्राप्रमाणें किंवा पशूप्रमाणें एकाकार होऊन अतिशय प्रिय झालेला अर्थ द्विधा कसा बरें होईल ? शस्त्रानें वेळूचे जसे दोन भाग करतां येतात, त्याप्रमाणें अति प्रिय असलेल्या धनाचा विभाग करतां येणें शक्य नाहीं. यास्तव अपक्क मृत्पात्रांतील जलाप्रमाणें तें हळुहळू झिरपून जाऊं नये व पात्रांतून धार सुरू होऊनहि तें बाहेर पडूं नये, म्हणून मला प्राप्त झालेल्या धनाचें रक्षण केलेंच पाहिजे. पांडवांना त्यांतील अल्पांश किंवा अर्धांश देणें सर्वथा अनुचित आहे. कारण मीं जर त्याचा एकत्र संग्रह केला नाहीं, तर तें शेकडों द्वारांनीं इतस्ततः पसरेल व या लोकीं केलेला सर्व प्रयत्न व्यर्थ होऊन माझ्या सर्व धनाचा नाश होईल ! अर्थनाश हाच महान् अनर्थ होय.

( पण वित्तसंग्रह करूं गेल्यास पुत्रनाश होतो. उत्तर— ) दैवानेंच जर त्यांचा नाश किंवा दुर्गति नियत केली असेल, तर तिचें निवारण कोण करणार ! शिवाय तो अनर्थ अद्यापि दूर आहे आणि त्याच्या भीतीनें आजच पांडवांना त्यांचा विभाग दिल्यास मला प्रत्यक्ष दुःख होईल. शिवाय तुल्यभाग घेणाऱ्या शत्रूंचा उत्कर्षहि दुःसह असतो व माझ्या दायादांचा उत्कर्ष तर उत्तरोत्तर पराकाष्ठेस पोंचत आहे.

धनंजय अरण्यांतूनहि इंद्रलोकीं गेला. पहा, त्याचें केवढें सामर्थ्य ! तेथें चार प्रकारचीं दिव्य अस्त्रें संपादन करून तो वीर या लोकीं पुनः परत आला आहे. याप्रमाणें सशरीर स्वर्गलोकीं जाऊन परत येण्याची इच्छा एका अर्जुनावांचून दुसरा कोणता मानव करील ! स्वर्गांतील स्थानमाहात्म्यामुळें दिव्य ज्ञानानें संपन्न असलेला अर्जुन माझ्या कालोपहत अनेक पुत्रांना आसन्नमरण झालेलें पहात आहे ! धनुर्धर सव्यसाची अर्जुन, महावेगवान् गांडीव धनुष्य व तीं दिव्य अस्त्रें या तिन्हींचें तेज सहन करण्यास या लोकीं कोण समर्थ आहे ! !

याप्रमाणें दुर्योधन समीप नसतांना धृतराष्ट्रानें जे उद्गार काढले, ते सौबल शकुनीनें ऐकले व कर्णाजवळ जाऊन त्यानें ते सर्व त्यास निवेदन केले. तेव्हां तो मंदबुद्धि कर्ण ' पांडवांना त्यांच्या संपत्तीचा अल्पांशहि देणार नाहीं ' ही धृतराष्ट्राची प्रतिज्ञा ऐकून हृष्ट परंतु ' पांडवांच्या हातून कौरवांना मृत्यु प्राप्त होईल ' या भितीनें खिन्नहि झाला. ३.१४.२३६

---

## अध्याय २३७ वा.

[ १ पांडवांना लज्जित करण्यासाठीं द्वैतवनांत जाण्याचा दुर्योधनास कर्णोपदेश.]

(१) वैशंपायन—जनमेजया, धृतराष्ट्राचें तें भाषण शकुनीच्या मुखानें ऐकून कर्ण दुर्योधनाला असें वचन बोलला—" हे भरतश्रेष्ठा, स्वसामर्थ्यानें पांडववीरांना वनवासाला पाठवून तूं स्वर्गांतील इंद्राप्रमाणें या पृथ्वीचा उपभोग घे. तूं पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या दिशांतील सर्व भूपालांना करद केलें आहेस.

पूर्वीं जी देदीप्यमान 'श्री' पांडवांचें सेवन करीत होती, तीच तुझ्या शत्रूंची लक्ष्मी आतां भ्रात्यांसह तुला प्राप्त झाली आहे. हे राजन्, इंद्रप्रस्थांत युधिष्ठिर असतां त्याच्या ठिकाणीं जी देदीप्यमान ' श्री ' आम्हीं पाहिली होती, तीच आतां तुझ्या ठिकाणीं प्रकाशत असलेली दिसत आहे.

हे राजेंद्रा, तुझे शत्रु अल्प कालांतच दुःखानें कृश झाले आहेत. यावरून तुझ्या प्रतिज्ञेप्रमाणें आमच्या सुखाचा काल भरपूर आहे, हेंच दिसून येत. राजा, तूं आपल्या बुद्धिबलानें राजा युधिष्ठिरापासून हरण केलेली श्री तुला प्रकाशित करीत असलेली दिसत आहे. त्याचप्रमाणें ' आम्हीं आपलें कोणतें कार्य करावें ? ' असें बोलणारे हे सर्व नृपति तुझ्या आज्ञेंत स्थित आहेत.

हे राजन्, पर्वत, वन, ग्राम, नगर, आकर, यांनीं युक्त, नाना वनप्रदेशांनीं व्याप्त व पर्वतांनीं शोभणारी ही समुद्रवलयांकित अखिल पृथ्वीदेवी तुझी आहे. त्रैवर्णिकांनीं स्तुति केलेला व राजांनीं सत्कार केलेला तूं आपल्या पराक्रमानें स्वर्गांतील देवांमध्यें प्रकाशमान होणाऱ्या सूर्याप्रमाणें इहलोकीं प्रकाशत आहेस. रुद्रांनीं परिवेष्टित झालेला यम, मरुद्गणांनीं युक्त असलेला इंद्र व नक्षत्रांनीं परिवृत झालेला चंद्र जसा शोभतो, तसा कौरवांनीं आवृत असलेला तूं शोभत आहेस.

हे नृपश्रेष्ठा, जे तुझी आज्ञा मानीत नाहींत व तुझ्या आज्ञेंत रहात नाहींत, त्या ऐश्वर्यहीन वनवासी पांडवांना आपण पाहूं या, चला. ते पांडव अरण्यवासी ब्राह्मणांसह द्वैतवनांतील सरोवरासमीप रहात आहेत, असें ऐकतों. यास्तव हे महाराज, तूं आपल्या परम ऐश्वर्यानें युक्त होऊन सूर्याच्या तेजाप्रमाणें त्या पांडुपुत्रांना ताप द्यावयास तेथें जा. हे राजा, तूं राज्यावर स्थित आहेस व पांडव राज्यापासून च्युत झाले आहेत. तूं ऐश्वर्यानें युक्त आहेस व ते ऐश्वर्यहीन झाले आहेत. तूं समृद्ध असून ते असमृद्ध आहेत. अशा विषम स्थितींत तूं पांडुसुतांची अवश्य भेट घे. ते दीन पांडव नहुषपुत्र ययातीप्रमाणें कुलीन, समृद्ध परिवारानें युक्त व मोठ्या सौख्यांत असलेल्या तुला पाहोत.

हे विशांपते, पुरुषार्थानें देदीप्यमान होणाऱ्या ज्या श्रीला सुहृद् व दुर्हृद् पहातात, तीच श्री सुहृदांना हर्ष व शत्रूंना शोक देण्यास समर्थ असते. पर्वत-शृंगावर स्थित असलेला मनुष्य भूमीवरील प्राण्याला जसा पहातो, तसा समृद्धावस्थेंत असलेला पुरुष विषमावस्थेंतील आपल्या शत्रूला पहातो. त्यावेळीं त्याला होणाऱ्या आनंदाहून अधिक सुख तें कोणतें ? हे राजा, शत्रूचें दुःख पाहून जसें सौख्य होतें, तसें पुत्र, द्रव्य किंवा राज्य यांच्या लाभानेंहि होत नाहीं.

वल्कलें परिधान करून व अजिन पांघरून आश्रमांत स्थित असलेल्या त्या अर्जुनाला पाहून आपल्याला केवढा संतोष होईल व केवढी धन्यता वाटेल, याचा तूं विचार कर.

हे राजेश्वरा, उत्कृष्ट वस्त्रालंकारांनीं भूषित झालेल्या तुझ्या भार्या वल्कलें व अजिनें पांघरलेल्या दुःखित कृष्णेला पाहोत. म्हणजे ती पांडवपत्नी आपल्या विपन्नावस्थेच्या लज्जेनें प्राणत्याग करण्यासहि उद्युक्त होईल. तुझ्या समृद्ध भार्यांना पाहून वैभवापासून च्युत झालेली ती मानिनी कृष्णा स्वतःची व आपल्या जीविताचीहि निंदा करूं लागेल. तुझ्या राजस्त्रियांचें ऐश्वर्य पाहून त्या पांचालराजकन्येला जितकें वैमनस्य वाटेल, तितकें द्यूतप्रसंगीं कौरवसभेंतहि वाटलें नसेल !

**वैशंपायन**—जनमेजया, दुर्योधनाला असें बोलून शेवटीं शकुनीसह कर्ण स्वस्थ बसला. ३.१४.२३७.

---

## अध्याय २३८ वा.

[ १ दुर्योधन, कर्ण व शकुनि यांचा संकेत. २ घोषयात्रारूप उपायाचा निश्चय. ]

( १ ) वैशंपायन—राजा परिक्षिता, कर्णाचें हें भाषण ऐकून दुर्योधनाला संतोष वाटला; परंतु लगेच तो खिन्न होऊन असें दीनवचन बोलूं लागला—

दुर्योधन—हे कर्णा, तूं जें बोलतोस, तें सव माझ्याहि मनांत आहे. परंतु जेथें पांडव आहेत, तेथें जाण्याची अनुज्ञा धृतराष्ट्रराजा मला देणार नाहीं. पृथ्वीपति धृतराष्ट्राला त्या पांडव वीरांविषयीं फार दुःख होत असतें आणि तो मनुजेश्वर पांडवांना तप आणि योग यांत आम्हांहून श्रेष्ठ समजतो. त्यामुळें आमचें मनोगत जरी त्याला कळलें तरी भावी कालाचें रक्षण करण्यासाठीं तो आम्हांला अनुज्ञा देणार नाहीं.

शिवाय, हे बुद्धिमान् कर्णा, त्या वनस्थ पांडवांना पीडा देण्यावांचून आमचें द्वैतवनांत दुसरें कांहींच प्रयोजन नाहीं. जेव्हां द्यूतकाल उपस्थित झाला तेव्हां विदुर तुला, मला व सौबलाला जें वचन बोलला, तें तूं जाणतच आहेस. तीं सर्व वाक्यें व अन्य खेदजनक प्रलाप मनांत आणले म्हणजे त्या शत्रूंना पीडा देण्यास जावें कीं न जावें, याविषयीं माझा कांहींच निश्चय होत नाहीं.

हे वैकर्तना, तुजप्रमाणेंच मलाहि अरण्यांत कृष्णेसह क्लेश भोगणाऱ्या भीमार्जुनांस पाहून परम हर्ष वाटेल. वल्कलाजिनें धारण करणाऱ्या पांडुपुत्रांना पाहून मला जेवढें सुख वाटेल, तेवढें या सर्व पृथ्वीच्या प्राप्तीनेंहि होणार नाहीं. कर्णा, वनामध्यें त्या द्रुपदात्मजेला काषायवस्त्र परिधान केलेली पहाणें याहून अधिक प्रिय तें काय आहे ! परम ऐश्वर्यानें युक्त असलेल्या मला धर्मराज-भीमसेनादि पांडव जेव्हां पहातील तेव्हांच माझ्या जीविताचें सार्थक्य होईल. परंतु ज्यायोगें मला वनांत जातां येईल, असा उपाय दिसत नाहीं.

यास्तव हे बुद्धिमन्, तूं, शकुनी व दुःशासन असे तिघेजण चांगला विचार करा व राजा धृतराष्ट्र आम्हांला वनांत जाण्याची अनुज्ञा देईल, असा उत्कृष्ट उपाय सांगा. मींहि 'वनांत जावें किंवा न जावें,' याचा आज निश्चय करून उद्यां प्रातःकालीं धृतराष्ट्राच्या समीप जाईन आणि मी व कुरुश्रेष्ठ भीष्म तेथें असतांना तूं सौबलासह तेथें ये आणि योजिलेला उपाय त्यांस निवेदन कर. नंतर त्याविषयीं राजा धृतराष्ट्र व भीष्म यांचें वचन ऐकून व पितामह भीष्माचें सान्त्वन करून मी जाण्याचा निश्चय करीन.

( २ ) दुर्योधनाचें हें भाषण ऐकून 'ठीक आहे' असें बोलून ते सर्व आपापल्या निवासस्थानीं निघून गेले. ती रात्र संपून दुसरा दिवस उगवला असतां कर्ण दुर्योधनाकडे आला व हंसतच त्याला म्हणाला—"हे जनाधिपा, मला एक उपाय सुचला आहे, तो ऐक. द्वैतवनांतील सर्व घोष—गवळीवाडे तुझी मार्गप्रतीक्षा करीत आहेत. यास्तव ते सर्व गोव्रज पहाण्याच्या निमित्तानें आपणांस तेथें जातां येईल, यांत संशय नाहीं. हे राजा, आपलें गोधन पहाण्यासाठीं नेहमीं घोष-यात्रेला जाणें उचित आहे. तुझा पिता या कार्याला अनुज्ञा देईल.

याप्रमाणें ते दोघे कर्ण व दुर्योधन घोषयात्रेचा निश्चय करूं लागले असतां गांधारराज शकुनि हंसतच त्यांस म्हणाला—" हे नराधिपा, द्वैतवनांत जाण्यास हा घोषयात्रेचा उपाय मोठा निरामय आहे खरा; या कार्याला धृतराष्ट्र अनुमति देईल, इतकेंच नव्हे, तर उलट बोधहि करील. तुझे सर्व गोव्रज द्वैतवनांतच असून ते तुझी प्रतीक्षा करीत आहेत. तेव्हां आपण घोषयात्रेच्या निमित्तानें निःसंशय तेथें जाऊं "

शकुनीचें हें भाषण ऐकून त्या सर्वांनीं हंसत हंसत परस्परांच्या हातावर टाळी दिली व तसेंच करण्याचा निश्चय केला. ३. १४. २३८.

---

## अध्याय २३९ वा.

[ १ कर्ण व शकुनि यांची राजाला प्रार्थना. २ धृतराष्ट्राची दुर्योधनाला घोषयात्रेला जाण्याची अनुमति. ३ दुर्योधनाचें सपरिवार प्रयाण. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर ते सर्व दुर्योधनादि प्रमुख कौरव धृतराष्ट्राला जाऊन भेटले आणि त्यांनीं राजाचें व राजानें त्यांचें कुशल विचारलें. इतक्यांत दुर्योधनादिकांच्या संकेताप्रमाणें त्यांनीं पूर्वींच योजून ठेवलेला 'समंग'-नामक बल्लव तेथें आला आणि त्यानें राजाच्या समीप जाऊन गोधनाचें वृत्त त्याला निवेदन केलें.

ही संधि पाहून कर्ण व शकुनि नृपश्रेष्ठ धृतराष्ट्राला म्हणाले—" हे महाराज, तुझे सर्व गवळीवाडे सांप्रत रमणीय प्रदेशांत आहेत आणि आपल्या खिल्लारांचें वय, जाति, वर्ण इत्यादिकांची गणना करण्याचा व वासरांना चिह्नित करण्याचा समय प्राप्त झाला आहे, शिवाय मृगयेलाहि हा उचित काल आहे. यास्तव हे राजा, तुझ्या दुर्योधन पुत्राला तेथें जाण्याची अनुज्ञा दे."

(२) धृतराष्ट्र—हे वत्सा, मृगया व गोधनाची पहाणी करणें, हे तुमचे हेतु स्तुत्य आहेत. पण या गोपालांवर विश्वास ठेवणें योग्य नाहीं. कारण पांडवांनीं कदाचित् त्यांचा भेद केला असेल, ते तुम्हांला त्यांच्यापुढें नेऊन उभे करतील व तें तर अतिशय अनिष्ट आहे. ते नरव्याघ्र पांडव तेथें समीपच आहेत, असें आम्हीं ऐकलें आहे. यास्तव तुमच्या गमनास अनुमति देणें मला योग्य वाटत नाहीं.

बाबांनो, आम्हीं त्यांना कपटानें जिंकलें आहे व त्यामुळेंच ते महावनांत क्लेश भोगीत आहेत. ते महारथ तपोनिष्ठ असल्यामुळें अतिशय समर्थ आहेत. त्यांतील धर्मराज केव्हांहि संतप्त होणार नाहीं. परंतु भीमसेन अत्यंत क्रोधी आहे आणि ती याज्ञसेनी तर केवळ अग्नीसारखी प्रखर आहे. शिवाय दर्प व मोह यांनीं युक्त होऊन तुम्ही त्यांचा कांहीं अपराध कराल आणि मग ते तपस्तेजानें युक्त असलेले वीर तुम्हांला दग्ध करतील. अथवा क्रोधसंतप्त झालेले ते महाबाहु आपल्या आयुधांनीं सज्ज होऊन शस्त्रतेजानेंच तुम्हांला जाळून टाकतील.

तुमची संख्या विपुल असल्यामुळें तुम्ही कदाचित् त्यांच्यावर चाल कराल, परंतु तुमचें तें कृत्य अनार्य, परम निंद्य व अशक्यहि आहे असें मला वाटतें. शिवाय महाबाहु धनंजय इंद्रलोकीं राहून तेथें दिव्य अस्त्रें संपादन करून वनांत परत आला आहे. त्या बीभत्सूनें पूर्वीं अस्त्रें प्राप्त झालेलीं नसतांहि जर सर्व पृथ्वी जिंकली तर तो महारथ आतां कृतास्त्र झाला असतां तुमचा वध करील यांत काय आश्चर्य आहे ! अथवा माझें वचन ग्राह्य मानून तुम्ही जर सावध राहिलां तर वनवासांतील क्लेशानें उद्विग्न झालेले सत्यव्रत पांडव कदाचित् तुम्हांला पीडा देणार नाहींत आणि याच विश्वासावर तुम्हीं जरी तेथें वास्तव्य केलेंत, तरी तेंहि दुःखद होईल. कारण आपण पूर्वीं ज्यांना अपकार केला आहे त्यांच्यावर कदापि विश्वास ठेवूं नये, अशी नीति आहे. शिवाय तुमच्या मूढ सैनिकांनीं एखादे वेळीं अबुद्धिपूर्वक जरी युधिष्ठिराला कांहीं अपकार केला, तरी त्या अपकृतीचा दोष तुम्हांवर येईल. यास्तव या वेळीं तुमचे अधिकारी पुरुष गोधनाची गणना करण्यास जावोत. तुम्ही स्वतः तेथें जाणें माझ्या मनाला रुचत नाहीं.

शकुनि—हे भरतश्रेष्ठ राजा, ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर धर्मज्ञ आहे, त्यानें बारा वर्षें वनवास करण्याची राजसभेंत प्रतिज्ञा केली आहे आणि त्याचे इतर धर्माचरणी भ्राते त्याला अनुसरणारे आहेत. यास्तव युधिष्ठिर आम्हांवर केव्हांहि

कोप करणार नाहीं. शिवाय हे महाराज, आम्हांला केवळ मृगयेचीच उत्कट इच्छा आहे. त्याच वेळीं आम्ही गौळीवाड्यांचीहि पाहणी करूं. आम्हांला पांडवांच्या दर्शनाची मुळींच इच्छा नाहीं. आम्ही तेथें कोणतेंहि अयोग्य कार्य करणार नाहीं. किंबहुना ते पांडव जेथें रहातात तेथें आम्ही जाणारहि नाहीं.

( ३ ) वैशंपायन—राजा, शकुनि असें बोलला असतां प्रजापालक धृतराष्ट्रानें दुर्योधनाला अमात्यांसह अनिच्छेनें घोषयात्रेची अनुमति दिली. राजाची अनुज्ञा मिळतांच शकुनि, कर्ण, इतर सर्व परिवार व विपुल सैन्य यांसह दुर्योधन घोषयात्रेच्या मिषानें द्वैतवनांत जावयास निघाला. याप्रमाणें दुःशासनादि भ्राते, बुद्धिमान् सौबलादि सुहृद्, स्त्रिया आणि इतर सहस्रावधि लोकांचा परिवार त्या महाबाहु दुर्योधनाबरोबर द्वैतवनांतील तें प्रसिद्ध सरोवर पहाण्यास निघाला असतां सर्व पौरजनहि स्त्री-पुत्रांसह त्यास अनुसरले.

जनमेजया, त्या कौरवाबरोबर आठ हजार रथ, तीस हजार गज, असंख्य पायदळ व नऊ हजार अश्व होते. तसेच भार वहाणारे शकट, विक्रयाचे पदार्थ, वेश्या, स्तुतिपाठक आणि मृगया करणारे लोक तर सहस्रावधि होते.

याप्रमाणें तो नृपति निघाला असतां वर्षाकालीं वहाणाऱ्या प्रचंड वायूप्रमाणें त्याच्या प्रयाणकालीन वाद्यादिकांचा ध्वनि झाला. नतर राजधानीपासून दोन कोस दूर गेल्यावर दुर्योधनानें पहिला मुक्काम तेथें केला व पुढें तो सर्व वाहनांसह द्वैतवनसरोवराकडे जाण्यास निघाला. ३.१४.२३९.

---

## अध्याय २४० वा.

[ १ दुर्योधनाचें सपरिवार वनगमन. २ गोधनाची पहाणी. ३ मृगया. ४ युधिष्ठिराचा यज्ञ. ५ कौरवांचें सरोवरासमीप गमन. ६ कौरवसैन्याला गंधर्वांनीं केलेला प्रतिकार. ]

( १ ) वैशंपायन—राजा, त्यानंतर दुर्योधनानें मार्गांत मुक्काम करीत करीत वनांत प्रवेश केला व गौळीवाड्यासमीप जाऊन तेथें तळ दिला. तेव्हां राजाज्ञेनें त्याच्या परिवारांनींहि पर्वत, वृक्ष व जल यांनीं समृद्ध असलेल्या रमणीय प्रदेशांत वास्तव्य केलें. त्याचप्रमाणें त्याच्या समीपच कर्ण, शकुनि व इतर धार्तराष्ट्र यांनीं पृथक् पृथक् निवास केला.

( २ ) नंतर त्यांनीं गाईंचे असंख्य कळप पाहिले. चिह्नांकित धेनूंची गणना केली. जवळच असलेल्या वासरांचीं चिह्नें तपासलीं, नवीन जन्मलेल्या बाल-

वत्सांची गणना करून त्यांना चिह्नांकित करविलें आणि तीन वर्षें पूर्ण झालेल्या वृषभांना आपल्या बरोबर घेतलें. याप्रमाणें गोधनाची पहाणी केल्यावर गोपालांनीं परिवेष्टित झालेला दुर्योधन त्या वनांत विहार करूं लागला. त्यावेळीं सर्व सैनिक व पौरजन यांसह दुर्योधनानें त्या अरण्यांत देवाप्रमाणें यथेच्छ क्रीडा केली.

त्याप्रसंगीं नृत्य-वादनकुशल गोप आपल्या अलंकारांनीं भूषित असलेल्या दुर्योधनराजाकडे आले. तेव्हां स्त्रीसमुदायांनीं युक्त असलेल्या त्या धार्तराष्ट्रानें परम संतुष्ट होऊन त्या गोपालांना यथान्याय धन व विविधप्रकारचें अन्नपानादि दिलें व तो मृगयेस निघाला.

( ३ ) राजा, त्या सर्वांनीं मिळून तरस, महिष, मृग, गवे, वराह व इतर हिंस्रपशु यांना चोहोंकडून हुसकून दिलें. त्या वनांतील अनेक गजांना शरांनीं विद्ध केलें आणि त्या रम्यप्रदेशांतील मृगांचें ग्रहण करविलें. नंतर तो कौरव गोरसाचें सेवन करीत, इतर वन्यपदार्थांचा उपभोग घेत व रम्य उपवनें पहात क्रमानें द्वैतवनांतील त्या पुण्यप्रद सरोवरासमीप आला. त्या वनांतील मत्त भ्रमरांनीं सेवन केलेला तो रमणीय प्रदेश मयूरांच्या शब्दांनीं ध्वनित आणि पुन्नाग, बकुल इत्यादि विविध वृक्षांनीं आकिर्ण झाला होता.

( ४ ) जनमेजया, त्या समयीं वज्रधर इंद्राप्रमाणें परम समृद्ध असलेला वनस्थ धर्मपुत्र युधिष्ठिर यदृच्छेनें एक यज्ञ करीत होता. त्या राजर्षीनें वन्य साहित्यानें व दिव्य विधीनें आरंभिलेला तो याग एका दिवसांत समाप्त होणारा होता. त्या धीमान् पांडवानें द्रौपदी व भ्राते यांसह त्या सरोवराच्या समीपच आपलें निवासस्थान केलें होतें.

( ५ ) भरतश्रेष्ठा, त्या वेळीं दुर्योधनानें आपल्या सहस्रावधि सेवकांना तेथें अनेक क्रीडास्थानें निर्माण करण्याची आज्ञा केली. तेव्हां ते ' ठीक आहे ' असें बोलून राजाज्ञेप्रमाणें क्रीडास्थानें तयार करण्यासाठीं द्वैतवन सरोवराकडे गेले. तेथें धार्तराष्ट्राचा सेनापति प्रवेश करीत असतां वनद्वारांतच गंधर्वांनीं त्याला प्रतिबंध केला. कारण चित्ररथ गंधर्व त्या सरोवरांत क्रीडा करण्यासाठीं कुबेरमंदिरांतून येऊन पूर्वींच त्या वनांत राहिला होता. त्या विहारशील गंधर्वाबरोबर इंद्रात्मज जयंतादि अनेक देवकुमार व अप्सरांचा समुदाय होता. त्यांच्या सर्व परिवारांनीं तें सरोवर व्यापून टाकिलें होतें.

याप्रमाणें तें सरोवर गंधर्वगणांनीं व्यापलेलें पाहून दुर्योधनाचे सेवक परत फिरले व त्यांनीं त्या कौरवेश्वराला तें वृत्त निवेदन केलें. सैनिकांचें भाषण ऐकतांच युद्धमदानें मत्त झालेल्या दुर्योधनानें ' त्या गंधर्वांना घालवून द्या, ' अशी आपल्या सैनिकांना आज्ञा देऊन त्यांना परत पाठविलें.

( ६ ) तेव्हां राजाचें तें वचन ऐकून कौरव सेनापति द्वैतवन-सरोवरावर जाऊन गंधर्वांना म्हणाले—" हे गंधर्वहो, धृतराष्ट्राचा पुत्र ' दुर्योधन'-नामक राजा अतिशय बलाढ्य आहे. तो विहाराच्या इच्छेनें येथें येत आहे. यास्तव तुम्ही येथून निघून जा. "

हे पृथ्वीपाला, त्यांचे हे शब्द ऐकून गंधर्व हंसून त्या सैनिकांना असें कठोर वचन बोलले—" तुमचा मंदबुद्धि दुर्योधन राजा देहभानावर नसावा, असें आम्हांला वाटतें. म्हणूनच तो मूढ कौरव आम्हां देवांना कर देणारे वैश्य समजून अशी आज्ञा करीत आहे. आपल्या स्वामीप्रमाणें तुम्हीहि विवेकशून्य व मंदमति आहां. त्यामुळेंच त्याची ही उद्दामपणाची आज्ञा आम्हांला सांगत आहां. यावरून तुम्ही व तो राजाहि मृत्यूचीच इच्छा करीत अहां, असें दिसतें. मूर्खांनो, तुमचा तो कौरवराजा जिकडे असेल तिकडे सत्वर निघून जा. नाहींतर आजच तुम्हांला यमलोकीं जावें लागेल. "

गंधर्वांचें हें भाषण ऐकून ते सर्व सैनिक पळत सुटले व जेथें दुर्योधन राजा होता तेथें गेले. ३. १४. २४०.

---

## अध्याय २४१ वा.

[ १ कौरव व गंधर्व याचें युद्ध. २ कर्णाचें पलायन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, त्यानंतर ते सर्व सैनिक एकत्र जमून दुर्योधनाच्या समीप गेले व त्यांनीं गंधर्वांचे उद्गार राजाला सांगितले. तेव्हां गंधर्वांनीं आपल्या सैन्याचें निवारण केलेलें पाहून प्रतापवान् धार्तराष्ट्र क्रुद्ध झाला व सैन्याला म्हणाला—" सैनिकहो, तेथें सर्व देवांसह साक्षात् शतक्रतु जरी क्रीडा करीत असला, तरी माझें अप्रिय करणाऱ्या त्या सर्व अधार्मिकांना तुम्ही शासन करा. "

महाबलाढ्य दुर्योधनाचें हें वचन ऐकून सहस्रावधि योद्धे सज्ज झाले व सिंहनादानें दशदिशा निनादित करणाऱ्या त्यांनीं सर्व गंधर्वांना दूर सारून

बलात्कारानें त्या प्रदेशांत प्रवेश केला. हे महाराज, गंधर्वांनीं त्या वेळीं सामोपचारानें त्या कुरुसैन्याचें निवारण केलें, परंतु गंधर्वांच्या बोलण्याचा अनादर करून तें प्रचंड सैन्य त्या महावनांत शिरलें.

तेव्हां राजांसह हे कौरव नुस्त्या शब्दांनीं थांबत नाहींत, हें पाहून त्या आकाशगामी गंधर्वांनीं हा सर्व वृत्तान्त चित्रसेनाला निवेदन केला. तो ऐकून गंधर्वराज म्हणाला—"त्या अनार्य कौरवांना शासन करा."

अमर्षी चित्रसेनानें अनुज्ञा देतांच ते सर्व गंधर्व आयुधें घेऊन धार्तराष्ट्रांवर धावून गेले. तेव्हां आयुधें उचलून वेगानें चाल करून येणाऱ्या गंधर्वांना पहातांच दुर्योधनाच्या समक्ष त्याचे सर्व सैनिक पळून गेले. पण कौरवसैन्य पराङ्मुख होऊन पळत सुटलें आहे, असें पाहूनहि वीर राधेय युद्धविमुख झाला नाहीं. उलट त्या राधेयानें आपल्यावर चाल करून येणाऱ्या त्या गंधर्वांच्या महासैन्यावर प्रचंड शरवृष्टि केली व त्या सेनेचें निवारण केलें. त्या चपल सूतपुत्रानें हजारों गंधर्वांना विद्ध केलें. कित्येकांचीं मस्तकें तोडलीं व मोठ्या शौर्यानें एका क्षणांत चित्रसेनाच्या त्या विपुल सैन्याला उधळून लाविलें.

याप्रमाणें कर्णानें संहार चालविला असतां ती गंधर्वसेना सहस्रपटीनें वाढली, चित्रसेनाचें सैन्य महावेगानें धांवून येत असल्यामुळें एका क्षणांत सर्व भूमि गंधर्वांनीं व्यापून गेली. तेव्हां दुर्योधन, शकुनि, दुःशासन, विकर्ण व इतर धार्तराष्ट्र गरुडासारखा घोष करणाऱ्या रथांतून त्या सैन्याचा वध करूं लागले. ते सर्व वीर कर्णाला पुढें करून फार मोठ्या रथसंघानें गंधर्वांशीं घोर युद्ध करूं लागले. वैकर्तनाचें रक्षण करण्याच्या इच्छेनें कौरवांनीं गंधर्वांवर भयंकर शरवृष्टि केली. तेव्हां सर्व गंधर्व कौरवांवर चालून आले व त्यांचा रोमहर्षण संग्राम झाला. कौरवांच्या शरांनीं पीडित झालेले गंधर्व मृदु झाले. त्यांना अतिशय पीडित झालेले पाहून कौरवांनीं उच्च स्वरानें गर्जना केली. पण आपलें गंधर्वसैन्य शत्रूच्या आयुधांनीं त्रस्त झालें आहे, असें पहातांच विजयी चित्रसेन आपल्या आसनावरून उठला आणि विविध युद्धमार्गांत प्रवीण असलेल्या त्या गंधर्वाधिपानें मायास्त्राचा आश्रय करून युद्ध आरंभिलें.

हे राजा, चित्रसेनाच्या त्या मायेनें सर्व कौरव मोहित झाले आणि पूर्वी ज्या एकेका योद्धयानें गंधर्वांच्या दहा दहा योद्धयांशीं युद्ध केलें, तेच कौरव आतां गंधर्वांकडून पीडित होऊन जीव वांचविण्यासाठीं भीतीनें रणांगणांतून पळत सुटले.

(२) हे जनमेया, याप्रमाणें कौरवांसह सर्व सैन्याचा पराभव झाला असतांहि वैकर्तन कर्ण पर्वताप्रमाणें अचल राहिला. अत्यंत क्षतपीडित झालेले दुर्योधन, कर्ण व शकुनि यांनीं रणांत गंधर्वांशीं निकराचें युद्ध केलें. त्या वेळीं वधाची इच्छा करणारे सहस्रावधि गंधर्व एकत्र जमून कर्णावर धाऊन गेले. खड्ग, गदा, प्रास इत्यादि आयुधांनीं युक्त असलेल्या त्या महाबलिष्ठ गंधर्वांनीं सूतपुत्राच्या वधेच्छेनें त्याला सर्वतः घेरलें.

राजा, त्यावेळीं त्यांतील कोणीं त्याच्या रथाची धुरा छेदिली, कोणीं ध्वज पाडिला, कोणीं ईषा तोडिली व कोणीं अश्व व सारथि यांचा वध केला. त्याचप्रमाणें कित्येकांनीं छत्र, रथगुप्ति व रथबंधनें तोडून टाकिलीं. त्या गंधर्वांनीं कर्णाच्या रथाचे तिळाएवढे सहस्रशः तुकडे केले. तेव्हां ढाल व तलवार धारण केलेल्या राधेयानें रथांतून खालीं उडी टाकिली आणि विकर्णाच्या रथावर आरूढ होऊन रणांगणांतून पळ काढण्यासाठीं अश्व परत फिरविले. ३. १४. २४१.

---

## अध्याय २४२ वा.

[ १ गंधर्वांनीं केलेलें दुर्योधनादिकांचें हरण. २ कौरव-अमात्यांची पांडवांस शरणागति. ३ भीमसेनाचें त्यांस उत्तर. ]

( १ ) **वैशंपायन**—हे महाराज, याप्रमाणें गंधर्वांनीं कर्णाचा पराभव केला असतां दुर्योधनाच्या समक्ष सर्व सेना पळत सुटली. तथापि राजा दुर्योधन युद्धपराङ्मुख झाला नाहीं. ती प्रचंड गंधर्वसेना आपल्यावर चाल करून येत आहे, असें पहातांच त्या अरिंदमानें फार मोठा शरवर्षाव केला. परंतु त्याकडे दुर्लक्ष करून त्या गंधर्वांनीं दुर्योधनाच्या वधेच्छेनें त्याच्या रथाला वेढिलें व त्याच्या रथाचा ध्वज, कणा, अश्व, सारथि इत्यादि सर्व भग्न करून त्यांचे तिळाएवढाले तुकडे केले. त्यामुळें विरथ झालेला दुर्योधन भूमीवर पडला. तेव्हां चित्ररथ गंधर्व धांवून आला व त्यानें दुर्योधनाला जीवंत धरिलें.

'आपल्या अधिपतीनें कौरवश्रेष्ठाला जिवंत धरलें आहे' असें पाहतांच इतर गंधर्वांनीं दुःशासनाच्या रथाला वेढा दिला व त्यालाहि धरून ठेविलें. नंतर कांहीं गंधर्व विविंशति-चित्रसेनादि कौरवांना घेऊन पळाले, कित्येकांनीं विंदानुविंद व राजस्त्रिया यांचें हरण केलें व ते सर्व गंधर्व धार्तराष्ट्राच्या सैन्याचा पराजय करून निघून गेले.

( २ ) राजा, याप्रमाणें गंधर्वांनीं स्त्रिया व श्रेष्ठ परिवार यांसह राजा दुर्योधनाचें हरण केलें आहे, असें पाहतांच गंधर्वांकडून पराभूत झालेलें तें सर्व कौरवसैन्य पूर्वींच रणांतून पळालेल्या इतर योद्ध्यांसह पांडवांकडे जावयास निघालें व कौरवांचे अमात्य, शकट, वणिज, इत्यादि अवशिष्ट परिवारांसह पांडवांना शरण आलें.

**सैनिक**—हे पांडवहो, गंधर्वांनीं महाबलाढ्य प्रियदर्शी दुर्योधनाचें हरण केलें आहे. यास्तव हे पार्थहो, तुम्ही त्याच्या साह्यार्थ धांवा. ते दुष्ट गंधर्व दुःशासन, दुर्विषह, दुर्मुख, दुर्जय आणि सर्व राजस्त्रिया यांना सर्वशः बांधून नेत आहेत.

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें दीन व व्याकुल झालेले दुर्योधनाचे अमात्य आक्रोश करीत युधिष्ठिरापाशीं आले व 'गंधर्वांच्या हातून आपल्या राजाला सोडवा,' अशी पांडवांची प्रार्थना करूं लागले.

तेव्हां दीन व व्यथित होऊन युधिष्ठिराजवळ साह्याची भिक्षा मागणाऱ्या त्या वृद्ध कौरव-अमात्यांस भीमसेन म्हणाला—"हे अमात्यहो, आम्हीं अश्वगजादि चतुरंग सैन्य सज्ज करून मोठ्या प्रयासानें जें करावयाचें, तेंच कृत्य गंधर्वांनीं सहज केलें आहे. विपरीत आचरण करणारांचें कर्म असेंच स्वतःवर उलटत असतें. ( दुर्योधन आम्हां निरपराध्यांस पीडा देण्याच्या इच्छेनें येथें आला होता, त्याला हें योग्य शासन मिळालें आहे. ) राजा युधिष्ठिराशीं कपटद्यूत खेळणाऱ्या धार्तराष्ट्राचा आम्हांला आपलें ऐश्वर्य दाखवून अधिक दुःख देण्याचाच निंद्य आशय होता, हें मी जाणून आहें.

विपत्कालीं दुर्बलावस्थेंत असणारांचा जे द्वेष करितात, त्यांचा इतरांकडून नाश होत असतो, असें आम्हीं ऐकलें आहे आणि गंधर्वांनीं या अतिमानुष कृतीनें आम्हांला याचा प्रत्यक्षच प्रत्यय आणून दिला आहे. आम्ही स्वस्थ बसलों असतां आमच्या मस्तकावरील भार उतरून आमचें प्रिय करणारा या लोकीं कोणी तरी वीर आहे, हें खरोखर आमचें मोठें भाग्यच होय !

आम्ही शीत, वात, आतप इत्यादि सहन करीत तपश्चरणानें कृश होऊन येथें वनवासांतील क्लेश भोगीत असतां सौख्यांत असणारा तो दुर्मति आमचें दैन्य पहाण्यासाठीं येथें येणार होता नव्हे ! त्या दुष्टाला योग्य फल मिळालें. जे कोणी त्या अधर्माचरणी दुरात्म्याच्या शीलाचें अनुकरण करतील, त्यांसहि

असाच स्वतःचा पराभव पहावा लागेल आणि ज्या कोणीं त्या दुर्मतीला हें निंद्य आचरण करण्याचें शिक्षण दिलें असेल, त्यानेंहि अधर्मच आचरिला आहे, असें मी तुमच्या तोंडावर सांगतों. कारण आम्ही पांडुपुत्र कदापि निंद्य कर्म करीत नसतों.

जनमेजया, याप्रमाणें भीमसेन क्रोधसंतप्त होऊन जेव्हां अस्पष्ट शब्दोच्चार करीत बोलूं लागला, तेव्हां धर्मात्मा युधिष्ठिर ' वत्सा, निर्दयपणा व्यक्त करण्याचा हा काल नव्हे ' असें त्याला म्हणाला. ३. १४. २४२.

---

## अध्याय २४३ वा.

[१ युधिष्ठिराचा भीमसेनास उपदेश. २ कौरवांना गंधर्वांच्या हातांतून सोडविण्याची अर्जुनप्रतिज्ञा. ]

( १ ) **युधिष्ठिर**—वत्सा भीमा, संकटग्रस्त झालेले हे कौरव भयानें आर्त होऊन आपल्याला शरण आले आहेत. तेव्हां आपल्या आश्रयाला आलेल्या त्यांना असें कसें बोलतोस! बाबारे, ज्ञातीमध्यें परस्पर भेद व कलह होतच असतात, वैरहि उद्भवत असतें, परंतु त्यामुळें कुलधर्म नष्ट होत नाहीं. यास्तव एखादा परका मनुष्य आपल्या कुलांतील लोकांचें अतिक्रमण करूं लागला तर त्या परकियांचें तें कृत्य सज्जन केव्हांहि सहन करीत नाहींत.

आम्ही येथें दीर्घकाल रहात आहों, हें जाणत असूनहि त्या दुर्बुद्धि गंधर्वानें आम्हांला तुच्छ मानून अशाप्रकारें आमचें अप्रिय केलें आहे. बा वृकोदरा, गंधर्वांनीं दुर्योधनाला बलात्कारानें बद्ध केलें व कुरुवंशांतील राजस्त्रियांना स्पर्श केला. त्यामुळें आमच्या कुलाचा नाश झाला आहे. यास्तव हे वीरा, शरणागताच्या परित्राणार्थ व कुलाच्या रक्षणार्थ ऊठ व सज्ज हो. आतां उशीर लावूं नको.

अर्जुन, नकुल-सहदेव आणि अजिंक्य असलेला तूं असे तुम्ही सव नरव्याघ्र जाऊन त्या हरण केल्या जाणाऱ्या दुर्योधनाला मुक्त करा. धार्तराष्ट्रांचे हे सर्व रथ आयुधांनीं समृद्ध, कांचन ध्वजांनीं भूषित व ध्वनियुक्त आहेत. अशा या नित्य सज्ज असलेल्या विमल रथांवर इंद्रसेनादि सारथ्यांसह तुम्ही आरूढ व्हा. या शस्त्रांनीं युक्त असलेल्या रथांनीं समरांगणांत जाऊन गंधर्वांशीं युद्ध करण्यास सज्ज व्हा आणि दुर्योधनाला सोडविण्याचा निरलसपणें प्रयत्न करा.

बा वृकोदरा, एखादा सामान्य क्षत्रियहि शरणागताचें परम यत्नानें रक्षण करीत असतो, मग तुझ्याविषयीं काय सांगावें ! 'धांवा, धांवा, रक्षण करा' असें म्हणत हात जोडून शरण आलेल्या शत्रूचेंहि रक्षण करण्यास कोण तत्पर असतो ! अर्थात् जो बलाढ्य असतो तोच त्याचा रक्षक होण्यास समर्थ होतो. तस्मात् शरणागताचें रक्षण करण्यास समर्थ असणारा दुर्लभ आहे.

हे वीरांनो, वरप्रदान, राज्य व पुत्रजन्म या तीन महद्भाग्यांची व 'शत्रूला क्लेशमुक्त करणें' या एका महत्कृत्याची योग्यता समान आहे. आपद्ग्रस्त दुर्योधन तुमच्या बाहुबलाचा आश्रय करून जीविताची आशा करीत आहे, याहून आणखीं अधिक तें काय पाहिजे ?

वृकोदरा, मीं जर यावेळीं यज्ञ आरंभिलेला नसता तर स्वतःच कौरवांच्या साह्यार्थ धांवून गेलों असतों, त्यांत मुळींच संशय नाहीं. बा भीमा, अगोदर तूं दुर्योधनाला सामानेंच सोडविण्याचा प्रयत्न कर. त्याचप्रमाणें इतर सर्व उपायांनींहि यत्न करा. त्या गंधर्वराजानें सामोपचारानें जर ऐकलें नाहीं, तर मग सौम्य पराक्रमानेंच दुर्योधनाला मुक्त करा. परंतु त्या गंधर्वानें मृदु युद्धानें जर कौरवांना सोडलें नाहीं, तर अन्य उपायांनीं त्या शत्रूचा निग्रह करून धार्तराष्ट्रास सोडवून आणा. भीमसेना, माझें हें यज्ञकर्म चालू असल्यामुळें तुम्हांला केवल या कार्याचा निर्देश करणेंच मला शक्य आहे.

( २ ) **वैशंपायन**—राजा, त्या अजातशत्रु ज्येष्ठ भ्रात्याचें तें वचन ऐकून धनंजयानें कौरवांना मुक्त करण्याची प्रतिज्ञा केली.

**अर्जुन**—हे धर्मराजा, गंधर्वांनीं धार्तराष्ट्रांना सामोपचारानें जर सोडिलें नाहीं तर आज ही भूमि गंधर्वराजाचें रक्त प्राशन करील.

जनमेजया, सत्यवादी अर्जुनाची ती प्रतिज्ञा ऐकून कौरवांचें मन स्वस्थ झालें व त्यांना धीर आला. ३.१४.२४३.

---

## अध्याय २४४ वा.

[ १ पांडवांचा गंधर्वांशीं युद्धारंभ. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजन्, युधिष्ठिराचें भाषण ऐकून प्रसन्नमुख झालेले भीमसेनादि नरश्रेष्ठ सुवर्णाचीं चित्र-विचित्र व अभेद्य कवचें चढवून सज्ज झाले. त्या महारथांनीं विविध दिव्य आयुधें धारण केलीं. त्या वेळीं धनुष्यांसह बाण-

भात्यांनीं युक्त असलेले ते सर्व पांडव ध्वजांनीं शोभणाऱ्या समृद्ध रथांतून चालले असतां प्रज्वलित अग्नीप्रमाणें भासले. नंतर ते नरव्याघ्र उत्तम प्रकारें सज्ज केलेल्या व वेगवान् अश्व जोडलेल्या रथांत बसून शीघ्रगतीनें निघाले. त्याप्रसंगीं कौरवांच्या सैन्यानें फार मोठा सिंहनाद केला.

इकडे विजयी झालेले आकाशचर गंधर्व महारथ पांडव कौरवसेनेसह यत आहेत असें पाहून त्या वनांमध्यें एका क्षणांत निर्भयपणें जमा झाले. त्या रथस्थ चार पांडुनंदनांना पाहून जयानें प्रकाशणारे ते सर्व गंधर्व रणांगणाकडे परत फिरले आणि ते गंधमादनवासी वीर लोकपालांप्रमाणें शोभणाऱ्या पांडव वीरांच्या समोर व्यूह रचून उभे राहिले.

हे महाराज, बुद्धिमान् धर्मराजाच्या उपदेशाप्रमाणें सव्यसाची धनंजयानें प्रथम मृदु युद्ध आरंभिलें. परंतु गंधर्वराजाचे ते मंदमति सैनिक मृदुयुद्धानें वश करून घेणें शक्य नाहीं, हें पाहून परंतप अर्जुन युद्धांत दुर्धर्ष असलेल्या त्या ...र्वांना असें सान्त्व वचन बोलला.

...—हे गंधर्वहो, माझ्या या सुयोधन-भ्रात्याला सोडून द्या.

... पांडवाचें हें वचन ऐकून गंधर्व हंसून म्हणाले—" अरे बाबा, ...ज्ञेनें आम्ही निर्भयपणें संचार करीत असतों, त्या एकट्याचेंच वचन ... या भूलोकीं मान्य करितों. त्यानें आम्हांला जशी आज्ञा केली असेल ...सच आम्ही वागतों. त्या एका सुरेश्वरावांचून आमचा दुसरा कोणी शास्ता नाहीं."

गंधर्वांनीं असें म्हटलें असतां कुंतीपुत्र धनंजय गंधर्वांना पुनः म्हणाला—हे गंधर्वहो, परदारांचें हरण आणि मनुष्यांशीं युद्ध, असलें निंद्य कर्म करणें गंधर्व-राजाला शोभत नाहीं. यास्तव या महावीर्यवान् धार्तराष्ट्रांना आणि या स्त्रियांना धर्मराजाच्या आज्ञेनें मुक्त करा. तुम्हीं सामानें जर या गांधारेयांना सोडलें नाहीं तर मी स्वतःच पराक्रमानें त्यांना मुक्त करीन.

असें बोलून सव्यसाची पार्थानें त्या आकाशचरांवर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला. तेव्हां बलाढ्य गंधर्वांनीं शरांची वृष्टि करीत पांडवांवर चाल केली. याप्र-माणें चपल गंधर्व आणि महावेगवान् पांडव यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. ३. १४. २४४.

---

## अध्याय २४५ वा.

[ १ पांडवांचें गंधर्वांशीं युद्ध. २ चित्रसेनानें अर्जुनाला ओळख दिल्यावर युद्धसमाप्ति. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजन्, त्यानंतर दिव्य अस्त्रांनीं संपन्न असलेले व सुवर्णमाला धारण करणारे गंधर्व प्रदीप्त शरांनीं सर्व बाजूंनीं पांडवांचें निवारण करूं लागले. त्यावेळीं ते चौघे पांडव वीर आणि सहस्रावधि गंधर्व परस्परांवर तुटून पडले असतां त्यांचें तें युद्ध अतिशय अद्भुत भासलें. गंधर्वांनीं कर्ण व दुर्योधन या दोघांच्या रथांचें जसें चूर्ण करून टाकिलें तसेंच या चारी पांडवांचे रथहि भग्न करण्यासाठीं त्यांस शरांनीं आच्छादून टाकिलें. गंधर्वांच्या त्या सहस्रावधि बाणाचा नरव्याघ्र पांडुपुत्रांनीं प्रतिस्वीकार केला. त्यामुळें सर्वतः शरवर्षावानें व्यापून टाकलेले ते आकाशचर पांडवांच्या समीप जाण्यास समर्थ झाले नाहींत.

क्रुद्ध अर्जुनानें अमर्षी गंधर्वांवर नेम धरून दिव्य महास्त्रांचा प्रयोग केला आणि त्या बलाढ्यानें अग्नेयास्त्रानें रणामध्यें सहस्रावधि गंधर्वांना यमसदनीं पाठविलें. त्याचप्रमाणें बलवानांतील श्रेष्ठ भीमानें प्रचंड धनुष्य धारण करून तीक्ष्ण शरांनीं शेंकडों गंधर्वांचा वध केला. उभयतां माद्रेयांनींहि युद्धांत असंख्य शत्रूंना अडवून त्यांचा संहार केला.

याप्रमाणें महारथ पांडवांच्या दिव्य अस्त्रांनीं वध होऊं लागला असतां ते सर्व गंधर्व धार्तराष्ट्रांना घेऊन अंतरिक्षांतून उड्डाण करूं लागले. तेव्हां शत्रु आकाशमार्गानें पळून जात आहे, असें पाहून धनंजयानें सर्व दिशांमध्यें विस्तृत शरजाल पसरलें व त्यांचें निवारण केलें. तेव्हां पिंजऱ्यांतील पक्ष्याप्रमाणें शरजालानें बद्ध झालेले गंधर्व अर्जुनावर क्रोधानें गदा, शक्ति इत्यादिकांची वृष्टि करूं लागले.

परंतु परम अस्त्रवेत्त्या पार्थानें भल्लबाणांनीं त्या गदा-शक्तींचा नाश करून गंधर्वांच्या गात्रांवर प्रहार केले. त्यामुळें त्यांचीं मस्तकें, चरण व बाहु भग्न होऊन खालीं पडत असतां पाषाणवृष्टीचाच भास झाला व शत्रु भयभीत झाले.

याप्रमाणें भूमिस्थ अर्जुन अंतरिक्षांतील गंधर्वांचा संहार करूं लागला असतां त्या आकाशचरांनींहि उलट त्या महात्म्या पार्थाला शरवृष्टीनें आच्छादित केलें. तेव्हां परंतप सव्यसाचीनें अस्त्रांनीं शरवृष्टीचें निवारण करून गंधर्वांना उलट

विद्ध केलें. शेवटीं तेजस्वी कौंतेयानें स्थूणाकर्ण, इंद्रजाल, सौर आणि आग्नेय या सौम्य अस्त्रांचा प्रयोग करून जेव्हां बाण सोडिले तेव्हां शक्रानें त्रस्त केलेल्या दैत्यांप्रमाणें कुंतीपुत्राच्या शरांनीं तप्त होणारे ते गंधर्व अतिशय खिन्न झाले. ते आकाशचर वर जाऊं लागले असतां सव्यसाचीनें शरजालानें त्यांचा मार्ग रुद्ध केला व ते दिशांमध्यें संचार करूं लागले असतां भल्लबाण सोडून त्यांचें निवारण केलें.

हे राजा, याप्रमाणें कुंतीपुत्रानें गंधर्वांना त्रस्त करून सोडलेलें पहातांच चित्रसेन गदा घेऊन सव्यसाचीवर धांवला; परंतु हातांत गदा घेऊन येणारा तो गंधर्वाधिपति समीप येण्यापूर्वींच अर्जुनानें तीक्ष्ण शर सोडून त्याच्या लोखंडी गदेचे सात तुकडे केले. तेव्हां वेगवान् धनंजयानें आपल्या गदेचे अनेक तुकडे केलेले पाहून, तो चित्रसेन आपल्या अदृश्य विद्येचा आश्रय करून पांडवांशीं युद्ध करूं लागला. परंतु वीर अर्जुनानें त्याच्या दिव्य अस्त्रांचें दिव्य अस्त्रांनींच सर्वशः निवारण केलें.

याप्रमाणें महात्म्या धनंजयानें अस्त्रांनींच अस्त्रांचें निवारण केलें असतां बलवान् गंधर्व अंतर्धान पावला. तेव्हां गुप्त होऊन प्रहार करणाऱ्या गंधर्वाला अनुलक्षून अर्जुनानें दिव्यास्त्रानें अभिमंत्रित केलेल्या आकाशगामी बाणांनीं त्याला ताडन केलें. क्रुद्ध झालेला धनंजय शब्दवेधाचा आश्रय करून त्या अंतर्हित गंधर्वाला वेध करूं लागला.

(२) तेव्हां महात्म्या अर्जुनाच्या अस्त्रांनीं विद्ध होणारा तो पार्थाचा प्रिय सखा चित्ररथ त्याच्यापुढें प्रकट झाला व म्हणाला—“ हे वीरा, हा मी तुझा सखा चित्रसेन तुझ्याशीं युद्ध करीत आहें, तूं मला ओळखलें नाहींस का ? ”

गंधर्वाचे हे शब्द ऐकून हा आपला सखा चित्रसेन युद्धांत दुर्बल झाला आहे, हें पाहून धनंजयानें सोडलेल्या सर्व अस्त्रांचा उपसंहार केला. पार्थानें आपल्या दिव्य अस्त्रांचा उपसंहार केला आहे, असें पाहून भीमसेन, माद्रीपुत्र व चित्रसेन यांनींहि धांवणारे अश्व आणि धनुष्यांचें वेगवान् शर थांबविले. नंतर त्या सर्वांनीं आपापल्या रथांत बसूनच परस्परांचें कुशल विचारिलें. ३.१४.२४५.

---

## अध्याय २४६ वा.

[ १ अर्जुनाचा चित्रसेनाला प्रश्न व त्याचें उत्तर. २ धर्मराजापाशीं सर्वांचें गमन. ३ युधिष्ठिराची दुर्योधनाला उपदेशपूर्वक स्वस्थानीं जाण्याची अनुज्ञा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्यानंतर महाद्युतिमान् व श्रेष्ठ धनुर्धर पार्थ गंधर्वसैन्यामध्यें स्थित असलेल्या चित्रसेनाला हंसतच म्हणाला—" हे वीरा, कौरवांना धरून नेण्यांत तुझा काय आशय आहे ? या दुर्योधनाचें स्त्रियांसह तूं कां ग्रहण केलेंस ? "

**चित्रसेन**—हे धनंजया, तुम्ही वनामध्यें अनाथांप्रमाणें क्लेश भोगीत असतां तुम्हांला स्वतःचें ऐश्वर्य दाखवून तुमची भेट घ्यावी आणि यशस्विनी द्रौपदीचा उपहास करावा, असा या दुरात्म्या दुर्योधनाचा व पापी कर्णाचा दुष्ट आशय होता. त्यांचा हा संकेत जाणून सुरेश्वर इंद्र मला म्हणाला— " चित्रसेना जा, आणि दुर्योधनाला अमात्यांसह बांधून आण. भ्रात्यांसह धनंजयाचें मात्र तूं रणांत रक्षण कर. तो पांडव तुझा सखा व शिष्य आहे. "

अर्जुना, याप्रमाणें देवराजाच्या आज्ञेनें मी येथें त्वरेनें आलों आहें. माझें इष्ट काय झालें. आतां मी या दुरात्म्याला बांधून पाकशासनाच्या आज्ञेनें इंद्रलोकीं घेऊन जातों.

**अर्जुन**—हे चित्रसेना, हा सुयोधन आमचा भ्राता आहे, यास्तव तुला जर माझें प्रिय करण्याची इच्छा असेल तर धर्मराजाच्या आज्ञेनें याला सोडून दे.

**चित्रसेन**—हे धनंजया, हा पापी व मत्त दुर्योधन धर्माचें अतिक्रमण करणारा आहे. यानें धर्मराज व पांचाली यांची वंचना केली आहे. हा क्षमेला किंवा सोडून देण्यास पात्र नाहीं. संपन्न स्थितींत असलेल्या या धार्तराष्ट्राचा विपदावस्थेंत असलेल्या तुम्हां पांडवांना भेटण्याचा निंद्य आशय धर्मराजाला ठाऊक नसेल. यास्तव आपण सर्व युधिष्ठिरापाशीं जाऊन त्याला हें सर्व वृत्त निवेदन करूं या. तें ऐकल्यावर धर्मराज जसें सांगेल तसेंच मी करीन.

( २ ) **वैशंपायन**—राजा, असें बोलून ते सर्व युधिष्ठिरापाशीं आले व त्यांनीं दुर्योधनाचें सर्व कृत्य त्यास कथन केलें. अजातशत्रु युधिष्ठिरानें गंधर्वांचें तें वचन ऐकून सर्व धार्तराष्ट्रांना मुक्त केलें आणि गंधर्वांची प्रशंसा केली.

**युधिष्ठिर**—हे गंधर्वहो, तुम्ही सर्व महाबलाढ्य व समर्थ वीरांनीं या दुराचरणी दुर्योधनाचा बांधव आणि अमात्य यांसह वध केला नाहींत, हें

खरोखर महद्भाग्य होय. तुम्ही आकाशचरांनीं मजवर हा मोठा उपकारच केलात. या दुरात्म्याला तुम्हीं मुक्त केलेंत म्हणून आमच्या कुलाचा पराभव झाला नाहीं. आतां तुम्हांला जे वस्त्रालंकार इष्ट असतील त्यांची मला आज्ञा करा. मी ते तुम्हांला अर्पण करीन. तुमच्या दर्शनानें आम्हांला मोठा संतोष झाला. आपले सर्व मनोरथ पूर्ण करून घेऊन तुम्ही आतां सत्वर मार्गस्थ व्हा.

याप्रमाणें बुद्धिमान् पांडुपुत्रानें अनुज्ञा दिली असतां ते सर्व चित्रसेनप्रभृति गंधर्व अप्सरागणांसह संतुष्ट होऊन परत गेले. नंतर देवराज इंद्रानें युद्धांत कौरवांनीं संहार केलेल्या सर्व गंधर्वांना दिव्य अमृतवृष्टीनें सजीव केलें.

( ३ ) इकडे पांडवहि अशा दुष्कर कर्मानें आपली ज्ञाति व राजस्त्रिया यांना मुक्त करून परम संतुष्ट झाले. त्यावेळीं स्त्री-पुत्रांसह कौरवांनीं सत्कार केलेले ते महारथ पांडव यज्ञांतील अग्नीप्रमाणें शोभले. त्यानंतर बांधवांसह मुक्त झालेल्या दुर्योधनाला युधिष्ठिर प्रेमानें म्हणाला—" अरे बाबा, अशाप्रकारचें साहस तूं पुनः करूं नको. कारण अशा साहसिकाला सुख कधींहि प्राप्त होत नाहीं. सुखानेंच सुख वाढत असतें. आतां तूं आपल्या भ्रात्यांसह सुखी हो आणि इच्छेस येईल तेव्हां परत जा. यापुढें कोणाशीं असें वृथा वैर करूं नको. "

वैशंपायन—याप्रमाणें पांडवांनीं जाण्याची अनुज्ञा दिली असतां दुर्योधन धर्मराजाला अभिवादन करून व मनांत अत्यंत विकल होऊन तेथून निघाला. तो लज्जेनें व्यथित होऊन आपल्या नगरीस परत गेला. कौरव निघून गेले असतां तपोनिष्ठ द्विजांनीं भ्रात्यांसह धर्मराजाचा सत्कार केला. तेव्हां तो उदार पांडवाग्रज देवांनीं परिवेष्टित झालेल्या शक्राप्रमाणें शोभला. पुढें ते वीर द्वैत-वनामध्येंच मोठ्या आनंदानें विहार करूं लागले. ३.१४.२४६

---

## अध्याय २४७ वा.

[ १ दुर्योधनाचा मार्गातील निवास. २ कर्णानें केलेली त्याची स्तुति. ]

( १ ) जनमेजय—हे ब्रह्मन्, दुरात्म्या मानी दुर्योधनाला शत्रूंनीं जिंकून बांधून नेलें असतां महात्म्या पांडवांनीं युद्ध करून त्यास शत्रूंपासून सोडविलें खरें, पण त्यानंतर त्या आत्मश्लाघी, पापाशयी, अतिशय गर्विष्ठ व त्यामुळेंच स्वतःचा पराक्रम व औदार्य यांनीं पांडवांचा अवमान करणाऱ्या, नित्य अहंकारवादी दुर्योधनाला हस्तिनापुरांत प्रवेश करणें दुःसह झालें असेल, असें मला वाटतें.

त्या लज्जित व शोकाकुल झालेल्या धार्तराष्ट्रानें स्वनगरींत प्रवेश कसा केला, तें मला सविस्तर कथन कर.

**वैशंपायन**—राजा, धर्मराजानें निरोप दिल्यावर सुयोधन लज्जेनें अधोमुख होऊन व दुःखानें खिन्न होऊन आपल्या चतुरंग सैन्यासह स्वनगरीस परत येण्यास निघाला. तो शोकग्रस्त चित्तानें झालेल्या पराभवाचा विचार करीत होता.

( २ ) त्यानें मार्गामध्यें तृण व जल यांनीं युक्त असलेल्या प्रदेशांत आपलीं वाहनें सोडिलीं आणि रम्य व उत्कृष्ट अशा स्वोचित स्थलीं गज-अश्वादिकांसह मुक्काम केला. ती रात्र क्षीण झाली व राहूनें ग्रासलेल्या चंद्राप्रमाणें निस्तेज दिसणारा दुर्योधन देदीप्यमान पर्यंकावर बसला असतां कर्ण त्याच्यापाशीं आला व म्हणाला—" हे गांधारेया, तूं जिवंत असून आम्हांला पुनः भेटलास हें महद्भाग्य होय. खरोखर, तूं त्या कामरूपी गंधर्वांना जिंकलेंस ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. आज मी तुझ्या सर्व विजयेच्छु महारथ भ्रात्यांनीं संग्रामांत शत्रूंना जिंकलेलें पहात आहें, हें केवढें भाग्य !

हे राजा, तुझ्या समक्षच सर्व गंधर्वांनीं मजवर चाल केल्यामुळें उधळलेलें सैन्य मला आवरतां येणें अशक्य झालें आणि मीं शरांच्या क्षतांनीं अतिशय पीडित झाल्यामुळें रणांतून पळ काढला. हे भरतश्रेष्ठा, तुम्ही त्या अतिमानुष युद्धांतून सर्व स्त्रिया, सैनिक व वाहनें यांसह क्षतरहित व सुरक्षित बाहेर पडून मुक्त झालांत, हें मोठेंच आश्चर्य आहे. खरोखर हे महाराज, तूं आज युद्धांत भ्रात्यांसह जें असामान्य कार्य केलेंस, तसलें महत्कृत्य करणारा या लोकीं मला तुजवांचून दुसरा कोणीही मानव दिसत नाहीं. "

**वैशंपायन**—राजा, कर्णाचें हें भाषण ऐकून दुर्योधनाचा कंठ दाटून आला व तो सद्गदित वाणीनें त्या अंगाधिपाला असें म्हणाला. ३.१४. २४७.

---

## अध्याय २४८ वा.

[ १ दुर्योधनानें युद्धाचा वृत्तान्त सांगण्यास केलेला आरंभ. ]

( १ ) **दुर्योधन**—हे राधेया, तुला खरा वृत्तान्त माहीत नाहीं, म्हणूनच तुझ्या या भाषणाबद्दल मी तुला दोष देत नाहीं. मीं आपल्या पराक्रमानें गंधर्वांना जिंकलें, असेंच तूं समजत आहेस. परंतु वस्तुतः तसा प्रकार घडला नाहीं. कर्णा, मीं भ्रात्यांसह गंधर्वांशीं बराच वेळ युद्ध केलें. त्यांत उभयपक्षांचाहि नाश

झाला. पण मायायुद्धांत श्रेष्ठ असलेल्या त्या शूरांनीं जेव्हां अंतरिक्षांतून युद्ध आरंभिलें, तेव्हां त्या आकाशचरांशीं आम्हांला त्यांच्या बरोबरीनें युद्ध करतां येईना. त्यामुळें शेवटीं आमचा पराजय झाला व त्या शत्रूंनीं आमच्या सर्व परिवारांसह स्त्री-पुत्रादिकांना व अत्यंत दुःखित झालेल्या आम्हांलाहि बांधून आकाशमार्गानें चालविलें.

त्या वेळीं आमचे कांहीं महारथ अमात्य सैनिक दीन होऊन पांडवांपाशीं गेले व त्यांनीं शत्रूंशीं युद्ध करण्यासाठीं त्यांची प्रार्थना केली. सैनिक म्हणाले— " हे वीरांनों, या धृतराष्ट्रपुत्र राजा दुर्योधनाला अमात्य व राजस्त्रिया यांसह गंधर्व हरण करून नेत आहेत. यास्तव त्या राजाला स्त्रियांसह सोडवा. तुमचें कल्याण असो. कुरुस्त्रियांचा परपुरुषांकडून असा अपहार न होवो. "

याप्रमाणें सैनिकांनीं विनविलें असतां धर्मात्म्या ज्येष्ठ पांडवानें भ्रात्यांना प्रसन्न करून आम्हांला मुक्त करविण्याची आज्ञा केली. तेव्हां ते चौघे पुरुषश्रेष्ठ पांडव त्या प्रदेशीं आले आणि त्या महारथांनीं समर्थ असतांहि गंधर्वांची सान्त्वपूर्वक प्रार्थना केली. परंतु सांत्ववचनानें ते गंधर्व आम्हांला सोडीत नाहींत, हें पाहून त्या बलाढ्य भीमार्जुनांनीं व नकुल-सहदेवांनीं अनेकदा शरवृष्टि केली. तेव्हां ते सर्व आकाशचर रणांगण सोडून दीन झालेल्या आम्हांला ओढीत संतुष्ट चित्तानें आकाशमार्गानें जाऊं लागले.

त्यावेळीं हे कर्णा, धनंजयानें अतिमानुष अस्त्रें सोडून त्यांचे सर्व मार्ग आपल्या शरजालानें अडविले आहेत, असें आम्हीं पाहिलें. त्या लोकोत्तर पराक्रमी पांडवानें तीक्ष्ण शरांनीं सर्व दिशा व्यापून सोडल्या आहेत, असें पाहून धनंजयाचा सखा चित्रसेन त्याच्या पुढें प्रकट झाला. नंतर चित्रसेन व पार्थ या दोघांनीं परस्परांस आलिंगन दिलें, एकमेकांचें कुशल विचारिलें व ते परस्परांस भेटले. तेव्हां अंगांतील कवचें काढून ते पांडव आणि गंधर्व एकमत झाले आणि चित्रसेन व धनंजय या दोघांनीं परस्परांचा सत्कार केला. ३.१४.२४८.

---

*

## अध्याय २४९ वा.

[ १ दुर्योधनाचा प्रायोपवेशनाविषयीं संकेत. २ दुःशासनाला उपदेश. ३ त्याचे दुःखोद्गार. ४ कर्णाचें वचन. ]

(१) **दुर्योधन**—कर्णा, चित्रसेनाला भेटल्यानंतर परवीरहा अर्जुन हंसतच त्याला असें अर्थपूर्ण वचन बोलला—" हे वीरा, माझ्या भ्रात्यांना सोडून दे. आम्ही पांडुपुत्र जिवंत असतां या आमच्या बांधवांचा असा अपमान होणें योग्य नव्हे. "

अर्जुन असें बोलला असतां, राधेया, भार्येसह क्लेश भोगणाऱ्या पांडवांना मोठ्या वैभवांत जाऊन भेटण्याचा आपण जो संकेत केला होता, तो त्यानें त्यास सांगितला. कर्णा, गंधर्वानें ते शब्द उच्चारतांच मी इतका लज्जित झालों कीं, यावेळीं भूमि जर विदीर्ण होईल तर त्यांत आपण प्रवेश करावा, असें माझ्या मनांत आलें.

नंतर ते गंधर्व पांडवांसह आम्हांला घेऊन युधिष्ठिरापाशीं गेले आणि आमचा दुष्ट संकेत त्याला निवेदन करून आम्हांला बद्ध केल्याचा वृत्तान्तहि कथन केला. कर्णा, द्रौपदीच्या समक्ष शत्रूंच्या वश व बद्ध होऊन दीन झालेल्या मला युधिष्ठिराकडे नेलें, याहून परम दुःखकर तें काय आहे !

हे वीरा, ज्यांना मीं राज्यभ्रष्ट करून घालवून दिलें व ज्यांचा मी नित्य द्वेष करितों, त्यांनींच मज दुर्बुद्धीला शत्रूच्या हातून सोडवून जीवदान द्यावें ना ? यापेक्षां त्या महारणांत माझा वध जरी झाला असता तरी उत्तम झालें असतें ! पण अशा प्रकारचें जीवित श्रेयस्कर नाहीं. गंधर्वांच्या हातून युद्धांत मला जर मृत्यु आला असता तर इहलोकीं माझी कीर्ति झाली असती आणि इंद्रलोकीं अक्षय पुण्यलोकाची प्राप्ति झाली असती !

आतां, हे पुरुषश्रेष्ठहो, माझा निश्चय ऐका. मी येथें प्रायोपवेशन म्ह० एका आसनावर बसून आहारावांचून देहत्याग करितों, आणि तुम्ही माझे सर्व भ्राते आजच स्वनगरीला जा. दुःशासनाला पुढें करून कर्णप्रभृति सर्व सुहृद् व बांधव स्वगृहीं परत जावोत. शत्रूंनीं अवमानिलेला मी आतां स्वनगरीस जाणार नाहीं. जो मीं पूर्वी शत्रूंचा अपमान व सुहृदांचा सन्मान करीत असें, तोच आज मित्रांच्या शोकाला व शत्रूंच्या हर्षाला पात्र झालों आहें. अशा लज्जास्पद स्थितींत हस्तिनापुरास जाऊन मी धृतराष्ट्र राजाला काय सांगूं ? भीष्म, द्रोण,

कृप, अश्वत्थामा, विदुर, संजय, बाल्हीक, सौमदत्ति आणि इतरहि वृद्धसंमत असलेले ब्राह्मण, शिल्पिसंघांतील मुख्य वणिक्, त्याचप्रमाणें अन्य उदासीन लोक मला काय म्हणतील आणि मीहि त्यांना काय सांगूं !

शत्रूंच्या मस्तकांवर पाय देऊन त्यांच्या उरावर चालणारा मी स्वतःच्या दोषानें असा पराभूत झालों असतां भीष्मादिकांशीं कसें भाषण करूं? दुर्विनीत माणसांना श्री, विद्या किंवा ऐश्वर्य प्राप्त झालें तरी तें त्याच्यापाशीं फार वेळ राहत नाहीं. याविषयीं दृप्त झालेला मी, हाच दृष्टान्त आहे.

अरेरे, असलें दुष्कृत्य करणें उचित नसूनहि मी मोहानें त्यांत प्रवृत्त झालों व अशा संकटांत सांपडलों. तस्मात् मी प्रायोपवेशनच करणार. मला आतां जिवंत रहाणें शक्य नाहीं. आपल्या शत्रूंनीं संकटांतून सोडविलेला कोणता मनुष्य जिवंत रहाण्याची इच्छा करील ! शिवाय मी अत्यंत मानी असूनहि पराक्रमशून्य झालों व शत्रूंनीं माझा उपहास केला. पराक्रमानें आढ्य झालेल्या पांडवांनीं मजकडे तुच्छतेनें अवलोकन केलें !

( २ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें चिंताकुल होऊन दुर्योधन दुःशासनाला म्हणाला—" हे दुःशासना, माझें हें वचन ऐक. माझ्या या अभिषेकाचा स्वीकार करून तूं नृप हो आणि कर्ण व सौबल यांनीं पालन केलेल्या या विस्तीर्ण पृथ्वीचें शासन कर. इंद्र जसा मरुद्गणांचें विश्वासानें पालन करितो तसें तूं भ्रात्यांचें रक्षण कर. शतक्रतूवर उपजीविका करणाऱ्या देवांप्रमाणें तुझे सर्व बांधव तुजवर उपजीविका करोत. सर्व ब्राह्मणांच्या वृत्तीची व्यवस्था करण्यांत दक्षता ठेव. बांधव व सुहृद् यांना सर्वदा आश्रय दे. देवांवर कृपादृष्टि ठेवणाऱ्या विष्णूप्रमाणें ज्ञातिजनांकडे लक्ष दे व गुरुजनांचें पालन कर. जा आतां, सर्व मित्रांना संतुष्ट व शत्रूंना तिरस्कृत करीत पृथ्वीचें शासन कर. " असें बोलून त्यानें दुःशासनाच्या गळ्याला घट्ट मिठी मारली आणि त्याला ' जा ' असें म्हटलें.

( ३ ) वडील बंधूचें हें वचन ऐकून दीन व अतिशय दुःखार्त झालेल्या दुःशासनाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले, कंठ दाटला आणि तो आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला प्रणिपात करून व हात जोडून सद्गदीत वाणीनें ' प्रसन्न हो ' असें म्हणाला व अतिशय दुःखित मनानें भूमीवर पडला.

त्यानें आपल्या अश्रूंनीं दुर्योधनाचें उभय चरण भिजविले व म्हटलें—" हे नरश्रेष्ठा, असें कदापि घडणार नाहीं. हे राजा, ही समग्र भूमि विदीर्ण होईल,

अंतरिक्षाचीं शकलें होतील, रवि आपली प्रभा व चंद्र आपलीं शीतल किरणें, यांचा त्याग करितील. वायु आपली शीघ्रगति टाकील, हिमालय आपलें अचलत्व सोडून भ्रमण करूं लागेल, समुद्र शुष्क होईल, अग्नि उष्णता सोडील, परंतु मी तुझ्यावांचून पृथ्वीचें राज्य करणार नाहीं. हे राजन्, तूंच आमच्या कुलाचा शतायु राजा होशील." असें बोलून दुःशासनानें आपल्या मानी ज्येष्ठ भ्रात्याच्या चरणांना स्पर्श करून उच्च स्वरानें रोदन केलें.

याप्रमाणें त्या दोघां दुःशासन-सुयोधनांस दुःखित पाहून कर्ण त्यांच्यापाशीं आला व व्यथित होऊन म्हणाला—" हे कौरवहो, प्राकृतांप्रमाणें तुम्हीं असे मूर्खांसारखे शोक कां करीत अहां ? कारण शोक करणारांचा शोक केव्हांहि निवृत्त होत नसतो. शोक करीत बसल्यानेंच जर संकटांचा नाश झाला असता तर शोक करणें योग्य होतें. परंतु तसें जर घडत नाहीं, तर मग व्यर्थ शोक करण्यांत काय अर्थ आहे ?

तुम्ही दोघे शोक करून कोणतें हित साधलेंत ! त्यांत कसलें सामर्थ्य पाहिलेंत ? हे वीरांनों, धीर धरा. शोक करून शत्रूंना आनंद देऊं नका. शिवाय पांडवांनीं तुम्हांला शत्रूपासून सोडविण्यांत स्वकर्तव्यच केलें आहे. कारण राष्ट्रांत रहाणाऱ्या लोकांनीं राजाचें नित्य प्रियच करीत असावें. तुम्ही त्यांचें पालन करीत असल्यामुळेंच ते शांत चित्तानें रहात आहेत. यास्तव दुर्योधना, तूं असा प्राकृताप्रमाणें शोकवश होऊं नको. तूं प्रायोपवेशन केल्यास तुझे सर्व भ्राते उद्विग्न होतील. यास्तव ऊठ, जा, आणि भ्रात्यांचें सान्त्वन कर. तुझें कल्याण होवो. ३.१४.२४९.

---

## अध्याय २५० वा.

[ १ कर्णाचा दुर्योधनास युक्तियुक्त उपदेश. ]

( १ ) कर्ण—हे वीरा, पांडवांनीं तुला मुक्त करविलें, म्हणून तुझें सामर्थ्य कांहीं कमी ठरत नाहीं. अरे, अकस्मात् शत्रूंच्या अधीन झालें असतां पांडवांनीं तुला त्यांच्या हातून सोडविलें यांत आश्चर्य तें कसलें ? हे नृपश्रेष्ठा, सेनेवर उपजीविका करणाऱ्या राष्ट्रांतील प्रजाजन आणि परिचित व अपरिचित लोक यांनीं राजाचें प्रिय करावें, हें त्यांचें कर्तव्यच आहे.

राजा, राष्ट्रांतील प्रमुख पुरुषच प्रायः शत्रुसैन्याला क्षुब्ध करीत असतात. परंतु त्यांचें जर कदाचित् शत्रूनें युद्धांत ग्रहण केलें, तर राजाचे सैनिक त्याला

सोडवीत असतात. त्याचप्रमाणें राजसैनिक होऊन उपजीविका करणारे जे मानव आहेत, त्या सर्वांनीं एकत्र होऊन राजाला साह्य करण्याचा प्रयत्न करावा, हें न्याय्यच आहे. यास्तव तुझ्या राष्ट्रांत रहाणाऱ्या पांडवांनीं यदृच्छेनें तुला शत्रूंच्या हातून सोडविलें, त्यांत इतका विषाद वाटण्याचें काय कारण !

हे राजन् , उलट तूं जेव्हां सैन्यासह गंधर्वांशीं युद्ध करण्यास निघालास, तेव्हांच पांडवांनीं तुझ्या मागोमाग यावयास पाहिजे होतें. ते आरंभींच तुझ्या साह्यार्थ आले नाहींत, हें त्यांनीं योग्य केलें नाहीं. ते पांडुपुत्र शूर, बलाढ्य व युद्धापासून पराङ्मुख न होणारे असून पूर्वींच तूं त्यांना जिंकून दास केलें आहेस. यास्तव त्यांनीं तुला साह्य केलेंच पाहिजे. त्या सत्त्वस्थ पांडवांची सहिष्णुता पहा ! त्यांच्या रत्नादि सर्व संपत्तीचा तूं अद्यापि उपभोग घेत असतांहि त्यांनीं तुझ्यासारखें प्रायोपवेशन केलें नाहीं !

यास्तव हे राजेंद्रा, ऊठ. आतां उशीर लावूं नको. तुझें कल्याण असो राजाच्या प्रजाजनांनीं राजाचें प्रिय अवश्य केलेंच पाहिजे. त्यांत तुला शोक करण्याचें काय कारण ! हे अरिमर्दना, तूं जर माझ्या सांगण्याप्रमाणें केलें नाहींस, तर तुझ्या चरणांची शुश्रूषा करीत मीहि येथेंच राहीन. तुझ्या वांचून जिवंत रहाण्यास मी समर्थ नाहीं. शिवाय हे नरश्रेष्ठा, तूं प्रायोपवेशन केल्यास सर्व नृपाल तुझा उपहास करतील.

**वैशंपायन**—राजा, कर्णानें जरी इतका उपदेश केला तरी स्वर्गलोकीं जाण्याचा दृढनिश्चय केलेल्या दुर्योधनानें जागेवरून उठण्याचें मनांत आणलें नाहीं. ३.१४.२५०.

---

## अध्याय २५१ वा.

[ १ दुर्योधनास शकुनीचा उपदेश. २ राजाचा निश्चय. ३ दैत्यांनीं निर्मिलेल्या कृत्येनें केलेले दुर्योधनाचें हरण. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्यानंतर सौबल शकुनीनें प्रायोपवेशन करून बसलेल्या अमर्षी दुर्योधनाला सान्त्वनपूर्वक म्हटलें—" हे नृपते, कर्णानें तुला जो योग्य उपदेश केला तो तूं ऐकलाच आहेस. मी तुझ्यासाठीं या विपुल संपत्तीचें हरण केलें असतां तूं मोहानें तिचा त्याग कसा करितोस ! तूं केवल अल्पबुद्धीमुळें प्राणत्याग करण्यास उद्युक्त झाला आहेस. किंवा तूं गुरुजनाचें योग्यप्रकारें सेवन केलें नसावेंस, असें मला वाटतें.

हे दुर्योधना, जो मनुष्य हर्ष किंवा दैन्य यांचें नियमन करूं शकत नाहीं, ला प्राप्त झालेलें ऐश्वर्य जलांत पडलेल्या अपक्व मृत्पात्राप्रमाणें सत्वर नष्ट तें. राजा, जो नृपति आत्मनाशाच्या शंकेनें अति भीरु, सामर्थ्यहीन, र्घसूत्री, अदक्ष, द्यूत-मद्य-मृगयादिरूप व्यसनांत आसक्त आणि स्त्र्यादि-ंच्या अधीन होतो, त्याच्यावर प्रजा स्नेह करीत नाहीं. तूंहि आज विषयाक्रांत ला आहेस. तुझा सत्कार होत असतांहि जर तुला शोक होत आहे, तर त्रादिकांनीं अवमान केल्यास मग काय होईल !

हे राजन्, पांडवांनीं तुझें जें हित केलें आहे, त्याचा शोकपरवश होऊन श करूं नको. ज्याविषयीं तुला हर्ष वाटावा आणि तूं पांडवांचा सत्कार ावास, त्याविषयीं तूं शोक करीत आहेस; हें तुझें आचरण केवळ विपरीत हे ! हे राजा, प्रसन्न हो, देहत्याग करूं नको. संतुष्ट हो आणि पांडवांनीं ेल्या सत्कृत्याचें स्मरण करून त्या पांडुपुत्रांचें राज्य त्यांना परत दे आणि ा व धर्म संपादन कर. पांडवांच्या या कृतीबद्दल तूं त्यांस स्नेहानें वागीव. ंचें राज्य त्यांना परत दे, म्हणजे तूं कृतज्ञ आहेस, हें सिद्ध होईल. त्यांना ंचें पैतृक राज्य दिलेंस, म्हणजे तूं सुखी होशील.

वैशंपायन—जनमेजया, शकुनीचें हें भाषण ऐकून दुर्योधनानें दीन लेल्या दुःशासनाकडे पाहिलें व म्लान मुखानें चरणांवर पडलेल्या त्या वीराला त्सल्यानें आपल्या दोन्ही पुष्ट बाहूंनीं उचलून आलिंगन दिलें आणि प्रेमानें ाच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. कर्ण व शकुनि यांचा उपदेश ऐकून राजा र्योधन लज्जेनें व्याकुल होऊन जीविताविषयीं विरक्त व राज्यलाभाविषयीं राश झाला.

( २ ) कर्णादि सुहृदांचें तें भाषण ऐकून तो अतिशय दीनवाणीनें म्हणाला— र्म व धन यांपासून प्राप्त होणारें सौख्य, ऐश्वर्य व राज्य यांचें मला आतां ंहीं प्रयोजन नाहीं. किंवा सुखोपभोगाचीहि इच्छा नाहीं. यास्तव ाझ्या कार्याला विरोध करून तुम्ही माझ्या संकल्पाचा विघात किंवा स्वतः-ाहि नाश करूं नका. दुःशासना, जा. प्रायोपवेशाचा माझा विचार निश्चित ाहे. तस्मात् तुम्ही सर्व नगरीस परत जा आणि धृतराष्ट्रादि श्रेष्ठांचें पूजन करा.

दुर्योधनाच्या या भाषणावर ते सर्व कौरव पुनः म्हणाले—" हे राजेंद्रा, झी जी गति तीच आमचीहि होईल. तुझ्यावांचून आम्हीं राजधानींत प्रवेश सा करावा ! "

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें कर्णादि सुहृद्, अमात्य, भ्राते व स्वजन यांनीं दुर्योधनाची अनेक प्रकारें समजूत घातली. पण तो मानी धार्तराष्ट्र आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं. त्या गांधारीनंदनानें दर्भाचें आसन पसरलें. आचमन केलें, शुचिर्भूत होऊन कौपीन व कुश धारण केले. नंतर तो परम नियमानें युक्त होऊन भूमीवर बसला आणि त्यानें मरणाच्या इच्छेनें मौन धरिलें. दहनार्थ काष्ठसंचयाचा मनानेंच संकल्प केला आणि 'अवश्य मरावें' असा निश्चय करून स्नानपानादि सर्व बाह्य क्रियांचा त्याग केला.

( ३ ) परंतु राजा जनमेजया, पातालवासी भयंकर दैत्य-दानवांना दुर्योधनाचा हा निश्चय जेव्हां कळला, तेव्हां पूर्वी देवांनीं जिंकलेले ते दानव स्वपक्षाचा क्षयच झाला आहे, असें समजले. नंतर त्या दैत्यांनीं दुर्योधनाला आपल्या लोकीं बोलावून नेण्यासाठीं अग्निविस्तारानें साध्य होणारें आथर्वणिक कर्म आरंभिलें. (हें कर्म ऋक्, साम व यजुः या तीन वेदांत नाहीं). त्यांनीं मंत्रविशारद बृहस्पति व शुक्र यांनीं अथर्ववेदांत सांगितलेल्या सर्व मंत्रयुक्त क्रिया केल्या. त्या दानवांनीं वेद-वेदांगपारग व दृढव्रती ब्राह्मणांकडून शत्रुमारणार्थ मंत्र-जप-होमादिरूप कम करविलीं आणि अग्नीमध्यें दुधाचा मंत्रयुक्त हवि अर्पिला.

राजा, हें कर्म सिद्ध होतांच तेथें एक अद्भुत कृत्या जांभया देत उत्पन्न झाली व ती आज्ञाकारी देवता 'मला काय आज्ञा आहे ?' असें त्यांस म्हणाली.

तेव्हां ज्यांचें चित्त प्रसन्न झालें आहे, असें दैत्य-दानव तिला म्हणाले— " भूलोकीं प्रायोपवेशन करून बसलेल्या राजा धार्तराष्ट्राला येथें घेऊन ये. "

त्यावर 'ठीक आहे' अस बोलून ती कृत्या जेथें दुर्योधन होता तेथें एका निमेषांत गेली आणि त्याला उचलून घेऊन क्षणांत रसातलांत प्रविष्ट झाली व तिनें एका मुहूर्तांत त्याला आणल्याचें वृत्त दानवांना निवेदन केलें.

कृत्येनें त्या राजाला आणल्याचें पाहून सर्व दानव संतुष्ट झाले. त्यांचे नेत्र संतोषानें विकसित झाले आणि ते मोठ्या अभिमानानें दुर्योधनाशीं असें बोलूं लागले. ३.१४.२५१

---

*

## अध्याय २५२ वा

[ १ दानवांनीं दुर्योधनाचें प्रायोपवेशनापासून केलेलें निवारण. २ राजाचें सर्व परिवारासह स्वनगरीस प्रयाण. ]

( १ ) दानव—हे भरतकुलोद्भव राजा सुयोधना, तूं शूर व महात्मे अमात्य यांनीं नित्य परिवेष्टित असतोस; असें असतां हें प्रायोपवेशनाचें साहस कां करीत आहेस ! बाबारे, आत्मघात करणारा अधोलोकीं जातो आणि इहलोकीं त्याची अयशस्कर निंदा होत राहते. तुझ्या सारखे बुद्धिमान् लोक समूल घात करणाऱ्या व शत्रुजयाच्या विरुद्ध असलेल्या आत्महत्यादि कार्यांत कदापि प्रवृत्त होत नसतात. यास्तव हे राजन् , धर्म, अर्थ व सुख यांचा नाश करणाऱ्या, यश, प्रताप व पराक्रम यांची हानि करणाऱ्या व शत्रूंचा हर्ष वाढविणाऱ्या या दुर्बुद्धीचा तूं त्याग कर.

हे नृपाला, तूं स्वतःचें दिव्यत्व व देहाचें तत्त्व ऐक. आम्हीं पूर्वीं तपश्चरणानें महेश्वरापासून तुला मागून घेतलें आहे. हे वीरा, तुझ्या नाभीच्या वरचा भाग वज्रसंचयानें निर्माण केलेला आहे. त्यामुळें तो अस्त्रें व शस्त्रें यांनींहि अभेद्य आहे आणि उमादेवीनें तुझ्या देहाचा अधोभाग पुष्पमय कोमल बनविल्यामुळें त्याचें स्वरूप स्त्रियांचें चित्त हरण करणारें आहे. याप्रमाणें उमामहेशानें निर्माण केलेला तुझा देह दिव्य आहे, तूं मानव नाहींस.

हे राजेंद्रा, भगदत्तप्रभृति महा वीर्यवान् व दिव्यास्त्रवेत्ते शूर क्षत्रिय तुझ्या शत्रूंचा नाश करतील. यास्तव हे राजा, हा खेद पुरे कर. तुला आतां भय नाहीं. तुझ्या साहायार्थ या लोकीं दानव वीर उत्पन्न झाले आहेत. शिवाय इतरहि दैत्य भीष्म, द्रोण, कृप इत्यादिकांच्या देहांत आवेश करतील व ते वीर निर्दयपणें तुझ्या शत्रूंशीं युद्ध करतील.

हे कुरुसत्तमा, ते सर्व वीर युद्धांत प्रहार करूं लागले, म्हणजे पुत्र, भ्राते, पितर, बांधव, शिष्य, ज्ञाति, बाल किंवा वृद्ध यांतील कोणालाहि सोडणार नाहींत. स्नेहशून्य दानवांनीं आविष्ट झालेले ते पराधीन होऊन स्नेहाला दूर सारतील आणि संबंधी जनांवरहि प्रहार करतील. ज्यांचें चित्त कलुषित झालें आहे असे अज्ञानानें मूढ व पूर्वकर्मामुळें पराधीन झालेले ते सर्व मोठ्या हर्षानें 'आतां तूं माझ्या हातून जिवंत सुटणार नाहींस' असें बोलत परस्परांवर शस्त्रास्त्रें सोडतील व आत्मश्लाघा करीत शत्रूंचा संहार करतील.

ते पांच पांडवहि उलट युद्ध करितील. परंतु क्षत्रियकुलांत उत्पन्न झालेले दैवबलसंपन्न महाबलाढ्य दैत्य व राक्षस त्यांचा वध करितील. ते राक्षस युद्धामध्यें गदा, मुसळें, शूल इत्यादि लहान-मोठीं शस्त्रें घेऊन शत्रूंना पादाक्रांत करीत युद्ध करितील. हे वीरा, तुला अर्जुनाचें भय वाटत आहे, परंतु आम्हीं त्या धनंजयाच्या वधाचाहि उपाय योजून ठेविला आहे. पूर्वीं वासुदेवानें ज्याचा वध केला, त्या नरकासुराचा जीवात्माच कर्णाच्या देहाचा आश्रय करून उत्पन्न झाला आहे. तें पूर्वीचें वैर स्मरूनच तो महारथ कर्ण केशवार्जुनांशीं युद्ध करील आणि शत्रूंना जिंकण्यास समर्थ असलेला तो राधेय पार्थाला जिंकील. महारथ कर्ण श्रेष्ठ योद्धा असून तो स्वपराक्रमानें सर्व शत्रूंचा संहार करील.

धार्तराष्ट्रा, कर्णाचें हें सामर्थ्य जाणूनच वज्रधर इंद्र धनंजयाचें रक्षण करण्यासाठीं कर्णाच्या कवच-कुंडलांचा अपहार करील. यास्तव आम्हीं या कार्यासाठीं सहस्रावधि दैत्य नियुक्त करून ठेविले आहेत. तेच ‘ संशप्तक ’ नांवानें प्रसिद्ध आहेत. ते वीर अर्जुनाचा वध करितील. तस्मात् तूं शोक करूं नको.

हे राजा, या निष्कंटक पृथ्वीचा तूं उपभोग घेशील. तूं खिन्न होऊं नको. तुला असें करणें शोभत नाहीं. हे कौरवा, तूं नष्ट झालास तर आमच्या पक्षाची हानि होईल. यास्तव हे वीरा, आतां जा. पुनः असा अविचार करूं नको. तूं आमची गति आहेस आणि पांडव देवांचे आधार आहेत.

वैशंपायन—राजा, असें बोलून त्या श्रेष्ठ दैत्य-दानवांनीं दुर्जय दुर्योधनाला पुत्रवत् आलिंगन दिलें. त्या वीराला धीर देऊन प्रिय भाषणांनीं त्याची बुद्धि स्थिर केली व ‘ जा , विजयी हो ’ अशा आशीर्वादपूर्वक त्याला अनुज्ञा दिली.

याप्रमाणें दानवांनीं निरोप देतांच ती कृत्या दुर्योधनाला घेऊन निघाली व तो पूर्वीं जेथें प्रायोपवेशन करून बसला होता, तेथें तिनें त्याला आणून सोडलें. नंतर ती कृत्या त्या वीराचा सत्कार करून व त्याची अनुज्ञा घेऊन तेथेंच अंतर्धान पावली.

जनमेजया, ती कृत्या गुप्त झाल्यावर राजा दुर्योधन या सर्व स्वप्नवत् प्रकाराचा विचार करूं लागला आणि तो मूढ ‘मी पांडुपुत्रांना युद्धांत जिंकीन. कर्ण व संशप्तक शत्रुसंहारक पार्थाचा रणांत वध करण्यास समर्थ आहेत,’ असेंच मानूं लागला. त्या दुर्बुद्धि धार्तराष्ट्राचा पांडवांच्या पराभवाविषयीं दृढ

निश्चय झाला. तो म्हणाला—" कर्णाच्या चित्तांत नरकासुराच्या अंतरात्म्यानें प्रवेश केला आहे. यास्तव तोहि अर्जुनाच्या वधाचा क्रूर निश्चय करील. वीर राक्षसांनीं संशप्तकांच्या अंतःकरणांत प्रवेश केला आहे. त्यामुळें ते रजोगुण व तमोगुण यांनीं व्याप्त होऊन अर्जुनाच्या वधाची इच्छा करीत आहेत. भीष्म, द्रोण, कृप इत्यादि वीरांच्या चित्तांतहि दानवांनीं प्रवेश केला आहे. त्यामुळें ते पांडुपुत्रांवर पूर्ववत् स्नेह करणार नाहींत."

राजा जनमेजया, दुर्मति धार्तराष्ट्राच्या मनांत अशी मोठी आशा उत्पन्न झाली. पण त्यानें ती कोणापाशीं व्यक्त केली नाहीं. त्यानंतर रात्र संपली असतां कर्ण दुर्योधनापाशीं आला व हात जोडून हंसतच असें युक्तियुक्त वचन बोलला.

" हे राजन्, मृत मनुष्य शत्रूंना जिंकीत नसतो; तर तो जिवंत राहूनच अनेक सुखें अनुभवितो. मृताला जय कोठला व त्याचें कल्याण तरी कोठलें! हे कौरवेया, हा विषादाचा, भयाचा किंवा मरणाचा काल नव्हे."

असें बोलून कर्णानें आपल्या महाभुजांनीं त्या गांधारेयाला आलिंगन दिलें व पुनः म्हटलें—" हे राजन्, ऊठ निजतोस काय? आणि शोक कशाला करितोस! आपल्या शत्रूंना ताप देणारा तूं मृत्यूची इच्छा कशी करितोस! अर्जुनाचा पराक्रम पाहून जर तुला भय वाटत असेल, तर मी तुला सत्य-प्रतिज्ञेनें सांगतों कीं, तेरा वर्षे पूर्ण होतांच मी रणामध्यें अर्जुनाचा वध करीन. हे जनाधिपा, मी सत्यानें आयुधाला स्पर्श करून तुला सांगतों कीं, मी पांडवांना जिंकून तुझ्या स्वाधीन करीन."

जनमेजया, कर्णाचें हें भाषण, दैत्यांचें आश्वासन व दुःशासनादिकांच्या प्रणिपातपूर्वक प्रार्थना यांच्या योगानें विजयाविषयीं निश्चित झालेला राजा दुर्योधन उठला, दैत्यांच्या वचनाप्रमाणें त्यानें आपली बुद्धि स्थिर केली आणि आपलें सर्व सैन्य गमनार्थ सज्ज करविलें.

गजाश्वांनीं व्याप्त असलेली ती चतुरंग सेना गंगेच्या प्रवाहाप्रमाणें निघाली. वर्षाकाल निघून गेला असतां ज्यामध्यें शरदृतूचीं चिह्नें किंचित् व्यक्त झालीं आहेत अशा अंतरिक्षाप्रमाणें शुभ्र ध्वज, पताका, छत्रें इत्यादिकांनीं युक्त असलेली ती प्रचंड चमू अतिशय शोभली.

ब्राह्मणांनीं सार्वभौम युधिष्ठिराप्रमाणें दुर्योधनाची स्तुति आरंभिली व त्याला जयाशीर्वाद दिले. आपल्या श्रेष्ठ ऐश्वर्यानें देदीप्यमान होणारा तो राजा

लोकांनीं हात जोडून केलेल्या नमस्कारांचा स्वीकार करीत चालला. त्या धार्तराष्ट्राबरोबर कर्ण व द्यूतासक्त शकुनि असून त्याचे दुःशासनादि भ्राते, भूरिश्रवा, सौमदत्त, बाल्हिक इत्यादि वीर नानाविध आकारांच्या रथांत व गज-अश्वादि विविध वाहनांवर आरूढ होऊन त्याच्या मागून चालले होते. अशा प्रकारें मार्ग आक्रमीत त्या सर्व कुरुश्रेष्ठांनीं अल्प कालांतच स्वनगरींत प्रवेश केला. ३.१४.२५२.

---

## अध्याय २५३ वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ भीष्माचा दुर्योधनास उपदेश. ३ कर्णाचें दिग्विजयासाठीं प्रयाण. ]

( १ ) **जनमेजया**—हे भगवन्, महात्मे पांडव त्या वनामध्यें रहात असतां महाधनुर्धर धार्तराष्ट्र, कर्ण, शकुनि आणि भीष्म-द्रोणादिक यांनीं काय केलें तें मला सांग.

( २ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें पार्थानें गंधर्वांशीं युद्ध करून सुयोधनाला सोडविलें असतां पांडुनंदनांनीं मुक्त केलेला तो राजपुत्र हस्तिनापुरास आला. तेव्हां भीष्म त्या धार्तराष्ट्राला असें वचन बोलला—" अरे बाबा, तूं जेव्हां तपोवनाकडे जावयास निघालास, त्याच वेळीं मीं तुला नको म्हटलें होतें. तुझें तेथें गमन मला त्यावेळीं मुळींच रुचलें नाहीं व मीं तुला जाण्यास अनुमोदनहि दिलें नव्हतें. तथापि तूं आमचें ऐकलें नाहींस. त्यामुळें शत्रूंनीं तुला बलात्कारानें धरून नेलें आणि धर्मज्ञ पांडुपुत्रांनीं तुला सोडविलें. त्याची तुला लज्जा कशी वाटत नाहीं !

हे गांधारेया, त्या समयीं तूं सैन्यासह आक्रोश करीत असतां गंधर्वांच्या भीतीनें ससैन्य सूतपुत्र तुझ्या समक्ष रणांतून पळाला. त्यावरूनच महात्म्या पांडवांचें सामर्थ्य व दुर्मति कर्णाचा पराक्रम प्रत्यक्षच तुझ्या निदर्शनास आला आहे. हे राजा, पांडवांचें धनुर्वेदज्ञान, शौर्य व धर्म यांतील एकचतुर्थांशहि कर्णाच्या अंगीं नाहीं. यास्तव हे धर्मवत्सला, तूं आपल्या कुलवृद्धीसाठीं महात्म्या पांडवांशीं संधि करावास, हें मला युक्त दिसतें. "

राजा, भीष्म असें बोलला असतां दुर्योधन हंसून एकदम उठला व सौबलासह सभेंतून निघून गेला. त्या महाबलाढ्य धार्तराष्ट्राला जातांना पाहून कर्ण-दुःशासनादिकहि त्याच्या मागोमाग निघाले. अशाप्रकारें ते दुर्योधनादि

हलुहलू उठून गेलेले पाहून कुरुपितामह भीष्म लज्जित झाला व स्वगृहीं निघून गेला.

हे महाराज, भीष्म निघून गेले असतां ते धृतराष्ट्रपुत्र पुनः त्या सभास्थानीं एकत्र जमले आणि आपल्या अमात्यांसह संकेत करूं लागले. ते म्हणाले— " आम्हांला श्रेयस्कर काय होईल! आमचें कोणतें कार्य अवशिष्ट राहिलें आहे! कोणतें सत्कार्य आम्हांला हितकर होईल? याचा आपण विचार करूं या. "

( ३ ) कर्ण—हे दुर्योधना, मी तुला सांगतों तें ऐक. हा भीष्म सर्वदा आमची निंदा व पांडवांची प्रशंसा करीत असतो आणि तुझ्या द्वेषामुळें त्यानें माझाहि द्वेष करावा, हें योग्यच आहे. हे नरेश्वरा, तो नित्य तुझ्या समक्ष माझी निंदा करीत असतो. राजा, या गांगेयानें, आज तुझ्या समक्ष पांडवांचें यश गायिलें, तुझी निंदा केली आणि त्यावेळीं मला उद्देशून त्यानें निर्भर्त्सनेचे उद्गारहि काढले, पण ते मी सहन करणें शक्य नाहीं.

यास्तव हे राजन्, तूं मला भृत्य, सैन्य व वाहनें यांसह युद्धाची अनुज्ञा दे म्हणजे मी पर्वत-वनांसह ही सर्व पृथ्वी जिंकतों. पूर्वीं चार बलाढ्य पांडुपुत्रांनीं जी पृथ्वी जिंकली होती, ती मी आतां एकटाच जिंकीन, यांत संशय नाहीं. त्या दुर्बुद्धि कुरुकुलाधम भीष्माला एकदा तरी माझा पराक्रम पाहूं दे. तो तुमचा वृद्ध पितामह जो अनिंद्य आहे, त्याची निंदा करितो आणि अश्लाघ्य असलेल्यांची प्रशंसा करितो. तो दुरात्मा आज माझें सामर्थ्य पाहो व स्वतःचीच निंदा करो. हे राजन्, तूं मला अनुज्ञा दे. तुझा विजय निश्चित आहे, असें समज. मी आयुधांना स्पर्श करून ही सत्यप्रतिज्ञा करितों.

राजा, कर्णाचें हें भाषण ऐकून अतिशय संतुष्ट झालेला दुर्योधनराजा म्हणाला,—" हे सर्वशत्रुसंहारक वीरा, मी धन्य आहें. मजवर तुझा हा मोठाच अनुग्रह आहे. ज्या माझ्या हितासाठीं तूं बलाढ्य वीर नित्य तत्पर असतोस, त्या माझें जन्म आज सफल झालें. तुला जेव्हां दिग्विजयार्थ जाणें योग्य वाटेल तेव्हां तूं अवश्य जा. तुझें कल्याण असो. मलाहि योग्य ती आज्ञा कर. "

धीमान् दुर्योधनाचें हें भाषण ऐकून कर्णानें राजाला मार्गांत अपेक्षित असलेल्या शकट, वणिक् इत्यादि परिवारास सज्ज होण्याची आज्ञा केली. त्या महा धनुर्धर कर्णानें सुगंधतैलादि मंगल द्रव्यांनीं स्नान केलें. त्याला

स्त्रियांनीं नीराजनादिकांनीं ओंवाळलें आणि द्विजांनीं शुभाशीर्वादपूर्वक त्याचा सत्कार केला. नंतर शुभ नक्षत्र, तिथि व शुभ दैवत यांनीं युक्त असलेल्या सुमुहूर्तावर तो महारथ राधेय आपल्या प्रचंड रथघोषानें सचराचर त्रैलोक्य निनादित करीत निघाला. ३. १४. २५३.

---

## अध्याय २५४ वा.

[१ कर्णानें केलेला दिग्विजय. २ त्याचें प्रत्यागमन.]

(१)वैशंपायन—राजा, नंतर विपुल सैन्यासह त्या धनुर्धर कर्णानें द्रुपदाच्या रम्यनगरीवर चाल करून त्याच्याशीं घोर संग्राम केला आणि त्या नृपतीला जिंकून द्रुपदाला विविध रत्नें, सुवर्ण व रौप्य यांचा कर देण्यास भाग पाडिलें. याप्रमाणें द्रुपदराजाला जिंकल्यानंतर त्याचे अनुयायी जे इतर भूपाल होते, त्या सर्वांस वश करून त्यांच्याकडूनहि खंडणी घेतली.

त्यानंतर राधेयानें उत्तर दिशेंत जाऊन तेथील सर्व राजांना अधीन करून घेतलें. प्रथम भगदत्ताला जिंकून तो कर्ण हिमालयाख्य महाशैलावर चढला व शत्रूंशीं युद्ध करणारा तो वीर त्या दिशेंतील सर्व नृपालांना वश करून पुढें निघाला. त्या हिमवान् प्रदेशांतील सर्व भूपलांना कर द्यावयास लावून कर्णानें नेपाल देशांत प्रवेश केला. तेथील अधिपांना जिंकल्यावर तो पर्वतावरून उतरला आणि पूर्व दिशेकडे वळला.

तेथें त्या महारथानें अंग, वंग, कलिंग, शुंडिक, मिथिल, मागध व कर्कखंड यांना अधीन करून आवशीर, योध्य व अहिक्षत्र हे प्रदेश जिंकून घेतले. याप्रमाणें पूर्व दिशा जिंकून त्या वीरानें वत्स भूमीकडे प्रयाण केलें. तेथें केवल मृत्तिकावती वत्सभूमीला जिंकल्यानंतर त्यानें मोहनपत्तन, त्रिपुरी व कोसलदेश पादाक्रांत करून त्यांच्याकडून सर्वशः कर घेतला.

तेथून त्या पराक्रमी कर्णानें दक्षिण दिशेंत प्रवेश करून सर्व महारथांना जिंकिलें. त्या दाक्षिणात्य नृपांतील रुक्मी राजाशीं राधेयानें तुमुल युद्ध केलें असतां रुक्मी म्हणाला—" हे राजेंद्रा, तुझा पराक्रम व सामर्थ्य पाहून मीं संतुष्ट झालों आहें. मी तुझ्या या कार्यांत विघ्न करणार नाहीं. मीं केवल क्षात्रधर्माचें पालन करण्यासाठीं तुझ्याशीं युद्ध केलें. विजयाच्या इच्छेनें नव्हे. आतां तुझी जेवढी अपेक्षा असेल तेवढें वित्त मी तुला मोठ्या प्रेमानें अर्पण करितों."

तेव्हां रुक्मीशीं सख्य करून कर्णानें पांड्य व श्रीशैल यांवर चाल केली. त्यानें केरळ व नील देशांचे अधिप, वेणुदारीचे पुत्र व दक्षिणेंतील इतरहि नृपति यांस रणांत जिंकून त्यांच्यापासून कर घेतला. त्यानंतर तो सूतपुत्र कर्ण शिशुपालाच्या पुत्रावर चाल करून गेला व त्याला जिंकून त्यानें त्याच्या समीपवर्ती नृपांसहि अधीन करून घेतलें. त्या बलाढ्य कर्णानें अवंतीच्या नृपालांना सामोपचारानेंच वश केलें. वृष्णिवीरांशीं युद्ध करून पश्चिम दिशाहि जिंकून घेतली.

नंतर वायव्य दिशेंत जाऊन यवन, बर्बर इत्यादि पाश्चात्य भूमिपांकडूनहि खंडणी घेतली. याप्रमाणें पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या सर्व दिशांनील प्रदेशांसह समग्र पृथ्वी जिंकून कर्णानें म्लेच्छ, अरण्यवासी व पर्वतवासी भूपाल, भद्र, रोहितक, आग्नेय व मालव या सर्व नृपगणांचा पराजय केला आणि तो नीतिमान् राधेय प्रसन्न मुखानें जणुं काय हंसतच शशक, यवन आणि नग्नजितादि महारथ यांचा पराभव करून सर्व भूपालांसह अखिल पृथ्वी जिंकून हस्तिनापुरास परत आला.

( २ ) हे महाराज, याप्रमाणें तो रणधुरंधर कर्ण दिग्विजय करून परत आला असतां दुर्योधनानें भ्राते, पितर, बांधव यांसह त्याचें स्वागत करून नगरींत कर्णविजयाची घोषणा करविली.

नंतर संतुष्ट झालेला दुर्योधन त्याला म्हणाला—हे वीरा, मला भीष्म, द्रोण, कृप, किंवा बाल्हिक यांच्यापासून जें प्राप्त झालें नाहीं, तें तूं संपादन करून दिलेंस. तुझें कल्याण असो. कर्णा, अधिक काय बोलूं? पण माझें हें वचन ऐक—‘ हे सत्तमा, तुझ्यामुळें मीं आज सनाथ झालों आहें. ते सर्व पांडव किंवा अन्य उत्कर्ष पावलेले भूपाल यांना तुझ्या षोडशांशाचीहि योग्यता नाहीं. आतां हे नरश्रेष्ठा, अदितीचें दर्शन घेणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं धृतराष्ट्र व यशस्विनी गांधारी यांचें दर्शन घे.”

त्या वेळीं कर्णविजयाचा हा वृत्तान्त ऐकून हस्तिनापुरांत मोठी खळबळ उडाली. पांडवांच्या पक्षाचे लोक कर्णाची निंदा करून हाहाकार करूं लागले. कांहीं लोक राधेयाची प्रशंसा करूं लागले व कित्येक नागरिक व नृपति तटस्थवृत्तीनें स्तब्ध राहिले. याप्रमाणें धनुर्धरांतील श्रेष्ठ कर्ण पर्वत, अरण्यें, समुद्र व इतर सर्व उच्चनीच प्रदेश यांसह ही समग्र पृथ्वी अल्पकालांतच जिंकून, सर्व नृपालांना वश करून व अक्षय संपत्ति संपादून दुर्योधनापाशीं आला.

नंतर त्या धर्मज्ञ वीरानें अंतर्गृहांत प्रवेश करून गांधारीसह धृतराष्ट्राचें दर्शन घेतलें आणि पुत्राप्रमाणें त्या वृद्धांच्या चरणांना अभिवादन केलें. तेव्हां धृतराष्ट्रानें मोठ्या प्रेमानें त्याला आलिंगन देऊन उठविलें आणि हे राजा, तेव्हांपासून दुर्योधन व शकुनि ' कर्णानें पार्थांना युद्धांत जिंकिलेंच आहे ' असें मानूं लागले. ३.१४.२५४.

---

## अध्याय २५५ वा.

[ १ दुर्योधनाचा राजसूयक्रतूचा विचार. २ पुरोहितानें राजसूयाच्या निषेधपूर्वक वैष्णवक्रतूचा केलेला उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनाधिपा, याप्रमाणें सर्व पृथ्वीला जिंकल्यानंतर कर्ण दुर्योधनाला म्हणाला—" हे कौरवा, मीं तुला एक हितवचन सांगतों, तें ऐक आणि मग त्याप्रमाणें कर. हे नृपश्रेष्ठा, आज ही सर्व निष्कंटक पृथ्वी तुझी आहे. स्वर्गाचें पालन करणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं तिचें शासन कर. "

कर्णाचें हें वचन ऐकून **दुर्योधन** त्याला म्हणाला—हे नरश्रेष्ठा, ज्या मजवर तूं अनुरक्त असून माझा साह्यकर्ता आहेस आणि मजसाठीं कोणतेंहि दुष्कर कार्य करण्यास उद्युक्त झाला आहेस, त्या मला दुर्लभ असें कांहींच नाहीं. कर्णा, माझ्या मनांतील एक आशय तुला सांगतों, तो लक्षपूर्वक ऐक. पांडवांनीं केलेला तो श्रेष्ठ राजसूय यज्ञ पाहिल्यापासून मला तसा यज्ञ करण्याची अतिशय उत्सुकता झाली आहे. तूं ती माझी इच्छा पूर्ण कर.

त्यावर **कर्ण** म्हणाला—हे नृपसत्तमा, आज तुला सर्व भूपाल वश आहेत. यास्तव तूं द्विजश्रेष्ठांना बोलावून आण आणि यज्ञाचीं सर्व उपकरणें व इतर सर्व साहित्य यथाविधि जमविण्याची आज्ञा कर. वेदपारग ऋत्विजांना निमंत्रण करून त्यांच्याकडून यज्ञाचा यथाशास्त्र उपक्रम करीव. विपुल अन्नपानादिकांनीं समृद्ध असलेला तुझाहि महायज्ञ प्रवृत्त होऊं दे.

कर्णाचा हा उपदेश ऐकून दुर्योधनानें पुरोहिताला बोलावून आणवून त्याला म्हटलें—" हे ब्रह्मन्, विपुल दक्षिणेनें युक्त असलेला श्रेष्ठ रायसूय यज्ञ तूं माझ्यासाठीं यथाविधि व यथाशास्त्र कर. "

( २ ) राजाची ही आज्ञा ऐकून तो ब्राह्मण म्हणाला—हे राजा, युधिष्ठिर जिवंत असतांना तुला राजसूय यज्ञ करितां येणें शक्य नाहीं. कारण एका

कुलांत दोन राजसूय होत नाहींत आणि जोंपर्यंत तूं युधिष्ठिराला जिंकलें नाहींस, तोंपर्यंत तुला राजसूयाचा अधिकारहि नाहीं. यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, तो आमचा शत्रूच नव्हे व त्याला आम्हीं द्यूतानें पूर्वींच जिंकलें आहे. तेव्हां तो आम्हांला प्रतिबंध कसा करणार? तर हे नृपोत्तमा, तुझें हें म्हणणें जरी खरें असलें तरी तुझा दीर्घायु पिता धृतराष्ट्र जिवंत आहे, त्यामुळें तुला या कुलांत दुसरा राजसूय करतां येणार नाहीं.

आतां 'तो अंध आहे व अंधाला क्रतूचा अधिकार नाहीं. त्यामुळें त्याचें अस्तित्व माझ्या अधिकाराला प्रतिबंध करूं शकत नाहीं' म्हणून म्हणशील, तर तुझ्यामध्यें युधिष्ठिराचा पराभव करण्याचें सामर्थ्य नसणें, हाच तुझ्या राजसूय क्रतूला मोठा प्रतिबंध आहे. तथापि हे प्रभो, राजसूयासारखेंच दुसरें एक मोठें सत्र आहे, तें तूं कर. हे राजेंद्रा, माझें हें दुसरेंहि वचन ऐक.

"हे जे तुला कर देणारे भूपाल आहेत, ते तुला घडविलेलें व खाणींतून काढलेलें सुवर्ण कर म्हणून देवोत. त्या सुवर्णाचा तूं सत्वर नांगर तयार करीव आणि त्या सुवर्णनांगरानें तुझी यज्ञिय भूमि नांगरून घे. नंतर त्या भूमीवर सुसंस्कृत व विपुल अन्नानें युक्त असा यज्ञ यथाविधि प्रवृत्त होऊं दे. तो तुझा यज्ञ सर्वप्रकारें निष्प्रतिबंध होईल. या सत्पुरुषांना उचित असलेल्या क्रतूला 'वैष्णवयज्ञ' असें नांव आहे. पूर्वीं सनातन विष्णूनें हा यज्ञ केला होता आणि हा क्रतु श्रेष्ठ राजसूयाशीं स्पर्धा करणारा आहे. हे भारता, तुझें कल्याण व्हावें, हेंच आम्हांला इष्ट आहे. हा तुझा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडेल व तुझी इच्छा सफल होईल."

विप्राचें हें भाषण ऐकून राजा धार्तराष्ट्रानें कर्ण, शकुनि व इतर भ्राते यांस म्हटलें—"हे वीरांनो, या ब्राह्मणाचें हें वचन मला योग्य वाटतें. तुम्हांलाहि जर तें रुचत असेल तर सत्वर सांगा."

यावर ते सर्व 'ठीक आहे' असें म्हणाले. नंतर राजा दुर्योधनानें शिल्पकारांकडून यज्ञस्थान यथाक्रम निर्माण करविलें आणि सुवर्णाचा नांगर तयार करण्याची सर्व शिल्पकारांना आज्ञा देऊन ब्राह्मणाच्या सांगण्याप्रमाणें क्रमानें यज्ञाची सर्व सिद्धता केली. ३.१४.२५५

---

## अध्याय २५६ वा.

[ १ दुर्योधनानें केलेला वैष्णवयज्ञ. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, नंतर ते सर्व श्रेष्ठ शिल्पी, प्रमुख अमात्य व महाज्ञानी विदुर यांनीं दुर्योधनाला म्हटलें—" हे राजन् क्रतूचा श्रेष्ठ समय प्राप्त झाला असून यज्ञाची सर्व तयारी झालेली आहे. सुवर्णाचा मूल्यवान् नांगरहि तयार आहे. "

त्याचें हें वचन ऐकून नृपश्रेष्ठ धार्तराष्ट्रानें तो श्रेष्ठ क्रतु आरंभण्यास आज्ञा दिली. नंतर दुर्योधनानें त्या सुसंस्कृत व विपुल धनयुक्त यज्ञाची यथाशास्त्र व यथाक्रम दीक्षा घेतली, तें पाहून धृतराष्ट्र, महा यशस्वी विदुर, भीष्म, द्रोण, कृप, कर्ण व यशस्विनी गांधारी यांना अतिशय संतोष वाटला.

नंतर राजानें पार्थिवांना व ब्राह्मणांना निमंत्रण करण्यास शीघ्रगामी दूत पाठविले. तेव्हां ते दूत वेगवान् वहानांतून आपल्या उद्दिष्ट कार्यासाठीं निघाले असतां दुःशासन त्यांतील एका दूतास म्हणाला—" हे दूता, तूं सत्वर द्वैत-वनांत जा आणि त्या पापी पांडवांना व त्या वनांत राहणाऱ्या ब्राह्मणांनाहि यथान्याय निमंत्रण कर. "

तेव्हां तो दूत वनस्थ पांडवांकडे गेला व त्या सर्व पांडुपुत्रांना वंदन करून म्हणाला—" हे महाराज, नृपसत्तम दुर्योधन राजानें स्वपराक्रमानें विपुल धन संपादन करून यज्ञ आरंभिला आहे. तेथें अनेक निमंत्रित नृपाल व ब्राह्मण जात आहेत. मला महात्म्या कौरवानें तुम्हांला निमंत्रण करण्यास पाठविलें आहे. यास्तव त्या धार्तराष्ट्राच्या इच्छेप्रमाणें तुम्हीं जाऊन त्याचा यज्ञ अव-लोकन करा."

त्या दूताचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—" हे दूता, पूर्वजांची कीर्ति वाढविणारा दुर्योधन असा श्रेष्ठ क्रतु करीत आहे, ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. आम्हीहि त्या यज्ञाला आलों असतों. परंतु सांप्रत आम्हांला तेरा वर्षांची प्रतिज्ञा पालन करावयाची असल्यामुळें येतां येत नाहीं. "

धर्मराजाचें हें वचन ऐकून भीम म्हणाला—" प्रतिज्ञेचीं तेरा वर्षें पूर्ण झाल्यावर नराधिप धर्मराज रणयज्ञामध्यें जेव्हां शस्त्रास्त्रांच्या प्रदीप्त अग्नीमध्यें दुर्योधनाची आहुति देण्यास सज्ज होईल, तेव्हांच तो कुंतिपुत्र तेथें येईल आणि जेव्हां हा धर्मात्मा युधिष्ठिर सर्व धृतराष्ट्रपुत्र स्वतःच क्रोधानें उद्दीपित झाले

असतां त्यांच्या ठिकाणीं त्यांना अधिक प्रज्वलित करणारा आपल्या क्रोधरूपी हवी-चा प्रक्षेप करील तेव्हांच मीहि तेथें येईन" असें त्या दुर्योधनाला जाऊन सांग.

जनमेजया, इतर पांडवांनीं कांहींहि अप्रिय भाषण केलें नाहीं. तेव्हां त्या दूतानें परत जाऊन घडलेला सर्व वृत्तान्त दुर्योधनाला निवेदन केला.

इकडे धार्तराष्ट्राच्या यज्ञासाठीं अनेक देशांतील श्रेष्ठ नृपति व महाभाग ब्राह्मण त्या कौरवांच्या नगरींत जमले. त्या नरेश्वरानें त्यांचें यथाशास्त्र, यथा-विधि व यथाक्रम पूजन केल्यामुळें ते अतिशय संतुष्ट होऊन तेथें राहिले.

त्या वेळीं सर्व कौरवांनीं परिवेष्टित झालेला धृतराष्ट्र परम हर्षानें विदुराला म्हणाला—" हे क्षत्त्या, यज्ञाला आलेले सर्व लोक ज्यायोगें अन्नानें तृप्त होऊन सुखी होतील अशी यज्ञमंदिरांत सत्वर व्यवस्था कर."

धृतराष्ट्राच्या आज्ञेप्रमाणें धर्मवेत्त्या विदुरानें सर्व वर्णांतील लोकांचा यथा-न्याय सत्कार केला व विद्वानांचें यथाशास्त्र पूजन केलें. त्या धर्मज्ञानें भक्ष्य, पेय, अन्नपान, सुगंधीमाला व विविध वस्त्रें त्यांना समर्पण केलीं. नंतर यज्ञ-समाप्तीच्या वेळीं दुर्योधनानें सहस्रावधि राजांना व ब्राह्मणांना विविध प्रकारचें द्रव्य व मूल्यवान् वस्तु अर्पण करून त्यांचा यथाशास्त्र व यथाक्रम सन्मान केला आणि त्या सर्वांस निरोप देऊन कर्ण-शकुनि इत्यादिकांसह हस्तिनापुरांत प्रवेश केला. ३. १४. २५६.

---

## अध्याय २५७ वा.

[ १ दुर्योधनाचा नगरप्रवेश. २ कर्णाची अर्जुनवधप्रतिज्ञा. ३ युधिष्ठिराची चिंता. ]

(१) **वैशंपायन**—जनमेजया, दुर्योधनानें जेव्हां नगरप्रवेश केला, त्या वेळीं प्रजाजन व सूत यांनीं त्या राजाची स्तुति करून त्याच्यावर लाह्या व चंदनाचें चूर्ण उधळिलें आणि 'हे नृपाला, तुझा हा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडला हें महद्भाग्य होय' असें म्हटलें. कित्येक समयोचित भाषणाविषयीं अनभिज्ञ असलेले लोक म्हणाले—" हे राजा, तुझा हा यज्ञ युधिष्ठिरानें केलेल्या महाक्र-तूच्या तुल्य तर नाहींच, पण त्याच्या षोडशांशाचीहि याला योग्यता नाहीं" दुर्योधनाच्या सुहृदांनीं 'तुझा हा यज्ञ सर्वांत वरिष्ठ प्रतीचा झाला असून याच्या-योगानें भरत, मांधाता, नहुष आणि ययाति पावन होऊन स्वर्गलोकीं गेले' अशी त्याची प्रशंसा केली.

हे विशांपते, सुहृदांचे अशाप्रकारचे शुभ उद्गार श्रवण करीत संतुष्ट झालेल्या त्या राजानें स्वनगरींत प्रवेश केला व राजमंदिरांत जाऊन माता-पितरांच्या चरणांना वंदन केलें. त्याचप्रमाणें भीष्म, द्रोण, कृप, विदुर, इत्यादि पूज्यांनाहि प्रणिपात केल्यावर त्याच्या कनिष्ठ भ्रात्यांनीं त्याला अभिवादन केलें. नंतर भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेला तो दुर्योधन हृष्ट चित्तानें मुख्य आसनावर बसला.

( २ ) त्यावेळीं त्या नृपश्रेष्ठाला उत्थापन देऊन कर्ण म्हणाला—हे महाराज, तुझा महाक्रतु समाप्त झाला, ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. हे भरतश्रेष्ठा, आतां तूं पांडुपुत्रांचा रणामध्यें वध करून राजसूय यज्ञ जेव्हां करशील, तेव्हां मीं तुझें पुनः अभिनंदन करून असाच सत्कार करीन.

कर्णाचें हें वचन ऐकून महा यशस्वी धार्तराष्ट्र त्याला म्हणाला—हे वीरा, तुझें म्हणणें सत्य आहे. दुरात्म्या पांडवांचा नाश केल्यावर मीं जेव्हां तो महाक्रतु करीन तेव्हां त्या राजसूय यज्ञांत तूं माझा उत्कर्ष असाच वाढविशील.

राजन्, असें बोलून त्या कौरवानें कर्णाला आलिंगन दिलें व तो नृपसत्तम राजसूयाचें चिंतन करीत आपल्या समीप असलेल्या कौरवांना म्हणाला—" हे कौरवहो, त्या सर्व पांडवांचा संहार करून विपुल धनयुक्त राजसूय महाक्रतु मीं केव्हां बरें करीन ! "

त्यावर कर्ण म्हणाला—हे राजशार्दूला, माझी प्रतिज्ञा ऐक. जोंवर मीं अर्जुनाचा वध केला नाहीं, तोंवर मीं दुसऱ्याकडून पादप्रक्षालन करून घेणार नाहीं. मद्य व मांस वर्ज करीन आणि कोणाहि याचकाला इष्ट वस्तु देण्यास नाकारणार नाहीं. या व्रतांचा मीं आज नियम करीत आहें.

याप्रमाणें कर्णानें रणांत अर्जुनाचा वध करण्याची प्रतिज्ञा केली असतां ते सर्व महारथ धनुर्धर धार्तराष्ट्र हर्षानें व उच्च स्वरानें गर्जना करून आम्हीं आतां पांडवांना जिंकलेंच आहे, असें मानूं लागले. नंतर दुर्योधनानें त्या सर्व नरश्रेष्ठांना निरोप देऊन चैत्ररथ उद्यानांत प्रवेश करणाऱ्या कुबेराप्रमाणें स्वतःच्या भवनांत प्रवेश केला.

( ३ ) जनमेजया, इकडे कौरवांच्या दूताचें वचन ऐकून पांडव त्याचाच विचार करूं लागले. त्यांचें चित्त अस्वस्थ झालें. इतक्यांत त्यांच्या गुप्त हेरांनीं येऊन दुर्योनाच्या यज्ञाचा वृत्तान्त व कर्णानें केलेली अर्जुनवधाची प्रतिज्ञा त्यांना कळविली. तें ऐकून धर्मपुत्र युधिष्ठिर उद्विग्न झाला. कर्णाचें अभेद्य

कवच व त्याचा अतुल पराक्रम मनांत येतांच त्याला आपल्या क्लेशांचें स्मरण झालें व त्याच्या मनाची शांति नाहींशी झाली. त्या वेळीं त्या चिंतातुर महात्म्याच्या मनांत अनेक हिंस्र पशु व मृग यांनीं व्याप्त असलेलें तें द्वैतवन सोडून जाण्याचा विचार आला.

दुर्योधनराजाहि वीर भीष्म-द्रोणादि, भ्राते व रणधुरंधर कर्ण यांच्या साह्यानें पृथ्वीचें शासन करूं लागला. तो इतर भूपालांचें प्रिय करण्यांत नित्य तत्पर असे. त्यानें विपुल दक्षिणायुक्त यज्ञांच्या योगानें ब्राह्मणांचा सत्कार केला. त्या परंतपानें ' दान व उपभोग ' हेंच द्रव्याचें फल होय, असा मनांत विचार करून आपल्या भ्रात्यांचेंहि प्रिय केलें. ३. १४. २५७.

येथें चवदावें घोषयात्रापर्व समाप्त झालें.

---

# मृगस्वप्नोद्भवपर्व १५



## अध्याय २५८ वा.

[ १ युधिष्ठिराला स्वप्नांत मृगदर्शन व द्वैत-वन सोडून जाण्याची प्रार्थना. २ पांडवांचें काम्यकवनांत गमन. ]

जनमेजया—हे मुने, दुर्योधनाला सोडविल्यानंतर महाबलाढ्य पांडुपुत्रांनीं त्या वनांत पुढें काय केलें, तें मला सांग.

( १ ) वैशंपायन—हे राजा, त्या रात्रीं द्वैतवनांत धर्मराज युधिष्ठिर निजला असतां स्वप्नांत त्याला मृग दिसले. त्यांचे कंठ बाष्पांनीं रुद्ध झालेले असून त्यांच्या शरीरांना कंप सुटला होता. अशा त्या हात जोडून उभ्या असलेल्या मृगांना पाहून युधिष्ठिरानें विचारिलें—" तुम्ही कोण अहां ? तुमची काय इच्छा आहे ? तुमचा जो कांहीं इष्ट हेतु असेल तो सांगा. "

याप्रमाणें त्या यशस्वी कुंतीपुत्रानें प्रश्न केला असतां पांडवांनीं मृगया करून अवशिष्ट राहिलेले मृग त्यास म्हणाले—" हे महाराज, आम्हीं या द्वैतवनांतील तुम्ही वध करून अवशिष्ट राहिलेले मृग आहों. तुम्ही पांडुपुत्र मोठे धार्मिक अहां. यास्तव आमचा समूळ नाश करूं नका. तुम्ही स्थलांतर करा. आतां या वनांत राहूं नका. हे राजन्, तुम्ही सर्व भ्राते शूर व अस्त्रकोविद अहां. तुम्ही आम्हां

वन्य-पशूंच्या कुलास मृगयेनें जवळ जवळ नामशेष करून टाकिलें आहे. आम्ही आतां केवल बीजभूत राहिलों आहों. यास्तव तुझ्या प्रसादानें आमची अभिवृद्धि होऊं दे."

याप्रमाणें बीजमात्र अवशिष्ट राहिलेल्या, कांपणाऱ्या व त्रस्त झालेल्या त्या मृगांना पाहून धर्मराज युधिष्ठिराला त्यांची दया आली व अतिशय खेदहि झाला. तो सर्व भूतांच्या हितामध्यें तत्पर असलेला राजा त्यांस म्हणाला— " हे मृगहो, तुमच्या सांगण्याप्रमाणें मी अवश्य करीन. तुम्ही स्वस्थानीं सुखानें रहा. "

त्यानंतर रात्र संपून तो जागृत झाला आणि ज्याच्या मनांत मृगांविषयीं दया उत्पन्न झाली आहे असा तो धर्मराजा आपल्या भ्रात्यांस म्हणाला— " रात्रीं स्वप्नामध्यें मृगांनीं येऊन मला म्हटलें कीं, आम्ही केवल बीजभूत अवशिष्ट राहिलों आहों. यास्तव आम्हांवर दया करा. तुमचें कल्याण असो. "

हे वीरांनो, त्या मृगांचें म्हणणें सत्य आहे. आपण या वनचरांवर अवश्य दया केली पाहिजे. आपण एक वर्ष व आठ महिने या मृगांवर निर्वाह करीत आहों. यास्तव आतां हें द्वैतवन सोडून विपुल मृगांनीं युक्त असलेल्या रम्य काम्यक वनांत पुनः जाऊं या. तें अरण्य तृणबिंदुसरोवराच्या समीप असून मरुभूमीचें जणुं काय मस्तकच आहे. तेथें विहार करण्यांत आपण वनवासाचा अवशिष्ट काल आनंदानें घालवूं.

( २ ) राजा, युधिष्ठिराचें हें वचन ऐकून सर्व पांडवांनीं त्या वनांतून सत्वर निघून जाण्याचा विचार केला आणि तेथें त्यांच्या जवळ रहाणाऱ्या सर्व ब्राह्मणांसह ते निघाले. इंद्रसेनादि त्यांचे अनुचरहि त्यांना अनुसरले. याप्रमाणें उत्कृष्ट भक्ष्य व विपुलजल यांनीं समृद्ध असलेल्या मार्गानें ते चालले असतां तापसांच्या पवित्र आश्रमांनीं युक्त असलेलें काम्यकवन त्यांच्या दृष्टीं पडलें. तेव्हां स्वर्गांत प्रवेश करणाऱ्या पुण्यात्म्याप्रमाणें विप्रश्रेष्ठांनीं परिवेष्टित असलेल्या त्या पांडवश्रेष्ठांनीं काम्यकवनांत प्रवेश केला. ३. १५. २५८

येथें पंधरावें मृगस्वप्नोद्भवपर्व समाप्त झालें.

---

# व्रीहिद्रौणिकपर्व १६



## अध्याय २५९ वा.

[ १ युधिष्ठिराच्या मनाचें अस्वास्थ्य. २ व्यासांचें आगमन व पांडवांस उपदेश. ३ दान व तप यांच्या श्रेष्ठत्वाचा विचार. ]

( १ ) वैशंपायन—हे जनमेजया, वनांत राहणाऱ्या त्या पांडुपुत्रांचीं अकरा वर्षें मोठ्या कष्टानें गेलीं. सुखालाच पात्र असलेले ते नरश्रेष्ठ फलमूलाहार करून प्रसंगानें प्राप्त झालेलें दुःख मोठ्या धैर्यानें सहन करीत होते. राजर्षि युधिष्ठिराला 'स्वतःच्या द्यूतादि अपराधामुळें आपल्या भ्रात्यांस हे भयंकर क्लेश भोगावे लागत आहेत' ही गोष्ट शल्याप्रमाणें टोंचीत असल्यामुळें रात्रीं सुखानें झोंपहि येत नसे. त्यावेळीं शकुनि व इतर कपट द्यूतकार यांचें तें दुष्कर्म त्याच्या दृष्टीपुढें उभें रहात असे. कर्णाच्या त्या कठोर वचनांचें त्याला स्मरण होत असे व भयंकर क्रोधरूपी विष मनांत धारण करणारा तो अत्यंत दीन होऊन वारंवार दीर्घ व उष्ण निःश्वास सोडीत असे.

अर्जुन, नकुल, सहदेव, साध्वी द्रौपदी आणि बलाढ्य भीमसेन युधिष्ठिराकडे पाहून तें भयंकर दुःख सहन करीत होते. आतां वनवासाचा अगदीं अल्प काल अवशिष्ट राहिला आहे, असें मानणाऱ्या त्या पुरुषश्रेष्ठांनीं उत्साह, क्रोध व हावभाव यांच्या योगानें जणुं काय आपल्या देहांचें रूपांतरच केलें.

( २ ) त्यानंतर कांहीं कालानें महायोगी सत्यवतीसुत व्यास पांडवांना भेटण्यासाठीं तेथें आला. कृष्णद्वैपायन येत आहे, असें दुरूनच अवलोकन करून युधिष्ठिर त्या महात्म्यास सामोरा गेला. त्यानें त्या पितामहाचें यथाविधि स्वागत केलें. नंतर पांडवांच्या प्रणिपातानें संतुष्ट झालेला तो बादरायण मुनि आसनावर बसला असतां जितेंद्रिय युधिष्ठिर त्याची शुश्रूषा करण्याच्या इच्छेनें त्याच्या समीप बसला.

तेव्हां तो महर्षि वनांतील वन्य आहारावर उपजीविका करणाऱ्या आपल्या पौत्रांस कृश झालेलें पाहून मनांत खिन्न झाला आणि अनुकंपेनें सद्गदित वाणीनें बोलला—" हे युधिष्ठिरा, तूं धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ आहेस. यास्तव माझें वचन ऐक. या लोकीं उग्र तपश्चरणावांचून उत्तम सुख प्राप्त होत

नसतें. मनुष्याला सुख व दुःख यांची क्रमानें प्राप्ति होतच असते. कोणाहि सामान्य मनुष्याला अनंत कालपर्यंत सुख केव्हांहि मिळत नाहीं ( ‘ तर मग तें अनंत सुख कोणाला मिळतें ! ’ असें जर म्हणशील, तर ऐक— ) केवल ज्ञानी मनुष्यालाच ब्रह्मविद्येच्या योगानें त्या अक्षय सुखाची प्राप्ति होते.

जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांचें कारण जें ब्रह्म त्याला जाणणारा ज्ञानी कधीं शोक करीत नाहीं किंवा कशाची आकांक्षा करीत नाहीं. या मिथ्याभूत जगांत प्रिय सुखाचा अभावच असल्यामुळें सुखाचा वियोग झाला असतां त्याला शोक होत नाहीं व तो त्याची कधीं इच्छाहि करीत नाहीं.

कृषीवल ज्याप्रमाणें कालप्राप्त फलाचा संग्रह करितो, त्याप्रमाणें विचारी पुरुषानें प्रारब्धप्राप्त सुख-दुःख संतोषानें सहन करावें. कारण तीं दोन्ही अपरिहार्य आहेत. हे भारता, ज्ञानाहून श्रेष्ठ साधन नाहीं. ज्ञानानें ब्रह्मप्राप्ति होते. त्याला असाध्य असें कांहींच नाहीं, असें समज. सत्य, आर्जव, अक्रोध, संपादित द्रव्याचा सत्पात्रीं विनियोग, शम, दम, अनसूया, अहिंसा, शौच आणि इंद्रियनिग्रह हीं पुण्यवान् मनुष्यांना पावन करणारीं आहेत.

परंतु अधर्मप्रिय मूढजन तिर्यग्गतिपरायण असतात. म्हणजे पशु-पक्ष्यादिकांच्या योनि प्राप्त होतील, असेंच आचरण करितात. त्यामुळें कष्टकर योनीस प्राप्त होऊन त्यांना सुख मिळत नाहीं. इह लोकीं जें कर्म करावें, तें परलोकीं उपयोगी पडतें. यास्तव सर्वदा ज्ञान व नियम यांनीं युक्त व्हावें. राजा, दानाचा काल प्राप्त झाला असतां मत्सरशून्य व संतुष्टचित्त होऊन, अतिथीचा प्रणामपूर्वक सत्कार करून, त्याला यथाशक्ति दान द्यावें.

युधिष्ठिरा, सत्यवादी मनुष्याला क्लेशपरिहार, सरळपणा व दीर्घायुष्य प्राप्त होतें. क्रोधराहित्य व अनसूया यांच्या योगें मोक्षाख्य परमगति मिळते. जितेंद्रिय व शमपर मनुष्यास क्लेश होत नाहींत. दमनशील पुरुष दुसऱ्याचें ऐश्वर्य पाहून संतप्त होत नाहीं. अन्नादिकांचा विभाग करणारा व धनादिकांचें दान करणारा नर सुखोपभोगानें संतुष्ट होतो. प्राण्यांना पीडा न देणारा श्रेष्ठ आरोग्य अनुभवितो. मान्यजनांचा सन्मान करणारा श्रेष्ठ कुलांत उत्पन्न होतो.

जितेंद्रिय पुरुष स्त्री, मद्य, द्यूत इत्यादि व्यसनांच्या अधीन होत नाहीं. ज्या मनुष्याची अशाप्रकारें शुभकार्याकडेच बुद्धि असते, त्याला मरणकालींहि त्या शुभकर्मामुळें कल्याणकर अंत्यमति प्राप्त होते.

**युधिष्ठिर**—हे भगवन्, दानापासून होणारा धर्म आणि कृच्छ्रादि शरीर-क्लेशकारक व्रतें, यांत श्रेष्ठ काय ? या दोहोंतील मरणोत्तर—परलोकीं अधिक उपयुक्त कोणतें आणि इहलोकीं आचरण्यास दुष्कर कोणतें, हें मला सांग.

( ३ ) **व्यास**—हे वत्सा, या पृथ्वीतलावर दानाहून अधिक श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. कारण लोकांना धनाची अत्यंत तृष्णा असते आणि तें द्रव्य अतिशय कष्ट करून संपादावें लागतें. हे महामते, धनासाठीं लोक आपल्या प्रिय प्राणांचाहि त्याग करून समुद्र व अरण्यें यांत प्रवेश करितात. द्रव्यासाठींच लोक कृषि व गौरक्ष्य यांचें अवलंबन करितात. धनार्थी जन परक्याचें दास्यहि पत्करितात !!

यास्तव हे कुंतीपुत्रा, इतक्या कष्टानें संपादन केलेल्या द्रव्याचा त्याग करणें अतिशय कठिण आहे. दानाहून अधिक दुष्कर कांहीं नाहीं. तस्मात् दान श्रेष्ठ होय, असें माझें मत आहे. आतां या दानाचा विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. न्यायानें संपादिलेल्या द्रव्याचा योग्यकालीं, पवित्रदेशीं व सत्पात्रीं विनियोग करावा. अन्यायानें मिळविलेल्या धनाचा जो दानरूपानें धर्म करितो, तो धर्म दात्याचें महद्भयापासून केव्हांहि रक्षण करीत नाहीं. युधिष्ठिरा, शुद्ध मनानें योग्य कालीं सत्पात्राला दिलेलें अल्प दानहि परलोकीं अनंत फल देतें, असें स्मृत आहे.

द्रोणभर व्रीहींचें दान केल्यानें मुद्गलास केवढें फल प्राप्त झालें, याविषयीं असा एक पुरातन इतिहास प्रसिद्ध आहे. ३. १६. २५९.

---

## अध्याय २६० वा.

[ १ मुद्गलाची शिलोञ्छवृत्ति. २ दुर्वासानें सहा वेळां केलेला त्याच्या अन्नाचा अपहार. ३ त्याच्या जितमनस्त्वाची प्रशसा. ४ विमानासह देवदूतांचें आगमन. ५ त्यांस देवलोकाविषयीं प्रश्न. ]

**युधिष्ठिर**—हे भगवन्, त्या महात्म्यानें व्रीहिद्रोणाचें दान कसें केलें ? तें कोणाला व कोणत्या विधीनें दिलें ? हें मला सांग. पुरुषांचे धर्म जाणणारा

१ पात्रे दानं स्वल्पमपि काले दत्तं युधिष्ठिर ।
मनसा हि विशुद्धेन प्रेत्यानन्तफलं स्मृतम् ॥

ईश्वर आहे आणि ज्या सद्धर्माचरणी पुरुषाच्या सत्कर्मांनीं तो भगवान् संतुष्ट होतो त्याचा जन्म सफल होय, असें मी मानतों.

( १ ) व्यास—हे राजन्, कुरुक्षेत्रांत 'मुद्गल'-नामक एक सत्यनिष्ठ व जितेंद्रिय ब्राह्मण रहात होता. कोणाची असूया न करणारा तो धर्मात्मा, नित्य शिलोञ्छवृत्तीवर निर्वाह करीत असे. तो अतिथिप्रिय व कर्मनिष्ठ होता. त्या महातपस्वी विप्रानें अल्पसंग्रहरूपी कापोती वृत्तीचें अवलंबन करून केवल इष्टींनींच समाप्त होणारें 'इष्टिकृत्'-संज्ञक सत्र आरंभिलें. पश्वादिकांनीं युक्त असलेला यज्ञ केला नाहीं.

तो मत्सरशून्य मुद्गल स्त्री-पुत्रांसह पंधरा दिवसांनीं एकदा आहार करीत असे आणि कपोतवृत्तीनें पंधरा दिवसांत एक द्रोणभर व्रीहि मिळवून आणून दर्श-पौर्णमास केल्यावर देवता व अतिथि यांना हवि अर्पण करून अवशिष्ट राहिलेल्या अन्नानें देहाचें पोषण करीत असे. प्रत्येक पर्वकालीं सर्व देवांसह साक्षात् त्रिभुवनेश्वर इंद्र त्या धर्मात्म्यानें अर्पिलेला हविर्भाग ग्रहण करीत असे व मुनिवृत्तीनें रहाणारा तो ब्राह्मण वैश्वदेव-वरुणप्रघासादि कर्म करून मोठ्या संतुष्ट चित्तानें अतिथींना अन्नदान करीत असे.

तो महात्मा द्रोणभर अन्न सिद्ध करून तें अर्पण करूं लागला म्हणजे अतिथि दिसतांच तें अवशिष्ट अन्न वाढत असे. त्यामुळें शेकडों विद्वान् ब्राह्मण भोजन करून जात. तो मुनि शुद्ध चित्तानें दान करीत असल्यामुळें त्याच्या अन्नाची अभिवृद्धि होत असे.

( २ ) हे महाराज, त्या धर्मनिष्ठ मुद्गलाची अशी कीर्ति ऐकून दिशा हेंच ज्याचें वस्त्र आहे असा दुर्वास-ऋषि तेथें आला. हे पांडुपुत्रा, तो मुनि उन्मत्ताप्रमाणें अनियत वेष धारण करून मस्तकाचें मुंडन करीत असे व दांत विचकीत नानाप्रकारचे कठोर शब्द उच्चारीत असे. तो मुनिश्रेष्ठ एकदा अकस्मात् मुद्गलापाशीं येऊन म्हणाला—" हे ब्राह्मणा, मी तुजकडे भोजनासाठीं आलों आहें, असें समज."

तेव्हां मुद्गलानें 'ठीक आहे, तुझें स्वागत असो' असें बोलून त्या मुनीचें पाद्य, आचमनीय, अर्घ्य इत्यादिकांनीं पूजन केलें आणि अतिथींचा सत्कार करणाऱ्या त्या व्रती ब्राह्मणानें उन्मत्तरूप धारण करणाऱ्या त्या क्षुधित तापसाला मोठ्या श्रद्धेनें अन्न दिलें. तेव्हां त्या क्षुधित दुर्वासानें तें सर्व रुचकर व स्वादु

अन्न यथेच्छ भक्षण केलें आणि भोजनानंतर सर्व उच्छिष्ट अन्नानें आपलें अंग माखून तो मुनि आल्या मार्गानें निघून गेला.

त्यानंतर पुनः दुसऱ्या पंधरवड्यासहि त्या उञ्छवृत्तीनें रहाणाऱ्या मुद्गलाच्या आहाराचा काल प्राप्त होतांच दुर्वास-ऋषि पूर्ववत् त्याच्याकडे आला व सर्व अन्न भक्षण करून मार्गस्थ झाला. तेव्हां तो आहारावांचून असलेला ज्ञानी ब्राह्मण मार्गांत पडलेले दाणे वेंचून आणण्यास गेला. परंतु त्या मुद्गलाला क्षुधा पीडा देऊं शकली नाहीं. स्त्री-पुत्रांसह दाणे वेंचीत असतां त्या धर्मात्म्याच्या मनाला क्रोध, मात्सर्य, अवमान किंवा भ्रांति यांनीं स्पर्शहि केला नाहीं.

याप्रमाणें उञ्छवृत्तीवर निर्वाह करणाऱ्या त्या विप्रश्रेष्ठाकडे कृतनिश्चयी दुर्वासमुनि सहा वेळां भोजनकालीं प्राप्त झाला. परंतु त्या शुद्धचित्त महात्म्याच्या मनांत यत्किंचित्‌हि विकार उत्पन्न झाला नाहीं. दुर्वासाला त्याचें चित्त सर्वदा निर्मल व निर्विकार दिसलें. तेव्हां तो मुनि प्रसन्न होऊन मुद्गलास म्हणाला—

( ३ ) " हे साधो, यालोकीं तुझ्यासारखा मत्सरशून्य दाता नाहीं. क्षुधा धर्माचें भान नाहींसें करिते, धर्म लोपविते, रसाला अनुसरणारी जिह्वा पुरुषाला रसाकडेच नेते. पण तूं प्राणधर्म क्षुधा आणि इंद्रियधर्म रसना या दोहोंनाहि जिंकिलें आहेस. प्राण आहारावरच जगणारे असून मन चंचल व निग्रह करण्यास अतिशय कठिण आहे. मन आणि इंद्रियें यांचें ऐकाग्र्य हेंच निश्चित तप आहे. हे धर्मज्ञा, श्रमानें संपादन केलेल्या वस्तूचा त्याग करणें अत्यंत दुःखप्रद आहे, परंतु तूं शुद्ध चित्तानें संपादिलेलें अन्न मला शांत चित्तानें समर्पण केलेंस. मीं तुझ्या सहवासानें प्रसन्न झालों आहें. तूं मजवर मोठा अनुग्रह केला आहेस. इंद्रियजय, धैर्य, सत्पात्रीं दान, दम, शम, दया, सत्य व धर्म हीं सर्व तुझ्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहेत. तूं आपल्या सत्कर्मांनीं सर्व लोकांना जिंकिलें आहेस व परम गतीला प्राप्त झाला आहेस. अहाहा! धन्य तुझी दाननिष्ठा. तुझ्या दातृत्वाची थोरवी काय वर्णावी! हे सुव्रता, स्वर्गांतील देवांनीं तुझ्या दानाची फार मोठी प्रशंसा केली आहे. तूं सशरीर स्वर्गीं जाशील. "

( ४ ) राजा, दुर्वासमुनि असें बोलत आहे, तोंच देवदूत विमानासह मुद्गलापाशीं आला. त्या विमानाला सारस व हंस पक्षी जोडले असून त्याला घुंगुरमाळा लावलेल्या होत्या. दिव्य सुवासानें युक्त असलेलें तें विचित्र विमान इच्छागामी होतें.

देवदूत त्या विमानासह मुद्गलापाशीं येऊन त्यास नम्रपणें म्हणाला—हे मुने, तूं आपल्या सत्कर्मांच्या योगानें हें विमान मिळविलें आहेस. यावर सत्वर आरूढ हो. तूं परम गतीला प्राप्त झाला आहेस.

देवदूताचें हें वचन ऐकून मुद्गल म्हणाला—हे देवदूता, स्वर्गवासी जनांचे गुण तुझ्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्यांचे गुण, तप व व्यवसाय कोणत्या प्रकारचे असतात, स्वर्गांतील सुख व दोष यांचें स्वरूप काय आहे, तें मला सांग. हे विभो, सज्जनांशीं सात पावलें चाललें असतां किंवा सात शब्द बोलले असतां मैत्री होते, असें कुलीन विद्वानांचें मत आहे. म्हणून मैत्रीचा पुरस्कार करून मी तुला विचारीत आहें. यास्तव स्वर्गांतील तथ्य आणि हिता-वह प्रकार तूं मला निःशंकपणें कथन कर. म्हणजे मग मी या विमानांत बसून स्वर्गामध्यें यावें कीं नाहीं, याचा निश्चय करीन. ३. १६. २६०.

---

## अध्याय २६१ वा.

[ १ स्वर्गांतील गुण व दोष यांचें वर्णन ]

(१) देवदूत—हे महर्षे, तुझी बुद्धि श्रेष्ठ आहे. यास्तव प्राप्त झालेल्या स्वर्ग-सुखाचा तूं बहुमान करावास, परंतु तसें न करतां एखाद्या अज्ञजनाप्रमाणें तें स्वर्गपद शुभ आहे कीं अशुभ आहे, याचा विचार करीत आहेस. या भूलो-कावर जो सुखलोक आहे त्याला ‘ स्वर् ’ असें म्हणतात. ‘ स्वर् ’ या शब्दाचा ‘विशिष्ट सुख’ असा अर्थ आहे. जें दुःखानें मिश्रित नाहीं, ज्याला उत्तरक्षणीं दुःख ग्राशीत नाहीं व जें इच्छा होतांच प्राप्त होतें, तें सुख, हाच ‘ स्वर् ’ या शब्दाचा अर्थ आहे. सुवर्लोकामध्यें अशाप्रकारच्या सुखाचें प्राधान्य असतें. म्हणून त्याला स्वर्लोक असें म्हणतात. ऊर्ध्वगमनामुळें तो लोक ऊर्ध्वग आहे. तो ब्रह्ममार्ग म्हणजे क्रममुक्तीचें स्थान आहे, म्हणून त्याला सत्पथ असेंहि म्हणतात. अर्चि-रादि-मार्गानें जाणारे उपासक यांतून नित्य संचार करितात. त्यामुळें हे मुने, या लोकाला देवयानचर असेंहि म्हणतात.

हे मुद्गला, तप न करणारे, महायज्ञ न करणारे, असत्यवादी व नास्तिक पुरुष तेथें जात नाहींत. शांत, दांत, विमत्सर, दानधर्मरत, शूर, धारातीर्थीं

पडलेले व जितेंद्रिय धर्मात्मेच त्या लोकीं जातात. शम-दमादि श्रेष्ठ धर्माचरण करणाऱ्या लोकांस सदाचरणी जनांचे हे पुण्य लोक प्राप्त होतात.

हे धर्मनिष्ठा, तेथें देव, साध्य, विश्वेदेव, महर्षि, यामा, धामा, गंधर्व, अप्सरा, या देवतांचीं पृथक् पृथक् भुवनें असलेले तेजस्वी, शुभ, कामसंपन्न व देदीप्यमान अनेक लोक आहेत. त्या स्वर्गलोकांत ज्याच्या शिखराचा परिघ तेहतीस हजार योजनें उंच आहे, असा सुवर्णमय पर्वतराज मेरु असून त्यावर देवांचीं नंदनवनासारखीं पवित्र उद्यानें व पुण्यवान् लोकांचीं विहारस्थानें आहेत.

तेथें क्षुधा, तृषा, ग्लानि, शीत, उष्ण, भय आणि बीभत्स व अशुभ असें कांहींहि नाहीं. त्या पुण्यलोकांत सर्वत्र आह्लादकारक सुगंध, सुखस्पर्शी पदार्थ व श्रुतिमनोहर शब्द भरलेला आहे. तेथें शोक, जरा, आयास, किंवा दुःख यत्किंचित्हि नाहीं. हे मुने, स्वतःच्या कर्मांनींच प्राप्त होणाऱ्या त्या स्वर्ग-लोकाचें स्वरूप अशाप्रकारचें आहे. स्वतःच्या सत्कर्मानेंच पुण्याचरणी लोकांचीं तैजस व कर्मजन्य शरीरें तेथें उत्पन्न होतात. तीं माता-पितरांपासून उत्पन्न होत नाहींत.

तेथल्या पुण्यवान् प्राण्यांना स्वेद, दुर्गंध किंवा इतर देहमल नसतात. त्यांचीं वस्त्रें मलिन होत नाहींत. त्यांच्या दिव्य गंधानें युक्त असलेल्या पुष्प-माला म्लान होत नाहींत. या विमानासारखींच विमानें त्यांना मिळतात. ईर्ष्या, शोक, ग्लानि, मोह व मात्सर्य यांनीं रहित असलेले ते स्वर्गजित् लोक सुखानें रहातात.

अशाप्रकारच्या पुण्यात्म्यांना प्राप्त होणारे व दिव्य गुणांनीं युक्त असलेले ते लोक उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत. त्या सर्व लोकांच्या अग्रभागीं ब्रह्मदेवाचे तेजोमय व शुभ लोक असतात. स्वतःच्या शुभ कर्मांनीं पावन झालेले ऋषि तेथें जातात. या लोकांत 'ऋभु'-नामक अन्य देवता आहेत. त्या देवतांची इतर देवताहि आराधना करितात. ते लोक स्वयंप्रकाश, तेजस्वी व कामना पूर्ण करणारे आहेत. त्यांना स्त्रियांचा ताप होत नाहीं. लोकैश्वर्याचा मत्सर वाटत नाहीं. ते आहुतीवर निर्वाह करीत नाहींत. अमृताचेंहि सेवन करीत नाहींत. त्यांचीं शरीरें दिव्य असतात. पण तीं साकार नसतात. ते सनातन देवाधिदेव सुखांत राहूनहि सुखाची इच्छा करीत नाहींत. कल्पाचें जरी परिवर्तन झालें तरी त्यांचें परिवर्तन होत नाहीं.

मग त्यांना जरा-मृत्यू, हर्ष-प्रीति, सुख-दुःख व राग-द्वेष कोठून असणार ? हे ब्रह्मन्, देवहि या श्रेष्ठ गतीची इच्छा करीत असतात. परंतु ती अगम्य सिद्धि विषयासक्त जनांस दुष्प्राप्य आहे. श्रेष्ठ नियम व विधिपूर्वक दान करणाऱ्या ज्ञानी पुरुषांना ज्यांचे लोक प्राप्त होतात, ते हे देवाधिदेव तेहतीसच आहेत.

हे विप्रा, तें दानाचें फल तुला अनायासानें प्राप्त झालें आहे. तपश्चरणानें तुझा देह कांतिमान् झाला आहे. यास्तव तूं स्वतःच्या सत्कर्मानें संपादिलेल्या या फलाचा उपभोग घे. विप्रा, स्वर्गसुख अशा स्वरूपाचें आहे. स्वर्गांत नानाप्रकारचे लोक आहेत. याप्रमाणें मीं तुला स्वर्गांतील गुण सांगितले; आतां दोष सांगतों तेहि ऐक.

स्वर्गलोकीं आपल्या पूर्वी केलेल्या कर्मांच्या फलाचाच उपभोग मिळतो. तेथें अन्य कर्म संपादन करितां येत नाहीं. त्यामुळें मूळ छेदून त्यावरच निर्वाह करावा लागतो. संपादित कर्मांत नवीन कर्मांची भर न पडतां संचित कर्माचाच व्यय होत असतो आणि कर्मक्षय होतांच स्वर्गांतून पतन होत असतें. स्वर्गांत मला हाच मोठा दोष दिसतो. ज्यांचें मन सुखानें व्याप्त झालें आहे, त्यांचें पतन व इतर स्वर्गीयांचें आपल्यापेक्षां अतिशय दीप्त असलेलें ऐश्वर्य पाहून होणारा संताप, आपल्या परिस्थितीविषयीं असंतोष, निकृष्टस्थानीं असलेल्या स्वर्गस्थांचा उत्कृष्टाविषयीं मत्सर हे दोष तेथें अपरिहार्य आहेत.

स्वर्गांतून च्युत होणाऱ्या जीवाचें ज्ञान नष्ट होतें. त्याचें शरीर धूलीनें मलिन दिसूं लागतें. त्यांनीं धारण केलेल्या पुष्पमाला म्लान होतात. त्या वेळीं त्यांस स्थानभ्रष्ट होण्याचें भय वाटूं लागतें. हे मौद्गल्या, ब्रह्मलोकापर्यंत हे दारुण दोष आहेत. परंतु स्वर्गलोकीं गेलेल्या पुण्यवान् लोकांचे सहस्रावधि गुणहि अनुभवास येतात.

हे मुने, स्वर्गांतून च्युत होणारांमध्यें एक श्रेष्ठ गुण असतो. त्या जीवांना पूर्वीच्या शुभसंस्कारांमुळें मनुष्यजन्म प्राप्त होतो व तो महात्मा मर्त्य लोकीं सुख भोगितो. परंतु त्या जन्मांत त्यानें जर ज्ञानार्जन केलें नाहीं तर तो अधोलोकीं जातो. या लोकीं जें कर्म करावें, त्याचेंच फल परलोकीं मिळतें. हे ब्रह्मन्, ही कर्मभूमि असून स्वर्गलोक फलभूमि आहे.

**मुद्गल**—हे देवदूता, तूं मला स्वर्गांतील मोठमोठे दोष सांगितलेस. आतां एखादा निर्दोष लोक असल्यास तो मला सांग.

**देवदूत**—हे विप्रश्रेष्ठा, ब्रह्मलोकाच्याहि ऊर्ध्वभागीं विष्णूचें शुद्ध व सनातन परम पद आहे. त्याच परम ज्योतीला ब्रह्म असें म्हणतात. विषयासक्त पुरुष व दंभ, लोभ, महाक्रोध, मोह, द्रोह, यांनीं युक्त असलेलीं मनुष्यें तेथें जाऊं शकत नाहींत. तर निर्मम, निरहंकार, द्वंद्वरहित, जितेंद्रिय व ध्यानयोगपर असलेले मानवच तेथें जातात. मुद्गला, तूं विचारलेलें हें सर्व तुझ्या अनुकंपेनें मीं तुला कथन केलें आहे. आतां हे साधो, आपण सत्वर जाऊं या.

**व्यास**—युधिष्ठिरा, देवदूताचें हें सर्व भाषण ऐकून मुद्गलानें मनांत विचार केला आणि त्या देवदूताला म्हटलें—

"हे देवदूता, तुला नमस्कार असो. तूं जसा आलास तसा परत जा. बाबारे, महादोषांनीं युक्त असलेल्या तुमच्या स्वर्गाशीं व तेथल्या सुखाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. स्वर्गांत निवास करणाऱ्या लोकांना स्थानभ्रष्ट होतांच भयंकर दुःख व क्लेश सहन करावे लागतात; तस्मात् मला त्या स्वर्गाची इच्छा नाहीं. जेथें गेलें असतां शोक, व्यथा किंवा च्युत होण्याचें भय नाहीं अशाच केवल अक्षय स्थानाचा शोध मी करीन."

असें बोलून त्या शिलोञ्छवृत्तीनें रहाणाऱ्या धर्मात्म्यानें देवदूताला परत पाठवून श्रेष्ठ शमाचें अवलंबन केलें. तो मुनि निंदा-स्तुति, मृत्तिका, दगड व सुवर्ण यांस तुल्य मानूं लागला व शुद्ध ज्ञानयोगानें ध्याननिष्ठ होऊन राहिला. ध्यानयोगाच्या बलानें त्याला श्रेष्ठ बुद्धि प्राप्त होऊन शेवटीं तो निर्वाणलक्षण शाश्वत परम सिद्धीला पोंचला. यास्तव हे युधिष्ठिरा, तूं आपल्या विस्तीर्ण राज्यापासून च्युत झाल्याचा शोक करूं नको. तपानें तुला तें प्राप्त होईल. वत्सा, रथचक्रांच्या आरांप्रमाणें सुखामागून दुःख व दुःखामागून सुख मनुष्याला क्रमानें प्राप्त होत असतें. तस्मात्, तुला तेराव्या वर्षाच्या शेवटीं पितृ-पितामहांचें राज्य प्राप्त होईल. तूं खेद करूं नको.

**वैशंपायन**—राजा, धर्मराजाला असा उपदेश करून भगवान् व्यास आपल्या आश्रमाकडे तपश्चर्येसाठीं परत गेला. ३.१६.२६१.

येथें सोळावें व्रीहि-द्रौणिकपर्व समाप्त झालें.

---

# द्रौपदीहरणपर्व १७



## अध्याय २६२ वा.

[ १ दुर्वासाचें दुर्योधनाकडे गमन व त्याचा वर. २ पांडवांचें सत्त्व पाहण्याविषयीं मुनीची प्रार्थना. ]

**जनमेजय**—हे महामुने, महात्मे पांडव पूर्वोक्त प्रकारें त्या वनांत मुनींसह विचित्र कथा ऐकत, आपल्या मनाचें रंजन करीत आणि पांचालीचें भोजन होण्यापूर्वीं येणाऱ्या सर्व ब्राह्मणांस सूर्यानें दिलेल्या स्थालींतील अक्षय अन्नानें आणि नानाविध वन्यमृगांच्या मांसानें तृप्त करीत रहात असतां दुरात्मे दुःशासन, कर्ण, शकुनि यांच्या मतानें चालणाऱ्या पापाचरणी धार्तराष्ट्रानें त्यांच्याशीं कसें आचरण केलें, हें मला सविस्तर कथन कर.

(१) **वैशंपायन**—हे राजा, पांडवांची वृत्ति नगरांत असतांना जशी होती, तशीच वनांतहि आहे, हें ऐकून दुर्योधनाच्या मनांत पापबुद्धि उत्पन्न झाली व त्यानें कपटबुद्धिनिपुण कर्ण-दुःशासनांबरोबर पांडवांच्या नाशासाठीं नानाविध उपायांचा विचार चालविला. याप्रमाणें ते दुरात्मे विचार करीत असतां महातपस्वी धर्मात्मा दुर्वासमुनि आपल्या सहस्रावधि शिष्यपरिवारांसह यदृच्छेनें तेथें प्राप्त झाला. तेव्हां तो महाक्रोधी मुनि येत असल्याचें पाहून भ्रात्यांसह नम्र झालेल्या श्रीमान् दुर्योधनानें त्याला निमंत्रण देऊन त्याचें यथाविधि पूजन केलें; आणि तो राजा, स्वतः त्या मुनीच्या सेवेंत किंकराप्रमाणें तत्पर राहिला.

त्या श्रेष्ठ मुनीनें कांहीं दिवस तेथें वास्तव्य केलें. तेव्हां त्या ऋषीच्या शापभयानें दुर्योधन राजा रात्रंदिवस त्याची परिचर्या करूं लागला. तो दुर्वासमुनि कधीं 'हे राजा, मी अतिशय क्षुधित झालों आहें, मला सत्वर अन्न दे' असें म्हणून स्नानास जात असे आणि दीर्घकालानें परत येत असे. केव्हां 'मला आज क्षुधा नाहीं, मला भोजन करावयाचें नाहीं' असें सांगून गुप्त होत असे व कांहीं वेळानें अकस्मात् प्रकट होऊन 'मला सत्वर भोजन दे' असें म्हणत असे. एखादे वेळीं मध्यरात्रीं उठून पूर्ववत् अन्न तयार करवीत असे व त्याची निंदा करून तें भक्षण करीत नसे.

याप्रमाणें तो मुनि वागत असतांहि दुर्योधनाच्या वृत्तींत कांहीं बदल होत नाहीं किंवा तो क्रुद्धहि होत नाहीं, असें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां तो दुराधर्ष मुनि संतुष्ट झाला व म्हणाला— " हे राजा, मी प्रसन्न होऊन तुला वर देत आहें. यास्तव इष्ट वर मागून घे. तुझें कल्याण असो. मी प्रसन्न झालों असतां तुला कोणतीहि धर्म्य वस्तु दुर्लभ नाहीं. "

**वैशंपायन**—राजा, त्या शुद्धचित्त महर्षीचें हें वचन ऐकून दुर्योधनाला स्वतःचा पुनर्जन्मच झाला असें वाटूं लागलें. हा मुनि प्रसन्न झाला असतां कोणता वर मागून घ्यावयाचा याचा त्यानें पूर्वीच कर्ण-दुःशासनादिकांशीं संकेत करून ठेविला होता. तेव्हां त्याप्रमाणेंच मागण्याचा निश्चय करून अतिशय हृष्ट झालेल्या दुर्मति दुर्योधनानें असा वर मागितला.

( २ ) **दुर्योधन**—हे भगवन्, तूं शिष्यांसह मजकडे जसा अतिथि आला आहेस, तसाच गुणवान् व शीलसंपन्न युधिष्ठिराचाहि अतिथि हो. हे ब्रह्मन्, तो धर्मराज आमच्या कुलांत ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. तो भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेला धर्मात्मा वनांत राहत आहे. त्याची धर्मपत्नी सुकुमारी यशस्विनी राजकन्या पांचाली सर्व ब्राह्मणांना व पतींना भोजन घालून व स्वतः सर्वांच्या शेवटीं भोजन उरकून सुखानें विश्रांति घेत बसली असतां तूं तेथें जावेंस. इतका मजवर अनुग्रह कर.

यावर ' ठीक आहे, तुझ्या इच्छेप्रमाणें करीन. ' असें बोलून तो दुर्वासमुनि आल्यामार्गानें निघून गेला. तेव्हां दुर्योधन स्वतःला कृतार्थ मानूं लागला. तो आपल्या हातांत कर्णाचा हात घेऊन अतिशय संतुष्ट झाला.

तेव्हां भ्रात्यांसह स्थित असलेल्या दुर्योधनाला **कर्ण** म्हणाला—हे कौरवा, तुझी कामना पूर्ण झाली व तुझा उत्कर्ष झाला, हें महद्भाग्य होय. आतां तुझे शत्रू, दुस्तर संकटांत सांपडतील ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. ते पांडुपुत्र दुर्वासाच्या क्रोधाग्नींत पडले आहेत, ते स्वतःच्या महापापांनींच दुर्गतीस प्राप्त झाले आहेत.

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें ते कपटी दुर्योधनादिक संतुष्ट होऊन हंसतच आपापल्या मंदिरांत निघून गेले. ३.१४.२६२.

---

## अध्याय २६३ वा.

[ १ दुर्वासाचें पांडवांकडे अकालीं आगमन व युधिष्ठिरानें दिलेलें भोजनाचें निमंत्रण. २ द्रौपदीनें केलेलें कृष्णस्तवन. ३ त्याचें आगमन, शाकपर्णभक्षण. ४ मुनींची तृप्ति व पलायन. ५ पांडवांच्या अनुज्ञेनें कृष्णाचें द्वारकेस प्रयाण. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर कांहीं दिवसांनीं पांडव व द्रौपदी भोजन उरकून सुखानें बसलीं आहेत, असें पाहून दुर्वास-ऋषि त्या वनांत आला. सहस्रावधि शिष्यसमुदायासह येत असलेल्या त्या अतिथीला पहातांच राजा युधिष्ठिर भ्रात्यांसह त्याला सामोरा गेला. त्यानें हात जोडून त्याचें स्वागत केलें, श्रेष्ठ आसनावर बसवून यथाविधि पूजन केलें व आतिथ्याचें निमंत्रण देत म्हटलें—" हे भगवन् , स्नान करून सत्वर यावें."

तें ऐकून तो निष्पाप मुनिहि आपल्या शिष्यांच्या परिवारासह स्नानास गेला. त्या वेळीं 'मला हा शिष्यांसह कसें भोजन देणार ?' याचा कांहीं विचार न करतां त्या मुनीनें शिष्यांसह स्नानासाठीं जलांत प्रवेश केला.

हे राजन्, या मधल्या अवकाशांत पतिव्रतांतील श्रेष्ठ द्रौपदीला अन्नाविषयीं परम चिंता वाटूं लागली. तिनें पुष्कळ विचार केला, पण ऋषींच्या भोजनासाठीं अन्न सिद्ध करण्याचा तिला कांहीं उपाय सुचेना. तेव्हां पांचालीनें मनांत कृष्णाचें स्मरण करून त्याचें स्तवन आरंभिलें.

**द्रौपदी**—हे महाबाहो, देवकीनंदना, कंसनिपूदना, तूं पापांचा व कामादिकांचा नाश करणारा आहेस म्हणून तुला कृष्ण म्हणतात. हे वासुदेवा, जगन्नाथा, तूं शरणागताच्या दुःखाचें निवारण करीत असतोस. हे विश्वात्मन् , विश्वजनका, विश्वसंहारका, हे प्रभो, हे अव्यय, हे शरणागताचें रक्षण करणाऱ्या गोपाला, हे परात्पर प्रजापालका, तूंच चित्तवृत्तीचा प्रवर्तक आहेस. तुला मी नमस्कार करित्यें.

हे सेवनीय वरदा, हे अनंता, तूं आम्हां निराश्रितांची गति हो. हे पुराणपुरुषा, तूं प्राण, मन इत्यादि वृत्तींना अगोचर आहेस. अशा तुज सर्वाध्यक्ष, पराध्यक्षाला मी शरण आलें आहें. हे शरणागतवत्सला देवा, कृपा करून माझें रक्षण कर. हे विभो, नीलकमलाच्या पाकळीप्रमाणें तुझा श्याम वर्ण व पद्मगर्भाप्रमाणें आरक्त नेत्र, यांच्यायोगें स्वभावतःच सुंदर दिसणारें तुझें स्वरूप पितांबर व तेजस्वी कौस्तुभभूषण यांनीं अतिशय शोभतें. तूंच सर्व भूतांचा आदि, अंत

व आश्रय आहेस. तूं परात्पर ज्योति, सर्वतोमुख असून तुलाच परम बीज व सर्व संपत्तीचें निधान म्हणतात. हे देवेशा, तुझा आधार असल्यावर भयंकर आपत्तीचेंहि भय वाटत नाहीं. हे भक्तवत्सला, पूर्वीं कौरवसभेमध्यें मला दुःशासनाच्या हातून जसें सोडविलेंस, तसेंच आतां या संकटांतून मला पार पाडण्यास तूंच समर्थ आहेस.

वैशंपायन—राजा, याप्रमाणें भक्तवत्सल कृष्णेनें स्तवन केलें असतां द्रौपदीचें संकट जाणून देवाधिदेव जगत्पति प्रभु समीपस्थ रुक्मिणीला शयनावर सोडून मोठ्या त्वरेनें तेथें प्राप्त झाला. तेव्हां त्या अचिंत्यगति ईश्वराला पाहून पांचालीनें मोठ्या हर्षानें त्याला प्रणाम केला व दुर्वासाच्या आगमनादिकांचा वृत्तांत निवेदन केला.

तो ऐकून कृष्ण म्हणाला—हे कृष्णे, या वेळीं मला अतिशय क्षुधा लागली आहे. यास्तव मला सत्वर जेवूं घाल. मग मी तुझें सर्व कार्य करीन.

वासुदेवाचें हें वचन ऐकून पांचाली अत्यंत लज्जित होऊन बोलली—हे देवा, भास्करानें दिलेल्या स्थालींत माझें भोजन होईपर्यंतच अन्न मिळतें. परंतु आतां माझें भोजन झालें आहे, तेव्हां त्या पात्रांत अन्न मिळणें शक्य नाहीं.

त्यावर कमललोचन भगवान् म्हणाला—हे कृष्णे, ही थट्टेची वेळ नव्हे. मी क्षुधा व श्रम यांनीं अगदीं व्याकुल झालों आहें. यास्तव सत्वर जा आणि ती स्थाली आणून मला दाखीव.

याप्रमाणें कृष्णानें आग्रह केल्यामुळें द्रौपदीनें ती स्थाली आणून त्याला दाखविली. तेव्हां त्या यदुश्रेष्ठ माधवानें ती हातीं घेऊन पाहिली. तों त्या पात्राच्या कांठाला चिकटून राहिलेलें भाजीचें एक पान त्याच्या दृष्टीं पडलें. तें पान भक्षण करून तो ईश्वर श्रीहरी याज्ञसेनीला म्हणाला—" हे साध्वि, यज्ञभोक्ता विश्वात्मा देव या अन्नानें तृप्त होवो." नंतर त्या क्लेशनिवारक कृष्णानें सहदेवाला म्हटलें—"हे माद्रेया, जा, त्या मुनींना भोजनाला सत्वर बोलावून आण."

तेव्हां सहदेव तेथें समीपच असलेल्या 'देवनदी'-नामक तीर्थावर गेला. तेथें ते ऋषि स्नान करीत होते. पांडव सहदेव कृष्णाच्या आज्ञेनें जेव्हां त्या सर्वांस भोजनार्थ निमंत्रण करावयास गेला त्या वेळीं ते मुनि अघमर्षण करीत होते. पण तें करीत असतांनाच त्यांना अन्नरसाच्या ढेंकरा येऊं लागल्या व अतिशय तृप्त झाल्यामुळें ते जलांतून वर येऊन परस्परांकडे पाहूं लागले.

दुर्वासाकडे पाहून ते सर्व मुनि म्हणाले—हे भगवन्, आपण स्नानासाठीं निघालों, तेव्हां राजा युधिष्ठिरानें आपल्यासाठीं अन्न सिद्ध करविलें असेल. परंतु आम्ही तर अगद आकंठ तृप्त झालों आहों. आतां आम्ही काय जेवणार ? आम्हीं राजाकडून व्यर्थ स्वयंपाक करविला, आतां काय करावें !

दुर्वास—खरोखर, आपण वृथा अन्न सिद्ध करावयास लावून त्या राजर्षींचा मोठा अपराध केला आहे. ते पांडव आपल्या क्रोधयुक्त क्रूर दृष्टीनें आम्हांला दग्ध न करोत ! हे विप्रहो, बुद्धिमान् अंबरीषाच्या अनुभवाचें स्मरण झालें म्हणजे मला हरिचरणांचा आश्रय करणाऱ्या लोकांची अतिशय भीति वाटूं लागते. महात्मे पांडव धर्मपरायण आहेत. ते सर्व भ्राते शूर, कृतविद्य, व व्रती असून तपांत स्थित आहेत. ते सदाचरणी पांडुपुत्र वासुदेवपरायण आहेत. ते क्रुद्ध झाले असतां कापसाच्या राशीचें भस्म करणाऱ्या अग्नीप्रमाणें आम्हांला दग्ध करतील. यास्तव हे शिष्यहो, तुम्ही आतां पांडवांचा निरोप न घेतांच येथून सत्वर पलायन करा.

वैशंपायन—राजा, गुरूनें असें सांगितलें असतां ते सर्व ब्राह्मण पांडवांच्या भीतीनें दशदिशेंत पळून गेले. इकडे सहदेवाला त्या नदीवर ते मुनिश्रेष्ठ न दिसल्यामुळें तो त्या तीर्थाच्या तीरावर त्यांचा शोध करीत इतस्ततः फिरूं लागला. त्यावेळीं तेथें रहाणाऱ्या तापसांनीं त्याला मुनींच्या पलायनाची वार्ता सांगितली. तेव्हां सहदेवानें युधिष्ठिरापाशीं येऊन सर्व वृत्तान्त निवेदन केला.

त्यानंतर ते जितेंद्रिय पांडव त्या मुनींची वाट पहात कांहीं काल स्वस्थ बसले व हा मुनि मध्यरात्रीं अकस्मात् येऊन आम्हांला छळील, आतां काय करावें, दैवानें उपस्थित केलेल्या या संकटांतून कसें पार पडावें, अशी चिंता करीत वारंवार दीर्घ निश्वास सोडूं लागले.

तेव्हां तेथें प्रत्यक्षच असलेल्या श्रीमान् कृष्णानें त्यांस दर्शन देऊन म्हटलें हे वीरांनो, या परमक्रोधी ऋषीपासून तुम्हांवर ओढवणारें संकट जाणून व द्रौपदीनें माझें स्मरण केल्यामुळें मी सत्वर येथें आलों. त्या दुर्वासापासून आतां तुम्हांला यत्किंचित्‌हि भय राहिलें नाहीं. तुमच्या तेजाला भिऊन तो मुनि पूर्वींच पळून गेला आहे. धर्मनिष्ठ पुरुषांना क्लेश कदापि भोगावे लागत नाहींत. आतां मी तुमची अनुज्ञा घेऊन जातों. तुमचें कल्याण असो.

**वैशंपायन**—राजा, केशवाचें हें भाषण ऐकून पांडवांच्या चित्ताला स्वस्थता वाटली व ते द्रौपदीसह निर्भय होऊन म्हणाले—" हे विभो,

महासागरांत बुडणारास तारणाऱ्या नौकेप्रमाणें तूं आम्हांला या दुस्तर आपत्तींतून वांचविलेंस. तुझें कल्याण असो. तूं आतां सुखानें परत जा."

पांडवांनीं अशी अनुज्ञा दिली असतां तो मुकुंद आपल्या नगरीस गेला. नंतर महाभाग पांडव द्रौपदीसह भिन्न भिन्न वनांत विहार करीत संतुष्ट चित्तानें राहिले.

हे राजन्, तूं विचारलेला सर्व वृत्तान्त मीं तुला सांगितला आहे. याप्रमाणें दुरात्म्या धार्तराष्ट्रांनीं वनस्थ पांडवांचा अनेक प्रकारें कपटानें छळ करण्याचा यत्न केला असतां तो सर्व व्यर्थ झाला. ३.१७.२६३.

---

## अध्याय २६४ वा.

[ १ विवाहेच्छु जयद्रथाचें काम्यकवनांत आगमन. २ द्रौपदीला पाहून तिजकडे कोटिकप्रेषण. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्या विपुल मृगयुक्त काम्यकवनांत फिरणाऱ्या महारथ पांडवांनीं देवांप्रमाणें तेथें विहार केला. समीपवर्ती विविध वनप्रदेश व ऋतुकालाप्रमाणें प्रफुल्ल होणारी रम्य वनराजी अवलोकन करीत ते मृगयाशील पांडव त्या महावनांत इंद्राप्रमाणें विहार करीत कांहीं काल सुखानें राहिले. एकदा महर्षि तृणबिंदु व उग्रतपस्वी धौम्य पुरोहित यांच्या अनुज्ञेनें एकट्या द्रौपदीलाच आश्रमांत ठेवून ते सर्व पुरुषश्रेष्ठ पांडव एकाच वेळीं चारी दिशांत ब्राह्मणाकरितां मृगया करावयास गेले.

याच समयीं सिंधुदेशाच्या वृद्धक्षत्र राजाचा पुत्र जयद्रथ विवाहाच्या इच्छेनें शाल्वदेशाकडे चालला होता. तो राजाला योग्य अशा सर्व परिवारांनीं युक्त होता. तो आपल्याबरोबर असलेल्या अनेक नृपतींसह मार्गक्रमण करीत असतां यदृच्छेनें काम्यकवनांत आला. तेथें त्या निर्जन वनांत आश्रमाच्या द्वारांत उभी असलेली पांडवांची प्रिय भार्या यशस्विनी द्रौपदी त्याच्या दृष्टीं पडली. ती आपल्या उत्कृष्ट स्वरूपानें व अंगकांतीनें त्या वनांत नील अभ्रांमध्यें प्रकाशणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें शोभत होती. त्या अनिंदित पतिव्रतेला पाहून 'ही कोणी अप्सरा आहे, देवकन्या आहे किंवा देवनिर्मित माया आहे,' असें जाणून ते सर्व हात जोडून तिजकडे पाहूं लागले.

( २ ) त्या सुकुमारीला पाहून सिंधुपति जयद्रथाच्या मनांत दुष्ट बुद्धि उत्पन्न झाली. तो काममोहित होऊन अंतःपुरांतील मुख्य अधिकारी जो कोटिकास्य क्षत्रिय, त्याला म्हणाला—" ही सुंदरी कोणाची कोण आहे ? ही मानुषी असेल, असें वाटत नाहीं. ही अतिशय रूपवती स्त्री जर मला प्राप्त होईल तर विवाहाची आवश्यकताच राहणार नाहीं. मी हिलाच घेऊन स्वगृहीं निघून जाईन.

यास्तव हे सौम्य, तूं जा आणि ही लावण्यवती कोण, कोठून आली, या कंटकमय घोर अरण्यांत ती कशासाठीं आली आहे, हें सर्व समजून घे. ही कमलनयना श्रेष्ठ स्त्री जर मला प्राप्त होईल तर मी कृतकृत्य होईन. यास्तव हे कोटिका, जा आणि या सुमुखीचा नाथ कोण आहे याचा शोध कर. "

जयद्रथाची ही आज्ञा ऐकतांच कुंडलें धारण करणाऱ्या कोटिकानें रथांतून उडी टाकली आणि कोल्हा जसा व्याघ्रस्त्रीकडे जातो, तसा तो त्या पांडवपत्नी-कडे जाऊन तिला विचारूं लागला. ३.१७.२६४

---

## अध्याय २६५ वा.

[ १ कोटीकास्याचा राजवर्णनपूर्वक द्रौपदीला ' तूं कोण ' इत्यादि प्रश्न. ]

( १ ) **कोटिक**—हे सुलोचने, तूं कोण आहेस ? कदंबशाखेला वाकवून व ती हातानें धरून आश्रमद्वारीं उभी असलेली तूं वाऱ्यानें चंचल होणाऱ्या सायंकालीन प्रदीप्त अग्निशिखेप्रमाणें शोभत आहेस !

तूं अतिशय रूपवती असून या अरण्यांत तुला भीति कशी वाटत नाहीं ? तूं कोणी देवी, यक्षी, दानवी, श्रेष्ठ अप्सरा किंवा दैत्यस्त्री आहेस ! सुंदर देह धारण करणारी तूं नागकन्या किंवा वनांत संचार करणारी राक्षसी तर नाहींस ! कीं राजा वरुण, यम, सोम व कुबेर या लोकपालांपैकीं कोणाची पत्नी आहेस ! अथवा तूं प्रजापतीची सरस्वती, रुद्राची पार्वती किंवा विष्णूची लक्ष्मी आहेस ! तूं इंद्रभुवनांतून तर येथें आली नाहींस ना ?

' आम्ही कोण आहों ' असें तूं आम्हांला विचारीत नाहींस आणि तुझा स्वामी कोण आहे, हें आम्हांला माहीत नाहीं. यास्तव आम्ही तुझा मान वाढविण्यासाठीं तुला विचारितों कीं, तुझा जन्म कोणापासून झाला व तुझा प्रभु कोण आहे ? तुझे आप्त, पति व कुल कोणतें ? आणि तूं येथें काय करीत असतेस, हें आम्हांला तत्त्वतः सांग.

हे देवि, मी राजा सुरथाचा पुत्र असून लोकांमध्यें 'कोटिकास्य' या नांवानें प्रसिद्ध आहें. या राजसमूहांत चयनस्थ हुताग्नीप्रमाणें सुवर्ण रथांत स्थित असलेला हा वीर त्रिगर्तराज ' क्षेमकर ' आहे. त्याच्या पलीकडे असलेला तो कुलिंद राजाचा धनुर्धर पुत्र आहे. हा जो पुष्करणीच्या समीप असलेला कमलपत्राक्ष तुझ्याकडे पहात आहे, तो पर्वतावर निवास करणारा व पुष्पें धारण करणारा श्यामवर्ण दर्शनीय तरुण इक्ष्वाकुकुलोद्भव सुभवराजाचा पुत्र आहे. तो शत्रूंचा संहार करणारा वीर आहे.

ज्याच्या सैन्यामागून ध्वजयुक्त बारा सौवीरक राजपुत्र तांबडे अश्व जोडलेल्या रथांत बसून मखांतील दिव्य अग्नींप्रमाणें जातात, तो हा सौवीरराज जयद्रथ आहे. अंगारक, कुंजर, गुप्तक, शत्रुंजय, संजय, सुप्रवृद्ध, भयंकर, भ्रमर, रवी, शूर, प्रताप व कुहन, या बारा सौवीर राजपुत्रांसह सहा हजार रथी, गज, अश्व व पायदळ याला अनुसरतें. हे कमलाक्षि, या सौवीरराज जयद्रथ राजाचें नांव तूं कदाचित् ऐकलेंहि असशील. हे त्याचे बलाहक, अनीक, विदारण इत्यादि शूर व बलाढ्य भ्राते आहेत. ते श्रेष्ठ सौवीरहि या राजाला अनुसरतात. या सर्वांकडून हा राजा मरुद्गणांनीं रक्षिलेल्या इंद्राप्रमाणें रक्षिला जातो. यास्तव हे चारुगात्रि, तुझ्याविषयीं अज्ञ असलेल्या आम्हांला ' तूं कोणाची भार्या व कोणाची कन्या आहेस ? ' हें कथन कर. ३.१४.२६५.

---

## अध्याय २६६ वा.

[ १ द्रौपदीचें कोटिकास्याला स्ववृत्तान्तकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्या शिबिकुलोत्पन्न श्रेष्ठ राजपुत्राचा हा प्रश्न ऐकून राजकन्या द्रौपदीनें त्याच्याकडे किंचित् पाहिलें, हातांतील शाखा सोडली, आपल्या रेशमी उत्तरीय वस्त्राचा पदर सांवरला आणि शंकोचानें त्याला म्हटलें " हे राजपुत्रा, माझ्यासारख्या श्रेष्ठ कुलांतील स्त्रीनें तुझ्याशीं भाषण करणें योग्य नव्हे, हें मी जाणत्यें. परंतु या वेळीं येथें तुझ्या प्रश्नाचें उत्तर देण्यास मजवांचून एकहि पुरुष किंवा स्त्री नाहीं. यास्तव मी तुझ्याशीं भाषण करित्यें, तें ऐक. एरवीं स्वधर्मनिष्ठ असलेली मी या अरण्यांत एकटीच असतां तुझ्याशीं कशी भाषण करीन !

हे शैब्या, ‘ कोटिकास्य ’ या नांवानें प्रसिद्ध असलेल्या तुज सुरथपुत्राला मी ओळखत्यें; त्याचप्रमाणें तुझ्या प्रसिद्ध कुलाची व आप्तबांधवांचीहि मला माहिती आहे. यास्तव तुला माझा वृत्तान्त सांगत्यें.

मी द्रुपदराजाची कन्या असून लोक मला ‘ कृष्णा ’ या नांवानें ओळखतात. खांडवप्रस्थांतील पांच पुरुषश्रेष्ठांचें नांव तूं ऐकलेंच असशील, त्यांना मीं वरिलें आहे. ते माझे वीर पति युधिष्ठिर, भीम, अर्जुन व नकुल-सहदेव मला येथें ठेवून या वेळीं चार दिशेंत मृगयेला गेले आहेत. धर्मराज पूर्वदिशेंत, भीमसेन दक्षिणेकडे, अर्जुन पश्चिमेस आणि उभयतां माद्रीपुत्र उत्तर दिशेस गेले आहेत. ते महारथ परत येण्याची वेळ होत आली आहे. यास्तव त्यांनीं तुमचा सत्कार केल्यावर मग तुम्ही मार्गस्थ व्हा. तोंपर्यंत वहानें सोडून विश्रांति घ्या. महात्म्या धर्मराजाला अतिथि फार प्रिय आहेत. तुम्हांला पाहून त्याला फार संतोष होईल.

याप्रमाणें त्या शैब्यपुत्राला सांगून ती चंद्रमुखी द्रुपदात्मजा त्या अतिथींच्या सत्काराचा विचार करीत पर्णकुटींत निघून गेली. ३.१७.२६६.

---

## अध्याय २६७ वा.

[ १ कोटिकास्यानें निवेदन केलेला द्रौपदीचा वृत्तान्त. २ कामी जयद्रथाचें तिच्यापाशीं आगमन. ३ द्रौपदीनें आतिथ्यानें त्याचें केलेलें स्वागत. ४ द्रौपदीला स्वतःची भार्या होण्याविषयीं जयद्रथाची प्रार्थना. तिनें केलेला धिक्कार. ]

(१) **वैशंपायन**—राजा, द्रौपदीचा हा वृत्तान्त व भाषण ऐकून कोटिकास्य जयद्रथाकडे परत आला व त्यानें ते सर्व राजे बसले असतां त्यांच्या समक्ष कृष्णेशीं झालेलें सर्व संभाषण त्यास निवेदन केलें. तें ऐकून जयद्रथ म्हणाला— “ त्या श्रेष्ठ सीमंतिनीच्या केवळ भाषणानेंच जर माझें मन इतकें रमतें, तर मग तूं तिच्या इतक्या संनिध जाऊन परत तरी कसा आलास? हे महाबाहो, या सुंदरीला पाहिल्यापासून मला इतर सर्व स्त्रिया वानरींसारख्या भासूं लागल्या आहेत, हें मी तुला अगदीं सत्य सांगतों. तिनें केवळ दर्शनानेंच माझें मन पूर्णपणें हरण केलें आहे. यास्तव हे शैब्या, ती कल्याणी जर मानुषी असेल तर तिचा वृत्तान्त मला कथन कर. ”

**कोटिक**—हे सौवीर राजपुत्रा, ती पांचाल राजकन्या यशस्विनी द्रौपदी पांडवांची प्रिय महिषी असून पांची भ्रात्यांना अतिशय प्रिय आहे. यास्तव हे वीरा, तिला घेऊन तूं सौवीर देशाकडे निघून जा.

**वैशंपायन**—राजा, शैब्याचें हें म्हणणें दुष्टबुद्धि जयद्रथाला अतिशय रुचलें व 'मी आतां द्रौपदीची प्रत्यक्षच भेट घेतों' असें बोलून अनेक सिंहांच्या गुहेंत प्रवेश करणाऱ्या लांडग्याप्रमाणें त्या दुरात्म्यानें पांडवांच्या पवित्र आश्रमांत प्रवेश केला.

त्यानें आपले बलाहकादि सहा भ्राते बरोबर घेतले आणि ते साती राजपुत्र पांडुपुत्रांच्या आश्रमांत जाऊन द्रौपदीला म्हणाले—"हे कल्याणि, तुझें कुशल आहेना? तुझे पति व इतरहि ज्या आप्त जनांचें तूं कुशल चिंतितेस त्यांचें क्षेम आहेना?"

जनमेजया, त्यांचा हा कुशल प्रश्न ऐकून साध्वी कृष्णा, ज्येष्ठ जयद्रथास म्हणाली—हे राजन्, राष्ट्र, कोश व बल यांसह तुझें कुशल आहेना? समृद्ध शिबि, सौवीर, सिंधु व इतरहि जे देश तुला मिळाले आहेत, त्यांचें तूं धर्मानें पालन करतोस ना! हे राजपुत्रा, तूं ज्यांचें कुशल विचारीत आहेस तो कुंतीपुत्र युधिष्ठिर व त्याचे इतर भ्राते, यांसह माझें कुशल आहे. हें पाद्य व आसन आहे. यांचा तूं स्वीकार कर. मी तुला प्रातःकालच्या उपहारासाठीं पन्नास मृग देत्यें. कुंतीपुत्र युधिष्ठिर मृगयेहून आला म्हणजे तो स्वतःच ऐणय, पृषत, न्यंकु, हरिण, शरभ, शश, ऋक्ष, रुरु, शंबर, गवे, मृग, वहार, महिष व इतरहि अनेकप्रकारचे वन्य पशु तुला अर्पण करील.

**जयद्रथ**—तूं देत असलेल्या या प्रातरुपहाराचें कुशल असो. ये, माझ्या रथावर आरूढ हो व केवल सुखाचा अनुभव घे. ऐश्वर्यहीन राज्यच्युत, दीन, अविवेकी व अरण्यवासी पार्थांचा तूं त्याग करणेंच उचित आहे. सुज्ञ स्त्रिया ऐश्वर्यशून्य पतीची सेवा करीत नसतात. जोंवर पुरुष 'वैभवसंपन्न असतो, तोंवरच त्याची उपासना करावी. त्याच्या संपत्तीचा क्षय झाला असतां त्याचा आश्रय करूं नये. या पांडुपुत्रांचें ऐश्वर्य व राज्य अनेक वर्षांपासून नष्ट झालें आहे. अशा त्या पांडवांची भक्तीनें क्लेशकारक सेवा करणें आतां पुरे झालें. हे चारुगात्रि, तूं आतां या पांडवांचा त्याग कर, माझी भार्या हो आणि सुख भोग. माझ्यासह समग्र सिंधु व सौवीर देशांच्या राज्याचा उपभोग घे.

वैशंपायन—राजा, सिंधुराजाचें तें हृदय कंपित करणारें भाषण ऐकून कृष्णा क्रोधानें अत्यंत संतप्त झाली. कपाळाला आंठ्या घालून ती पर्णशालेच्या अंतर्गृहांत गेली व तेथूनच त्याच्या बोलण्यावर आक्षेप घेऊन त्याचा तिरस्कार करीत जयद्रथाला म्हणाली—" पुरे कर. मजपुढें असलें निंद्य भाषण करण्यास तुला लज्जा वाटली पाहिजे. " इतकें बोलून पतींची मार्गप्रतीक्षा करणारी ती निष्पाप पतिव्रता त्याच्याशीं धिक्कारयुक्त भाषण करीत त्याच्या उत्तराला प्रत्युत्तर देऊं लागली. ३.१७.२६७.

---

## अध्याय २६८ वा.

[ १ द्रौपदीनें केलेली जयद्रथाची निर्भत्सना. ]

( १ ) वैशंपायन—राजा, जयद्रथाचें तें निर्लज्जपणाचें भाषण ऐकून द्रुपदात्मजेचें मुख क्रोधानें आरक्त व भीतीनें म्लान झालें. तिच्या सुंदर भृकुटी वक्र झाल्या होत्या. ती रोषानें उष्ण निःश्वास टाकीत त्या सुवीर राष्ट्रपतीस म्हणाली— " मूढा, यशस्वी पांडुपुत्र इंद्रतुल्य पराक्रमी आहेत. ते नित्य स्वकर्मांत तत्पर असलेले वीर यक्ष-राक्षसांनाहि अजिंक्य आहेत. अशा त्या तीक्ष्ण विषाप्रमाणें असह्य असलेल्या महारथांचें अतिक्रमण करून असे नीच उद्गार काढण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं !

पण दुरात्म्यांना कांहींच स्तुत्य दिसत नसतें. तूं दुरात्मा आहेस. तुझ्या सारखे श्वान कोणी गृहस्थ असो, वानप्रस्थ असो, कीं कृतविद्य विद्वान् असो, त्या सर्वांनाच मुक्तकंठानें पापवचनें बोलून त्यांच्या अंगावर असेच भुंकत असतात. पण अधोगतीच्या महागर्तेत पडणाऱ्या तुला दोन्ही हातांनीं धरून त्यांतून वर काढील असा मला एकहि पुरुष या नृपसमूहांत दिसत नाहीं. एखाद्या दंडधारी मनुष्यानें हिमालयाच्या पायथ्याशीं स्वैरसंचार करणाऱ्या, पर्वत शृंगवत् प्रचंड व मदोन्मत्त गजाला त्याच्या कळपांतून दूर करण्याचा जसा प्रयत्न करावा, तसाच तुझा हा उद्यम आहे. पण बाबारे, धर्मराजाला जिंकील असा एकहि मानव मला या लोकीं दिसत नाहीं.

हे दुर्मते, हे पांच महाबलाढ्य सिंह सुखानें स्वस्थ निजले असतां तूं त्यांना लत्ताप्रहार करून मूर्खपणानें त्यांच्या मिशा उपटीत आहेस. परंतु क्रुद्ध भीमसेनाला जेव्हां तूं पहाशील तेव्हां भीतीनें पलायनच करशील. तूं उग्र धनंज-

याशीं युद्धाचा प्रसंग आणूं पहात आहेस. पण ही तुझी कृति पर्वताच्या दरीमध्यें उत्पन्न होऊन तेथेंच वाढलेल्या महाबलाढ्य व अतिभयंकर सुप्त सिंहाला पायानें डवंचण्यासारखीच आहे, हें तुझ्या लक्षांत येत नाहीं.

त्याचप्रमाणें मत्त झालेला तूं त्या पुरुषश्रेष्ठ उभय कनिष्ठ पांडुपुत्रांशीं युद्ध करण्याची इच्छा करीत आहेस, परंतु त्यायोगें तीक्ष्ण मुखें व दोन दोन जिह्वा यांनीं युक्त असलेल्या दोन कृष्णसर्पांच्या शेंपटीवरच पाय देत आहेस, हें तुला कळत नाहीं. हे दुरात्म्या, वेळु, कर्दली किंवा देवनळ स्वतःच्या नाशासाठींच जसे फलद्रूप होतात व खेकडी स्वतःच्या नाशासाठींच गर्भ धारण करिते, त्याचप्रमाणें तूं पराक्रमी पांडवांकडून संरक्षित असलेल्या माझें ग्रहण करण्याची इच्छा करीत आहेस.

जयद्रथ—हे कृष्णे, त्या राजपुत्रांची योग्यता मला ठाऊक आहे. तुझ्या अशा भयप्रदर्शनानें आम्ही भयभीत होणें शक्य नाहीं. हे पांचालि, आम्ही सर्व आंठ कर्मे व नऊ शक्ति यांनीं नित्य युक्त असलेल्या श्रेष्ठ कुलामध्यें उत्पन्न झालों आहों. त्याचप्रमाणें शौर्य, तेज, धृति, दाक्षिण्य, दान व ऐश्वर्य, या सहा गुणांनीं पांडवांपेक्षां वरिष्ठ आहों. त्यामुळें आम्ही पांची पांडुपुत्रांस आपल्याहून हीन समजतों. यास्तव तूं आतां सत्वर गजावर किंवा अश्वावर आरूढ हो. तुझ्या या शाब्दिक वल्गनांनीं आमचें निवारण होणें शक्य नाहीं. तस्मात् पांडवांचा पराभव झाल्यावर दीन होऊन आमची प्रार्थना करण्यापेक्षां आतांच मला प्रसन्न करून घे.

द्रौपदी—हा सौवीरराजा स्वतःला महाबलाढ्य व मला दुर्बल समजत आहे. परंतु त्याच्या मतानें मी जरी दीन असल्यें, तरी वस्तुतः माझा निग्रह करतां येणें शक्य नाहीं, हें प्रसिद्धच आहे. शत्रूंनीं राजसभेंत माझा अवमान करतांच भगवानानें वस्त्रांच्या राशी पाडून मजवर अनुग्रह केला. यास्तव हा दुरात्मा बलात्कारानें जरी माझें हरण करूं लागला तरी मी या सौवीरराजाशीं कदापि दीन भाषण करणार नाहीं. एका रथावर आरूढ झालेले कृष्णार्जुन ज्या

१ कृषी, व्यापार, दुर्ग, सेतु, हस्तिबंधन, खाणी, प्रजेपासून करग्रहण व निर्जनप्रदेश वसविणें हीं आठ कर्मे आणि प्रभुशक्ति, मन्त्रशक्ति व उत्साहशक्ति; प्रभुसिद्धि, मंत्रसिद्धि व उत्साहसिद्धि; प्रभूदय, मंत्रोदय व उत्साहोदय या नऊ शक्ति आहेत.

माझा शोध करण्यास समर्थ आहेत, त्या मज पांडवपत्नीचें हरण करण्याचें साक्षात् इंद्रालाहि सामर्थ्य नाहीं, मग या दुर्बल सामान्य मानवाची काय कथा!

हे मूढमते, तूं जर कदाचित् त्या शूर महात्म्यांचें अतिक्रमण केलेंस, तर शत्रूंच्या मनाचा थरकांप उडविणारा परवीरघ्न अर्जुन माझ्यासाठीं ग्रीष्मकालांतील तृण दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें तुझ्या सैन्यांत प्रवेश करील. तसेंच अंधक वृष्णिवीरांसह जनार्दन व प्रसन्नचित्त महा धनुर्धर केकय राजपुत्र हे सर्व माझा शोध करण्यास निघतील. धनंजयाच्या प्रचंड व श्रेष्ठ गांडीव धनुष्यापासून मेघाप्रमाणें घोर शब्द करणारे शर जेव्हां वेगानें सुटूं लागतील, तेव्हां तूं आपल्या मूढबुद्धीची निंदा करूं लागशील. तो धनंजय शंख वाजवून बाण सोडूं लागला असतां तलत्राणाच्या घोषासह जेव्हां तुझ्या वक्षःस्थलीं असह्य शरवेध करूं लागेल, तेव्हां तुझ्या मनाची काय स्थिति होईल, याचा पूर्णपणें विचार कर.

हे अधमा, हातांत गदा घेतलेला भीमसेन जेव्हां धांवून येईल आणि अमर्षी माद्रीपुत्र जणुकाय क्रोधरूपी विष ओकीतच चोहोंकडून तुजवर चाल करतील तेव्हां तुला दीर्घकाल पश्चात्ताप करावा लागेल.

ज्या मीं आपल्या पूज्य पतींचें कधीं मनानेंहि अतिक्रमण केलेलें नाहीं, त्या माझ्या सत्यप्रभावानें मी आज तुला पार्थांनीं पराभूत करून पशूप्रमाणें भूमीवर ओढलेलें पाहीन. तूं जरी माझा अपहार करण्याचा प्रयत्न केलास, तरी मी तुला भिणार नाहीं किंवा तुला वश होणार नाहीं. तूं जरी माझें हरण केलेंस, तरी कुरुश्रेष्ठ पांडवांची गांठ पडून मी पुनः काम्यकवनांत परत येईन.

वैशंपायन—राजा, द्रौपदीनें त्यांच्याकडे पाहून अशाप्रकारें निर्भर्त्सना केली असतां ते दुरात्मे तिला धरण्याचा प्रयत्न करूं लागले. तेव्हां ती विशालाक्षी पांचाली त्यांचा धिक्कार करीत 'हं दूर व्हा. मला स्पर्श करूं नका,' असें म्हणाली व अत्यंत भ्यालेली ती धौम्य पुरोहितास उच्चस्वरानें हांका मारूं लागली.

इतक्यांत जयद्रथानें पुढें होऊन तिचें उत्तरीय वस्त्र धरलें. तेव्हां त्या तेजस्विनी राजकन्येनें त्याला इतक्या जोरानें हिसडा दिला कीं, त्याबरोबर तो पातकी सिंधुराजा, मूळें छेदिलेल्या वृक्षाप्रमाणें एकदम भूमीवर आपटला.

नंतर ते सर्व दुरात्मे मोठ्या वेगानें तिला ओढूं लागले. तेव्हां पांचालीनें धौम्यमुनींच्या चरणांना वंदन केलें आणि वारंवार उष्ण निश्वास टाकीत ती रथावर चढली.

हा निंद्य प्रकार पाहून धौम्य म्हणाला—जयद्रथा, महारथ पांडुपुत्रांना जिंकल्यावांचून तुला या साध्वीला अशा प्रकारें नेतां येत नाहीं. पुरातन क्षत्रिय-धर्माकडे लक्ष दे. हे पाप्या, तूं हें क्षुद्र पाप कर्म करीत आहेस, परंतु धर्मराज-प्रभृति पांडव वीरांची गांठ पडली, म्हणजे तुला या दुष्कर्माचें फल निःसंशय भोगावें लागेल.

**वैशंपायन**—राजा, असें बोलून तो धौम्य महर्षि यशस्विनी राजकन्येला हरण करून नेणाऱ्या त्या सैन्यांतील पदातींबरोबर तिच्या मागोमाग जाऊं लागला. ३. १७. २६८.

---

## अध्याय २६९ वा.

[ १ धर्मराजास मार्गात दिसलेलीं दुश्चिन्हें. २ द्रौपदीच्या दासीमुखानें सर्व वृत्तान्तश्रवण. ३ पांडवांनीं केलेला जयद्रथाचा पाठलाग. ]

(१) **वैशंपायन**—जनमेजया, इकडे सर्व पृथ्वीला पादाक्रांत करणारे श्रेष्ठ धनुर्धर पांडव सर्व दिशांत संचार करून मृग-वराहादि वन्य पशूंची मृगया करून एकत्र जमले. नंतर हिंस्रपशूंनीं व्याप्त व पक्ष्यांनीं आकीर्ण असलेल्या त्या वनांतील मृगांचा शब्द ऐकून युधिष्ठिर भ्रात्यांना म्हणाला—" हे वीरांनो, सूर्यप्रकाशानें देदीप्यमान झालेल्या दिशेस जाऊन हे पशु-पक्षी क्रूर शब्द करीत आहेत. यावरून आपणांवर कांहीं तरी घोर संकट येणार असून वनांत असलेल्या आपल्या गृहिणीला शत्रु पीडा देत आहे, असें सूचित होतें. यास्तव आतां सत्वर परत फिरा. इतके मृग आम्हांला पुरे झाले. माझ्या मनाला अतिशय उद्वेग व ताप होत आहे. माझे प्राण व्याकुल झाले असून बुद्धि मोहित झाली आहे.

हे शूरांनो, गरुडानें सर्प हरण केलेल्या सरोवराप्रमाणें किंवा अराजक—( राजानें रहित ) ऐश्वर्यहीन राष्ट्राप्रमाणें, किंवा मद्यपि लोकांनीं ज्यांतील मद्य प्राशन केलें आहे, अशा कुंभाप्रमाणें हें काम्यकवन मला शून्य दिसत आहे."

ज्येष्ठ भ्रात्याचें हें भाषण ऐकून ते पार्थ प्रचंड व उत्कृष्ट रथांतून मोठ्या वेगानें आश्रमाकडे निघाले. त्यांच्या श्रेष्ठ रथांना सिंधु देशांतील जातिवंत अश्व जोडले असून ते वायूप्रमाणें वेगवान् होते. ते वीर आश्रमाच्या समीप येत असतां त्यांच्या डावीकडे एक कोल्हा मोठ्यानें भयसूचक शब्द करूं लागला.

तें दुश्चिह्न पाहून धर्मराज भीमार्जुनास म्हणाला—"ज्याअर्थी हा हीन कोल्हा आमच्या डाव्या बाजूस येऊन कर्कश शब्द करीत आहे त्याअर्थी त्या पापी कौरवांनीं आपल्या आश्रमांत जाऊन बलात्कारानें आपला कांहीं तरी अवमान केला आहे, हें स्पष्ट दिसत आहे."

राजा, त्या महा-अरण्यांत मृगया करून श्रांत झालेले पांडव असें बोलत आपल्या आश्रमांत जों प्रवेश करीत आहेत, तों त्यांना मोठमोठ्यानें आक्रोश करीत असलेली पांचालीची दासी दिसली. तेव्हां इंद्रसेनानें मोठ्या त्वरेनें रथांतून उडी टाकली. तो सूत त्वरेनें त्या बालेजवळ गेला आणि त्या धात्रीच्या कन्येला म्हणाला—"हे बाले, तूं अशी भूमीवर पडून रडत कां आहेस? तुझें मुख दीन व म्लान कां दिसत आहे? त्या निर्दय व पापी दुर्जनांनीं राजकन्या द्रौपदीला कांहीं पीडा तर दिली नाहींना? कुरुपुंगवांना प्राणाप्रमाणें प्रिय असलेल्या त्या अप्रतिम रूपवती देवीला घेऊन शत्रूनें पृथ्वींत जरी प्रवेश केला असला, स्वर्गलोकीं नेलें असलें, किंवा समुद्रांत लपवून ठेविलें असलें, तरी त्या ठिकाणीं पार्थ जातील व तिला घेऊन येतील. हा धर्मपुत्र अतिशय संतप्त झाला आहे. अरिमर्दक, अजिंक्य व क्लेश सहन करणाऱ्या धनुर्धर पांडुपुत्रांना ही द्रौपदी प्राणांहूनहि प्रिय आहे. एखाद्या मूल्यवान् रत्नाप्रमाणें असलेल्या त्या साध्वीचा अपहार करण्याची इच्छा कोणता मूर्ख करील? त्या मंदमतीला द्रौपदीचे स्वामी कोण आहेत आणि ती राजमहिषी पांडवांचें बहिश्चर हृदयच आहे, हें कळलें नाहीं काय? आज पांडुपुत्रांचे भयंकर तीक्ष्ण शर कोणाच्या शरीराचा भेद करून भूमींत शिरतील तें नकळे. हे भीरु, तूं असा शोक करूं नको. हे धनुर्धर पार्थ सर्व शत्रूंचा संहार करून याज्ञसेनीला परत आणतील. कृष्णा निश्चयानें सांपडेल. तूं चिंता करूं नको."

इंद्रसेनाचें हें भाषण ऐकून त्या धात्रीकन्येनें विचार करीत त्या प्रसन्नवदन सारथ्याला म्हटलें—हे वीरा, इंद्रतुल्य पांची पांडुपुत्रांना तुच्छ लेखून जयद्रथानें बलात्कारानें पांचालराजकन्येचें हरण केलें आहे. हीं पहा, त्यांच्या

मार्गांचीं नवीन उमटलेलीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. त्याचप्रमाणें मार्गांत मोडून पडलेले वृक्षहि अद्यापि म्लान झाले नाहींत. यास्तव तुम्ही सत्वर परत फिरा व त्या दुरात्म्यानें त्या राजकन्येला दूर नेलें नाहीं तोंच त्यांचा पाठलाग करा. हे इंद्रतुल्य वीरांनो, तुम्ही आपलीं सर्व सुंदर कवचें चढवा, धनुष्य व बाण घेऊन सज्ज व्हा. जोंवर निर्भर्त्सना व दंड यांनीं मोहित होऊन शुष्कमुख भ्रांतचित्त झालेल्या त्या साध्वीनें उत्कृष्ट घृतपूर्ण स्रुचा जशी भस्मामध्यें ओतावी त्याप्रमाणें आपला देह त्या नीचाला अर्पण केला नाहीं, तोंवर तुम्ही शत्रूला गांठा. तुषाग्नीमध्यें जसा हवि अर्पावा किंवा सुगंधी पुष्पमाला जशी श्मशानांत टाकावी किंवा ऋत्विज मूर्च्छित झाल्यामुळें यज्ञांतील सोमरस श्वानांनीं चाटावा त्याप्रमाणें त्या नीचानें साध्वी द्रौपदीला जोंवर दूषित केलें नाहीं तोंवर तुम्ही धांवा. महारण्यांत मृगया करून कोल्हा कमलिनींत शिरला नाहीं, तोंच तुम्ही त्या साध्वीला दुर्जनांच्या हातून सोडवा.

पवित्र यज्ञांतील पुरोडाशाला श्वानानें जसा स्पर्श करावा तसा सर्वांगसुंदर द्रौपदीच्या चंद्रासारख्या प्रसन्न मुखाला एखाद्या दुरात्म्यानें स्पर्श केला नाहीं, तोंवर तुम्ही सत्वर या मार्गानें जाऊन त्यांचा पाठलाग करा. आतां येथें व्यर्थ वेळ घालवूं नका. सत्वर निघा.

**युधिष्ठिर**—हे भद्रे, दूर हो, तूं आमच्यासमोर अशाप्रकारचीं म्ह० ' ती दुसऱ्याला तनु समर्पील ' इत्यादि दुःश्राव्य भाषणें करूं नको. राजे किंवा राजपुत्र स्वतःच्या बलानें मत्त झाले म्हणजे अवध्य स्वजनांचाहि वध करितात. यास्तव तसा प्रसंग तूं स्वतःवर ओढवून घेऊं नको.

**वैशंपायन**—राजा, असें बोलून ते पांडुपुत्र त्याच मार्गानें मोठ्या शीघ्रगतीनें निघाले. ते धनुर्धर वीर सर्पाप्रमाणें दीर्घ निश्वास टाकीत व धनुष्याची दोरी वारंवार ओढीत चालले होते. इतक्यांत त्यांना सैन्याच्या व अश्वांच्या पावलांपासून उडणारी धुलि दिसली आणि पदातींबरोबर ' हे भीमा, धांव धांव ' असा आक्रोश करीत चालणारा धौम्यहि दृष्टीं पडला.

तेव्हां ते वीर धौम्यमुनीला ' तुम्ही निर्भयपणें चला ' असें बोलून त्यांचें सान्त्वन करीत आमिषावर झडप घालणाऱ्या श्येनाप्रमाणें मोठ्या वेगानें त्या सैन्यावर धावले. जयद्रथ आणि त्याच्या रथांत बसलेली आपली प्रिय पत्नी पांचाली यांस पाहून कोपलेल्या त्या इंद्रतुल्य पराक्रमी वीरांचा क्रोध अधिकच

प्रज्वलित झाला आणि युधिष्ठिरादि पांची महाधनुर्धर भ्रात्यांनीं जयद्रथाला उच्च स्वरानें हांका मारिल्या. त्या ऐकून शत्रु मोहित झाले व त्यांची दिशाभूल झाली. ३.१७.२६९.

---

## अध्याय २७० वा.

[ १ जयद्रथानें द्रौपदीला विचारलेली पांडवांची माहिती. २ द्रौपदीनें निर्भर्त्सनापूर्वक त्यास कथन केलेलें पांडवांचें सामर्थ्य. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्या वेळीं क्षत्रियांतील अमर्षी भीमार्जुनांस पाहून त्या वनांत अतिशय घोर शब्द झाला. तेव्हां त्या महारथांच्या ध्वजांचीं अग्रें पाहून दुरात्मा राजा जयद्रथ रथांत बसलेल्या याज्ञसेनीला त्या कुरुश्रेष्ठांचा वृत्तान्त विचारूं लागला.

**जयद्रथ**—हे कृष्णे, हे पांच प्रचंड रथ मजकडे येत आहेत. यावरून तुझे पतिच येत असावेत असें मला वाटतें. तुला त्यांची चांगली माहिती आहे, यास्तव या रथस्थ पांडवांतील कोण कोठला भ्राता, हें मला सांग.

( २ ) **द्रौपदी**—हे मूढा, त्या महाधनुर्धरांचा प्रभाव जाणत असूनहि तूं हें आयुष्याचा नाश करणारें अति घोर कर्म केलें आहेस, आतां तुला त्यांची माहिती विचारून काय करावयाचें आहे! हे माझे वीर पति एकत्र जमले असतां युद्धांत तुमच्यापैकीं एकहि वीर अवशिष्ट रहाणार नाहीं. हे मुमुर्षो, तूं विचारीत असलेली माहिती मी सांगत्यें, कारण हा धर्म आहे. ऐक अनुजांसह धर्मराजाला पहातांच माझी व्यथा नाहींशी झाली व मला तुझें यत्किंचित्‌हि भय वाटेनासें झालें आहे.

ज्याच्या ध्वजाग्रावर नंद व उपनंद नामक दोन मृदंगांचा मधुर ध्वनि होत आहे, ज्याचा शुद्ध सुवर्णासारखा गौरवर्ण आहे, नासिका स्थूल असून, नेत्र विशाल आहेत, त्या माझ्या कुरुकुलश्रेष्ठ पतीला धर्मपुत्र युधिष्ठिर असें म्हणतात. या ज्येष्ठ पांडवाला स्वधर्मार्थांचें उत्तम ज्ञान आहे, त्यामुळें त्याच्याकडे धर्मजिज्ञासु लोक निरंतर येत असतात. हा धर्मनिष्ठ पुरुषश्रेष्ठ शरण आलेल्या शत्रूलाहि प्राणदान देत असतो. यास्तव हे मूढा, तुला जर स्वतःच्या हिताची इच्छा असेल तर शस्त्रत्याग करून व हात जोडून या धर्मराजाला शरण जा.

शालवृक्षासारखा उंच, बलाढ्य व महाबाहु असा जो हा दुसरा वीर दिसत आहे, तो 'वृकोदर'-नामक माझा पति आहे. तो पहा भ्रुकुटी वक्र करून दांत-ओंठ खात रथांत बसला आहे आणि बलाढ्य, शिक्षित, दान्त व जातिवंत अश्व त्याच्या रथाला ओढीत आहेत. त्याच्या अतिमानुष कर्मांमुळेंच पृथ्वीवर तो 'भीम' या नांवानें प्रसिद्ध झाला. हा वीर आपला अपराध करणारांस कदापि जिवंत ठेवीत नाहीं. आपणांशीं केलेलें वैर तो कधींहि विसरत नाहीं. शत्रूचा नाश करूनहि त्याच्या मनाला शांति येत नाहीं. मरणानंतर वैराचा लोप होतो असें जरी लोकांत प्रसिद्ध आहे, तरी हा अमर्षी पांडुपुत्र शत्रूचा नाश करून त्याच्या पुत्र-पौत्रादिकांसहि शिल्लक ठेवीत नाहीं, असा हा दीर्घ कोपी आहे.

हा तिसरा रथस्थ वीर धनुर्धरांतील अग्रणी, धृतिमान्, यशस्वी, जितेंद्रिय, व वृद्धांची सेवा करणारा आहे. तो धनंजयसंज्ञक माझा पति युधिष्ठिराचा भ्राता व शिष्य आहे. तो कधींहि कामानें, भयानें, किंवा लोभानें धर्माचा त्याग करीत नाहीं अथवा क्रूर कर्म आचरीत नाहीं. तो अग्नितुल्य तेजस्वी कुंतीपुत्र शत्रूंना सहन करून त्यांचा नाश करणारा आहे.

हा जो सर्व धर्मार्थांचा निर्णय जाणणारा, भयार्त लोकांचें भय घालविणारा, ज्ञानी, पृथ्वीवर अत्यंत रूपवान्, सर्व पांडव ज्याचें रक्षण करितात व ज्याला प्राणाहूनहि प्रिय समजतात, तो हा चौथा वीर माझा 'नकुल'-नामक पति आहे आणि खड्गयुद्धांतील ज्याचें हस्तकौशल व लाघव विचित्र आहे, असा हा बुद्धिमान् व अद्वितीय माद्रीपुत्र सहदेव आहे. हे मूढबुद्धे, पूर्वी दैत्यसैन्यांत इंद्रानें केलेल्या पराक्रमांसारखें आज तूं याचें अप्रतिम युद्धकौशल्य पहाशील. हा माद्रीतनय शूर, कृतास्त्र, मतिमान्, विद्वान् व धर्मराजाला अतिशय प्रिय आहे. हा चंद्रकिरणाप्रमाणें कांतिमान् असून पांडवांचा कनिष्ठ भ्राता आहे. याच्यासारखा बुद्धिमान् अन्य पुरुष नाहीं. त्याचप्रमाणें याच्यासमान वक्ता किंवा निर्णयज्ञहि कोणी नाहीं. असा हा शूर, नित्य अमर्षी व ज्ञानी सहदेव माझा पति आहे. हा धर्मनिष्ठ प्राणत्याग करील, अग्निप्रवेश करील, परंतु धर्म-बाह्य भाषण कदापि करणार नाहीं. सर्वदा क्षात्रधर्मांत रत असलेला हा नरश्रेष्ठ आर्या कुंतीला प्राणांहूनहि प्रिय आहे.

हे मंदमते, समुद्रामध्यें रत्नांनीं परिपूर्ण भरलेली नौका नक्राच्या पाठीवर आपटून जशी छिन्न-भिन्न व्हावी, तद्वत् आज पांडुपुत्रांच्या हातून तुझ्या सर्व

योद्धयांचा व या सैन्याचाहि नाश झालेला तूं पहाशील. हे अधमा, तूं मोहानें ज्यांचा अवमान करण्यास प्रवृत्त झालास, त्या पांडुपुत्रांचा असा हा सर्व वृत्तान्त मीं तुला कथन केला आहे. आतां तूं या वीरांच्या हातून जर अक्षत शरीरानें सुरक्षित सुटलास तर जिवंतपणींच तुझा पुनर्जन्म झाला असें समज.

**वैशंपायन**—राजा, त्यानंतर इंद्रतुल्य असलेले ते पांच पांडुपुत्र त्रस्त झालेल्या व हात जोडून शरण आलेल्या पदातींस सोडून रथसैन्यांवर धांवून गेले आणि क्रुद्ध झालेल्या त्या महारथांनीं शरवृष्टीनें त्यांस सर्वतः व्यापल्यामुळें सर्वत्र अंधकार पसरला. ३.१७.२७०.

---

## अध्याय २७१ वा.

[ १ पांडवांचें जयद्रथाशीं युद्ध. २ द्रौपदीची मुक्तता, जयद्रथाचें पलायन. ३ त्याचा पाठलाग. ]

(१) **वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें पांडुपुत्रांना समीप आलेलें पाहून तो सैंधव राजा आपल्या बरोबर असलेल्या राजांना ‘थांबा, प्रहार करा, सत्वर धांवून जा’ इत्यादि शब्दांनीं प्रेरणा करूं लागला. त्यावेळीं युधिष्ठिरासह भीमार्जुन व नकुल-सहदेव यांस पाहून त्या संग्रामांत सैन्यांचा भयंकर शब्द झाला. व्याघ्राप्रमाणें बल व उत्साह यांनीं युक्त असलेल्या त्या नरव्याघ्र पांडवांना पाहून शिबि, सौवीर व सिंधु इत्यादि देशांतील योद्धयांना विषाद वाटला.

पांडवांचे रथ त्या सैन्याच्या समीप येतांच क्रोधी भीमसेनानें आपली सुवर्णानें भूषविलेली लोखंडी प्रचंड गदा वर उचलली आणि ज्याला कालानेंच प्रेरणा केली आहे, अशा सैंधवावर तो धांवून गेला. इतक्यांत कोटिकास्यानें मोठ्या त्वरेनें आपला प्रचंड रथसमूह भीम व जयद्रथ या दोघांच्या मध्यें घालून सिंधुपतीचें भीमाच्या गदाप्रहारापासून निवारण केलें.

नंतर त्या वीरांनीं शक्ति, तोमर, बाण, इत्यादि विविध आयुधांची भीमसेनावर वृष्टि चालविली, परंतु तो वीर यत्किंचित्‌हि भ्याला नाहीं. त्या बलाढ्य पांडवानें शत्रुसैन्याच्या अग्रभागींच असलेले माहतांसह गज व चौदा पदाती यांचा गदाघातानें संहार केला.

त्या सौवीराशीं भिडण्याची इच्छा करणाऱ्या पार्थानें जयद्रथाच्या सेनाभिमुख पर्वतवासी पांचशें शूर महारथांना गतप्राण केलें. स्वतः धर्मराजानें सुवीरांचे शंभर युद्धनिपुण श्रेष्ठ योद्धे मारिले. त्या वेळीं हातीं खड्ग धारण करणारा नकुल रथांतून उडी टाकून पादरक्षक सैन्याच्या मस्तकांचा छेद करीत असतां शेतांत बीज पेरणाऱ्या कृषीवलाप्रमाणें त्या रणभूमीवर मस्तकेंच पेरीत आहे, असा भास झाला. सहदेवानें रथारूढ होऊन गजारोही वीरांवर चाल केली आणि वृक्षावरून भूमीवर पाडविलेल्या मोराप्रमाणें त्या शूरानें नाराच बाणांनीं त्यांचीं मस्तकें खालीं पाडविलीं.

त्यानंतर त्रिगर्ताधिपानें रथांतून उतरून धर्मराजाच्या चारी अश्वांना गदाप्रहारानें गतप्राण केलें. तेव्हां तो त्रिगर्त समीप आलेला पाहून धर्मराजानें अर्धचंद्र बाण सोडून त्या पदाती राजाच्या हृदयावर वेध केला. तेव्हां भिन्नहृदय झालेला तो नृप मूळें तोडलेल्या वृक्षाप्रमाणें रक्त ओकीत त्याच्यापुढें पडला. नंतर अश्व मारले गेल्यामुळें धर्मराज इंद्रसेनासह रथांतून उतरून सहदेवाच्या प्रचंड रथावर चढला. तोमरांची वृष्टि करणाऱ्या क्षेमकर व महामुख या दोघां योद्ध्यांनीं वर्षाकालीन पर्जन्यवृष्टि करणाऱ्या दोन मेघांप्रमाणें दोन्ही बाजूंनीं नकुलावर तीक्ष्ण शरांची वृष्टि केली. तेव्हां त्या माद्रीसुतानें एकेकावर एकेक विपाठ बाण सोडून त्यांचा वध केला.

गजयानवेत्त्या त्रिगर्तराज सुरथानें नकुलाच्या रथधुरेशीं आपला गज भिडवून तो रथ दूर उडवून दिला. तेव्हां नकुलानें निर्भयपणें त्या रथांतून उडी टाकिली आणि तो वीर ढाल तलवार घेऊन व सुरक्षित स्थळीं आरूढ होऊन पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला. तें पाहून सुरथानें नकुलाचा वध करण्यासाठीं त्याच्या अंगावर क्रुद्ध झालेला हत्ती सोडून दिला, तेव्हां नकुलानें आपल्या खड्गानें त्या शुंडा वर उचलून समीप येणाऱ्या गजाची दांतांसह सोंड छेदून टाकिली. त्यावेळीं घुंगुरमालांनीं युक्त असलेल्या त्या गजानें भयंकर चीत्कार केला आणि तो अधोमुख होऊन माहातासह खालीं पडला. याप्रमाणें महत्कर्म करून तो शूर माद्रीपुत्र भीमसेनाच्या रथावर चढला व भयरहित झाला.

इकडे भीमसेनानेंहि आपल्यावर धावून येणाऱ्या कोटिकास्याच्या रथावरील अश्वांचें नियमन करणाऱ्या त्याच्या सारथ्याचें मस्तक तीक्ष्ण बाणांनीं छेदून टाकिलें, परंतु त्या महाबाहूला आपला सारथि पडल्याचें समजलेंहि नाहीं.

सारथ्याच्या अभावीं रथाचे अश्व त्या रणभूमीवर इतस्ततः धावूं लागले. तेव्हां त्या मध्यम पांडवानें सूतहीन झाल्यामुळें युद्धपराङ्मुख झालेल्या त्या योद्ध्याला प्रासाच्या मुठीनें प्रहार करून गतप्राण केलें.

धनुर्धर धनंजयानें तीक्ष्ण भल्ल बाणांनीं त्या सर्व म्हणजे बाराहि सौवीरांचीं धनुष्यें व मस्तकें यांचा छेद केला. त्याचप्रमाणें त्या अतिरथानें युद्धांत आपल्या बाणांच्या कक्षेंत येणारे सर्व शिबि, इक्ष्वाकु, त्रिगर्त व सैंधव या वीरांचा वध केला. ज्यावेळीं त्या सव्यसाचीनें अनेक रथी, पताकांसह गज आणि ध्वजयुक्त महारथ यांचा संहार चालविला, त्यावेळीं ती समरभूमि मस्तकें, मृतदेह व कबंधें—मस्तकांवांचून शरीरें, यांनीं आच्छादून गेली. मृत होऊन पडलेल्या वीरांच्या रक्त-मांसांनीं कावळे, कोल्हे, कुत्रे, इत्यादि पशु-पक्षी तृप्त झाले.

( २ ) राजा, याप्रमाणें त्या सर्व वीरांचा वध झाला असतां त्रस्त झालेल्या सिंधुराज जयद्रथानें द्रौपदीला सोडून देऊन पलायनाचा विचार मनांत आणिला. आपलें सर्व सैन्य भ्रांत झालेलें पाहून त्यानें द्रौपदीला आपल्या रथांतून खालीं उतरविलें आणि त्या नराधमानें स्वतःचा प्राण वांचविण्याच्या इच्छेनें आल्या मार्गानें त्या महावनांत पलायन केलें. तेव्हां धर्मराजानें धौम्यमुनीच्या पुढें असलेल्या द्रौपदीला पहातांच तिला वीर माद्रीपुत्राकडून रथांत बसविलें.

इकडे जयद्रथानें पलायन केलें असतां त्याचें भयभीत झालेलें सैन्यहि इतस्ततः पळत सुटलें. तेव्हां वृकोदरानें आपलें नांव सांगून त्या सर्व सेनेचा संहार चालविला. पण जयद्रथ पळून जात आहे हें पहातांच सव्यसाचीनें सैंधवसैन्याचा वध करणाऱ्या भीमाचें निवारण केलें.

अर्जुन—हे भीमसेना, ज्याच्या अपराधामुळें आम्हांला हे क्लेश भोगावे लागले तो दुरासद जयद्रथ या रणभूमीवर कोठें दिसत नाहीं. यास्तव हे वीरा, तूं अगोदर त्याचा शोध कर. तुझें कल्याण असो. या सैन्याचा नाश करून तुला कसला लाभ होणार आहे? हें कर्म निष्फल आहे! तुला कसें काय वाटतें!

वैशंपायन—राजा, बुद्धिमान् अर्जुन असें बोलला असतां वाक्पटु भीमसेन युधिष्ठिराकडे पाहून म्हणाला— "हे राजेंद्रा, शत्रूंच्या प्रमुख योद्ध्यांचा आम्हीं वध केला असून अवशिष्ट राहिलेले शत्रु दश-दिशांस पळून गेले आहेत. यास्तव हे राजन्, द्रौपदीला घेऊन तूं परत फिर. धौम्यमुनि व उभयतां माद्रेय यांसह आश्रमांत जाऊन तूं पांचालीचें सान्त्वन कर. तो मूढ जयद्रथ

राजा पातालांत जाऊन जरी लपला व प्रत्यक्ष इंद्रानें जरी त्याला साह्य केलें, तरी तो आतां माझ्या हातून जिवंत सुटत नाहीं.

**युधिष्ठिर**—वत्सा, असें करूं नको. तो सैंधव जरी दुरात्मा असला तरी त्याचा वध करणें योग्य नव्हे. बा भीमा, आपली भगिनी दुःशला व यशस्विनी गांधारी यांच्याकडे लक्ष दे आणि त्या सिंधुनृपतीचा प्राण घेऊं नको.

**वैशंपायन**—जनमेजया, धर्मराजाचा हा उपदेश ऐकून दुःखाकुल झालेली द्रौपदी अत्यंत क्रुद्ध झाली आणि ती अकार्याविषयीं लज्जा बाळगणारी ज्ञानसंपन्न पांचाली आपल्या त्या उभय पतींकडे पहात म्हणाली— " तुम्हांला जर माझें प्रिय करावयाचें असेल, तर त्या पापी कुलकलंक पुरुषाधमाचा अवश्य वध करणेंच योग्य आहे. भार्येचें हरण व राज्याचा अपहार करणारा शत्रु संग्रामांत शरण येऊन प्राणांची याचना जरी करूं लागला, तरीहि त्याला कदापि जिवंत सोडूं नये, अशी नीति आहे. "

राजा, त्या तेजस्वी राज्ञीचें हें वचन ऐकून ते दोघे भीमार्जुन ज्या मार्गानें सैंधव निघून गेला होता, त्याच दिशेकडे निघाले. राजा युधिष्ठिरहि कृष्णेला घेऊन पुरोहित व माद्रीनंदन यांसह आपल्या आश्रमाकडे परतला. आश्रमांत येतांच तेथील घट, ऋषींचीं आसनें, कमंडलु इत्यादि सर्व वस्तु अस्ताव्यस्त पडलेल्या त्याला दिसल्या. ऋषींच्या शिष्यांचीं निवासस्थानें मार्कंडेयादि ब्राह्मणांनीं व्याप्त झालेलीं त्यांच्या दृष्टीं पडलीं. ते सर्व ब्राह्मण साध्वी द्रौपदीसाठीं खेद करीत होते. इतक्यांत महाप्राज्ञ युधिष्ठिर दोघे भ्राते, भार्या व धौम्य यांसह तेथें आला.

त्यावेळीं सिंधु व सौवीर नृपतींना जिंकून व द्रौपदीला शत्रूच्या हातून सोडवून परत आलेल्या युधिष्ठिराला पाहून त्या विप्रांना परम संतोष वाटला. नंतर त्या ब्राह्मणांनीं परिवेष्टित असलेला राजा तेथेंच बसला आणि मानिनी द्रुपदात्मजा नकुल-सहदेवांसह आश्रमांत निघून गेली.

( ३ ) राजा, इकडे भीमार्जुन शत्रु एक कोसभर दूर गेला आहे, असें ऐकून स्वतःच अश्व हांकीत अत्यंत वेगानें निघाले. त्यावेळीं अर्जुनानें अद्भुत शरसंधान केलें. त्यानें एका कोसाच्या अंतरावर असलेल्या जयद्रथाच्या अश्वांना शर सोडून गतप्राण केलें. तो कृतास्त्र वीर संकटांतहि भ्रांत होत नसल्यामुळें त्यानें अस्त्रमंत्रित शरांनीं हें दुष्कर कर्म केलें.

नंतर ते दोघे भीमार्जुन एकट्या जयद्रथावर धांवून गेले. त्यावेळीं तो सैंधव-राज आपले अश्व मारलेले पाहून अतिशय दुःखाकुल झाला. धनंजयाचा तो अतिमानुष पराक्रम पाहून त्याला केवळ पलायनाचाच मार्ग सुचला आणि तो महावनाकडे पळून जाऊं लागला.

तेव्हां पलायनांत पराक्रमी असलेल्या त्या सिंधुपतीचा पाठलाग करून त्याच्याकडे पहात फाल्गुन म्हणाला—"हे राजपुत्रा, परत फिर. या अशा शौर्यानें तूं आमच्या स्त्रीचें बलात्कारानें हरण कसें करणार! तुझ्या सारख्यानें पलायन करणें योग्य नव्हे. आपल्या सर्व अनुचरांस शत्रूंमध्यें सोडून तूं पळून कसा जातोस?"

पार्थ असें बोलत होता, तरी जयद्रथ परत फिरला नाहीं. तेव्हां बलाढ्य भीमसेन 'थांब, थांब,' अशी गर्जना करीत मोठ्या वेगानें त्याच्यावर धांवला. तें पाहून दयावान् धनंजय त्याला म्हणाला—"बा भीमा, तूं या राजपुत्राचा वध करूं नको." ३.१७.२७१.

येथें सतरावें द्रौपदीहरणपर्व समाप्त झालें.

---

## जयद्रथविमोक्षणपर्व १८.



### अध्याय २७२ वा.

[ १ जयद्रथाची विटंबना व मुक्तता. २ जयद्रथाचें तप व शंकराची वरप्राप्ति. ]

**वैशंपायन**—राजा पारिक्षिता, त्यावेळीं हे दोघे पांडुपुत्र आपला वध करण्यास उद्युक्त झाले आहेत, असें पाहून अत्यंत खिन्न झालेला जयद्रथराजा जीवितेच्छेनें वेगानें पळून जाऊं लागला. तेव्हां बलाढ्य भीमसेन क्रोधानें रथांतून उतरला व त्याचा पाठलाग करून त्यानें धांवत असलेल्या त्या सिंधुराजाचे केस धरून त्याला ओढलें व जोरानें भूमीवर आपटलें. त्याच्या मस्तकावर हातानें चापट्या मारिल्या. त्यामुळें त्याला मूर्च्छा आली, परंतु लगेच तो सावध होऊन उठण्याचा प्रयत्न करूं लागला. तेव्हां महाबाहु भीमानें विव्हल

झालेल्या सिंधुराजाच्या मस्तकावर लत्ताप्रहर केला, त्याच्या अंगावर गुडघे टेकून त्याला ठोसे मारले. तेव्हां असह्य प्रहारांनीं पीडित झालेला तो सैंधव पुनः मूर्च्छित झाला.

भीमानें जयद्रथाची अशी शोचनीय अवस्था केलेली पाहून अर्जुनानें त्याला 'दुःशलेसाठीं त्या दुरात्म्यावर अनुकंपा करा' या धर्मराजाच्या वचनाचें स्मरण देऊन त्याचें निवारण केलें.

तेव्हां भीम अतिशय संतापानें म्हणाला—अशाप्रकारच्या अपमानाला सर्वथा पात्र नसलेल्या कृष्णेला या नराधमानें क्लेश दिले आहेत. यास्तव माझ्या हातून हा पापाचरणी दुरात्मा जिवंत सुटणें उचित नाहीं. परंतु हा धर्मराज सतत दयावान् असल्यामुळें मला कांहीं करतां येणें शक्य नसतें आणि अर्जुना, तूंहि आतां बालिश बुद्धीनें मला अडथळा करून शत्रूचा प्राण घेऊं देत नाहींस.

राजा, पार्थाला असें बोलून वृकोदरानें मुकाट्यानें अर्धचंद्र बाणानें जयद्रथाच्या मस्तकाचें पांच जागीं क्षौर केलें. अशाप्रकारें पांच पाट काढल्यानंतर त्याची निंदा करीत म्हटलें—"हे मूढा, तुला जर जिवंत रहाण्याची इच्छा असली तर मी एक उपाय सुचवितों, तो ऐक. सज्जनांच्या सभेमध्यें जनसमूहासमक्ष 'मी तुमचा दास आहें' असें जर तूं बोलशील तर मी तुला जिवंत सोडीन. युद्धामध्यें जिंकलेल्या शत्रूसाठीं हा विधिच आहे."

तेव्हां जयद्रथानें भूमीवरून फरफटत ओढणाऱ्या त्या पुरुषव्याघ्र भीमाला 'ठीक आहे' असें म्हटलें. नंतर वृकोदरानें त्याच्या हातांतून सुटण्याचा प्रयत्न करणाऱ्या जयद्रथाला बांधून रथांत बसविलें. त्यावेळीं त्या राजाचें शरीर धूलीनें माखलें असून त्याला मूर्च्छा आली होती. याप्रमाणें त्याला रथांत ठेवून भीम अर्जुनाच्या रथाला अनुसरला आणि आपल्या पर्णशालेसमीप येतांच भीमसेनानें

---

१ डाव्या हातानें केशग्रहण, भूमीवर बलात्कारानें आदळणें, मस्तकावर लत्ताप्रहार करणें, गुडघ्यानें उदरमर्दन करणें, आडव्या मुष्टीनें गालावर ताडन करणें, गालगुच्चे घेणें, सर्व बाजूंनीं चापट्या देणें, टाळ्या वाजवून युद्धांत भ्रान्त करणें, असे शत्रूला मारण्याचे आठ प्रकार आहेत. त्यांतील चार प्रकारांनीं क्षत्रियाला, पांचांनीं क्षत्रियाधमाला, सहांनीं वैश्याला, सातांनीं शुद्राला व आठांनीं संकरवर्णाला मारावें असें नीतिशास्त्र आहे.

आश्रमांत बसलेल्या युधिष्ठिराजवळ जाऊन त्याला रथामध्यें बांधून ठेवलेला जयद्रथ बोटानें दाखविला.

तेव्हां युधिष्ठिर त्याच्याकडे पाहून हंसला आणि म्हणाला—" बा भीमा, त्याला सोडून दे."

त्यावर भीम म्हणाला—" हा पापबुद्धि दुरात्मा पांडवांचा दास झाला आहे, असें अगोदर त्या मानार्ह द्रौपदीला कळवा."

तें ऐकून तो ज्येष्ठ भ्राता युधिष्ठिर अतिशय प्रेमानें भीमाला म्हणाला— " वत्सा, तुला आम्ही जर मान्य वाटत असलों, तर या अधमाला अगोदर सोडून दे पाहूं."

तेव्हां पांचालीनेंहि युधिष्ठिराकडे पहात म्हटलें—हा पापात्मा धर्मराजाचा दास झाला आहे, शिवाय याचे पांच पाटहि काढले आहेत. यास्तव याला सोडून द्या, झालें.

जनमेजया, त्यानंतर भीमानें मुक्त केलेल्या जयद्रथानें विह्वल होऊन युधिष्ठिराला व तेथें असलेल्या सर्व मुनींना वंदन केलें.

तेव्हां धनंजयानें धरून आणलेला त्या जयद्रथराजाकडे पाहून कृपाळु धर्मराज म्हणाला—" हे सिंधुराजा, तुला मीं आमच्या दास्यांतून मुक्त केलें आहे, जा. पुनः मात्र अशी परस्त्रीची कामना कदापि करूं नको. तुझ्या या क्षुद्रबुद्धीला व तुला साह्य करणाऱ्या हीनवृत्तीच्या लोकांना धिक्कार असो. खरोखर तुझ्यावांचून अन्य कोणीहि पुरुषाधम असें दुष्कृत्य करणार नाहीं."

असें बोलून युधिष्ठिरानें तो अशुभ कर्म करणारा राजा लज्जेनें मृतवत् झाला आहे, असें पाहून त्याच्यावर दया केली व म्हटलें—" हे जयद्रथा, तुझी बुद्धि सर्वदा धर्मात स्थित होवो. तूं अधर्म करण्याचें कदापि मनांत आणूं नको. जा आतां. आपल्या अश्व-रथादि सैन्यासह सुखानें मार्गस्थ हो.

( २ ) हे भारता, युधिष्ठिरानें याप्रमाणें जाण्याची अनुज्ञा दिली असतां दुःखार्त झालेला तो सैंधवराज लज्जेनें अधोमुख होऊन कांहीं न बोलतां गंगाद्वारीं निघून गेला आणि तेथें विरूपाक्ष उमापतीला शरण जाऊन त्यानें उग्र तपश्चर्या आरंभिली. तेव्हां महादेवानें प्रसन्न होऊन राजानें अर्पिलेल्या उपहारादि पूजेचें प्रत्यक्ष ग्रहण केलें व त्याला वर दिला. पण त्या राजानें त्याच्यापासून कोणता वर मागून घेतला तो सविस्तर वृत्तान्त तूं ऐक.

जनमेजया, जयद्रथानें प्रथम ' मी युद्धांत सर्व रथस्थ पांडुपुत्रांना जिंकावें ' असा वर मागितला. तेव्हां देवाधिदेवानें म्हटलें—" असें होणार नाहीं. ते पांची पांडुपुत्र अवध्य व अजिंक्य आहेत. पण अर्जुनावांचून त्या चार भ्रात्यांचें तूं युद्धांत एकदाच केवल निवारण करूं शकशील. परंतु धनंजयाचें नुस्तें निवारण करणेंहि तुला शक्य नाहीं. तो महाबाहु नरनामक फाल्गुन प्रति सुरेश्वर इंद्रच आहे.

नारायण ज्याला साह्य करणारा आहे, अशा या नरानें बदरिकाश्रमीं उग्र तप आचरिलें. तो सर्व लोकांना अजिंक्य व देवांनाहि दुरासद आहे. त्या धनुर्धर सव्यसाचीला मीं दिव्य व अप्रतिम पाशुपत अस्त्र दिलें आहे. शिवाय त्यानें लोकपालांपासून वज्रादि महास्त्रें संपादन केलीं आहेत.

( त्यानंतर महेश्वरानें नारायणाचें ज्याला साह्य आहे, अशा अर्जुनाचें अजेयत्व सांगण्यासाठीं नारायणाचें माहात्म्यच त्यास निवेदन केलें. ) तो त्रिनेत्र म्हणाला—" तो नारायण सूर्य, चंद्र, अग्नि, चक्षु, मन, वाक् या देवांचाहि म्हणजे प्रकाशक जोतींचाहि देव म्हणजे प्रकाशक आहे. त्याचें स्वरूप त्रिविध परिच्छेदशून्य आहे. तो व्यापक विष्णु देवांचा गुरु व प्रभु आहे. तो त्रिगुणात्मक माया म्हणजे प्रधान व चिद्रूप पुरुष एतदुभयात्मक म्हणजे चिदचिन्मय आहे. तो अव्यक्त आहे, म्हणजे ज्याच्या आंत महान्वटवृक्ष लीन आहे, अशा वटबीजाप्रमाणें तो सर्व जगत्कारणरूप आहे. त्यामुळेंच तो चेतनांशानें सर्वात्मा व जडांशानें विश्वमूर्तिमान् आहे.

( याप्रमाणें नारायणाचें जगत्कारणत्व सांगून आतां गिरिजेश गंगाधर त्याचें जगत्संहर्तृत्व सांगतो— ) युगांतकाल प्राप्त झाला असतां हा नारायण स्वतःच कालाग्नि होऊन पर्वत, समुद्र, द्वीपें, अरण्यें, वनें, उपवनें यांसह सर्व जगताला दग्ध करितो. तोच पातालतलचारी नागलोकांना जाळून भस्म करितो. त्यानंतर अंतरिक्षांत मोठ-मोठे अनेक वर्णांचे घोर गर्जना करणारे विद्युद्युक्त मेघ उत्पन्न होतात व ते समंततः सर्व देशांत वृष्टि करितात आणि त्या संवर्ताग्नीचें नियमन करणारे ते महामेघ मुसळासारख्या धारांनीं त्रैलोक्याला जलमय करून

---

१ 'येन सूर्यस्तपति तेजसेद्धः' ज्या तेजानें प्रकाशमय झालेला सूर्य सर्व जगाला ताप देतो. 'येन चक्षूंषि पश्यति'—ज्याच्या दृक्शक्तीनें चक्षू रूपाला पाहूं शकतात. इत्यादि श्रुति याविषयीं प्रमाण आहेत. केनोपनिषद् खं. २ पृ. २९

प्रलयाग्नीचा नाश करितात. त्यामुळें त्रिभुवन एकार्णवरूप होऊन सर्व चराचरांचा नाश होतो.

त्यावेळीं चंद्र, सूर्य, वायु, ग्रह, नक्षत्रें या सर्वांचा अभाव होतो. जेव्हां एक सहस्र चतुर्युगांच्या शेवटीं ब्रह्माचा एक दिवस संपतो, तेव्हां त्या एकार्णव जलांत पृथ्वी बुडून जाते. त्यानंतर सहस्रनेत्र, सहस्रपाद, सहस्रशिर्ष, नारायणाख्य पुरुष शयन करण्याची इच्छा करितो. सहस्र फणांनीं युक्त असलेला शेष त्या अतींद्रिय नारायणाख्य हिरण्यगर्भाचें शयनस्थान होतो. सूर्यासारख्या तेजानें युक्त असलेल्या त्या शेषाची कांति अप्रतिम असते. कुंदपुष्प, चंद्र, मौक्तिकमाला, गोक्षीर, कमलनाल व कुमुद यांसारखी ज्याची शुभ्र प्रभा आहे, अशा त्या शेषाकडे पहावत नाहीं. त्या एकार्णवामध्यें हा भगवान् देव शेषरूपी पर्यंकावर शयन करितो. त्यावेळीं तो प्रभु गाढ अंधकारानें व्याप्त असलेली आपली रात्र करितो. चतुर्युगसहस्र हेंच तिचें काल परिमाण आहे.

त्यानंतर त्याच्या सत्त्वगुणाचा उद्भव होऊन तो जागा होतो. सत्त्व उद्भूत झाल्यामुळें तमाचा तिरोभाव होतो. त्यावेळीं जागा झालेला तो नारायणाख्य हिरण्यगर्भ सर्व लोक प्राणिसंचारशून्य आहेत असें पहातो. प्राचीन ऋषि या नारायणाविषयीं असा श्लोक म्हणतात—

**आपो नारास्तत्तनव इत्यपां नाम शुश्रुम । अयनं तेन चैवास्ते तेन नारायणः स्मृतः ॥** अर्थ— जलाला ' नारा ' असें म्हणतात, कारण त्या नरापासून झाल्या आहेत. त्या नारायणाच्याच तनु आहेत. म्हणून आपांचें ' नारा ' हें नांव आम्हीं ऐकलें आहे. देहाद्याकारानें परिणत झालेल्या त्या नाराच त्याचें अयन म्हणजे निवासस्थान आहे. किंवा नारायण त्याच्याशीं तादात्म्य पावून रहातो.

---

१ ' तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत '—हें सर्व जगत् उत्पन्न करून तो परमात्माच त्या सृष्ट देहांत प्रविष्ट झाला, असें तैत्तिरीयोपनिषदांत म्हटलें आहे. तै. भा. २. ६. ७ पृ. ११८ )

२ आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः '—शरीर, इंद्रियें व मन यांनीं युक्त झालेला आत्माच भोक्ता होतो, असें विद्वान् म्हणतात. या काठक वचनांत देहादिकांच्या संबंधानें आत्म्याचें भोक्तृत्व सांगितलें आहे. ( काठ. भा. १. ३. ४ पृ. ५७) अर्थात् चेतनाचेतनात्मक सर्व जगत् नारायणात्मक आहे, हें सिद्ध होतें.

त्यानंतर त्या सनातन नारायणानें प्रजोत्पत्तीसाठीं ध्यान करितांच ब्रह्मा त्याच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला. प्रथम धात्याच्या दृष्टीमध्यें चतुर्मुखाचें स्वरूप प्रतीत झालें. त्याचें ध्यान करितांच विष्णूच्या नाभीमध्यें पद्म उत्पन्न झालें आणि त्या पद्मावर तो पितामह स्थित झाला. त्यानें सर्व जगत् शून्य आहे, असें पाहून आपल्या सारखेच मरीचिप्रभृति नऊ मानस पुत्र उत्पन्न केले.

त्या नऊ महर्षींनीं यक्ष, राक्षस, भूत, पिशाच, उरग, मानुष इत्यादि सर्व स्थावर-जंगम भूतें उत्पन्न केलीं. मायाशबल ईश्वराच्या सत्त्वादि एकेका गुणाच्या उत्कर्षामुळें तीन अवस्था होतात. रजाचा उत्कर्ष झाला असतां ब्रह्मा सृष्टि करतो. सत्त्वाचा उत्कर्ष झाला असतां तोच ईश्वर वैष्णवी तनूमध्यें प्रवेश करून रक्षण करितो आणि तमाचा उत्कर्ष झाला असतां रुद्रभावानें जगाचा संहार करितो.

हे जयद्रथा, तूं अद्भुत कर्में करणाऱ्या विष्णूची वेदपारग ब्राह्मणांकडून व मुनींकडून सांगितलीं जाणारीं चरित्रें ऐकलीं नाहींस, त्यामुळें तीं तुला माहित नाहींत. तींच मी तुला सांगतों ऐक. वायु, तेज व पृथ्वी यांनीं रहित अशा केवल आकाशांत एकार्णव जल पसरलें असतां पावसाळ्यांत रात्रीं खद्योत ज्याप्रमाणें सर्वत्र संचार करितो, त्याप्रमाणें तो प्रभु त्या जलांत सर्वत्र संचार करूं लागला. त्यावेळीं तो लोकांच्या प्रतिष्ठापनेसाठीं पृथ्वीला शोधीत होता. तेव्हां चित्प्रकाशरूप असलेल्या त्या नारायणाला जलांत बुडालेली पृथ्वी दिसली व 'आपण आतां हिचा उद्धार करावा' असें त्याच्या मनांत आलें, पण 'मीं कोणतें रूप धारण करून हिचा उद्धार करावा बरें!' असा तो भगवान् विचार करूं लागला.

तेव्हां आपल्या दिव्यदृष्टीनें जलक्रीडेची प्रीति असलेल्या वाराहरूपाचें त्याला स्मरण झालें. त्याबरोबर त्या ईश्वरानें चतुर्वेदमय यज्ञरूप 'वाराह' शरीर धारण केलें. तें दहा योजनें रुंद व शंभर योजनें लांब होतें. त्याचें शरीर पर्वतासारखें दृढ व तीक्ष्ण दाढा अतिशय तेजस्वी होत्या. त्याचा ध्वनि महामेघसमूहाच्या गर्जनेप्रमाणें असून वर्ण नीलमेघासारखा होता. याप्रमाणें तो प्रभु यज्ञवराह होऊन त्या एकार्णवजलांत शिरला आणि त्यानें एका दाढेनें पृथ्वीला वर उचलून स्वस्थानीं स्थापन केलें.

---

१ मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, नारद व भृगु हे लोकपितामहाचे आद्य मानसपुत्र होत.

पुनः त्या नारायणानें अपूर्व तनूचा आश्रय केला. त्यानें आपलें अर्धें शरीर मनुष्याचें व अर्धें सिंहाचें केलें आणि तो दैत्येंद्राच्या सभेंत जाऊन हात चोळीत उभा राहिला. त्या अद्भुत पुरुषाला पाहून दैत्यांचा आदि पुरुष जो हिरण्यकशिपु तो अतिशय क्रुद्ध झाला. तो देवशत्रु दितिपुत्र क्रोधानें नेत्र लाल करून व शूल उचलून त्या नृसिंहावर धांवला. त्याचें शरीर नीलमेघांच्या समूहासारखें असून शब्दहि घनगर्जनेसारखा होता. ज्यानें आपल्या गळ्यांत पुष्पमाला धारण केली आहे, असा तो दैत्य समीप आला असतां बलाढ्य मृगेंद्रानें गजाचें जसें विदारण करावें, त्याप्रमाणें त्या नारायणानें नारसिंहस्वरूपानें त्या दैत्यावर धांवून जाऊन नखानें त्याचें उदर फाडलें.

याप्रमाणें त्या भगवानानें शत्रुनाशक दैत्येंद्राचा नाश करून त्या पुंडरीकाक्ष प्रभूनें लोकहितासाठीं वामन-अवतार धारण केला. दितीनें त्या श्रीमान् कश्यपात्मजाला आपल्या गर्भांत धारण केलें व सहस्र वर्षें पूर्ण झालीं असतां तिनें त्या उत्तम पुत्राला जन्म दिला. त्याची अंगकांति वर्षर्तूंतील कृष्ण मेघाप्रमाणें असून त्याचे नेत्र प्रदीप्त व शरीराकृति अतिशय ठेंगु होती. त्यानें एका हातांत दंड व दुसऱ्या हातांत कमंडलु धारण केला होता. श्रीवत्सलांछनानें त्याच्या वक्षःस्थलास भूषित केलें होतें. जटा व यज्ञोपवीत यांस धारण करणारा तो बालरूपी भगवान् दानवेंद्राच्या यज्ञस्थानास गेला आणि बृहस्पतीसह बलीच्या यज्ञांत प्रविष्ट झाला. त्या वामनमूर्ति बटूला पाहून संतुष्ट झालेला बलि म्हणाला—" हे विप्रा, तुझ्या दर्शनानें मी प्रसन्न झालों आहें, मी तुला काय देऊं तें सांग."

बलीनें असें म्हटलें असतां तो वामन प्रथम 'स्वस्ति भवते' असें बोलून हंसतच बलीस म्हणाला—" हे दानवपते, मला तीन पावलें भूमि दे."

वामनाची ही प्रार्थना ऐकतांच प्रसन्न झालेल्या बलीनें त्या अति तेजस्वी ब्राह्मणाला त्रिपाद भूमि दिली. तेव्हां तीन पावलें टाकणाऱ्या हरीनें दिव्य व अद्भुत रूप धारण केलें आणि तीन पावलांनीं राक्षसापासून भूमीचा अपहार केला. नंतर त्या सनातन विष्णुदेवानें ही मेदिनी शक्राला अर्पण केली.

हे सिंधुराजा, मीं हा तुला भगवानाचा वामनसंज्ञक प्रादुर्भाव सांगितला आहे. या अवतारामुळें देवांचा मोठा उत्कर्ष झाला व याच कारणास्तव 'हें सर्व जगत् विष्णूचें आहे' असें म्हणतात. दुरात्म्यांच्या नाशासाठीं व पुण्या-

यांच्या रक्षणासाठीं तोच भगवान् आतां मनुष्यलोकीं यदुकुलांत उत्पन्न
ला आहे. त्या भगवान् विष्णूलाच ' कृष्ण ' असें म्हणतात. तो अनाद्यनंत,
ज व लोकनमस्कृत प्रभु आहे. हे सैंधवा, सर्व विद्वान् त्याच्या या दिव्य
मांचें संकीर्तन करितात. ज्याला अजित, कृष्ण, शंख-चक्र-गदाधर, श्रीवत्स व
तांबर यांस धारण करणारा नारायण म्हणतात, तोच कृष्ण अस्त्रज्ञांतील श्रेष्ठ
र्जुनाचें रक्षण करीत आहे. तो अतुल पराक्रमी पुंडरीकाक्ष पार्थाचा साह्यकर्ता
हे. तो शत्रुनाशक कृष्ण पार्थाला आपल्या रथावर बसवून त्याच्या हातून सर्व
त्रूंचा नाश करविणारा आहे. त्यामुळें अर्जुन देवांनाहि अजेय आहे. मग
नवांतील कोणता वीर पार्थाला जिंकूं शकेल ! यास्तव हे राजा, त्या एका
र्जुनाला सोडून तूं युधिष्ठिराचें सर्व सैन्य व चारी भ्राते यांस युद्धांत एकच
वस जिंकशील.

राजा जनमेजया, त्या सिंधुपतीला असें बोलून सर्वपापनाशक उमापति
पले विविध वेष धारण करणारे गण व देवी गिरिजा यांच्यासह तेथेंच
तर्धान पावला. मंदात्मा जयद्रथहि स्वगृहास परत गेला व पांडव काम्यक-
नांत सुखानें राहूं लागले. ३. १८. २७२.

येथें अठरावें जयद्रथविमोक्षणपर्व समाप्त झालें.



# रामोपाख्यानपर्व १९.

## अध्याय २७३ वा.

[ १ युधिष्ठिराचा द्रौपदीहरणाविषयीं विलाप व मार्कंडेयास प्रश्न. ]

**जनमेजय**—हे मुने, याप्रमाणें अतिशय क्लेश सहन करून द्रौपदीला परत
णिल्यानंतर पुरुषश्रेष्ठ पांडवांनीं काय केलें ?

**वैशंपायन**—हे राजा, पूर्वोक्तप्रकारें जयद्रथाला जिंकून व कृष्णेला सोड-
न आणिल्यानंतर धर्मराज मुनींच्या समूहांत बसला असतां पांचालीहरणाची
र्ता ऐकून उद्विग्न झालेल्या महर्षिगणांत बसलेल्या मार्कंडेयाला तो पांडुपुत्र
पें वचन बोलला.

( १ ) **युधिष्ठिर**—हे भगवन्, तूं देवर्षींमध्यें भूत-भविष्यत्वेत्ता आहेस,
शी तुझी प्रसिद्धि आहे. यास्तव मी तुला एक प्रश्न विचारितों, तेवढा माझ्या

मनांतील संशय दूर कर. हे ब्रह्मन्, ही द्रुपदात्मजा पवित्र यज्ञवेदींतून उत्पन्न झाली आहे. ही अयोनिजा असून महात्म्या पांडूची स्नुषा आहे. असें असतां या साध्वीला अशाप्रकारचे क्लेश भोगावे लागत आहेत. यावरून धर्माधर्मरूप दैव आणि सदसत्कर्मरूप विधि यांनीं निर्माण केलेलें जें भवितव्य तेंच श्रेष्ठ आहे असें मला वाटतें. प्राण्यांच्या भवितव्याचें अतिक्रमण कदापि करतां येत नाहीं.

ही आमची पत्नी धर्मज्ञ व धर्माचरणी आहे. एखाद्या सज्जनावर जसा चोरीचा मिथ्या आरोप यावा, तसा या साध्वीवर हा कष्टकर प्रसंग ओढवला. या पतिव्रतेनें केव्हांहि पापकर्म किंवा निंद्य वर्तन केलेलें नाहीं. उलट ही याज्ञसेनी दीर्घ कालापासून विपुल धर्माचरण करून ब्राह्मणांविषयीं आपलें कर्तव्य करण्यास तत्पर असते. असें असतां मूढमति जयद्रथानें बलात्कारानें तिचें हरण केलें. या अपराधामुळेंच तो पापात्मा मस्तकावरील केसांना मुकला व युद्धांत साह्यकर्त्यांसह पराजय पावला. आम्हांला त्या जयद्रथाच्या सैन्याचा वध करून द्रौपदीची मुक्तता करावी लागली. अशा प्रकारचा हा भार्याहरणाचा अकल्पित प्रसंग आमच्यावर ओढवला !

शिवाय आम्हांला हे वनवासांतील क्लेश सोसावे लागत आहेत. मृगयेवर उपजीविका करावी लागत आहे. वनांत राहिल्यामुळें वृथा तापस वेष धारण करणाऱ्या आमच्या हातून हिंसा घडत आहे. बांधवांनीं राज्याचा अपहार करून घालवून दिल्यामुळें हें सर्व दुःख भोगावें लागत आहे. खरोखर, माझ्यासारखा अभागी पुरुष यापूर्वीं कोणीहि झाला नसेल ! हे ब्रह्मन्, तूं पूर्वीं असा दुर्दैवी पुरुष कधीं पाहिला किंवा ऐकला तरी आहेस काय ! ३. १९. २७३.

---

## अध्याय २७४ वा.

[ १ रामाचा संक्षिप्त वृत्तान्त. २ सविस्तर रामचरित्र सांगण्याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. ३ रामादिभ्रात्यांचा जन्मवृत्तान्त. ४ पुलस्त्यपुत्रांची उत्पत्ति. ]

( १ ) **मार्कंडेय**—राजा युधिष्ठिरा, तुझ्यासारखी आपत्ति पूर्वीं अनेक श्रेष्ठ पुरुषांनीं भोगिली आहे. प्रभु रामचंद्रावर अशाप्रकारचें अप्रतिम दुःख ओढवलें होतें. त्याची प्रिय पत्नी जानकी आश्रमांत असतां दुरात्म्या रावणानें संन्याश्याचा वेष धारण करून तिचें हरण केलें. त्या बलाढ्य राक्षसानें मोठ्या

वेगानें 'जटायु'-नामक गृध्रपक्ष्याचा वध करून त्या पतिव्रतेचा अपहार केला. तेव्हां त्या रघुपतीनें सुग्रीवाच्या बलाचा आश्रय करून त्याच्या साह्यानें समुद्रावर सेतु बांधून व लंका दग्ध करून त्या साध्वीला परत आणिलें.

( २ ) युधिष्ठिर—हे भगवन्, रामचंद्राचा जन्म कोणत्या कुलांत झाला ? त्याचा पराक्रम व सामर्थ्य कशाप्रकारचें होतें ? रावण कोणाचा पुत्र ? त्याचें रामाशीं वैर कशासाठीं उद्भवलें ? हें सर्व मला सविस्तर कथन कर. सहज कर्मे करणाऱ्या त्या वीराचें चरित्र ऐकण्याची माझी इच्छा आहे.

( ३ ) मार्कंडेय—हे भरतश्रेष्ठा, ऐक. पूर्वी इक्ष्वाकु-कुलामध्यें 'अज-नामक एक प्रसिद्ध राजा होता. त्याचा पुत्र दशरथ निरंतर शुचिर्भूत व स्वाध्यायसंपन्न होता. त्या राजाला राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न या नांवाचे धर्मार्थवेत्ते चार पुत्र झाले. ते चारी भ्राते महा बलाढ्य होते. रामाची माता कौसल्या व भरताची कैकयी असून लक्ष्मण व शत्रुघ्न हे दोघे सुमित्रेचे पुत्र होते.

हे विभो, रामाची प्रिय सम्राज्ञी सीतादेवी ही विदेहराज जनकाची कन्या होय. प्रजापतीनें स्वतःच संकल्पानें निर्माण केल्यामुळें ती अयोनिज होती. याप्रमाणें राम व सीता यांची उत्पत्ति तुला सांगितली. आतां रावणाचाहि जन्मवृत्तान्त सांगतों, तो ऐक.

( ४ ) हे जनेश्वरा, सर्व लोकांचा प्रभु, स्रष्टा, स्वयंभू साक्षात् प्रजापति हा रावणाचा पितामह होय. त्या महातपस्वी ब्रह्मदेवाचा 'पुलस्त्य'-नामक एक प्रिय मानस पुत्र होता. त्याला 'गो'-संज्ञक भार्येच्या ठिकाणीं 'वैश्रवण'-नामक पुत्र झाला. त्या वैश्रवणानें आपल्या पित्याचा त्याग करून पितामहापाशीं गमन केलें. तेव्हां पुलस्त्याला 'आपला पुत्र आपल्याला सोडून आपल्या पित्याची सेवा करीत आहे,' ही गोष्ट असह्य झाली. त्यानें क्रोधसंतप्त होऊन वैश्रवणास बाधक होण्यासाठीं स्वतःच्या योगबलानें आपल्या देहापासून 'विश्रवा'-नामक एक पुरुष निर्माण केला. वैश्रवणाला प्रतिकार करण्यासाठींच त्या द्विजानें विश्रवाला उत्पन्न केलें होतें.

धर्मराजा, इकडे वैश्रवणाच्या सेवेनें त्याजवर प्रसन्न झालेल्या पितामहानें त्याला अमरत्व, धनेशत्व, लोकपालत्व, रुद्राशीं सख्य, 'नलकूबर-' पुत्राची प्राप्ति, आणि राक्षसगणांनीं व्याप्त असलेली 'लंका'-नगरी अर्पण केली. तीच त्याची राजधानी होती. त्याचप्रमाणें त्याला कामगामी पुष्पक विमान, यक्षांचें आधिपत्य व राजराजत्वहि दिलें. ३.१९.२७४.

## अध्याय २७५ वा.

[ १ रावणादिकांचा जन्म. २ त्यांची तपश्चर्या. ३ वरप्राप्ति व उत्कर्ष. ]

( १ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, पुलस्त्याच्या अर्धदेहापासून क्रोधामुळें जो 'विश्रवा'-नामक मुनि उत्पन्न झाला होता, तो वैश्रवणाकडे क्रोधानें पाहूं लागला. तेव्हां आपला पिता क्रुद्ध झाला आहे, हें जाणून राक्षसेश्वर वैश्रवण कुबेर त्याला प्रसन्न करण्याचा निरंतर प्रयत्न करूं लागला.

लंकेंत रहाणाऱ्या त्या राजराजेश्वर नरवाहन कुबेरानें आपल्या पित्याला तीन राक्षसस्त्रिया परिचर्येसाठीं अर्पण केल्या. त्या नृत्य-गायनविशारद स्त्रिया त्या ऋषीला संतुष्ट ठेवण्यांत सर्वदा उद्युक्त असत. पुष्पोत्कटा, राका व मालिनी अशीं त्यांचीं नांवें असून आपल्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या त्या राक्षसी परस्परांच्या स्पर्धेनें त्या द्विजश्रेष्ठाच्या सेवेंत तत्पर असत. एकदा संतुष्ट झालेल्या त्या महात्म्यानें तिन्ही राक्षसींस 'तुम्हांतील प्रत्येकीस तुमच्या इच्छेप्रमाणें लोकपालासारखा एकेक पुत्र होईल,' असा वर दिला.

त्यानंतर पुष्पोत्कटेनें 'रावण' व 'कुंभकर्ण' या दोन श्रेष्ठ राक्षसांना जन्म दिला. ते दोघे भ्राते या लोकीं अप्रतिम बलानें युक्त होते. मालिनीला 'बिभीषण' हा एकच पुत्र झाला. राकेला खर व शूर्पणखा हीं दोन जुळीं अपत्यें झालीं. बिभीषण सर्वांहून अधिक रूपवान् होता. तो महाभाग धर्माचें रक्षण करणारा व कर्तव्यदक्ष होता.

दशमुख रावण सर्व राक्षसांत श्रेष्ठ असून तो अत्यंत उत्साही, पराक्रमी, बलाढ्य व सामर्थ्यवान् होता. कुंभकर्ण युद्धांत सर्वांहून अधिक बलवान् होता. तो राक्षस मायावी, रणविशारद व क्रूर होता. खर धनुर्युद्धांत प्रवीण, पराक्रमी व ब्रह्मद्वेष्टा होता. शूर्पणखा अतिशय भयंकर असून सिद्धांना विघ्न करणारी होती.

हे सर्वहि वेदवेत्ते, शूर व सदाचारी पुत्र आपल्या विश्रवापित्यासह गंधमादन पर्वतावर सुखानें रहात असत. एकदा परम ऐश्वर्यवान् नरवाहन कुबेर आपल्या पुलस्त्य-पित्यासह बसलेला त्यांच्या दृष्टीं पडला. तेव्हां त्याचें ऐश्वर्य पाहून त्यांच्या मनांत मत्सर उद्भवला आणि त्या भ्रात्यांनीं उग्र तपश्चर्या करण्याचा निश्चय केला व घोर तपानें ब्रह्मदेवाला प्रसन्न केलें.

( २ ) दशमुख रावणानें केवल वायु भक्षण करून, एका पायावर उभें राहून, हजार वर्षें तपश्चर्या केली. तो दशग्रीव चार दिशेंत चार अग्नि आणि वर

सूर्य अशा पंचाग्नींच्या मध्यें तप करीत बसला. कुंभकर्ण मिताहार व नियतव्रत होऊन भूमीवर निजून राहिला. बिभीषण उपवास व जप करण्यांत सर्वदा परायण असे. तो धीमान् वृक्षावरून गळून पडलेलें एक पान भक्षण करून सहस्र वर्षें तीव्र तप आचरीत राहिला. हे तिघे भ्राते याप्रमाणें तपश्चर्या करीत असतां खर व शूर्पणखा मोठ्या संतुष्ट चित्तानें त्यांची परिचर्या करीत होती.

याप्रमाणें एक सहस्र वर्षें पूर्ण झालीं असतां दुराधर्ष दशानन रावणानें आपलें मस्तक तोडून त्याची अग्नींत आहुति दिली. तेव्हां संतुष्ट झालेल्या जगत्प्रभु ब्रह्मदेवानें स्वतः प्रकट होऊन त्याचें तपापासून निवारण केलें आणि त्या सर्वांस पृथक् पृथक् वराचा लोभ दाखविला.

( ३ ) ब्रह्मदेव—हे वत्सांनो, मी प्रसन्न झालों आहें, आतां तुम्ही मजपाशीं वर मागा व परत जा. मी एका अमरत्वावांचून तुम्हांला इष्ट असलेला दुसरा कोणताहि वर देईन. हे दशमुखा, श्रेष्ठ पदाच्या अपेक्षेनें तूं अग्नीमध्यें ज्या मस्तकांची आहुति दिलीस तीं तुझीं सर्व शिरें तुझ्या देहाला पुनः प्राप्त होतील व त्यामुळें तुझ्या स्वरूपांत वैगुण्यहि येणार नाहीं. याचप्रमाणें तूं कामरूपी होऊन रणामध्यें शत्रूंना जिंकशील, यांत संशय नाहीं.

रावण—हे प्रभो, गंधर्व, देव, असुर, सर्प, किंनर व भूतें यांच्या हातून माझा केव्हांहि पराभव होऊं नये.

ब्रह्मदेव—ठीक आहे, तूं आतां ज्यांचीं नांवें सांगितलींस त्यांच्यापासून तुला भय नाहीं. मनुष्यावांचून अन्य कोणापासूनहि तुला भय नसावें, अशी मीं पूर्वींच योजना करून ठेविली आहे.

मार्कंडेय—राजा, तो दुर्बुद्धि नरभक्षक दशग्रीव मनुष्यांना तृणतुल्य समजत असल्यामुळें प्रपितामहाचें हें वचन ऐकून संतुष्ट झाला. नंतर त्या प्रजापतीनें कुंभकर्णाला वर मागण्यास सांगितलें. त्यावेळीं तमोग्रस्त झालेल्या त्या कुंभकर्णानें मोहामुळें अनिष्ट असलेलीहि दीर्घ निद्रा मागून घेतली. तेव्हां ब्रह्मदेवानें त्याला ‘ तथास्तु ’ असें बोलून बिभीषणाला ‘ मी तुजवर प्रसन्न झालों आहें, तूंहि इष्ट वर मागून घे. ’ असें पुनः पुनः म्हटलें.

तेव्हां बिभीषण म्हणाला—हे भगवन्, परम संकट प्राप्त झालें असतांहि माझी बुद्धि अधर्मामध्यें आसक्त न होवो. ( आपत्तींतहि माझ्या हातून अधर्माचरण न घडो. ) आणि शिक्षणावांचूनच स्वयंस्फूर्तीनें मला ब्रह्मास्त्राची प्राप्ति होवो.

**ब्रह्मदेव**—हे धर्मनिष्ठा, तुझी माता राक्षसी असली तरी पिता ब्राह्मण आहे, त्यामुळें तुझें बीज राक्षसी नाहीं. पुरुष प्रायः मातृवंशाला अनुसरतात, असा सामान्य नियम आहे. त्यामुळें मातांचे क्रौर्यादि दोष रावणादिकांत प्रादुर्भूत झाले आहेत. परंतु ज्याअर्थी तुझी बुद्धि अधर्माकडे प्रवृत्त होत नाहीं त्याअर्थी मी तुला अमरत्वाचा वर देतों. तुझ्या स्वभावांत ब्राह्मणबीजाचें प्राधान्य आहे.

**मार्कंडेय**—राजा, दशमुख राक्षसानें असा वर मिळविल्यानंतर प्रथम कुबेराला युद्धांत जिंकिलें व त्याला लंकेंतून घालवून दिलें. तेव्हां आश्रयशून्य झालेल्या धनेश्वर कुबेरानें गंधर्व, यक्ष, राक्षस व किंपुरुष यांसह गंधमादन पर्वतावर जाऊन तेथें वास्तव्य केलें. रावणानें वैश्रवणाचा पराभव करून त्याचें पुष्पक विमानहि हरण करून घेतलें असतां कुबेरानें त्याला—'हे राक्षसा, हें विमान तुला तर वाहून नेणार नाहींच, परंतु जो कोणी युद्धांत तुझा वध करील, त्याला तें वाहून नेईल व ज्याअर्थी तूं आपल्या पूज्य पित्याचा आणि माझा अवमान केला आहेस, त्याअर्थी तूं सत्वरच मरण पावशील,' असा शाप दिला.

परंतु हे महाराजा, त्या वेळीं परम तेजानें युक्त असलेला धर्मात्मा बिभीषण सज्जनांचा मार्ग स्मरून कुबेराला अनुसरला. तेव्हां संतुष्ट झालेल्या त्याच्या धीमान् धनेश्वर भ्रात्यानें त्यास यक्ष-राक्षसांच्या सैन्याचें आधिपत्य दिलें.

इकडे महाबलाढ्य पिशाच व मनुष्यभक्षक राक्षस या सर्वांनीं मिळून दशाननाला राज्याभिषेक केला. नंतर बलानें मत्त झालेल्या त्या कामगामी लंकाधिपतीनें देव आणि दैत्य यांवर आकाशमार्गानें चाल करून त्यांचा पराभव केला व त्यांचीं अमूल्य रत्नें हरण करून आणलीं. याप्रमाणें त्या अत्यंत बलाढ्य व कामरूपी राक्षसानें देवांनाहि भयभीत केलें. निर्दयपणें ब्राह्मणादि सात्त्विक लोकांची हिंसा आरंभिली व सर्वांना आक्रोश करावयास लाविलें. त्यामुळें तो 'रावण' या नांवानेंच प्रसिद्ध झाला. ३.१९.२७५.

---

## अध्याय २७६ वा.

[ १ रावणवधासाठीं पितामहाची योजना. ]

( १ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, त्यानंतर ब्रह्मर्षि, सिद्ध व देवर्षि हे सर्व अग्नीला पुढें करून ब्रह्मदेवाला शरण गेले. तेव्हां अग्नि म्हणाला—"हे प्रभो,

ज्याला आपण पूर्वी वरदानानें अवध्य केलें आहे तो हा विश्रवाचा महाबलाढ्य पुत्र दशग्रीव सर्व प्रजेला विविधप्रकारांनीं पीडा देत आहे. यास्तव आतां हे भगवन्, तुझ्यावांचून आमचें रक्षण करण्यास अन्य कोणीहि समर्थ नाहीं."

**ब्रह्मदेव**—हे विभावसो, त्या राक्षसेंद्राला युद्धांत जिंकण्यास देव किंवा असुर समर्थ नाहींत. यास्तव त्याच्या निग्रहाचा विहित उपाय मीं पूर्वींच योजिला आहे. या कार्यासाठींच माझ्या आज्ञेनें चतुर्भुज विष्णूनें भूलोकीं अवतार घेतला आहे. तो हें कर्म करील.

**मार्कंडेय**—राजा, अग्नीला असें बोलून पितामहानें त्या देवगणांच्या समक्षच इंद्राला म्हटलें—" हे शक्रा, तूं सर्व देवगणांसह भूलोकीं उत्पन्न हो. विष्णूच्या साह्यासाठीं वानरी व आस्वली यांच्या ठिकाणीं तुम्ही कामरूपी व बलाढ्य वीरपुत्र उत्पन्न करा. "

तेव्हां पितामहाच्या आज्ञेप्रमाणें ते सर्व देव, गंधर्व व दानव एकत्र जमून पृथ्वीवर अंशांनीं अवतीर्ण होण्याचा विचार करूं लागले. त्यांच्या समक्ष वरद पितामहानें 'दुंदुभी'-नामक गंधर्वीला 'तूं इष्ट कार्यासाठीं भूलोकीं जा' अशी आज्ञा केली. पितामहाची ही आज्ञा ऐकतांच दुंदुभी-गंधर्वी भूलोकीं 'मंथरा'-नामक कुब्जा झाली आणि शक्रादि देवश्रेष्ठांनीं वानरादि स्त्रियांच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न केले.

ते सर्व बल व यश यांच्या योगानें आपापल्या पितरांस अनुसरले. ते वीर पर्वतांचीं शिखरें तोडणारे आणि साल, ताल व शिला यांचा आयुधा-प्रमाणें उपयोग करणारे असून त्या सर्वांचीं शरीरें वज्रासारखीं दृढ होतीं. ते आपल्या अंगीं स्वेच्छेनें बल व वीर्य धारण करीत असत. ते सर्वहि देवपुत्र युद्धविशारद, दहासहस्र हत्तींच्या बलानें युक्त, वायूसारखे वेगवान् व इच्छे-प्रमाणें निवास करणारे होते. त्यांतील कित्येक वनांत रहात असत. अशाप्रकारें समग्र पूर्व कार्य करून लोकभावन भगवानानें मंथरेला कैकयीच्या मनांत लोभ व मोह उत्पन्न करून रामाला वनवासाला पाठविण्याविषयीं पुढील सर्व कार्यांचा उपदेश केला. तेव्हां प्रजापतीच्या आज्ञेप्रमाणें मनाप्रमाणें वेगवान् असलेल्या त्या कुब्जेनें इतस्ततः संचार करीत वैर प्रज्वलित करण्याचें कार्य आरंभिलें. ३.१९.२७६

## अध्याय २७७ वा.

[ १ रामाच्या यौवराज्याभिषेकाचा संकेत. २ मंथरेच्या प्रेरणेनें कैकयीनें केलेलें विघ्न. ३ रामाचा वनवास. ४ खरादि राक्षसांचा वध व शूर्पणखेची विटंबना. ५ तिला पाहून रावणाला आलेला क्रोध. ६ रावणाचें गोकर्णक्षेत्रीं मारीच्याकडे गमन. ]

**युधिष्ठिर**—हे ब्रह्मन्, तूं रामादिकांच्या जन्माचें पृथक्, पृथक् वर्णन केलेंस. आतां रामाच्या वनवासाचें कारण ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव ते दोघे वीर राम-लक्ष्मण यशस्विनी जानकीसह वनांत जाण्यास कां निघाले, तें मला सविस्तर कथन कर.

( १ ) **मार्कंडेय**—हे धर्मपुत्रा, याप्रमाणें चार सुलक्षणी पुत्रांचा जन्म होतांच दशरथराजा परम संतुष्ट झाला. ते चौघेहि राजपुत्र नित्य धर्मपरायण, कर्तव्य-निष्ठ व वृद्धांची सेवा करणारे होते. ते महाबलाढ्य कुमार क्रमानें वाढूं लागले. ब्रह्मचर्यव्रताचें पालन करून ते नृपनंदन उपनिषदांसह वेद व प्रयोग-उपसंहारांसह अस्त्रयुक्त धनुर्विद्या यांत प्रवीण झाले आणि ब्रह्मचर्य संपवून त्यांनीं अनुरूप भार्यांचें पाणिग्रहण केलें. तें पाहून दशरथ राजा अत्यंत संतुष्ट व सुखी झाला.

त्या चौघां राजपुत्रांतील ज्येष्ठ भ्राता रामचंद्र प्रजेचें रंजन करूं लागला. तो धीमान् कौसल्यानंदन आपल्या स्वाभाविक मनोहरत्वामुळें पित्याच्या हृदयाला आनंद देऊं लागला. नंतर योग्य काल प्राप्त होतांच त्या विचारी राजानें आपल्या वार्द्धक्याचा विचार करून सचिव व धर्मज्ञ पुरोहित यांच्याशीं रामाला यौवराज्याभिषेक करण्याचा संकेत केला. तेव्हां त्या सर्व मंत्रिमंडळानें ‘ राजाचा हा विचार प्राप्तकालाला अनुरूपच आहे ’ असें म्हटलें.

राजन्, श्रीरामचंद्र अप्रतिम रूपवान् होता. त्याचे नेत्र आरक्त असून तो महाबाहु मत्त मातंगाप्रमाणें गमन करीत असे. त्या आजानुबाहूचें वक्षःस्थल विशाल असून मस्तकावरील केंस नीलवर्ण व कुरळे होते. त्याची अंगकांति देदीप्यमान असून तो वीर युद्धांत इंद्रालाहि अजिंक्य होता. बृहस्पतितुल्य बुद्धिमान् असलेला तो राघव सर्वधर्मपारग, सर्वविद्याविशारद, जितेंद्रिय व शत्रूंनाहि मनोहर दिसत असे. त्याच्यावर सर्व प्रजेचें अत्यंत प्रेम होतें. तो दुर्जनांचें नियमन व सज्जनांचें रक्षण करीत असे. तो धृतिमान्, अजिंक्य व दुराधर्ष होता. अशा प्रकारच्या त्या कौसल्येचा आनंद वाढविणाऱ्या पुत्राला पाहून राजा दशरथ परम हृष्ट होत असे.

राजा युधिष्ठिरा, तुझें कल्याण असो. वीर्यवान् रामाच्या या सर्व गुणांचें चिंतन करून महातेजस्वी दशरथ आपल्या वसिष्ठ पुरोहितास म्हणाला—" हे ब्रह्मन्, आज रात्रीं पुष्य नक्षत्राचा पुण्य योग आहे. यास्तव तुम्ही यौवराज्याभिषेकाचें सर्व साहित्य तयार करून रामाची संमति घ्या व त्याला अभिषेकासाठीं बोलवून आणा."

( २ ) राजाचें हें भाषण मंथरेनें ऐकलें व तिनें कैकयीपाशीं जाऊन, योग्य वेळ पाहून व संधि साधून म्हटलें—" हे कैकेयि, राजानें आज तुझी फार मोठी हानि केली आहे. हे अभागिनि, तुला क्रुद्ध झालेला भयंकर सर्प जरी दंश करील तरी बरें होईल ! खरोखर, जिच्या पुत्राला आज अभिषेक होणार आहे, ती कौसल्याच खरी भाग्यवती आहे. तुझें एवढें भाग्य कोठलें ? तूंच दुर्दैवी, म्हणून तुझ्या पुत्राला राज्यपद प्राप्त झालें नाहीं. "

मंथरेचें तें वचन ऐकून सर्वाभरणभूषित असलेल्या त्या कृशोदरी कैकेयीनें एकांतांत पतीची गांठ घेतली आणि त्या सुहासिनीनें हंसत व जणुकाय प्रेमच व्यक्त करीत त्या नरेंद्राशीं प्रणयानें मधुर भाषण करण्यास आरंभ केला. ती म्हणाली—" हे सत्यप्रतिज्ञ महाराज, तूं मला पूर्वींच जें इष्टवराचें अभिवचन देऊन ठेविलें आहेस, तें खरें कर. मला वर देऊन तूं आज त्या कष्टकर स्त्रीऋणांतून मुक्त हो. "

राजा—ठीक आहे, तूं मागशील तो वर मी देतों. जें तुला इष्ट असेल तें मागून घे. आज मी कोणत्या अवध्य मनुष्याचा वध करूं ! कोणाला बद्ध करूं किंवा कोणाला मुक्त करूं ! कोणाला द्रव्य देऊं अथवा कोणाचें द्रव्य हरण करूं ! या पृथ्वीतलावर ब्राह्मणांचें धन सोडून बाकीची सर्व संपत्ति माझी आहे. चारी वर्णांच्या प्रजेचें रक्षण करणारा मी या पृथ्वीचा राजराजेश्वर आहें. यास्तव हे कल्याणि, तुझी जी इष्ट कामना असेल ती सत्वर सांग. मी ती तत्काल पूर्ण करीन.

राजाचें हें वचन ऐकून कैकेयीनें त्याचा आशय जाणला व हा पृथ्वीपति आतां आपल्या पूर्ण अधीन झाला आहे, असें पाहून ती राजाला म्हणाली—"हे प्रभो, तूं रामाच्या अभिषेकासाठीं जें साहित्य जमविलें आहेस त्याच्यायोगानें भरताला अभिषेक होऊं दे आणि राघव वनांत जाऊं दे. "

( ३ ) हे भरतश्रेष्ठा, दशरथराजा आपल्या प्रिय राज्ञीचें तें अप्रिय व दारुण वचन ऐकून अत्यंत दुःखार्त झाला व कांहीं न बोलतां बसला. तेव्हां आपल्या

पित्यानें कैकेयीला दिलेला वर जाणून सत्यप्रतिज्ञ राम 'आपल्या धर्मात्म्या पित्याचें वचन सत्य व्हावें' म्हणून वनांत जावयास निघाला. तेव्हां श्रीनें युक्त असलेला लक्ष्मण व रामाची प्रिय पत्नी वैदेही सीता, हीं दोघें त्याला अनुसरलीं. ती जनकात्मजा शेत नांगरीत असतां भूमींत सांपडली म्हणून तिला 'सीता' म्हणत.

याप्रमाणें भ्राता व भार्या यांसह राम वनांत निघून गेला असतां राजा दशरथहि पुत्रशोकानें मृत्यु पावला. तेव्हां राम वनवासास गेला व राजानें इहलोक सोडला, हें पाहून कैकेयीनें मातुलगृहीं गेलेल्या आपल्या भरत-पुत्राला बोलावून आणविलें व त्याला म्हटलें—"बाळा भरता, दशरथराजा स्वर्गलोकीं गेला असून राम-लक्ष्मण वनवासांत आहेत. यास्तव या निष्कंटक विपुल राज्याचा स्वीकार कर आणि सुखी हो."

मातेचें हें भाषण ऐकून धर्मात्मा भरत तिची निर्भर्त्सना करीत म्हणाला—हे कुलपांसने, तूं हें अतिशय क्रूर कर्म केलें आहेस. धनलोभानें पतीचा नाश करून कुलाचा उच्छेद केलास आणि माझ्या मस्तकावर हा अपकीर्तीचा कलंक लादलास. आतां तूं आपल्या कर्माचें अनिष्ट फल भोग.

असें बोलून त्या कैकेयीपुत्रानें रोदन केलें व हें सर्व दुष्कृत्य कैकेयीचें आहे माझें नव्हे, हें व्यक्त करून आपलें शुद्ध चरित्र प्रकट करण्याच्या इच्छेनें रामाला परतविण्यासाठीं तो सर्व प्रजाजनांच्या समक्ष वनाकडे चालला. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांना वहानांतून पुढें पाठवून अत्यंत दुःखी झालेला तो भरत शत्रुघ्नासह त्यांच्या मागून निघाला. त्यावेळीं वसिष्ठ-वामदेवादि अनेक ब्राह्मण व सहस्रावधि पौरजनहि रामाला परतविण्याच्या इच्छेनें त्यास अनुसरले.

महात्मा भरत भरद्वाजमुनीच्या सांगण्यावरून चित्रकूट पर्वतावर गेला. तेथें पर्णकुटी करून आणि लक्ष्मणभ्रात्यासह जटा-वल्कलादि तापसांचीं भूषणें धारण करून रहाणाऱ्या सपत्नीक रामाला तो भेटला. त्यास पितृनिधनाची दुःखद वार्ता सांगून स्वतःला राज्याभिषेक करून घेण्यासाठीं आग्रहानें अयोध्येस परत बोलावूं लागला. परंतु पित्राज्ञेचें पालन करणाऱ्या रामचंद्रानें त्याचें सांगणें अमान्य केलें व त्यासच पादुका समर्पण करून परत पाठविलें. तेव्हां भरतानें राजसिंहासनावर रामाच्या पादुका स्थापून अयोध्येच्या बाहेर नंदिग्रामीं तापस वेषानेंच वास केला आणि तेथून राज्य चालविलें. इकडे रामचंद्र हे सर्व प्रजा-

जन पुनः आपल्याकडे येतील व त्रास देतील, या शंकेनें चित्रकुटाचा त्याग करून महारण्यांतील शरभंगाच्या आश्रमास[1] गेला. तेथें शरभंगाचा सत्कार करून त्या वीरानें दंडकारण्यांत गोदावरीच्या तीरावरील रम्य आश्रमांत वास्तव्य केलें. तो महात्मा राघव भ्राता लक्ष्मण व पत्नी जानकी यांसह तेथें सुखानें रहात असतां शूर्पणखेनें त्याचें जनस्थानांत रहाणाऱ्या खर-राक्षसाशीं फार मोठें वैर उत्पन्न केलें. त्या निमित्तानें धर्मवत्सल रामानें तापसांच्या रक्षणासाठीं जनस्थानांतील चवदा सहस्र चवदा राक्षसांसह खर, दूषण व त्रिशरस् या नांवांच्या तीन प्रधान राक्षसांचा नाश केला आणि तें धर्मारण्य निर्भय केलें.

रामचंद्रानें त्या राक्षसांचा वध केला असतां शूर्पणखा पुनः तेथें गेली. तेव्हां लक्ष्मणानें तिचें नाक व ओष्ठ कापून टाकिले. त्यामुळें दुःखानें विह्वल झालेली ती राक्षसी लंकेंतील आपल्या रावण भ्रात्याकडे गेली. त्यावेळीं तिचें मुख वाळलेल्या रक्तानें मलीन झालें होतें. ती भ्रात्याच्या पायांवर पडून आक्रोश करूं लागली. आपल्या भगिनीला असें विरूप केलेलें पाहून रावण क्रोधसंतप्त झाला व दांत-ओठ खात आसनावरून उठला.

( ५ ) त्यानें आपल्या अमात्यांना निरोप दिला व ते सभेंतून निघून गेले असतां एकांतांत तिला म्हटलें—" हे भद्रे, मला तुच्छ लेखून व माझा अवमान करून कोणत्या मूर्खानें तुझी अशी अवस्था केली ? हा कोण मंदमति तीक्ष्ण शूलाला सर्व अवयवांनीं दृढ आलिंगन देत आहे ? हा कोणता मूढ मस्तकावर अग्नि ठेवून सुखानें शयन करीत आहे ? भयंकर सर्पाला पायानें डंवचणारा हा कोण आहे ? आयाळानें युक्त असलेल्या हिंस्र सिंहाच्या दाढांना स्पर्श करणारा हा क्षुद्र प्राणी कोण आहे ? "

याप्रमाणें तो राक्षसाधिप बोलत असतां रात्रीं जळणाऱ्या वृक्षांच्या रंध्रांतून निघणाऱ्या अग्निज्वालांप्रमाणें त्या लंकाधीशाच्या नेत्रादिकांतून तेजस्वी ज्वाला निघूं लागल्या. नंतर त्याच्या भगिनीनें रामाचा सर्व पराक्रम आणि सहस्रावधि राक्षसांसह खर-दूषणांचा पराभव त्याला कथन केला. तेव्हां रावणानें पुढील कार्याचा निश्चय करून आपल्या भगिनीचें सान्त्वन केलें व नगरीच्या रक्षणाची योजना करून आकाशमार्गानें गमन केलें.

---

१ येथें मूळ रामायणकथेंत थोडा विपर्यास झाला आहे. पण हा केवल अनुवाद असल्यामुळें क्षम्य आहे.

( ६ ) त्या राक्षसेंद्रानें प्रथम त्रिकुट व काल या पर्वतांचें आक्रमण केलें. नंतर गंभीर जलानें युक्त असलेल्या मकरालय-महासागराचें उल्लंघन करून गोकर्णांत प्रवेश केला. तें पवित्र क्षेत्र महात्म्या श्रीशंकराचें अव्यग्र व प्रिय स्थान आहे. तेथें पूर्वी विश्वामित्राच्या यज्ञप्रसंगीं उत्पन्न झालेल्या रामाच्या भयानें मारीच दैत्य तपश्चर्या करीत होता. दशानन त्या आपल्या अमात्याकडे गेला. ३.१९.२७७.

---

## अध्याय २७८ वा.

[ १ रावणाचा मारीच्याशीं संकेत. २ त्या दोघांचें कपट वेषानें रामाश्रमापाशीं गमन. ३ रामानें केलेला मायावीमृगरूपी मारीचाचा वध. ४ रावणानें केलेलें सीताहरण. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, याप्रमाणें रावण आलेला पाहून मारीच गडबडीनें उठला व त्यानें त्याचें फल-मूलादिकांनीं सत्कारपूर्वक आतिथ्य केलें. नंतर विश्रांति घेऊन तो वाक्यज्ञ राक्षसेंद्र सुखासनावर बसला असतां वक्त्यांतील श्रेष्ठ मारीच त्यास असें अर्थपूर्ण वचन बोलला—" हे लंकाधिपा, आज तुझें मुख म्लान कां दिसत आहे ! तुझ्या नगरींत सर्वत्र क्षेम आहे ना ! सर्व प्रजा पूर्वींप्रमाणेंच तुझी सेवा करीत आहे ना ! आज तुझें कोणत्या निमित्तानें येथें आगमन झालें ! तुझें कोणतें कार्य आहे, तें मला सांग. तें कितीहि दुष्कर असलें तरी मी पार पाडीन. "

मारीचाचें असें आश्वासनपर भाषण ऐकून क्रोधसंतप्त झालेल्या रावणानें त्याला रामाचें सर्व घोर कृत्य कथन केलें व पुढील कार्याची संक्षिप्त योजनाहि निवेदन केली. तेव्हां त्याची ती आत्मघातक योजना ऐकून मारीच म्हणाला—" हे राक्षसेश्वरा, तूं या वेळीं रामाच्या समीप जाऊं नको. मला त्याचें सामर्थ्य माहित आहे. त्या महात्म्याच्या बाणाचा वेग सहन करण्यास कोण समर्थ आहे ! त्या पुरुष-श्रेष्ठाच्या भीतीनेंच मी सर्वस्वाचा त्याग करून येथें राहिलों आहें. कोणत्या दुरात्म्यानें तुला हें विनाशाचें द्वार दाखविलें !

मारीचाचें हें भाषण ऐकून क्रुद्ध झालेल्या रावणानें त्याची निर्भर्त्सना करीत म्हटलें—" हे मारीचा, तूं जर आमच्या सांगण्याप्रमाणें केलें नाहींस, तर तुझा मृत्युहि निश्चित आहे, असें समज. "

रावणाचें हें उग्र वचन ऐकून मारीचानें विचार केला कीं, याच्या सांगण्याप्रमाणें वागलें किंवा न वागलें तरी मृत्यु जर अवश्य येणारच आहे, तर मग रामासारख्या श्रेष्ठ पुरुषाच्या हातून मरणेंच अधिक श्रेयस्कर होय. यास्तव याच्या मताप्रमाणेंच वागावें हें बरें. असा निश्चय करून मारीच त्या श्रेष्ठ राक्षसाला म्हणाला—" राक्षसेश्वरा, मी तुला कोणतें साह्य करूं तें सांग. तें करण्यास मी जरी समर्थ नसलों, तरी तें करीन."

त्यावर रावण म्हणाला—" रत्नासारखे विचित्र केंस, तशींच सुवर्णप्रचुर शृंगें व शरीर यांनीं युक्त असलेल्या मृगाचें रूप धारण करून तूं सीतेच्या मनांत लोभ उत्पन्न कर. तुला पहातांच ती जनकात्मजा रामाला निश्चयानें तुझा वध करण्याची प्रेरणा करील आणि काकुत्स्थ राम तुझ्या मागें लागून दूर गेला म्हणजे सीता माझ्या हातीं सांपडेल व मी तिचें हरण करीन. म्हणजे तो दुर्बुद्धि राम भार्यावियोगानें अनायासानेंच नाश पावेल. एवढें साह्य तूं मला कर. "

रावणाचें हें वचन ऐकून मारीचानें स्वतःचें और्ध्वदेहिक केलें आणि तो पुढें गेलेल्या रावणाच्या मागोमाग अतिशय दुःखानें निघाला.

( २ ) नंतर सहज कर्म करणाऱ्या रामाच्या आश्रमापाशीं जाऊन त्या दोघांनीं पूर्वसंकेताप्रमाणें आचरण केलें. रावणानें दंड-कमंडलु धारण करून मुंडन केलेल्या यतीचें रूप घेतलें व मारीच रत्नजडित सुवर्णमृग होऊन तेथें इतस्ततः फिरूं लागला.

तो मृग वैदेहीच्या दृष्टीं पडतांच विधीनें प्रेरणा केल्यामुळें तिनें रामाला त्या विचित्र मृगाला धरून आणावयास सांगितलें. तेव्हां जानकीचें प्रिय करण्याची इच्छा करणाऱ्या रामानें सत्वर धनुष्य हातीं घेतलें, लक्ष्मणाला सीतेचें रक्षण करावयास सांगितलें आणि त्या विचित्र मृगाला जिवंत धरण्यासाठीं तो त्याच्या मागें लागला. त्यावेळीं रामानें हातांत धनुष्य घेतलें असून पाठीवर भाते बांधले होते. खड्ग, गोधांगुलि, बाण इत्यादिकांनीं युक्त असलेला तो राम तारामृगाच्या[१] मागें धांवणाऱ्या रुद्राप्रमाणें या मायावी मृगाच्या मागें धांवूं लागला.

---

१ प्रजापति मृगरूप धारण करूण कन्येच्या अभिलाषानें तिजकडे गेला असतां रुद्रानें त्याचा पाठलाग करून शिरश्छेद केला, तोच पुढें मृगशीर्ष नक्षत्र झाला, असें पुराणांत वर्णन आहे.

( ३ ) तेव्हां त्या मायावी मृगानें कांहीं वेळ अदृश्य व पुनः व्यक्त होत रामाला आश्रमापासून पुष्कळ दूर नेलें. तेव्हां रामानें तो राक्षस आहे, हें ओळखलें व प्रसंगावधान असलेल्या त्या धनुर्धरानें एक अमोघ बाण त्या मृगरूपी राक्षसावर सोडला, तेव्हां त्या बाणप्रहारानें विह्वल झालेला तो मायावी मृग 'हा सीते, हा लक्ष्मण,' असा रामाच्या स्वरानें आक्रोश करूं लागला.

तो करुणस्वर वैदेहीच्या कानीं पडतांच जेथून तो शब्द आला होता त्या दिशेकडे ती धावूं लागली. तेव्हां लक्ष्मण तिचें निवारण करीत म्हणाला—"हे भीरु, तूं व्यर्थ साशंक होऊं नको ! रामावर प्रहार करण्यास कोण समर्थ आहे ! आतां एका घटकेंत तुझा भर्ता सुरक्षित परत आलेला तूं पहाशील."

लक्ष्मणाचें हें भाषण ऐकून सीतेच्या मनांत 'हा लक्ष्मण माझा अभिलाष करीत आहे' अशी भलतीच शंका येऊन, शुद्ध चारित्र्य हेंच जिचें भूषण आहे, अशी ती रोदन करणारी पतिव्रता त्याला कठोर वचनें बोलूं लागली. स्त्रीस्वभावानें विवेकहीन झालेली ती लक्ष्मणाला म्हणाली— "हे मूढा, तूं आपल्या अंतःकरणांत जी पापी कामना करीत आहेस, ती कदापि पूर्ण होणार नाहीं. मी स्वतः हातीं शस्त्र घेऊन आत्महत्या करीन. पर्वताच्या शिखरावरून उडी टाकीन, अग्निप्रवेश करीन, परंतु तुझा स्वीकार करणार नाहीं. ज्याप्रमाणें सिंहीण कधीं कोल्ह्याकडे पहात नसते, तशी मी रामाचा त्याग करून कदापि तुझ्या वश होणार नाहीं."

सीतेचें हें अशाप्रकारचें अश्राव्य व कठोर भाषण ऐकून रामावर अत्यंत प्रेम करणारा सदाचरणी लक्ष्मण हातांनीं कान झांकून राम ज्या मार्गानें गेला होता, त्याच मार्गानें निघाला. तो धनुर्धर रामाचा शोध करीत वेगानें त्याच्या मागोमाग चालला.

( ४ ) इतक्यांत इकडे आश्रमाच्या द्वारांत सर्वांगाला भस्मच चूंन रावण प्रकट झाला. त्यानें राखेनें आच्छादित झालेल्या अग्नीप्रमाणें यतीचा कपट वेष धारण केला होता. तो वस्तुतः उग्र असूनहि तेथें भिक्षूच्या सौम्य रूपानें त्या साध्वीचें हरण करण्याच्या इच्छेनें आला होता. आपल्या आश्रमापाशीं एक यति आला आहे, असें पाहून धर्मज्ञ जनकात्मजेनें फल-मूलादिकांनीं सत्कार करण्यासाठीं त्याला निमंत्रण केलें. तेव्हां तिच्या आतिथ्याचा अवमान करून त्या राक्षसेंद्रानें स्वतःचें स्वरूप प्रकट केलें आणि सीतेचें सान्त्वन करण्यास आरंभ

केला. रावण म्हणाला—" हे सीते, मी ' रावण '-नांवाचा प्रसिद्ध राक्षसाधिप आहें. या समुद्राच्या पलीकडे माझी रम्य लंकानगरी आहे. तेथें तूं स्त्री-पुरुषांच्या समूहांमध्यें माझ्यासह अतिशय शोभशील. हे सुंदरि, या तापसी राघवाला सोडून दे व माझी भार्या हो."

अशाप्रकारचीं हीं दुःश्राव्य भाषणें ऐकून जानकीनें आपले कान दोन्ही हातांनीं झांकून घेतले व तिरस्कारानें त्याला म्हटलें—" हे दुरात्म्या, असें निंद्य भाषण करूं नको. हें सर्व आकाश नक्षत्रांसह खालीं पडेल, पृथ्वीचीं शकलें होतील, अग्निहि शीतल होईल, परंतु मी रघुनंदनाचा त्याग करणार नाहीं. हे मूढा, कमलवनामध्यें संचार करणाऱ्या मदोन्मत्त महा गजाचा जिनें आश्रय केला आहे, ती हस्तिनी सूकरला कधीं तरी स्पर्श करील काय ? जिनें पुष्पापासून उत्पन्न झालेल्या मधुमाधवीनामक उत्तम मद्याचा आस्वाद घेतला आहे, अशी कोणती स्त्री क्षुद्र कांजीचा लोभ धरील !"

इतकें बोलून ती साध्वी आश्रमांत जाऊं लागली. त्यावेळीं क्रोधानें तिचे ओष्ठ स्फुरण पावत असून ती वारंवार आपले दोन्ही हात चोळीत होती. ती पर्णशालेंत निघून जात असतां रावणानें धांवत जाऊन कठोर वचनांनीं तिची निर्भर्त्सना करीत तिला आंत जाण्यास प्रतिबंध केला. तें पाहून विवेकशून्य झालेल्या तिला मूर्च्छा आली. तेव्हां रावणानें तिच्या मस्तकावरील केंस घट्ट धरून तिला उचललें व तत्काल आकाशमार्गानें गमन केलें. याप्रमाणें रावणानें बलात्कारानें हरण केलेली ती तपस्विनी जनकात्मजा ' हे राम, हे राम ' असा आक्रोश करीत असतां पर्वतावर बसलेल्या गृध्र जटायूनें तिला पाहिलें. ३. १९. २७८.

---

## अध्याय २७९ वा.

[ १ जटायूनें रावणाला केलेला प्रतिकार व जटायूचा पराभव. २ रावणाचा सीतेसह लंकेंत प्रवेश. ३ रामाच्या भेटीनंतर जटायूचा मृत्यु. ४ कबंधवध व दिव्य पुरुषानें रामाला पुढील कर्तव्याचा केलेला उपदेश. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, अरुणाचा पुत्र जटायु हा राजा दशरथाचा परम मित्र होता. तो संपातीचा सोदर भ्राता महा वीर्यवान् होता. त्या बलाढ्य गृध्रराजानें रावणाच्या अंकावर स्थित असलेल्या त्या राजस्नुषेला पहातांच

क्रोधानें आकाशांत उड्डाण केलें व रामभार्येचें हरण करणाऱ्या त्या राक्षसेश्वर रावणावर झडप घालीत म्हटलें—" हे निशाचरा, माझ्या या साध्वी स्नुषेला सोडून दे. मी जिवंत असतांना तूं या मैथिलीचें हरण कसें करतोस ? तूं जर या राजकन्येला सोडलें नाहींस, तर माझ्या हातून तूं आज जिवंत सुटणार नाहींस."

इतकें बोलून जटायूनें आपल्या तीक्ष्ण नखांनीं रावणाला क्षतयुक्त केलें. चोंचीनें असंख्य प्रहार केले व आपल्या विस्तीर्ण पंखांचे शेंकडों प्रहार करून जर्जर केलें. त्या वेळीं पर्वतांतून स्रवणाऱ्या जलप्रवाहांप्रमाणें त्या बलाढ्य राक्षसेंद्राच्या शरीरांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. रामाचें प्रिय व हित इच्छिणाऱ्या त्या गृध्रानें रावणाला असें जर्जर केलें असतां त्या राक्षसानें हातांत खड्ग घेतलें व त्या प्रचंड पक्ष्याचे पंख तोडून टाकिले. त्याबरोबर तो गृध्रराज पंख तोडलेल्या पर्वत शिखराप्रमाणें विद्ध होऊन खालीं पडला व रावणानें सीतेसह अंतरिक्षांत उड्डाण केलें.

( २ ) याप्रमाणें तो राक्षस आकाशमार्गानें चालला असतां वैदेही जेथें जेथें आश्रममंडल, सरोवर किंवा एखादी नदी दृष्टीं पडे, तेथें तेथें आपल्या शरीरावरील अलंकार टाकीत होती. तिनें एका पर्वतशिखरावर बसलेले पांच श्रेष्ठ वानर पाहिले. तेव्हां त्या मनस्विनीनें आपलें दिव्य वस्त्र खालीं टाकिलें. तें वाऱ्यानें उडविलेलें पिवळें वस्त्र त्या पांच वानरांच्या मध्यभागीं पडलें असतां मेघांतील पीतवर्ण विद्युल्लतेप्रमाणें शोभलें.

त्यानंतर लवकरच अंतरिक्षांतून गमन करणाऱ्या त्या आकाशचराला आपली रम्य नगरी दिसली. ती मनोरम लंकापुरी अनेक द्वारांनीं युक्त होती, ती दृढ तट व त्याच्याहि बाहेर असलेला वेणुमय दुर्ग यांच्या योगानें अतिशय दुर्गम झाली होती. विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या त्या विचित्र लंकानगरींत राक्षसाधिपानें सीतेसह सत्वर प्रवेश केला.

( ३ ) याप्रमाणें रावणानें सीतेचें हरण केलें असतां इकडे धीमान् राम त्या महामृगाचा वध करून परत येत होता, तों मार्गांतच भ्राता लक्ष्मण त्याच्या दृष्टीं पडला. त्याबरोबर 'राक्षसांनीं व्याप्त असलेल्या या घोर वनांत एकट्या वैदेहीला टाकून हा येथें कसा आला ?' इत्यादि बोलून त्या वीरानें मनांत लक्ष्मणाची पुष्कळ निंदा केली. 'त्या मायावी राक्षसानें मृगरूपानें मला दूर

नेलें व हा वीर लक्ष्मणहि आश्रम सोडून मजकडे येत आहे, हें काय असावें' असा विचार करीत संतप्त झालेला तो राघव लक्ष्मणाच्या समीप येऊन पोंचला व त्याची निर्भर्त्सना करीत म्हणाला—"लक्ष्मणा, वैदेही आतां जिवंत तरी माझ्या दृष्टीं पडते कीं नाहीं याचा मला संशयच वाटत आहे."

ज्येष्ठ भ्रात्याचें हें निंदावचन ऐकून लक्ष्मणानें त्याला सर्व सत्य वृत्तान्त निवेदन केला आणि सीतेचे ते शेवटचे निंद्य शब्दहि सांगितले. तेव्हां तो वृत्तान्त ऐकून राम संतप्त हृदयानें आपल्या आश्रमाकडे निघाला. तों मार्गांत विद्ध होऊन पडलेला गृध्र त्याला दिसला. त्या पक्ष्याचें पर्वताकार प्रचंड शरीर पाहून 'हा कोणी राक्षसच आहे कीं काय,' अशी त्यास शंका आली व तो लक्ष्मणासह आपलें दृढ धनुष्य आकर्ण ओढून त्यावर धांवून गेला. तेव्हां तो तेजस्वी गृध्रराज त्या उभयतां बंधूंना म्हणाला—"वत्सांनो, तुमचें कल्याण असो. मी दशरथराजाचा सखा जटायु गृध्र आहें."

त्याचे हे शब्द ऐकतांच ते दोघे शूर राम-लक्ष्मण आपलीं धनुष्यें शिथिल करून 'आमच्या पित्याचें नांव घेणारा हा कोण बरें आहे' असें म्हणत त्याच्या समीप आले. तेव्हां दोन्ही पंख तुटलेला तो गृध्रराज त्यांच्या दृष्टीं पडला. जटायूनें त्यांना सर्व वृत्तान्त निवेदन करून "सीतेसाठीं रावणाच्या हातून आपला वध झाला आहे," असें म्हटलें.

तें ऐकून राघवानें 'तो दुरात्मा रावण कोणत्या दिशेनें गेला ?' असें त्यास विचारिलें.

पण त्या वेळीं तो गृध्र आसन्नमरण झाला होता. त्यामुळें त्यानें मस्तक हालवून दक्षिण दिशेकडे खूण केली व प्राण सोडले. तेव्हां काकुत्स्थ रामानें त्याचा आशय ओळखला व आपल्या पित्याच्या मित्राचा सन्मानपूर्वक और्ध्वदेहिक संस्कार केला. नंतर ते दोघे भ्राते आपल्या आश्रमांत येऊन पहातात तों आश्रमांतील घट व आसनें अस्ताव्यस्त पडलीं आहेत, कांहीं कलश फुटले आहेत व त्या शून्य आश्रमांतून कोल्हीं फिरत आहेत, असें त्यांस दिसलें. त्यावरून जटायूच्या म्हणण्याप्रमाणें सीतेचें रावणानेंच हरण केलें आहे, असा त्यांचा निश्चय झाला व तिच्या शोकानें संतप्त झालेले ते भ्राते दक्षिण दिशेनें दंडकारण्यांत जावयास निघाले.

( ४ ) सौमित्रासह राघव त्या महावनामध्यें संचार करीत असतां सर्वतः धावणारे मृगांचे अनेक कळप त्यांच्या दृष्टीं पडले. त्या निबिड अरण्यांत हिंस्र

श्वापदांचा घोर शब्द वणव्याप्रमाणें वाढत होता. तेथें त्यांना एका घटकेंतच एक भयंकर कबंध म्ह० मस्तकहीन पुरुषशरीर दिसलें. त्याच्या हृदयावर नेत्र असून उदरावर मुख होतें. तो प्राणी मेघ किंवा पर्वत यांसारखा प्रचंड होता. त्याचे बाहू शालवृक्षासारखे दीर्घ होते. त्याच्या हृदयावर एक विशाल नेत्र असून त्याच्या महोदरावरील मुख विस्तीर्ण होतें.

त्या राक्षसानें लक्ष्मणाला यदृच्छेनें आपल्या हातानें धरिलें व तो त्याला आपल्या मुखाकडे ओढूं लागला. तेव्हां तो उर्मिलेचा प्रिय पति अतिशय खिन्न झाला व रामाकडे पहात म्हणाला—" हे रामचंद्रा, वैदेहीचें हरण, मजवरील हें संकट, तुझा राज्यभ्रंश व पित्याचें मरण या सर्व गोष्टींचा विचार केला असतां वैदेहीसह कोसलदेशांत जाऊन तुला पितृ-पितामहादिकांनीं संपादन केलेल्या पृथ्वीच्या राज्यावर बसलेलें मी पाहीन, असें मला वाटत नाहीं. जे भाग्यवान् पुरुष कुश, लाह्या व शमीपत्रें यांसह पृथ्वीराज्यावर अभिषिक्त झालेल्या तुझें शरत्कालीन चंद्रतुल्य मुख पहातील ते धन्य होत. "

धीमान् लक्ष्मण असा विलाप करूं लागला असतां भ्रांतीच्या वेळींहि निर्भय असणारा काकुत्स्थ राम त्याला म्हणाला— "हे नरव्याघ्रा, असा खिन्न होऊं नको. मी येथें उभा असतां या राक्षसापासून तुला यत्किंचित्हि भय नाहीं. हा पहा मी याचा डावा हात तोडतों. तूं त्याच्या उजव्या हाताचा छेद कर. "

असें बोलून रामानें सत्वर आपलें तीक्ष्ण खड्ग हातीं घेतलें व तिळाचें काष्ठ जसें तोडावें, तसा त्याचा डावा हात तोडून टाकिला. तेव्हां आपला ज्येष्ठ भ्राता समीपच उभा आहे, हें पाहून बलाढ्य लक्ष्मणानेंहि खड्गानें त्याचा उजवा हात तोडून भूमीवर पाडला व त्या रामानुजानें पुनः त्या राक्षसाच्या कुशींत प्रहार केला. त्याबरोबर तो कबंध गतप्राण होऊन त्याचा प्रचंड देह भूमीवर पडला.

इतक्यांत त्याच्या मृत देहांतून एक दिव्य पुरुष बाहेर पडला व तो सूर्यतुल्य देदीप्यमान पुरुष अंतरिक्षांत निघून गेला. तेव्हां रामानें त्याला विचारिलें—"तूं कोण आहेस ? या माझ्या प्रश्नाचें उत्तर दे. हा आश्चर्यकारक प्रकार काय आहे ?"

तो पुरुष म्हणाला—"हे नृपश्रेष्ठा, मी विश्वावसु गंधर्व असून ब्राह्मणाच्या शापानें या राक्षसयोनीला प्राप्त झालों होतों. सीतेला लंकाधिप रावणानें हरण करून नेलें आहे. यास्तव तूं सुग्रीवाकडे जा. तो तुला साह्य करील.

ऋष्यमूक पर्वताच्या समीप पंपा-सरोवर आहे. तें पवित्र सरोवर निर्मल जलानें युक्त असून हंस, कारंडव इत्यादि जलचर पक्ष्यांनीं व्याप्त आहे. तेथें चार मंत्र्यांसह सुग्रीव रहात असतो. तो हेममाला धारण करणारा वानरराज वालीचा कनिष्ठ भ्राता आहे. त्याची भेट घेऊन त्याला आपल्या दुःखाचें कारण निवेदन कर. तो सुग्रीव तुझ्या सारखाच समदुःखी आहे. तो तुला साह्य करील. 'जानकीची व तुझी पुनः भेट होईल' इतकेंच आज तुला सांगतां येणें शक्य आहे. त्या वानराधिपाला रावणाच्या मंदिराची निश्चित माहिती आहे."

असें बोलून तो महा तेजस्वी दिव्य पुरुष अंतर्धान पावला. तें पाहून राम व लक्ष्मण या दोघां श्रेष्ठ वीरांना अत्यंत विस्मय वाटला. ३. १९. २७९.

---

## अध्याय २८० वा.

[ १ रामाचें सुग्रीवाशीं सख्य, वालीचा वध. २ रावणाच्या आज्ञेनें घोर राक्षसांनीं सीतेला दाखविलेली भीति, तिचा निश्चय. ३ त्रिजटेचा उपदेश. ]

( १ ) **मार्कंडेय**—राजा युधिष्ठिरा, त्यानंतर सीताहरणानें दुःखार्त झालेले ते दोघे राम-लक्ष्मण तेथून जवळच कमलांनीं व्याप्त असलेल्या पंपा-सरोवरावर आले. त्या वनांत हिमतुल्य शीतल वायु वहात असल्यामुळें त्यांच्या श्रमांचा परिहार होऊन मन प्रसन्न झालें. तथापि प्रिय कांतेचें स्मरण करून कामविह्वल झालेला राम विलाप करूं लागला. तें पाहून सौमित्रि त्याला म्हणाला—" हे मानदा, वृद्धांप्रमाणें ज्ञानी व जितेंद्रिय असलेल्या तुला अशा क्षुद्र विकारांचा स्पर्श होणेंहि योग्य नव्हे. आपल्याला रावण व वैदेही यांचा शोध लागलेला आहे. यास्तव पराक्रम व बुद्धि यांच्या योगानें तूं जानकीला सोडविण्याचा यत्न कर. आपण आतां शैलस्थ वानरश्रेष्ठ सुग्रीवाकडे जाऊं या. मी तुझा शिष्य व सेवक असून तुला साह्य करण्यास तत्पर आहें, यास्तव शांत हो."

राजा, अशा उत्तेजक वाक्यांनीं लक्ष्मणानें भ्रात्याचें सान्त्वन केलें असतां राघव स्थिरचित्त झाला व आपल्या कार्याला लागला. त्या उभय भ्रात्यांनीं पंपा-सरोवरांत स्नान करून पितरांचें तर्पण केलें व ते दोघे वीर भ्राते तेथून निघाले. थोड्याच अवधींत ते फल-मूलांनीं युक्त असलेल्या ऋष्यमूक पर्वताजवळ आले. त्या पर्वताच्या शिखरावर पांच वानरवीर त्यांना दिसले.

शिवाय मैंद, द्विविद, हनूमान्, नीलात्मज व ऋक्षराज जांबवान् हे सुग्रीवाचे सचिव त्याच्या साह्यार्थ सज्ज आहेत. हे सर्व महात्मे महाबलाढ्य व बुद्धिमान् आहेत. त्यांनीं रामबलाचा आश्रय केल्यामुळें तुझा विनाश करण्यास ते समर्थ आहेत.

तारेचें हें हितवचन वालीला रुचलें नाहीं. त्या कपीश्वरानें तिच्या बोलण्यावर आक्षेप घेऊन तिचें मन सुग्रीवावर गेलें असावें अशी शंका घेतली व तिला कठोर शब्द बोलून तो मत्सरी वालि आपल्या गुहेंतून बाहेर पडला आणि माल्यवान् पर्वतासमीप स्थित असलेल्या सुग्रीवाला म्हणाला—"ज्याला जीवित प्रिय आहे अशा तुला, मीं पूर्वी अनेक वेळां जिंकिलें असून तूं केवळ माझ्या ज्ञातीचा आहेस म्हणून तुला सोडून दिलें. असें असतांना पुनः तुला मरणाची इतकी त्वरा कां झाली आहे!"

वालीचें हें भाषण ऐकून सुग्रीव आपल्या भ्रात्याला असें प्राप्तकाल व युक्तियुक्त वचन बोलला. त्या शत्रुनाशक सुग्रीवानें आपल्या वचनानें जणुकाय रामालाहि आपला वृत्तान्त सुचविला. तो म्हणाला—" हे राजन्, तूं माझ्या स्त्रीचा व राज्याचा अपहार केला आहेस. तेव्हां माझ्या जीविताचें श्लाघ्यत्व किती आहे, हें दाखविण्यासाठींच मी येथें आलों आहें, असें समज."

याप्रमाणें परस्परांस अनेकप्रकारें वाक्प्रहार करीत ते दोघे वालि व सुग्रीव साल, ताल, शिला इत्यादि आयुधें घेऊन युद्धामध्यें एकमेकांवर धांवून गेले. दोघांनींहि परस्परांवर प्रहार व मुष्टींचे आघात केले. दोघेहि भूमीवर पडले व विचित्र संचार करूं लागले. त्यांनीं दांत व नखें यांच्या क्षतांनीं परस्परांस रक्तानें माखून टाकिलें. त्यावेळीं ते दोघे वीर फुललेल्या पळसाप्रमाणें शोभले. त्यांचें युद्ध चाललें असतां त्या दोघांमध्यें कांहींच वैशिष्ट्य दिसेना, म्हणून हनुमानानें सुग्रीवाच्या कंठांत एक पुष्पमाला घातली, तेव्हां महाशैल मलय मेघमालेनें जसा शोभतो, तसा तो वीर कंठांतील मालेनें शोभूं लागला.

तेव्हां पुष्पमालेनें चिह्नित झालेल्या सुग्रीवास पाहून महाधनुर्धर रामानें आपलें धनुष्य आकर्ण ओढिलें व वालीला लक्ष्य करून त्यावर शर सोडला. त्यावेळीं आकर्ण ओढलेलें तें धनुष्य यंत्राप्रमाणें शोभलें. रामाच्या शरानें हृदयप्रदेशीं विद्ध झालेला वालि अत्यंत त्रस्त झाला व रक्त ओकला. इतक्यांत लक्ष्मणासह राम त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां त्या काकुत्स्थाची निंदा करून

वालि मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. चंद्राप्रमाणें ज्याचें बल आहे, असा आपला भर्ता भूमीवर पडला आहे, असें पाहून तारा सचिंत झाली.

याप्रमाणें वालीचा वध झाला असतां सुग्रीवाला जिचा ईश्वर नष्ट झाला आहे अशी किष्किंधा व चंद्रानना तारा यांची प्राप्ति झाली. श्रीरामानें वर्षा-कालचे चार महिने त्या शुभ्र माल्यवान् पर्वतावर मोठ्या कष्टानें निवास केला त्यावेळीं सुग्रीव त्याची वारंवार भेट घेत असे.

(२) इकडे कामबलानें उन्मत्त झालेल्या रावणानेंहि लंकापुरींत प्रवेश करून आपल्या नंदन-वनोपम भवनांत सीतेला ठेविलें. तें मंदीर अशोक-वनाच्या समीप असून तापसाश्रमासारखें होतें. तेथें ती भर्त्याच्या स्मरणानें कृश झालेली व तापसीचा वेष धारण करणारी जानकी उपवासपरायण व तपः-शील होऊन राहिली. ती हरिणाक्षी रामभार्या फल-मूलाशन करीत तेथें मोठ्या दुःखानें काल कंठित होती.

त्या राक्षसाधिपानें सीतेच्या रक्षणार्थ अनेक प्रकारच्या विकराल राक्षसी तेथें ठेविल्या होत्या. त्या सर्व प्रास, असि, शूल, परशु इत्यादि विविध आयुधें धारण करून, रात्रंदिवस सीतेच्या सभोंवार राहून तिचें रक्षण करीत होत्या. त्यांतील कित्येकींना एकच नेत्र असून कांहीं दोन, तीन नेत्रांनीं युक्त होत्या. कित्येकींना दीर्घ जिह्वा असून कांहींना एकच पाय होता. अशा नानाप्रकारच्या भयंकर आणि विचित्र आकार व घोररूप यांनीं युक्त असलेल्या त्या पिशाची दारुण शब्द व घोर भाषणें करून सीतेला सर्वदा भीति दाखवीत असत.

त्या राक्षसी 'आमच्या स्वामीचा अवमान करून येथें सुखानें राहणाऱ्या या मानुषीचे आपण तिळा एवढाले तुकडे करूं व तिला भक्षण करूं.' असें बोलून सीतेची वारंवार निर्भर्त्सना करीत असत.

एकदा राक्षसींच्या अशा भाषणांनीं त्रस्त व पतिविरहाच्या शोकानें व्याकुल झालेली जानकी दीर्घ निश्वास टाकून त्यांस म्हणाली—"हे राक्षसींनो, मला सत्वर खाऊन टाका. पुंडरीकाक्ष रामचंद्रावांचून जीवंत रहाण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. तालवृक्षावर चढलेल्या सर्पिणीप्रमाणें मी प्राणाहून प्रिय असलेल्या रामावांचून निराहार राहून गात्रें शुष्क करीन. परंतु राघवावांचून अन्य कोणाहि पुरुषाचा स्वीकार करणार नाहीं, हें माझें वचन सत्य समजा व यापुढें तुम्हांला जें कांहीं करावयाचें असेल तें करा."

( ३ ) वैदेहीचें हें सर्व भाषण ऐकून तें रावणाला निवेदन करण्यासाठीं त्या घोररूपीणी राक्षसी त्वरेनें निघून गेल्या. तेव्हां त्या निघून गेल्या असतां 'त्रिजटा'-नांवाच्या प्रियवादिनी व धर्मज्ञ राक्षसीनें वैदेहीचें सान्त्वन करीत म्हटलें—"हे सीते, मी तुला कांहीं सांगतें. मजवर विश्वास ठेव. हे सखि, तूं भय सोडून दे आणि माझें वचन ऐक. 'अविंद्य'-नांवाचा एक वृद्ध व मेधावी राक्षसश्रेष्ठ आहे. तो रामाचा हितचिंतक असून तुझ्यासाठीं त्यानें मला असें सांगितलें आहे."

"त्रिजटे, माझ्या सांगण्यावरून तूं सीतेचें सान्त्वन कर व तिला प्रसन्न करून असें सांग कीं, बलाढ्य लक्ष्मणासह तुझा भर्ता राम कुशल आहे. श्रीमान् राघवानें इंद्रतुल्य तेजस्वी वानरराजाशीं सख्य केलें असून तो तुला सोडविण्यास उद्युक्त झाला आहे. लोक ज्याची निंदा करितात त्या रावणापासून तुला यत्किंचित्हि भय नाहीं. हे नंदिनि, नलकूबराच्या शापानें तूं सुरक्षित आहेस.

पूर्वीं रंभेचा अभिलाप करणाऱ्या या पाप्याला शाप झाला आहे. त्यामुळें तो अजितेंद्रिय राक्षस कोणाहि स्त्रीला, तिच्या इच्छेविरुद्ध स्पर्श करण्यास समर्थ नाहीं. सुग्रीव ज्याचा संरक्षक आहे, असा तुझा धीमान् भर्ता सौमित्रीसह येथें येऊन लवकरच तुला सोडवील.

हे शुभे, मला रोज अनेक अनिष्ट व घोर स्वप्नें पडतात. तीं या दुर्बुद्धि राक्षसाचा विनाश सुचवितात. हा पौलस्त्यकुलघातक क्षुद्रकर्मा निशाचर दुष्टात्मा आहे. तो आपल्या स्वाभाविक शीलदोषानें सर्वांचें भय वाढवीत आहे. काळानें ज्याच्या बुद्धीला भ्रष्ट केलें आहे असा तो निशाचर सर्व देवांशीं स्पर्धा करितो. मी स्वप्नांत त्याच्या विनाशाचीं चिन्हें पहात असतें. तो तैलाभिषिक्त, केंसरहित, चिखलांत बुडालेला व खरयुक्त रथांत नृत्य करीत असलेला मला दिसतो. हे कुंभकर्णादिक केंस मोकळे सोडून, रक्तमाला धारण करून, रक्ताचें अनुलेपन करून व नग्न होऊन दक्षिण दिशेकडे जात असलेले मी स्वप्नांत पहातें.

शुभ्र छत्र, शिरस्त्राण, शुभ्र पुष्पमाला व अनुलेपन यांस धारण करणारा एकटा बिभीषणच श्वेतपर्वतावर आरूढ झालेला दिसतो. त्याचे चार सचिवहि शुभ्रमाला व अनुलेपन यांनीं भूषित होऊन श्वेतपर्वतावर आरूढ झालेले

माझ्या दृष्टीं पडतात. त्यामुळें हे पांच राक्षसच या महाभयापासून मुक्त होतील. रामाच्या अस्त्रानें समुद्रवलयांकित पृथ्वी त्याच्या अंकित होईल व हे सीते, तुझा पति आपल्या यशानें सर्व पृथ्वीला व्यापील.

तुझा दीर लक्ष्मणहि अस्थिसमूहावर आरूढ होऊन मधुपायस भक्षण करीत आहे, असें मला स्वप्नांत दिसतें. तो सर्व दिशांना दग्ध करण्याची इच्छा करीत असतो. जिचें अंग रुधिरानें आर्द्र झालें आहे व व्याघ्रानें जिचें सर्वतः रक्षण केलें आहे, अशा रोदन करीत असलेल्या तुला मी उत्तरेकडे जात असलेलें वारंवार पहातों. यास्तव हे साध्वि, तूं लवकरच भ्रात्यांसह आपल्या पतीशीं संयुक्त होऊन परम हर्षाला प्राप्त होशील."

युधिष्ठिरा, त्रिजटेचें हें वचन ऐकून त्या हरिणाक्षी बालेला पुनरपि भर्तृ-समागमाची आशा वाटूं लागली. इतक्यांत रावणाकडे गेलेल्या त्या दारुण राक्षसी तेथें आल्या व त्यांनीं पूर्वीप्रमाणेंच त्रिजटेसह बसलेल्या सीतेला पाहिलें. ३. १९. २८०.

---

## अध्याय २८१ वा.

[ १ रावणाचें सीतेपाशीं आगमन व वश होण्याविषयीं तिची प्रार्थना. २ सीतेनें केलेला त्याचा निषेध. ]

( १ ) मार्कंडेय—हे धर्मराजा, याप्रमाणें ती जनकात्मजा रावणाच्या पुष्पवाटिकेंत रहात असतां पतिवियोगानें अतिशय व्याकुल झाली. तिनें मलिन वस्त्र परिधान केलें असून ती अत्यंत दीन दिसत होती. तिनें केवल मणि-मंगलसूत्र हाच एक अलंकार धारण केला होता. ती पतिव्रता शिलातलावर रोदन करीत बसली होती व राक्षसी तिच्या परिचर्येंत तत्पर होत्या.

अशाप्रकारें शोकार्त होऊन बसलेल्या जानकीच्या त्या भवनांत रावण अकस्मात् आला व कामार्त झालेला तो राक्षसेंद्र त्या पतिव्रतेच्या समीप गेला. देव-दानव-गंधर्व-यक्ष व किंपुरुष यांनाहि युद्धांत अजिंक्य असलेला तो राक्षसाधिप कामपीडित होऊन अशोकवनांत आला. त्यानें दिव्य वस्त्रें व मूल्यवान् रत्नांचीं कुंडलें धारण केलीं होतीं. त्याच्या मस्तकावर चित्र-विचित्र मालांनीं युक्त असलेला मुकुट असल्यामुळें तो मूर्तिमान् वसंत ऋतुच भासत होता. त्यानें आपलें स्वरूप अतिशय यत्नानें जरी अलंकृत केलें होतें, तरी तें

कल्पवृक्षासारखें दिसत नव्हतें. उलट त्याचा तो भूषणांनीं विभूषित झालेला देह स्मशानांतील चैत्यवृक्षाप्रमाणें भयंकर भासत होता.

त्यावेळीं सीतेच्या समीप आलेला तो रजनीचर रोहिणी-नक्षत्राजवळ आलेल्या शनिग्रहाप्रमाणें दिसला. तो रावण कामशरानें विह्वल झाला होता. त्यामुळें तो समीप येतांच सीता त्रस्त झालेल्या हरिणीप्रमाणें भयभीत झाली. इतक्यांत तो लंकाधिप तिला हाक मारून म्हणाला—"हे सीते, तूं आतांपर्यंत आपल्या पतीवर अनुग्रह केलास तेवढा पुरे झाला. आतां मजवर प्रसन्न हो. मी तुला विपुल वस्त्राभरणें देईन. हे सुंदरि, तूं मूल्यवान् वस्त्रें व भूषणें धारण करून मजवर अनुग्रह कर. माझ्या सर्व स्त्रियांमध्यें तूं श्रेष्ठ होऊन रहा.

देवकन्या, गंधर्वकन्या, दानवकन्या व दैत्यकन्या अशा सर्व जातींच्या कन्या माझ्या भार्या आहेत. चौदा कोटि पिशाची माझ्या आज्ञेंत असतात. त्यांच्या दुप्पट नरभक्षक राक्षस व तिप्पट यक्ष माझ्या वचनांत स्थित आहेत. कांहीं थोडे यक्ष माझा भ्राता जो धनाध्यक्ष कुबेर त्याच्या आश्रयानें रहातात. हे भद्रे, गंधर्व व अप्सरा माझ्या भ्रात्याची जशी उपासना करितात, त्याचप्रमाणें त्या मद्यप्राशनस्थानीं गेलेल्या माझीहि सर्वदा सेवा करितात.

हे चारुगात्रि, मीहि साक्षात् विप्रश्रेष्ठ विश्रवामुनीचा पुत्र आहें. मी केवळ पांचवा लोकपालच आहें, अशी माझी प्रसिद्धि आहे. हे सुंदरि, साक्षात् देवेश्वर इंद्राप्रमाणेंच माझींहि दिव्य व विविध प्रकारचीं अन्न-पानादि भक्ष्य-भोज्यें असतात. यास्तव आतां तुझें हें वनवासाचें दुष्कर कर्म क्षीण होऊं दे आणि मंदोदरी जशी माझी सम्राज्ञी आहे तशीच तूंहि माझी भार्या हो."

( २ ) युधिष्ठिरा, राक्षसाधिपाचें हें निंद्य भाषण ऐकून वैदेहीनें आपलें मुख फिरविलें व दोघांच्यामध्यें एक तृण ठेवून त्या निशाचराशीं बोलण्यांस आरंभ केला. त्यावेळीं त्या पतिव्रतेच्या नेत्रांतून अशुभ दुःखाश्रूंच्या धारा चालल्या होत्या, त्यायोगानें तिच्या वक्षःस्थलावर जणुकाय अभिषेकच होत होता. पतीला देवता मानणारी ती साध्वी वैदेहि त्या क्षुद्रबुद्धि रावणाचा निषेध करीत म्हणाली—" हे राक्षसेश्वरा, अशाप्रकारचें अमंगल भाषण तूं वारंवार करीत आहेस आणि मी अभागिनी अतिशय विषादानें तुझे ते नीच प्रलाप ऐकून घेत आहें. हे भद्रमुखा, तुझें कल्याण असो. परदाराभिलाष कदापि सुखावह होत नसतो. तो अकल्याणकारक आहे, यास्तव तूं आपलें मन या दुष्कर्मापासून परत फिरीव. या पापी विचारापासून निवृत्त हो. हे निशाचरा, मी

परस्त्री असून सदैव पतिव्रताधर्मांत स्थित आहें. मज मानुषस्त्रीचा तुला काय उपयोग? मजसारख्या असहाय दीन अबलेचें बलात्कारानें हरण करून तुझें कोणतें प्रिय होणार आहे!

अरे, तुझा पिता ब्रह्मदेवापासून उत्पन्न झाला असून तो प्रजापतितुल्य विप्र आहे. तूंहि लोकपालांप्रमाणें श्रेष्ठ आहेस. असें असतां स्वधर्माचें पालन कसें करीत नाहींस? हे मूढा, महेश्वराचा सखा राजराजेश्वर धनाध्यक्ष जो कुबेर, त्या महात्म्याचा 'मी भ्राता आहें' असा निर्देश करण्यास तुला लज्जा कशी वाटत नाहीं!"

इतकें बोलून ती सुकुमारी जनकात्मजा रोदन करूं लागली. त्या कोमलांगीनें आपलें मस्तक व मुख वस्त्रानें झांकून घेतलें व भूमीकडे दृष्टि लाविली. त्यावेळीं तिचें कृश शरीर थरथरां कांपत होतें, ती राजनंदिनी दुःखाकुल होऊन रोदन करीत असतां तिच्या मस्तकावरील स्निग्ध केसांची दीर्घ वेणी कृष्णवर्ण सर्पिणीप्रमाणें दिसत होती.

सीतेचें तें अतिशय निष्ठुर वचन ऐकून तो निर्लज्ज रावण, तिनें निषेध केला असतांहि पुनः तिला असें बोलला—"हे सुहासिनि, माझें शरीर मदनाच्या बाणांनीं अत्यंत पीडित झालें आहे. तथापि तुझ्या संमतीवांचून मी तुला स्पर्श करणार नाहीं. आम्हांला आहारभूत असलेला मानव जो राम त्यावरच तूं अद्यापि अनुरक्त आहेस, तेव्हां अशा तुला मी काय करूं शकणार?"

याप्रमाणें त्या अनिंद्य सीतेला बोलून तो महाराक्षस तेथेंच अंतर्धान पावला व आपल्या इष्ट दिशेस निघून गेला. तेव्हां राक्षसींनीं परिवेष्टित असलेली ती वैदेही शोकाकुल होऊन तेथें राहत असतां त्रिजटा तिची परिचर्या करीत तिच्यापाशीं राहिली. ३. १९. २८१

## अध्याय २८२ वा.

[ १ रामप्रेरणेनें क्रुद्ध लक्ष्मणाचें किष्किंधेत गमन. २ सुग्रीवाची शरणागति व सीतेच्या शोधार्थ योजलेल्या उपायांचें कथन. ३ हनुमानाचें आगमन. ४ त्यानें सांगितलेला सीतेचा वृत्तान्त. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे कौंतेया, इकडे सुग्रीवानें ज्याचें संरक्षण केलें आहे, असा राघव लक्ष्मणासह माल्यवान् पर्वतावर रहात असतां एकदा रात्रीं मध्येंच जागृत

झालेल्या त्याची दृष्टि आकाशाकडे गेली. त्या विमल नभोमंडलांत ग्रह-नक्षत्रादिकांनीं युक्त असलेला शशांक चंद्रहि त्याच्या दृष्टीं पडला. त्या पर्वतावर निजलेला राघव त्यावेळीं कुमुदादि कमलांच्या सुगंधानें युक्त व शीतल अशा सुखावह वायूच्या स्पर्शानें अकस्मात् जागृत झाला होता. लागलेंच, सीता राक्षसाच्या भवनांत बंदिवासांत पडली आहे, या असह्य स्थितीचें स्मरण होऊन तो धर्मात्मा अतिशय खिन्न झाला व प्रभातकालीं आपल्या वीर भ्रात्याला म्हणाला—" हे लक्ष्मणा, किष्किंधेंत जा व तो वानरराज सुग्रीव काय करीत आहे, याचा शोध कर. तो कृतघ्न व स्वार्थपरायण वानर ग्राम्यधर्मात आसक्त होऊन कर्तव्यपराङ्मुख झाला आहे, असें मला वाटतें.

त्या मूढाला मीं राज्याभिषेक केला. सर्व वानर, गोलांगुल व ऋक्ष त्याची सेवा करीत आहेत. त्याच्यासाठीं मीं किष्किंधेच्या उपवनांत तुझ्या साह्यानें वालीचा वध केला. पण हा हीन वानर अत्यंत कृतघ्न आहे, असें मला वाटूं लागलें आहे. कारण तो माझी अवस्था जाणत असूनहि सुखोपभोगांत मग्न होऊन राहिला आहे. आपली प्रतिज्ञा पाळणें हें पुण्यकर्महि तो जाणत नसावा असें दिसतें. त्या अल्पबुद्धीला कृतोपकाराचेंहि स्मरण नाहींसें झालें आहे. यास्तव तो मूढ वानर जर विषयोपभोगांतच आसक्त होऊन राहिला असेल तर हे वीरा, तूं त्याला वालीच्या मार्गानेंच सर्व भूतांच्या गतीला पाठवून दे आणि तो वानरश्रेष्ठ आमच्या कार्यासाठीं जर यत्न करीत असेल तर त्याला येथें घेऊन ये. जा आतां, त्वरा कर, विलंब लावूं नको."

( २ ) ज्येष्ठ भ्रात्याच्या वचनांत व हितांत तत्पर असलेला लक्ष्मण हें आज्ञावचन ऐकून तत्काल आपलें सुंदर धनुष्य व बाण, भात्यांसह घेऊन तत्काल निघाला. किष्किंधेच्या द्वारांत येतांच त्यानें कोणाला न विचारतां निर्भयपणें आंत प्रवेश केला. त्याचें निवारण कोणींहि केलें नाहीं. नंतर लक्ष्मण क्रुद्ध होऊन आला आहे, हें ऐकतांच वानरश्रेष्ठ सुग्रीवानें आपल्या पत्नीसह त्याच्या समीप जाऊन स्वागत केलें. त्या नम्र वानरराजानें लक्ष्मणाचें सत्कारपूर्वक आतिथ्य केलें असतां संतुष्ट झालेल्या लक्ष्मणानेंहि त्याच्या सत्काराचा स्वीकार केला.

नंतर सौमित्रीनें निर्भयपणानें त्याला रामाचें सर्व म्हणणें सविस्तर निवेदन केलें. तें ऐकून तो वानराधिप सुग्रीव आपले भृत्य व स्त्री यांसह नम्र होऊन हात जोडून लक्ष्मणाला म्हणाला—" हे लक्ष्मणा, मी दुर्बुद्धि नाहीं,

अकृतज्ञ नाहीं किंवा निष्ठुरहि नाहीं. मीं सीतेच्या शोधासाठीं जो प्रयत्न चालविला आहे, तो ऐक.

" मीं आपल्या सर्व बुद्धिमान् वानरांना चारी दिशांस पाठविलें आहे. त्या सर्वांनीं एका मासांत परत येण्याची प्रतिज्ञा केलेली आहे. हे वीरा, ते वानर या पृथ्वीवरील सर्व अरण्यें, पर्वत, नगरें, ग्राम, आकर इत्यादि सर्व प्रदेशीं सीतेचा शोध करितील. एक महिना पूर्ण होण्यास आतां फक्त पांचच दिवसांचा अवधि राहिला आहे. त्यानंतर तूं रामासह अतिशय प्रिय वार्ता श्रवण करशील."

याप्रमाणें तो बुद्धिमान् वानरेंद्र बोलला असतां प्रगल्भ लक्ष्मणानें क्रोध सोडून त्याची प्रशंसा केली व सुग्रीवासह माल्यवान् पर्वताकडे प्रयाण केलें. तेथें पर्वताच्या पृष्ठभागीं बसलेल्या राघवापाशीं जाऊन सुग्रीवानें केलेलें सर्व कार्य त्यास निवेदन केलें. त्यानंतर तीन्हीं दिशांतून सहस्रावधि वानर जमा झाले. पण दक्षिण दिशेकडे गेलेले वानर परत आले नव्हते. त्यांनीं रामाला सांगितलें कीं, आम्हीं समुद्रवलयांकित पृथ्वी शोधिली. पण वैदेही किंवा रावण यांतील कोणीहि आमच्या दृष्टीं पडलें नाहीं. हा वृत्तांत ऐकून दक्षिण दिशेंत गेलेले वानर अद्यापि परत यावयाचे आहेत, या आशेवर तो दुःखार्त राघव जीव धरून राहिला.

( ३ ) याप्रमाणें दोन महिन्यांचा काल निघून गेला असतां एके दिवशीं कांहीं वानर त्वरेनें सुग्रीवापाशीं आले व त्याला म्हणाले—" हे वानरश्रेष्ठा, वालीनें रक्षण करून ठेविलेलें जें विस्तीर्ण मधुवन आहे, त्या तुझ्या महावनाचें वायुपुत्र हनुमान्, वालिपुत्र अंगद व इतरहि जे श्रेष्ठ वानर तूं दक्षिण दिशेकडे पाठविले होतेस ते सर्व यथेच्छ सेवन करीत आहेत."

त्यांचा हा अपराध ऐकून सुग्रीव 'ते सर्व कृतकृत्य होऊन आले असावेत' असें समजला. कारण कृतार्थ झालेले सेवक अशाच चेष्टा करीत असतात, हें त्याला ठाऊक होतें. तेव्हां त्यानें हा वृत्तान्त रामाला निवेदन केला. तो ऐकून रामानेंहि 'ते वानर मैथिलीला पाहून आले असावेत' असें अनुमान केलें.

कांहीं वेळानें हनुमानादि श्रेष्ठ वानरहि विश्रांति घेऊन राम-लक्ष्मणांच्या संनिध बसलेल्या सुग्रीवापाशीं आले. तेव्हां हनुमानाची गति व प्रसन्न मुख हीं पाहून 'हा वीर खचित सीतेला भेटून आला आहे' असें रामाला वाटलें.

त्या हृष्टचित्त झालेल्या हनुमान्प्रभृति वानरांनीं राम, सुग्रीव व लक्ष्मण यांस क्रमानें यथाविधि प्रणाम केला.

तेव्हां नम्र झालेल्या त्या वानरश्रेष्ठांना रामानें सशर धनुष्य हातीं घेऊन असा प्रश्न केला—" हे वानरवीरांनो, तुम्ही मला जीवित देणार ना ? तुम्ही कृतकृत्य होऊन आलां आहां ना ? शत्रूचा युद्धांत वध करून व जनकात्मजेला परत आणून तुम्ही मजकडून पुनः अयोध्येचें राज्य करविणार काय ? शत्रूनें माझा अवमान करून माझ्या भार्येचें हरण केलें आहे. यास्तव वैदेहीला सोडविल्यावांचून व शत्रूचा रणांत नाश केल्यावांचून मी जिवंत रहाण्यास समर्थ नाहीं."

( ४ ) रामाचें हें वचन ऐकून वायुपुत्र म्हणाला—हे रामा, मी तुला प्रिय वार्ता सांगतों, ऐक. मी जानकीला प्रत्यक्ष पाहून आलों आहें. प्रथम आम्ही दक्षिण दिशेंतील सर्व पर्वत, वनें व गुहा, या ठिकाणीं शोध करून अतिशय श्रांत झालों. तोंपर्यंत आमची ठरलेली मुदतहि पूर्ण होत आली होती, इतक्यांत एक महागुहा आमच्या दृष्टीं पडली. त्यांत आम्हीं प्रवेश केला. ती गुहा अनेक योजनें लांब असून गाढ अंधकारानें युक्त होती. तेथें गहन अरण्य असून ती कीटकांनीं व्याप्त होती. तथापि त्या गुहेंतील बिकट मार्गानें पुष्कळ दूर गेल्यावर आम्हांला सूर्यप्रकाश दिसला व तेथेंच कांहीं अंतरावर एक दिव्य भवन आमच्या दृष्टीं पडलें.

हे राघवा, तें 'मय'-नामक दैत्याचें गृह होतें. तेथें प्रभावती-नांवाची एक तापसी तप करीत होती. तिनें दिलेले विविधप्रकारचे भक्ष्य पदार्थ व पान यांचें सेवन करून आम्ही तृप्त झालों व बलयुक्त होऊन तिनें दाखविलेल्या मार्गानें पुढें निघालों. त्या प्रदेशांतून निघाल्यानंतर महासमुद्राच्या समीपच असलेले सह्य, मलय व दर्दुर हे महापर्वत आम्हीं पाहिले. आम्ही मलय गिरीवर आरूढ होऊन सागराकडे पहात खिन्न होऊन बसलों होतों. आम्ही अत्यंत व्यथित होऊन स्वतःच्या जीविताविषयींहि निराश झालों. तिमि-नक्रादि प्रचंड जलचरांनीं आकुल व असंख्य योजनें विस्तीर्ण असलेला तो महासागर पाहून आम्ही अतिशय उद्विग्न झालों आणि प्रायोपवेशन करण्याचा निश्चय करून तेथेंच बसलों.

त्यावेळीं आम्हीं परस्परांशीं पूर्वीच्या गोष्टी बोलत असतां सहज जटायूची कथा सांगितली. तेव्हां पर्वतशृंगासारखा प्रचंड, घोर व भयावह असा एक

पक्षी आम्हांला दिसला. तो जणुकाय दुसरा गरूडच भासत होता. तो आम्हांला भक्षण करण्याच्या इच्छेनें आमच्या समीप येऊन म्हणाला—" अरे, तुम्ही कोण अहां ! माझ्या जटायु-भ्रात्याचें नांव घेऊन त्याच्याविषयीं येथें हे कोण बोलत आहेत ! मी त्याचा ज्येष्ठ भ्राता खगाधिप संपाति आहें. एकदा आम्ही दोघे एकमेकांच्या स्पर्धेनें उंच उंच उड्डाण करीत असतां मी आदित्याच्या समीप गेलों. त्यामुळें माझे दोन्ही पंख दग्ध झाले. पण जटायूचे दग्ध झाले नाहींत. तेव्हांपासून तो माझा प्रिय भ्राता अद्यापि माझ्या दृष्टीं पडला नाहीं. माझे पंख दग्ध झाल्यामुळें मी या महाशैलावर पडलों आहें." हे प्रभो, त्याचें हें भाषण ऐकून रावणाच्या हातून त्याच्या भ्रात्याचा वध झाल्याचा वृत्तान्त आम्हीं त्यास सांगितला आणि आम्हांवरील हें संकटहि संक्षेपतः निवेदन केलें. हे राघवा, ही अतिशय अप्रिय वार्ता ऐकून संपातीनें खिन्न मनानें आम्हांला पुनः विचारलें—" हे वानरसत्तमांनो, हा राम कोण आहे ! सीतेचा काय वृत्तान्त आहे ! आणि जटायूचा वध कसा झाला ! हें सर्व ऐकण्याची माझी इच्छा आहे."

हे राजन्, तेव्हां मीं त्याला आपणावर ओढवलेल्या या सर्व संकटाचा सविस्तर वृत्तान्त कथन केला आणि आमच्या प्रायोपवेशनाचा हेतुहि सांगितला. तो ऐकून त्या पक्षिराजानें आम्हांला असें प्रोत्साहन दिलें.

संपाति—हे वानरहो, मी रावणाला ओळखतों. ती पहा समुद्राच्या पलीकडे त्रिकुटगिरिकंदरांत असलेली त्याची लंकानगरी, मला ती येथून दिसत आहे. वैदेही तेथें असेल यांत मुळींच संशय नाहीं.

हे राजन्, त्या श्रेष्ठपक्ष्याचें हें वचन ऐकून आम्ही सर्व सत्वर उठलों आणि समुद्राचें उल्लंघन करण्याविषयीं विचार करूं लागलों. परंतु सागराचें आक्रमण करण्यास कोणीहि धजेना. तें पाहून मीं माझा पिता जो वायु त्याचा आश्रय करून शतयोजनें विस्तीर्ण असलेल्या समुद्रावरून उड्डाण केलें. मार्गांत मला प्रतिबंध करावयास उद्युक्त झालेल्या एका जलराक्षसीचा वध केला आणि लंकेंत जाऊन रावणाच्या अंतःपुरांत प्रतिबद्ध होऊन राहिलेल्या सीतेला पाहिलें. ती सती पतिदर्शनलालसेनें उपवास व तप करीत आहे. तिच्या मस्तकावरील केसांच्या जटा झाल्या असून अंग अतिशय मलिन झालें आहे. ती तपस्विनी दीन व कृश दिसत आहे. या सर्व पृथक् पृथक् चिह्नांवरून हीच जानकी असावी असें मीं जाणलें.

नंतर ती आर्या एकटीच एकांतांत बसली आहे, असें पाहून मी तिच्या समीप जाऊन म्हणालों—"हे सीते, मी रामाचा दूत मारुतात्मज वानर आहें. तुझ्या दर्शनेच्छेनें मी आकाशमार्गानें येथें आलों. राजपुत्र राम-लक्ष्मण हे दोघेहि भ्राते कुशल आहेत आणि सर्व वानरांचा अधिपति जो सुग्रीव तो त्यांचें संरक्षण करीत आहे. लक्ष्मणासह रामानें तुला आपलें कुशल सांगितलें आहे आणि स्नेहभावानें राजा सुग्रीवानेंहि तुझें कुशल विचारिलें आहे. हे देवि, तुझा भर्ता राम आतां लवकरच सर्व वानरांसह येथें येईल. माझ्यावर विश्वास ठेव, मी वानर आहें, राक्षस नव्हे."

तेव्हां क्षणभर विचार करून वैदेही मला म्हणाली—हे रामदूता, अविंध्याच्या वचनावरून तूं हनुमान् आहेस, हें मला कळलें आहे. अविंध्य हा वृद्धांना संमत असलेला एक राक्षस आहे, त्यानें मला तुझ्यासारख्या कुशल मंत्र्यांनीं युक्त असलेल्या सुग्रीवाविषयीं सांगितलें आहे. आतां तूं परत जा.

इतकें बोलून मैथिलीनें मला हा दिव्य चूडामणि दिला. हें रत्न जवळ असल्यामुळेंच ती आर्या आतांपर्यंत जीव धरून राहिली होती. याच्या वियोगानें ती अत्यंत व्याकुल झाली आहे. यास्तव आतां त्या देवीला सोडविण्याचा शीघ्र प्रयत्न केला पाहिजे.

हे नरव्याघ्रा, त्या वेळीं तूं चित्रकूट महापर्वतावर एका वायसावर जें इषीका तृण फेंकलें होतेंस, त्याचा वृत्तान्त जानकीनें मला खुणेसाठीं सांगितला. नंतर मीं त्या राक्षसांकडून स्वतःला धरविलें, त्यांची लंकानगरी दग्ध केली व इकडे निघून आलों.

याप्रमाणें हनुमानाचें प्रिय भाषण श्रवण करून राघवानें त्याचा मोठा सन्मान केला. ३. १९. २८२.

---

## अध्याय २८३ वा.

[ १ रामकार्यासाठीं विविध वानरश्रेष्ठांचें प्रचंड सैन्यासह सुग्रीवासमीप आगमन. २ रामाचें सैन्यासह सुमुहूर्तावर प्रयाण व समुद्रतीरावर वास. ३ समुद्रोल्लंघनाचा संकेत. ४ समुद्राच्या सूचनेप्रमाणें सेतुबंधन. ५ अमात्यांसह बिभीषणाची शरणागति. ]

(१) **मार्कंडेय**—हे पांडुपुत्रा, त्यानंतर राघव त्या वानरांसह बसला असतां सुग्रीवाच्या आज्ञेनें अनेक वानरश्रेष्ठ तेथें जमले. वालीचा श्वशुर श्रीमान् सुषेण

एक कोटि वेगवान् वानरांना घेऊन प्राप्त झाला. गज व गवय हे दोघे कपिश्रेष्ठ प्रत्येकीं शंभर कोटि वानरांना घेऊन आले. गोलांगुल व भीमदर्शन गवाक्ष, हे दोघे साठ सहस्र कोटि वानरसैन्यासह आले. गंधमादन पर्वतावर निवास करणारा श्रेष्ठ गंधमादन वानर एक लक्ष कपिसेना घेऊन आला. 'पनस'-नांवाचा अतिशय बलाढ्य व बुद्धिमान् वानर पन्नास कोटि वानरांसह आला. 'दधिमुख' या नांवाच्या श्रीमान् वृद्ध वानरानें तेजस्वी कपींचें महासैन्य आणिलें.

हे महाराजा, ज्यांच्या ललाटावर ऊर्ध्व पुंड्राकार चिह्न आहे, अशा कृष्णवर्ण भीमपराक्रमी कोट्यवधि अस्वलें बरोबर घेऊन जांबवान् तेथें येऊन पोंचला. हे व दुसरे पुष्कळ वानरांचे व अस्वलांचे अधिपति असंख्य सैन्यासह रामकार्यासाठीं तेथें जमा झाले. ते सर्व सैनिक पर्वताप्रमाणें प्रचंड होते. सिंहाप्रमाणें गर्जना करीत होते. ते इतस्ततः धांवत असतांना फार मोठा शब्द होत होता. त्यांतील कांहीं पर्वततुल्य, कांहीं महिषाकार, कित्येक शरत्कालीन मेघाप्रमाणें शुभ्र तर कित्येक आरक्तमुखाचे होते.

ते सर्व वानर, कोणी उड्या मारीत, कोणी अंतरिक्षांतून उड्डाण करीत तर कोणी धांवत व धूलि उडवीत सर्वतः तेथें जमा झाले. वानरांचें तें प्रचंड सैन्य जलपूर्ण सागरासारखें शोभत होतें. सुग्रीवाच्या अनुज्ञेनें त्यांनीं तेथें वास्तव्य केलें.

(२) याप्रमाणें ते सर्व कपींद्र सर्व बाजूंनीं जमा झाले असतां शुभ नक्षत्र व तिथि पाहून सुमुहूर्तावर श्रीमान् राघव सुग्रीवासह त्याचें तें प्रचंड सैन्य बरोबर घेऊन निघाला. तें व्यूहाकार सैन्य मोठ्या त्वेषानें सर्व लोकांना उद्ध्वस्त करीत निघालें. त्या सैन्याच्या अग्रभागीं पवनात्मज हनूमान् असून निर्भय लक्ष्मण मागच्या बाजूचें रक्षण करीत होता.

विविध कपिसैन्यांनीं परिवेष्टित व गोधांगुलित्राणांनीं युक्त असलेले ते दोघे महाबलाढ्य राघव ग्रहांनीं परिवेष्टित असलेल्या चंद्र-सूर्याप्रमाणें चालले. तें वानरसैन्य साल, ताल, शिला इत्यादि आयुधें घेऊन जात असतां सूर्योदयसमयीं पक्व झालेल्या शाळीच्या पीतवर्ण शेतांप्रमाणें शोभलें.

त्या वेळीं नल, नील, अंगद, क्राथ, मैंद व द्विविद यांनीं रक्षण केलेलें तें प्रचंड सैन्य रामाच्या कार्यसिद्धीसाठीं मोठ्या उत्साहानें चाललें होतें. मार्गांत

विपुल व विविध फल-मूलें, यथेच्छ मधु-मांस व निर्मल जल यांनीं युक्त असलेल्या प्रदेशांत व पर्वतशिखरावर मुक्काम करीत तें सैन्य क्षारसमुद्रापाशीं आलें. तें अनेक ध्वजयुक्त सैन्य इतकें विस्तीर्ण होतें कीं जणुकाय तो दुसरा सागरच आहे, असा भास झाला. समुद्रतीरीं येतांच राघवानें वेलावनाचा आश्रय करून सैन्यासह तेथें निवास केला.

( ३ ) त्यानंतर श्रीमान् दाशरथि रामानें योग्य काल पाहून श्रेष्ठ वानरांच्या समुदायांत सुग्रीवाला म्हटलें—" हे कपीश्वरा, आपण या विस्तीर्ण समुद्राचें उल्लंधन कोणत्या उपायानें करावें, असें तुला वाटतें ! आपलें हें सैन्य अति प्रचंड आहे आणि हा समुद्र तर दुस्तर आहे."

रामाचा हा प्रश्न ऐकून स्वसामर्थ्याचा अतिशय अभिमान वाहणारे कांहीं वानर म्हणाले—" आम्ही सागराचें आक्रमण करण्यास समर्थ आहों, पण सर्वांना तें शक्य नाहीं."

कांहींनीं नौकांतून जाण्याचा उपाय सुचविला, तर कित्येकांनीं भोपळे, घट, क्षुद्र नौका इत्यादि साधनांनीं समुद्र तरून जाण्याची युक्ति काढिली. तेव्हां त्या सर्वांचीं विविध मतें ऐकून त्यांचें सान्त्वन करीत राम म्हणाला—" हे तुमचे उपाय योग्य नाहींत. कारण हा महासागर शंभर योजनें विस्तीर्ण आहे. या उपायांनीं त्याचें उल्लंघन करण्यास सर्व वानर समर्थ नाहींत. यास्तव तुमच्या या सूचना मला ग्राह्य वाटत नाहींत. त्याचप्रमाणें एवढें प्रचंड सैन्य पलीकडे नेण्यास आपल्यापाशीं विपुल नौकाहि नाहींत. वणिकांच्या नौका आहेत, पण आमच्या सारख्यांनीं त्यांस उपसर्ग कसा द्यावा !

शिवाय आमचें हें छिद्र पाहून शत्रु आमच्या प्रचंड सेनेचा नाश करूं शकेल. यास्तव नौका किंवा होडक्या यांच्या साह्यानें समुद्र तरून जाणें मला मान्य नाहीं. आतां मी या विस्तीर्ण जलनिधीची उपायानें आराधना करितों. मी उपवास करून येथें शयन करितों. म्हणजे हा समुद्रच मला मार्ग देईल आणि त्यानें जर मला मार्ग दाखविला नाहीं तर वायु व अग्नि यांसहि प्रतिहत करणारीं उज्ज्वल अस्त्रें सोडून मी या सागराला दग्ध करीन."

असें बोलून रामानें आपल्या अनुजासह स्नान केलें. त्या समुद्रतीरावर यथाविधि कुश पसरले व त्यावर शयन केलें. तेव्हां समुद्रानें रामाला स्वप्नांत दर्शन दिलें तो महासागर नद व नदी यांचा प्रभु असून जलचरांनीं व्याप्त

होता. रत्नांच्या शेंकडों आकरांनीं युक्त असलेला तो श्रीमान् समुद्र मधुर वाणीनें म्हणाला—" हे कौसल्यात्मजा, माझें वचन सावधान चित्तानें ऐक. या प्रसंगीं मीं तुला कोणतें साह्य करावें तें मला सांग. हे पुरुषश्रेष्ठा, मीहि इक्ष्वाकु वंशज असल्यामुळें तुझा ज्ञातिबांधव आहें."

सागरदेवतेचें हें भाषण ऐकून राम म्हणाला—"हे नदनदीश्वरा, माझ्या सैन्याला तूं मार्ग द्यावास, अशी माझी इच्छा आहे. त्या मार्गानें जाऊन त्या पौलस्त्यकुलकलंक दशग्रीवाचा मी वध करीन. तुजपाशीं याचना करीत असलेल्या मला तूं जर मार्ग दिला नाहींस, तर दिव्य अस्त्रांनीं अभिमंत्रित केलेल्या शरांनीं मी तुला शोपून टाकीन."

(४) राम असें बोलला असतां वरुणालय अतिशय व्यथित झाला व हात जोडून म्हणाला—"हे राघवा, तुला प्रतिबंध करण्याचें मीं कधीं मनांतहि आणिलें नाहीं. मी तुझ्या कार्यांत कदापि विघ्न करणार नाहीं. यास्तव माझें हें वचन ऐक व मग आपलें कर्तव्य कर. तुझ्या आज्ञेनें मीं तुझ्या सैन्याला तरून जाण्यास आज जर मार्ग दिला, तर पुढें इतरहि समर्थ मानव आपल्या धनुष्याच्या बलावर मला आज्ञा करतील. यास्तव मी तुला एक युक्ति सांगतों, ती ऐक. तुझ्या सैन्यांत 'नल'-नांवाचा एक वानर आहे. तो देवांचा त्वष्टा जो विश्वकर्मा त्याचा पुत्र असून श्रेष्ठ शिल्पि आहे. तो काष्ठ, तृण, पाषाण, शिला किंवा जें कांहीं माझ्या उदरांत टाकील, तें सर्व मी माझ्या पृष्टभागावर तरंगत ठेवीन आणि अशा रीतीनें सेतु तयार होईल. त्यावरून तूं सैन्यासह अनायासानें परतीरीं जाशील."

रामाला असें सांगून तो सागर अंतर्धान पावला. तेव्हां राघव नलाला म्हणाला—"हे शिल्पज्ञा, समुद्रावर सेतु बांधण्यास तूं समर्थ आहेस, असें माझें निश्चित मत आहे. यास्तव तूं सेतु निर्माण कर."

राजा युधिष्ठिरा, काकुत्स्थ रामानें नलाकडून दहा योजन विस्तीर्ण आणि शंभर योजनें लांब असा दृढ सेतु महासागरावर बांधविला. तो अद्यापि पृथ्वीवर 'नलसेतु' या नांवानें प्रसिद्ध आहे.

(५) रामाच्या आज्ञेनें तो पर्वतप्राय प्रचंड वानर नल सेतु निर्माण करण्याच्या कार्यांत व्यग्र असतां रावणाचा धर्मात्मा भ्राता बिभीषण आपल्या चार राक्षस अमात्यांसह समुद्राच्या उत्तर तीरावर तळ देऊन राहिलेल्या रामापाशीं

आला. तेव्हां उदार मनाच्या रामानें स्वागतपूर्वक त्याला आश्रय दिला. त्यावेळीं सुग्रीवाला तो रावणाचा गुप्त हेर कपट वेषानें आला असावा अशी शंका आली. परंतु राघवानें त्याची चर्या, सत्य, आचरण व सरळ स्वभाव यांवरून त्याच्या वस्तुस्वरूपाचा निश्चय केला व त्याच्या सदाचरणानें संतुष्ट होऊन सर्व राक्षसांच्या राज्याचा त्याला अभिषेक केला. त्याचप्रमाणें तो बिभीषण लक्ष्मणाचा सुहृद् व सचीवहि झाला.

त्यानंतर एका महिन्यानें बिभीषणाच्या संमतीनें तें सर्व सैन्य त्या सेतूच्या द्वारा विस्तीर्ण सागराचें उल्लंघन करून लंकेपर्यंत जाऊन पोंचलें. तेथें गेल्यावर रामानें त्या सर्व वानरसैन्याकडून लंकानगरींतील मोठमोठीं अनेक उपवनें उद्ध्वस्त करविलीं.

याप्रमाणें वानरसैन्यासह राघव आल्याचें ऐकून रावणानें शुक व सारण या नांवाचे आपले दोघे मंत्री तेथें पाठविले. ते वानररूपानें आले होते. तथापि बिभीषणानें त्यांस ओळखून, धरिलें. तेव्हां त्या कपटी राक्षसांनीं आपलें राक्षसरूप प्रकट केलें. तें पाहून रामानें त्यांस आपलें सैन्य दाखवून सोडून दिलें. नंतर रामानें सर्व सैन्यासह लंकेच्या उपवनांत वास्तव्य केलें व 'अंगद'-नामक प्राज्ञ वानरास रावणाकडे दूतभावानें पाठविलें. ३. १९. २८३.

---

## अध्याय २८४ वा.

[ १ अंगदाचें रावणाच्या सभेंत गमन व शिष्टाई. २ राक्षसांचा पराभव करून त्याचें प्रत्यागमन. ३ वानरसैन्यासह राघवाची लंकेवर चाल व युद्ध. ]

(१) **मार्कंडेय**—हे भरतश्रेष्ठा, त्या वनामध्यें विपुल अन्नोदक व विविध फलमूलें होतीं. तेथें वास्तव्य करून रामानें आपल्या प्रचंड सैन्याचें संरक्षण केलें. इकडे रावणानेंहि लंकेंत युद्धाची यथाशास्त्र सिद्धता केली. लंकानगरी स्वभावतःच दुर्गम होती. तिचे तट व द्वारें अतिशय दृढ होतीं. तिच्या सभोंवार सात दुस्तर खंदक होते. ते सर्व विपुल जलानें युक्त असून मासे व नक्र यांनीं आकुल होते. त्यांत कंटकप्रचुर खादिर वृक्ष सर्वत्र पसरले होते. त्या तटावरून मोठमोठीं शतघ्नी-प्रभृति यंत्रें सज्ज करून ठेविलीं होतीं. त्यांवर फिरत्या व कायमच्या चौक्या असून त्यांतील वीर सतत सूक्ष्मदृष्टीनें शत्रूच्या हालचालीचें निरीक्षण करीत होते.

त्या तटावर सर्वत्र बुरूज असून त्यांत शत्रूंवर दुरून फेंकावयाचे तोफेचे गोळे व पाषाणादि इतर वस्तु यांचा संग्रह केला होता. त्या प्रत्येक बुरुजाला मोठमोठीं द्वारें असून त्यांत भयंकर तोफा ठेवल्या होत्या. त्या तटाजवळच प्रचंड चतुरंगसेना उभी होती.

रामाच्या आज्ञेनें निघालेला अंगद लंकेच्या द्वारापाशीं येऊन पोंचला व राक्षसेंद्र रावणाला आपण आल्याचें कळवून त्यानें निर्भयपणें नगरींत प्रवेश केला. त्यावेळीं कोट्यवधि महाबलाढ्य राक्षसांनीं परिवेष्टित असलेला तो वालिपुत्र मेघमालांनीं आवृत्त झालेल्या आदित्याप्रमाणें शोभला. नंतर तो श्रेष्ठ वक्ता अंगद अमात्यांनीं युक्त असलेल्या राक्षसेंद्राच्या समीप जाऊन त्याला 'हे रावणा' असें संबोधून रामाचा संदेश सांगूं लागला.

अंगद्—हे राजा, महायशस्वी कोसलेंद्र राघवानें तुला जो प्रसंगप्राप्त संदेश पाठविला आहे, तो ऐक व तसें वर्तन कर. अजितेंद्रिय व अन्यायांत रत असलेला राजा प्राप्त झाला म्हणजे त्याचे देश व नगरें यांतहि अन्यायाचा प्रवेश होऊन तीं विनाश पावतात. सीतेचें बलात्कारानें हरण करणाऱ्या तूं एकट्यानेंच माझा अपराध केला आहेस. परंतु त्यामुळें अनेक निरपराध प्राण्यांचा वध होणार आहे, याचा विचार कर.

हे राक्षसाधिपा, तूं बल व दर्प यांनीं मत्त होऊन पूर्वीं वनवासी ऋषींची हिंसा केलीस, देवांचाहि अवमान केलास, राजर्षींचा वध केलास आणि त्यांच्या रोदन करणाऱ्या स्त्रियांचीहि हत्या केली आहेस. त्या सर्व अन्यायांचें फल भोगण्याचा काल आतां प्राप्त झाला आहे. मी तुझा अमात्यांसह वध करणार आहें. यास्तव वीरासारखा समरांगणांत उभा राहून माझ्याशीं युद्ध कर. हे निशाचरा, तूं मज मानुषाच्याहि धनुष्याचें सामर्थ्य किती आहे, याचा विचार कर आणि सामोपचारानें जनकात्मजेला सोडून दे. तूं जर माझ्या सीतेला सोडलें नाहींस, तर मी तीक्ष्ण शरांच्या योगानें ही समग्र पृथ्वी राक्षसशून्य करून टाकीन.

(२) युधिष्ठिरा, असें बोलणाऱ्या त्या दूताचें कठोर वचन त्या राक्षसास सहन झालें नाहीं. तो रावण क्रोधानें संतप्त झाला. तेव्हां प्रभूच्या मनांतील आशय जाणणारे चौघे राक्षस अंगदावर धांवून आले व चार पक्ष्यांनीं सिंहावर जशी झडप घालावी, त्याप्रमाणें त्या चार निशाचरांनीं अंगदाचे दोन हात व दोन पाय असे चार अवयव धरिले.

याप्रमाणें ते राक्षस अंगाशीं येऊन भिडले असतां अंगदानें त्यांच्यासह अंतरिक्षांत एकदम उड्डाण केलें व तो वीर वालिपुत्र राजभवनाच्या शिखरावर जाऊन बसला. तो वानर वेगानें उड्डाण करीत असतां ते चारी रजनीचर भूमीवर आपटले व तीव्र आघातामुळें त्यांचीं हृदयें भग्न झालीं.

इकडे राजमंदिराच्या शिखरावर बसलेल्या अंगदानें पुनः उड्डाण केलें व लंकापुरीचें आक्रमण करून समुद्रतीरावर ससैन्य बसलेल्या कोसलाधिपाकडे प्रयाण केलें. त्या विजयी दूतानें राघवाला सर्व वृत्तान्त निवेदन केला व रामानें अभिनंदन केल्यावर त्यानें विश्रांति घेतली.

( ३ ) त्यानंतर रघुनंदनानें वायूसारख्या वेगवान् वानरांकडून एकाच वेळीं लंकेवर चढाई करविली व लंकेचा दृढ तट फोडविला. लक्ष्मणानें बिभीषण व ऋक्षाधिपति जांबवान् यांना पुढें करून दक्षिण द्वाराचा भेद केला. त द्वार अतिशय दृढ व दुरासद होतें. पण त्यानें त्याचे तुकडे करून टाकिले. तत्काल कोठ्यवधि वानर लंकेवर चाल करून गेले. तलहस्ताप्रमाणें आरक्तवर्ण असलेल्या युद्धशाली वानरांच्या शतसहस्र कोटी लंकेवर धांवून गेल्या.

त्यावेळीं तेथें धूम्रवर्णाचीं तीन कोटी अस्वलेंहि आलीं होतीं. त्यांचे बाहु व पाय वेळूसारखे लांब होते. कित्येक वानर उड्डाण करून खालीं पडत होते. त्यामुळें उडणाऱ्या धूळीनें सर्व प्रकाश नष्ट होऊन सूर्य दिसेनासा झाला. त्या वानरांचा वर्ण साळीचीं केसरें, शिरसाचीं फुलें, तरुण आदित्य किंवा सण या सारखा पिंगट होता. त्या नगरीच्या सभोंवार असलेला तट वानरांनीं व्यापल्यामुळें तोहि पिंगट दिसूं लागला. हा चमत्कार पाहून त्या नगरींतील आबालवृद्ध स्त्रीपुरुष राक्षस विस्मित झाले.

लंकेंत प्रवेश केल्यावर त्या वानरांनीं तेथील रत्नमय स्तंभ व रत्नजडित शिखरें भग्न करून टाकिलीं. त्यामुळें रावणानें दुर्गरक्षणार्थ जी युद्धसामग्री सज्ज करून ठेविली होती, तीच सर्व नगरीच्या नाशाला कारण झाली. कारण त्या तटावरील शतघ्नी, पाषाणचक्रें इत्यादि राक्षसांचींच आयुधें घेऊन त्या वानरश्रेष्ठांनीं त्यांचाच लंकेवर प्रयोग केला. त्यामुळें लंकेमध्यें प्रचंड ध्वनि उत्पन्न झाले. त्या प्राकारावर निशाचरांचे जे समूह होते, त्यांना वानरांनीं अतिशय पीडा दिली. त्यामुळें ते तेथून पळून गेले.

याप्रमाणें वानर चाल करून गेले असतां राक्षसाधिपाच्या आज्ञेनें लक्षावधि कामरूपी विकराल राक्षस नगरींतून बाहेर पडले. त्यांनीं अतिशय पराक्रम

करून त्या वनचर वानरांचा पराभव केला व पुनः परत येऊन लंकेचा तट सुशोभित केला. ते भीमदर्शन राक्षस उडदाच्या राशीप्रमाणें दिसत होते. त्यांनीं तो प्राकार पुनः वानरशून्य करून टाकिला. राक्षसांच्या शूलप्रहारांनीं विद्ध झालेले अनेक वानरश्रेष्ठ भूमीवर पडले. उलट वानरांनीं फेकलेले स्तंभ व तट यांच्या योगानें राक्षसहि भग्न होऊन पडले. ते राक्षस व वानर परस्परांचे केस ओढून नखांनीं एकमेकांस ओरबाडून व दांतांनीं चावून युद्ध करीत होते. ते राक्षस व वानर गर्जना करीत मृतप्राय होऊन भूमीवर जरी पडले तरीहि परस्परांस सोडीत नव्हते.

लोकधुरंधर राघवांनींहि वर्षाकालीं पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें लंकेवर शरांचा वर्षाव केला. तेव्हां त्या वेगवान् बाणांनीं लंकेंत प्रवेश करून तेथील निशाचरांचा संहार केला. दृढधन्वी व अश्रांत सौमित्रीनें नाराच बाण सोडून व हांका मारून लंकेच्या दुर्गावर असलेल्या राक्षसांना गतप्राण करून भूमीवर पाडिलें. याप्रमाणें लंकेला विध्वस्त करून जयानें उत्कर्ष पावलेलें तें सर्व वानरसैन्य रामाच्या आज्ञेनें आपल्या शिबिराकडे परत आलें. वानरांनीं जेवढ्या राक्षसांवर प्रहार केले, तेवढे सर्व विद्ध होऊन पराभूत झाले. त्यामुळें त्या प्रथम युद्धांत वानरसैन्य विजयी झालें. ३. १९. २८४.

---

## अध्याय २८५ वा.

[ १ व्यूहरचनापूर्वक राम-रावणादिकांचें युद्ध. ]

( १ ) मार्कंडेय—हे धर्मपुत्रा, याप्रमाणें तें वानरसैन्य परत फिरलें असतां पर्वण, पतन, जंभ, खर, क्रोधवश, हरि, प्ररुज, अरुज, व प्रघस इत्यादि अनेक पिशाच व क्षुद्र राक्षसगण त्यांच्यावर चाल करून आले. ते सर्व रावणाचे अनुचर अदृश्य रूपानें येत असतां बिभीषणानें त्यांना ओळखलें व त्या विद्येंत तज्ज्ञ असलेल्या त्या रावणानुजानें त्या दुरात्म्यांची अंतर्धानशक्ति नष्ट करून टाकिली. त्यामुळें ते दिसूं लागतांच दूरवर उड्डाण करणाऱ्या कपींद्रांनीं त्यांच्यावर वेगानें असह्य प्रहार केले. तेव्हां ते सर्व गतप्राण होऊन धरणीवर पडले.

हे राजन्, राक्षसांचा हा संहार महाबलाढ्य रावणाला सहन झाला नाहीं. तो वीर्यवान् राजा राक्षस व घोर पिशाचें यांनीं आवृत्त होऊन आपल्या सैन्यांसह लंकेंतून बाहेर पडला. तो राक्षसाधिप युद्धशास्त्रविधानांत जणुकाय दुसरा शुक्रच

होता. त्यानें औशनस व्यूह रचून वानरांना वेढा दिला. तेव्हां रावणाला व्यूह रचून येत असलेलें पाहून राघवानें बृहस्पतीच्या विधीप्रमाणें व्यूह रचना केली व निशाचरांना वेढून टाकिलें.

त्यानंतर राम आणि रावण यांची गांठ पडून परस्पर युद्ध सुरू झालें. त्यावेळीं लक्ष्मणानें इंद्रजिताशीं युद्ध केलें; सुग्रीव विरूपाक्षाशीं, निखर्वट ताराशीं, नल तुंडाशीं, व पडुश पनसाशीं युद्ध करूं लागला. त्या संग्रामांत ज्या वीराला जो योद्धा आपल्या तोडीचा आहे, असें वाटलें त्यानें स्वतःच्या बाहुबलाचा आश्रय करून त्याच्याशीं युद्ध केलें.

याप्रमाणें तो संग्राम वाढत चालला असतां भीरु लोक भयभीत झाले. पूर्वीं झालेल्या देवासुरांच्या युद्धाप्रमाणें तें घोर युद्ध अंगावर रोमांच आणीत होतें. त्यावेळीं रावणानें शक्ति, शूल व असि यांच्या वृष्टींनीं रामाला पीडित केलें आणि तीक्ष्ण शरांच्या वर्षावानें राघवानें रावणाला जर्जर केलें. त्याचप्रमाणें लक्ष्मणानें मर्मभेदक बाणांनीं इंद्रजिताला व इंद्रजितानें विपुल शरांनीं सौमित्रीला विद्ध केलें. बिभीषण व प्रहस्त यांनीं परस्परांवर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव निर्भयपणें केला. त्यांच्या बलवान् महास्त्रांचा जेव्हां एकमेकांशीं संयोग झाला, तेव्हां तर समग्र चराचर त्रिभुवन व्यथित झालें. ३. १९. २८५.

---

## अध्याय २८६ वा.

[ १ राक्षससैन्याचा पराभव. २ प्रहस्तादिकांच्या वधानें खिन्न झालेल्या रावणाची कुंभकर्णास युद्धाची प्रेरणा. ]

( १ ) मार्कंडेय—राजा युधिष्ठिरा, रणकर्कश प्रहस्तानें मोठ्यानें सिंहनाद करून बिभीषणावर एकदम चाल केली व त्याला गदेनें ताडन केलें. पण त्याच्या त्या प्रहारानें बिभीषण यत्किंचित्‌हि भ्याला नाहीं. तो हिमालयाप्रमाणें निश्चल राहिला. त्यानें शेकडों घंटांनीं युक्त असलेली एक शक्ति अभिमंत्रित केली व ती प्रहस्ताच्या मस्तकावर फेकली. तेव्हां वज्रतुल्य वेगानें पडणाऱ्या त्या शक्तीनें त्याच्या मस्तकाचा छेद केला असतां तो प्रहस्त वायूनें भग्न होऊन पडलेल्या वृक्षाप्रमाणें दिसला.

परंतु प्रहस्त-निशाचराचा बिभीषणाच्या हातून वध झालेला पहातांच धूम्राक्ष मोठ्या वेगानें वानरांवर धांवून आला. त्या राक्षसाचें मेघोपम भयंकर सैन्य

पाहून वानरश्रेष्ठ एकदम आपला संघ मोडून इतस्ततः पसरले. वानरसैन्यांनीं माघार घेतलेली पाहून कपिश्रेष्ठ हनुमान् तेथें आला. तो मारुतात्मज स्वतः समरभूमीवर आला आहे, असें पहातांच वानरहि सर्व बाजूंनीं परत येऊं लागले. त्यावेळीं तें राम-रावणांचें सैन्य परस्परांवर धांवून जात असतां अंगावर रोमांच आणणारा प्रचंड शब्द झाला.

याप्रमाणें घोर संग्राम प्रवृत्त झाला असतां तेथें रक्ताचा चिखल झाला. धूम्राक्षानें शरवर्षावानें कपिसैन्याला पळवून लाविलें व तो राक्षसश्रेष्ठ हनुमानावरहि धांवून गेला. तेव्हां शत्रूंना जिंकणारा वायुसुत त्याच्याशीं युद्ध करण्यास मोठ्या वेगानें पुढें सरसावला. त्यावेळीं इंद्र व प्रल्हाद यांप्रमाणें त्या राक्षस-वानरवीरांचें घोर युद्ध झालें. ते दोघेहि परस्परांस जिंकण्याची इच्छा करीत होते. राक्षस गदा व परिघ यांनीं हनुमानावर प्रहार करीत होता आणि हनुमान् स्कंध व महान् शाखा यांनीं युक्त असलेल्या वृक्षाघातांनीं राक्षसाला विद्ध करीत होता. शेवटीं क्रुद्ध झालेल्या हनूमानानें रथ, अश्व व सारथि यांसह धूम्राक्षाचा वध केला.

राक्षसश्रेष्ठ धूम्राक्ष पडलेला पहातांच वानरांना मोठा धीर आला व त्यांनीं सर्व राक्षससैन्याचा संहार चालविला. त्यावेळीं जयाची आकांक्षा करणाऱ्या बलाढ्य वानरांच्या हातून राक्षससैन्याचा वध होऊं लागल्यामुळें ते निशाचर भयभीत झाले व निराशेनें लंकेंत पळून गेले. वानरांच्या हातून वध पावून अवशिष्ट राहिलेल्या पराभूत राक्षसांनीं लंकेंत परत जाऊन रावणाला घडलेला सर्व वृत्तान्त निवेदन केला.

त्यावेळीं प्रहस्ताचा युद्धांत वध झाला व वानर सैन्यानें महाधनुर्धर धूम्राक्षालाहि सैन्यासह यमलोकीं पाठविलें, हा वृत्तान्त भयभीत झालेल्या स्वसैनिकांच्या मुखानें ऐकून रावणानें एक दीर्घ निःश्वास सोडिला व आपल्या श्रेष्ठ आसनावरून उठून म्हटलें—"आतां कुंभकर्णाच्या कार्याचा समय प्राप्त झाला आहे." तेव्हां रावणाच्या अनुचरांनीं प्रचंड निनाद करणारीं विविध वाद्यें वाजवून फार मोठा घोष केला व त्या शयन करणाऱ्या अत्यंत निद्राळु कुंभकर्णाला जागृत करविलें.

(२) त्यावेळीं मोठ्या प्रयत्नानें जागृत झालेला तो कुंभकर्ण अव्यग्र चित्तानें स्वस्थ बसला असतां राक्षसाधिप रावण त्याला म्हणाला—"अशा

प्रकारची निद्रा असणारा तूं धन्य आहेस. राक्षसकुलावर केवढें दारुण महाभय ओढवलें आहे, याची तुला वार्ताहि नाहीं. या विस्तीर्ण सागराचें उल्लंघन करून राघव वानरसेनेसह आला आहे.

त्यांनीं सेतु बांधून समुद्राचें आक्रमण केलें आहे. तो मानवेंद्र आम्हां सर्वांचा अवमान करून दारुण संग्राम करीत आहे. मीं त्या रामाची ' **सीता** '-नामक भार्या हरण करून आणिली आहे. तिला नेण्यासाठीं तो महासागर ओलांडून येथें आला आहे. त्यानें प्रहस्तादि आपले महान् स्वजन परलोकीं पाठविले. आतां हे शत्रुकर्शना, तुझ्यावांचून त्याचा वध करणारा अन्य कोणीहि वीर नाहीं. यास्तव हे बलवानांतील श्रेष्ठा, तूं कवच घालून सज्ज हो आणि रामादि सर्व शत्रूंचा समरांत नाश कर. दूषण-राक्षसाचे कनिष्ठ भ्राते वज्रवेग व प्रमाथी हे दोघे वीर विपुल सैन्यासह तुझ्या मागोमाग येतील. "

याप्रमाणें वेगसंपन्न कुंभकर्णाला सांगून राक्षसाधिप रावणानें वज्रवेग व प्रमाथी या दोघांस पुढील कार्याचें दिग्दर्शन केलें. तेव्हां ते उभयतां राक्षस-वीर रावणाला ' ठीक आहे ' असें बोलले व कुंभकर्णाला पुढें करून मोठ्या त्वरेनें लंकेंतून बाहेर पडले. ३.१९.२८६.

---

## अध्याय २८७ वा.

[ १ कुंभकर्णाचें वानरसैन्याशीं युद्ध. २ लक्ष्मणानें केलेला त्याचा वध. ३ इतर राक्षसवीरांचा नाश व रावणसेनेचा पराभव. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, याप्रमाणें आपल्या अनुयायांसह कुंभकर्ण नगरींतून बाहेर पडला असतां विजयश्रीनें शोभणारें कपिसैन्य त्याच्या दृष्टीं पडलें. त्यानें सर्व वानरश्रेष्ठ अग्रभागींच स्थित असलेले पाहिले. तेव्हां रामाला पहाण्याच्या इच्छेनें कुंभकर्ण त्या सेनेकडे पहात असतां धनुष्य घेऊन सज्ज असलेला सौमित्री त्याला दिसला.

इतक्यांत कुंभकर्णाला येत असलेलें पाहून त्या वानरांनीं त्याला सर्व बाजूंनीं वेढा दिला व त्याच्या अंगावर मोठमोठ्या वृक्षांचे प्रहार केले. कांहीं वानरश्रेष्ठांनीं निर्भयपणानें त्याला नखांनीं ओरबाडलें. याप्रमाणें त्यांनीं अनेक प्रकारच्या युद्ध-मार्गांचें अवलंबन करून विविध आयुधांनीं त्या राक्षसाला ताडन केलें. परंतु तो बलाढ्य राक्षस हंसतच त्या ताडन करणाऱ्या वानरांना तोंडांत टाकूं लागला.

त्यानें बल, चंडबल व वज्रबाहु या वानरांना भक्षण केलें. तेव्हां कुंभकर्णाचें तें नृशंस कर्म पाहून तारादि वानर उच्च स्वरानें आक्रोश करूं लागले.

वानरसैन्याचा तो आक्रोश ऐकून सुग्रीव कुंभकर्णावर धांवून गेला व त्याच्याशीं युद्ध करूं लागला. उदारबुद्धि सुग्रीवानें विशाल शालवृक्ष घेऊन मोठ्या वेगानें त्या राक्षसाच्या मस्तकावर त्याचा प्रहार केला. पण त्यामुळें त्या शाल वृक्षाचेच तुकडे झाले. तो कपिश्रेष्ठ त्या बलाढ्य राक्षसाला यत्किंचित्हि व्यथित करूं शकला नाहीं. उलट शालवृक्षाच्या स्पर्शानें देहभानावर आलेल्या त्या राक्षसानें सिंहनाद करून एकदम दोन्ही हातांनीं सुग्रीवाला बलात्कारानें उचलून घेतलें.

( २ ) पण तो राक्षस सुग्रीवाचें हरण करून, त्याला घेऊन जात आहे असें पहातांच सुमित्रेचा पुत्र वीर लक्ष्मण मोठ्या वेगानें त्यावर धांवून गेला. त्या परवीरघ्न दाशरथीनें सोनेरी पृष्ठाचा एक महावेगवान् श्रेष्ठ शर सोडून कुंभकर्णाला विद्ध केलें. तेव्हां तो बाण त्या राक्षसाचें कवच व देह यांचें विदारण करून रक्तानें लिप्त होऊन भूमींत शिरला.

तेव्हां हृदय विद्ध झालेल्या त्या राक्षसानें सुग्रीवाला सोडून दिलें व शिलांनीं युद्ध करणारा तो कुंभकर्ण हातांत प्रचंड शिला घेऊन सौमित्रीवर धांवून गेला. तेव्हां लक्ष्मणानें दोन तीक्ष्ण शरांनीं त्याचे ते वर उचललेले दोन्ही हात तोडून टाकिले. परंतु दोन हात तोडतांच तो राक्षस चतुर्भुज झाला व त्या चारी हातांत शिला घेऊन लक्ष्मणावर धांवला. तें पाहून त्या सुमित्रानंदनानें तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या चारी बाहूंचा छेद करून आपलें हस्तलाघव प्रकट केलें.

त्यानंतर कुंभकर्णानें आपलें प्रचंड शरीर अनेक हस्त, पाद व मस्तकें यांनीं युक्त केलें. तेव्हां सौमित्रीनें त्या पर्वतराशितुल्य प्रचंड राक्षसावर ब्रह्मास्त्र सोडिलें. त्या दिव्य अस्त्रानें विद्ध झालेला तो महावीर्यवान् राक्षस त्या रणांगणांत मृत होऊन पडला. त्यावेळीं तो राक्षस महा अशनीनें दग्ध झालेल्या पल्लवयुक्त वृक्षाप्रमाणें दिसला.

त्या वृत्रासुरासारख्या प्रचंड कुंभकर्णाला गतप्राण होऊन भूमीवर पडलेलें पहातांच इतर सर्व राक्षस भीतीनें पळून जाऊं लागले. तेव्हां आपलें सैन्य पलायन करीत आहे, हें पाहून दूषणाच्या दोघां कनिष्ठ भ्रात्यांनीं त्याला परत फिरविलें व त्या दोघां योद्ध्यांनीं मोठ्या क्रोधानें लक्ष्मणावर ससैन्य चाल केली.

( ३ ) वज्रवेग व प्रमाथी या नांवांचे ते दोघे दूषणभ्राते क्रुद्ध होऊन आलेले पहातांच लक्ष्मणानें सिंहनाद करून शरांनीं त्यांचा स्वीकार केला. धीमान् लक्ष्मण व ते दोघे राक्षस यांचें तुमुल युद्ध झालें. लक्ष्मणानें त्या दोघांवर शरांचा वर्षाव केला व त्या उभयतां क्रुद्ध वीरांनींहि लक्ष्मणावर असंख्य बाण सोडिले.

याप्रमाणें दोन घटिकापर्यंत त्या पराक्रमी राक्षस-मानवांनीं परस्परांवर दारुण प्रहार केले. नंतर वायुपुत्र हनुमानानें एक पर्वतशिखर आणून तें वज्रवेगावर फेंकलें, त्या प्रहारानें तो राक्षस तत्काल मरण पावला. नील वानरानें एक भयंकर शिला कनिष्ठ भ्रात्यावर फेंकली, त्यायोगें तोहि राक्षस प्राणास मुकला.

त्यानंतर परस्परांवर धांवून जाणाऱ्या त्या राम-रावणसेनेचा अतिशय कटु संग्राम पुनः प्रवृत्त झाला. त्यांत शेंकडों राक्षसांनीं वानरांना प्रहार केले व असंख्य वानरांनीं राक्षसांना ताडन केलें. परंतु त्या संग्रामांत पुष्कळ राक्षसांचाच वध झाला. वानर प्रायः मरण पावले नाहींत. ३.१९.२८७.

---

## अध्याय २८८ वा.

[ १ रावणानें इंद्रजिताला केलेली रामवधाची आज्ञा. २ इंद्रजिताचें समरांगणांत आगमन व तुमुल युद्ध. ३ अदृश्य राहून राम-लक्ष्मणादिकांना केलेले शरवेध. ]

( १ ) मार्कंडेय—त्यानंतर पराक्रमी प्रहस्त, तेजस्वी धूम्राक्ष व अनुचरांसह कुंभकर्ण या सर्वांचा युद्धांत वध झाल्याचें ऐकून रावण आपल्या वीर इंद्रजित्-पुत्राला म्हणाला—" हे माझ्या सत्पुत्रा, तूं पूर्वी युद्धांत वज्रधर शचीपतीला जिंकून उज्ज्वल कीर्ति संपादन केली आहेस. यास्तव आतां या लक्ष्मण-सुग्रीवांसह रामाचा वध कर. तुला वरप्रसादानें दिव्य शरांची प्राप्ति झालेली आहे. त्या शरांनीं तूं अदृश्य किंवा प्रकट होऊन शत्रूंचा नाश कर. राम-लक्ष्मण व सुग्रीव हे तुझ्या बाणांचा स्पर्श सहन करण्यास समर्थ नाहींत. मग त्यांचे अनुयायी कोठून समर्थ होणार !

हे महाबाहो, तूं आज ससैन्य शत्रूंचा तीक्ष्ण शरांनीं संहार करून कुंभकर्ण, प्रहस्त, खर इत्यादि राक्षसश्रेष्ठांना जें यश मिळवितां आलें नाहीं तें मिळीव. तूं पूर्वी जसें वासवाला जिंकलें होतेंस, तसेंच आज या मानवाला जिंकून मला आनंद दे. "

( २ ) हे राजन्, पित्याचें हें वचन ऐकून इंद्रजितानें 'ठीक आहे' असें म्हटलें. तो वीर कवच धारण करून तत्काल रथारूढ झाला व रणभूमीकडे निघाला. तेथें जाऊन त्या राक्षसश्रेष्ठानें उच्चस्वरानें स्वतःचें नांव ऐकवून शुभ-लक्षण लक्ष्मणाला युद्धाचें आह्वान केलें. तेव्हां सशर धनुष्य घेऊन लक्ष्मण त्यावर धांवून गेला. त्या रामानुजानें आपल्या तलघोषानें सिंह जसा क्षुद्र मृगांना भयभीत करितो, त्याप्रमाणें शत्रुसैन्याला त्रस्त केलें. ते दोघेहि राक्षस व मानव दिव्यास्त्रवेत्ते असून परस्परांशीं तीव्र स्पर्धा करीत होते. जयाची इच्छा करणाऱ्या त्या उभय वीरांचें तुमुल युद्ध झालें.

पण इंद्रजिताला जेव्हां आपल्या शरांनीं लक्ष्मणाचा पराभव करतां येईनासा झाला तेव्हां त्यानें अधिक यत्न आरंभिला. त्या रावणपुत्रानें महा वेगवान् तोमर लक्ष्मणावर फेंकले. परंतु लक्ष्मणानें तीक्ष्ण शरांनीं त्या सर्वांचा छेद केला. त्याच्या त्या तीक्ष्ण शरांनीं तोमरांचे तुकडे होऊन ते भूमीवर पडले. इतक्यांत श्रीमान् अंगद मोठा वृक्ष घेऊन धांवला व त्या वालिसुतानें इंद्रजिताच्या मस्तकावर अतिशय वेगानें प्रहार केला.

तथापि त्या प्रहारानें तो बलाढ्य राक्षस भ्रांत न होतां त्यानें अंगदाच्या हृदयावर प्रास फेंकला. परंतु तो येऊन भिडण्यापूर्वींच लक्ष्मणानें त्या प्रासाचेहि तुकडे करून टाकिले. तेव्हां इंद्रजितानें वीर अंगदाच्या समीप जाऊन त्याच्या उजव्या बाजूवर गदेचा प्रहार केला. पण त्या प्रहाराकडे लक्ष न देतां बलाढ्य अंगदानें क्रुद्ध होऊन एक प्रचंड सालवृक्षाचा स्कंध त्या राक्षसाच्या वधार्थ त्याच्यावर फेंकला. त्या तरूच्या आघातानें इंद्रजिताचा रथ, अश्व व सारथि यांचा नाश झाला.

तेव्हां अश्व व सारथि यांचा वध झालेला पाहून इंद्रजितानें रथांतून उडी टाकिली व तो राक्षसेंद्र गुप्त राहून युद्ध करण्यासाठीं मायेचा आश्रय करून अदृश्य झाला. त्या राक्षसाचें हें मायामय अंतर्हितत्व रामानें जाणलें व त्या प्रदेशीं येऊन आपल्या सैन्याचें संरक्षण केलें.

( ३ ) त्यावेळीं इंद्रजितानें मायेनें अदृश्य होऊन वरप्राप्त शरांचा राघवावर प्रयोग केला व महाबलाढ्य लक्ष्मणाचीं सर्व गात्रें विद्ध केलीं. तथापि त्या दोन्ही दशरथसुतांनीं राक्षस अदृश्य असतांहि त्याच्याशीं युद्ध केलें. रावणात्मजानें त्या दोघां पुरुषश्रेष्ठांवर असंख्य बाणांची वृष्टि करून त्यांचीं सर्व गात्रें विद्ध केलीं

तें पाहून अदृश्य राहून युद्ध करणाऱ्या त्या राक्षसाचा शोध करण्यासाठीं अनेक वानरांनीं प्रचंड शिला उचलून अंतरिक्षांत उड्डाण केलें. परंतु मायेनें अदृश्य झालेल्या इंद्रजितानें त्या सर्वांनाहि शरांनीं विद्ध केलें. तेव्हां त्या राक्षसाच्या बाणांनीं पीडित झालेले ते दोघे राघव भ्राते भूमीवर पडले. त्यावेळीं शरांनीं व्याप्त झालेले ते दोघे राघव वीर आकाशांतून पडणाऱ्या चंद्र-सूर्यांप्रमाणें भासले. ३. १९. २८८.

---

## अध्याय २८९ वा.

[ १ राम-लक्ष्मणांची बंधनिवृत्ति व विशलीकरण. २ कुबेरापासून दिव्यदृष्टि देणाऱ्या जलाची प्राप्ति. ३ इंद्राजिताचें रणांगणांत पुनरागमन. ४ लक्ष्मणानें केलेला त्याचा वध. ५ रावणाची सीतावधापासून निवृत्ति व युद्धाचा निश्चय. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, याप्रमाणें ते दोघे भ्राते राम-लक्ष्मण शरविद्ध होऊन पडलेले आहेत, असें पाहून इंद्रजितानें वरप्राप्त शरांनीं त्या दोघांना बद्ध केलें. त्यावेळीं ते शरविद्ध पुरुषव्याघ्र रणामध्यें पिंजऱ्यांतील दोन पक्ष्यांप्रमाणें शोभले. त्या दोघां रघुनंदनांना बाणांनीं व्याप्त होऊन भूमीवर पडलेलें पहातांच सुग्रीवादि सर्व वानरश्रेष्ठ त्यांच्या सभोंवार जमले आणि सुषेण, मैंद, द्विविद, कुमुद, अंगद, हनूमान्, नील, तार, नल इत्यादि कपिश्रेष्ठ चिंताक्रांत होऊन बसले. इतक्यांत ज्यानें पूर्वीं अशा प्रकारचें कर्म केलेलें आहे, असा बिभीषण त्या प्रदेशीं आला आणि प्रज्ञास्त्राचा प्रयोग करून त्यानें त्या दोघांहि वीरांना सावध केलें.

राम-लक्ष्मण देहभानावर येतांच सुग्रीवानें दिव्यमंत्रांनीं अभिमंत्रित केलेल्या विशल्य महौषधीनें त्यांच्या देहांत रुतलेले सर्व शर एका क्षणांत काढून टाकिले ते दोघे नेते राघव मूर्च्छा व शर या दोहोंनीं वियुक्त होतांच त्या नरश्रेष्ठांची ग्लानि व श्रम नाहींसे झाले व ते तेथून उठले.

( २ ) हे पार्था, त्यानंतर रघुनंदन क्लेशरहित झाला आहे असें पाहून बिभीषणानें हात जोडून त्याला म्हटलें—“ हे महाराज, राजराजेश्वर कुबेराच्या आज्ञेनें हा गुह्यक हें पवित्र जल घेऊन श्वेतपर्वतावरून तुझ्याकडे आला आहे. त्या देवानें अदृश्य भूतेंहि तुझ्या दृष्टीं पडावीं म्हणून हें जल पाठविलें आहे. तें नेत्रांना लाविलें असतां अंतर्हित असलेलेहि प्राणी तुला दिसतील आणि तूं ज्या कोणाला हें जल देशील, तोहि अदृश्य भूतें पहाण्यास समर्थ होईल. ”

त्यावर 'ठीक आहे' असें बोलून रामानें त्या संस्कारयुक्त पवित्र जलाचें ग्रहण केलें व तें आपल्या नेत्रांना लावून उदारधी लक्ष्मणालाहि दिलें. त्याच प्रमाणें सुग्रीव, जांबवान्, हनूमान्, अंगद, मैंद, द्विविद, नील व प्रायः बहुतेक सर्व कपिश्रेष्ठ यांसहि दिलें. त्या सर्वांनीं त्याचा नेत्रांना स्पर्श करितांच त्यांस बिभीषणाच्या सांगण्याचा तत्काल प्रत्यय आला. त्या सर्व वीरांना क्षणांत अतींद्रिय दृष्टि प्राप्त झाली.

( ३ ) इकडे इंद्रजितानेंहि लंकेंत परत जाऊन आपला सर्व पराक्रम पित्याला निवेदन केला व पुनः मोठ्या त्वरेनें समरांगणाकडे परत येऊन युद्धाला आरंभ केला. तेव्हां तो राक्षस क्रोधानें पुनः चाल करून येत आहे असें पहातांच बिभीषणाच्या मतांत स्थित असलेला लक्ष्मण युद्धाच्या इच्छेनें त्यावर धांवून गेला.

नुकत्याच मिळालेल्या विजयश्रीनें शोभणारा तो इंद्रजित् आह्निक केल्यावांचून युद्धाला आला होता. राम-लक्ष्मणादिकांच्या वधाची इच्छा करणाऱ्या राक्षसावर क्रुद्ध लक्ष्मणानें बिभीषणाशीं संकेत करून शरप्रहार केले. त्यावेळीं परस्परांस जिंकण्याची इच्छा करणाऱ्या त्या दोघां वीरांचें शक्र-प्रह्लादांच्या युद्धाप्रमाणें अतिशय आश्चर्यकारक युद्ध झालें.

इंद्रजितानें मर्मभेदक तीक्ष्ण शरांनीं सौमित्राला विद्ध केलें व त्या रामानुजानेंहि अग्नीसारख्या प्रज्वलित बाणांनीं रावणात्मजाला जर्जर केलें. तेव्हां लक्ष्मणाच्या प्रदीप्त शरांनीं क्रोधसंतप्त झालेल्या रावणपुत्रानें सौमित्रीवर सर्पासारखे आठ विषारी बाण सोडले. तेव्हां सौमित्रानें तीन अग्नितुल्य शर सोडून त्याचे प्राण कसे हरण केले, तें मी तुला सांगतों ऐक.

( ४ ) पराक्रमी लक्ष्मणानें इंद्रजिताचा धनुष्य धारण केलेला हात एका शरानें तोडून टाकिला. दुसऱ्या शरानें नाराच बाण धारण केलेल्या बाहूचा छेद केला. तिसऱ्या तीक्ष्ण धारेच्या तेजस्वी बाणानें त्याचें कुंडलांनीं शोभणारें सुंदर मस्तक देहापासून वेगळें केलें. तेव्हां भुजांसह स्कंधप्रदेश व मस्तक यांनीं रहित झालेलें तें रावणात्मजाचें कबंध भयंकर दिसूं लागलें.

याप्रमाणें लक्ष्मणानें इंद्रजिताचा वध करून अस्त्रप्रयोगानें त्याच्या सारथ्यालाहि यमलोकीं पाठविलें. तेव्हां त्या रथाचे क्षुब्ध अश्व सारथिविहीन झालेला तो रथ घेऊन लंकेंत निघून गेले. रावणानें आपला शूर पुत्र व सारथि

यांवांचून शून्य रथ परत आलेला पाहून आपल्या पुत्राचा वध झाला, असा निश्चय केला व त्याचें मन भयानें व्याकुल झालें.

( ५ ) तो राक्षसेंद्र शोक व मोह यांनीं आर्त झाला. तो देहभान विसरला. आतां काय करावें, हें त्यास सुचेनासें झालें. प्रियपुत्रासाठीं करुण विलाप करणाऱ्या त्या रावणानें आपल्या कुलाच्या नाशाला कारण होणाऱ्या वैदेहीचा नाश करण्याचा निश्चय केला. त्यावेळीं रामदर्शनाविषयीं उत्कंठित झालेली सीता अशोक वनांत रामाचें चिंतन करीत बसली होती. दुरात्मा रावण निर्दयपणें तिचा वध करण्याच्या उद्देशानें हातांत तीक्ष्ण खड्ग घेऊन तिच्याकडेच जावयास उद्युक्त झाला आहे, असें पाहून व त्याचा पापनिश्चय जाणून अविंध्य राक्षसानें त्याचें निवारण केलें. तोच वृत्तान्त मी तुला सांगतों.

युधिष्ठिरा, क्रुद्ध रावणाला मार्गांत गांठून अविंध्य म्हणाला—हे प्रभो, ऐश्वर्ययुक्त महाराज्यावर स्थित असलेल्या तुला स्त्रीचा वध करणें योग्य नाहीं. एक तर ही स्त्री आहे, शिवाय ती तुझ्या बंधनांत व तुझ्या अधीन आहे. तेव्हां नुसत्या देहभेदानें ती हत होणार नाहीं, असें मी समजतों. त्यापेक्षां तिच्या भर्त्याचा वध केलास तर ती सहजच हत होईल. साक्षात् इंद्रहि पराक्रमांत तुझी बरोबरी करूं शकत नाहीं. युद्धामध्यें देवांसह इंद्रालाहि तूं अनेकदा त्रस्त केलें आहेस.

याप्रमाणें अनेक प्रकारच्या वचनांनीं अविंध्यानें रावणाचा सीताविषयक क्रोध शांत केला. तेव्हां त्या राक्षसाधिपानें त्याचें सांगणें मान्य केलें व उगारलेलें खड्ग कमरेला बांधून समरांगणांत जाण्याचा निश्चय केला आणि 'माझा रथ सज्ज करा' अशी आज्ञा केली. ३. १९. २८९.

---

## अध्याय २९० वा.

[ १ राम-रावणांचें अद्भुत युद्ध. २ रावणाच्या मायेचें निवारण. ३ इंद्ररथासह मातलीचें आगमन. ४ रावणाचा वध. ]

(१) मार्कंडेय—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें प्रिय पुत्राचा वध झाला असतां क्रुद्ध झालेला दशग्रीव सुवर्णमय रत्नजडित रथांत बसून रणभूमीकडे निघाला. तो राक्षसाधिप विविध आयुधें धारण करणाऱ्या घोर राक्षसांनीं परिवेष्टित होऊन रामावर चालून गेला व वानरसैन्याशीं युद्ध करूं लागला. तेव्हां सैन्यासह

क्रुद्ध होऊन धांवून येणाऱ्या त्या रावणाचें मैंद, नील, नल, अंगद, हनूमान् व जांबवानादि इतर वीर यांनीं निवारण केलें. ते वानर व ऋक्ष प्रचंड वृक्षांचे प्रहार करीत रावणाच्या समक्ष त्याच्या सैन्याचा नाश करूं लागले.

( २ ) तेव्हां शत्रूंकडून आपल्या सैन्याचा संहार होत आहे, असें पाहून त्या मायावी राक्षसाधिप रावणानें सर्वत्र माया पसरविली. तिच्या योगानें त्या राक्षसेंद्राच्या देहांतून सहस्त्रावधि राक्षस बाहेर पडत असलेले दिसले. त्या सर्व निशाचरांनीं हातांत शर, शक्ति, ऋष्टि इत्यादि आयुधें धारण केलेलीं होतीं. परंतु त्या असंख्य राक्षसांचा रामानें दिव्य अस्त्रें सोडून वध केला.

तेव्हां रावणानें पुनः माया निर्माण केली. रामाचीं व लक्ष्मणाचीं अनेक रूपें धारण करून त्या दैत्यानें रामरूपानें लक्ष्मणावर व लक्ष्मणरूपानें रामावर चाल केली. तेव्हां ते राक्षस राम व लक्ष्मण यांस पीडा देऊं लागले. हातांत धनुष्य घेऊन ते रामावर वेगानें धांवले. पण राक्षसेंद्राची ही अद्भुत माया पाहूनहि इक्ष्वाकुनंदन लक्ष्मण यत्किंचित्‌हि भ्रांत न होतां उच्च स्वरानें रामाला म्हणाला—" हे प्रभो, तूं आपल्यासारखें स्वरूप धारण करणाऱ्या या पातकी राक्षसांचा वध कर. " तें ऐकून रामानें आपलें रूप धारण करणाऱ्या व इतरहि दुसऱ्या राक्षसांना तत्काल परलोकीं पाठविलें.

( ३ ) इतक्यांत हरिताश्व जोडलेला सूर्यासारखा देदीप्यमान रथ घेऊन इंद्रसारथि मातलि रणांमध्यें रामापाशीं येऊन उभा राहिला.

मातलि—हे पुरुषश्रेष्ठा, हा हरिताश्वानें युक्त असलेला इंद्राचा उत्तम रथ अतिशय विजयी आहे. याच यशस्वी रथावर आरूढ होऊन शक्रानें युद्धामध्यें शेंकडों दैत्य-दानवांचा संहार केला आहे. यास्तव हे काकुत्स्था, मी सारथ्य करीत असलेल्या या रथावर आरूढ होऊन तूं या दुरात्म्या रावणाचा वध कर. आतां व्यर्थ विलंब लावूं नको.

याप्रमाणें मातलीनें सत्य भाषण केलें असतांहि राघवाला ' ही राक्षसाचीं माया तर नसेल ! ' अशी शंका आली. तेव्हां बिभीषण त्याला म्हणाला—" हे नरव्याघ्रा, ही दुर्मति रावणाची माया नाहीं. तूं या इंद्राच्या उत्कृष्ट रथावर शीघ्र आरूढ हो. "

तें ऐकून हृष्ट झालेल्या राघवानें बिभीषणाच्या संमतीनें मातलीला ' ठीक आहे ' असें म्हटलें व रथारूढ होऊन क्रोधानें दशग्रीवावर चाल केली. तेव्हां

सर्व भूतें हाहाकार करूं लागलीं. सिंहनाद व दिव्य दुंदुभि यांच्या ध्वनीनें स्वर्गलोक निनादित झाला. त्यावेळीं त्या राम-रावणांचें जें तुमुल युद्ध झालें त्याला अन्य उपमाच नाहीं. तें राम-रावणांचें युद्ध राम-रावणांच्या युद्धासारखेंच झालें. त्या निशाचरानें ब्रह्मदंडाप्रमाणें दिसणारा आपला महाघोर शूल उगारून तो रामावर सोडला. परंतु रामानें तीक्ष्ण बाणांनीं इंद्राच्या वज्राप्रमाणें असलेल्या त्या शूलाचे तत्काल तुकडे केले. तेव्हां रामाचें तें दुष्कर कर्म पाहून रावण भयभीत झाला व रामावर सहस्रावधि तीक्ष्ण शर सोडूं लागला. नंतर त्या दशाननानें भुशुंडी, शूल, मुसलें, शक्ति इत्यादि विविध शस्त्रांचा वर्षाव चालविला. रावणाची ती भीषण माया पाहून सर्व वानर भीतीनें दशदिशांत पळूं लागले.

( ४ ) पण आपलें वानर सैन्य भयानें व्यग्र झालें आहे, असें पाहून रामानें सुवर्णपुंखयुक्त तीक्ष्ण धारेचा एक उत्तम शर भात्यांतून काढला व तो ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रित केला. तें पाहून इंद्रादि सर्व देव व गंधर्व संतुष्ट झाले. रामानें आपल्या शत्रूवर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला आहे, हें पहातांच देव, दानव व किन्नर यांनीं त्या राक्षसाचें आयुष्य आतां संपत आलें आहे, असें जाणलें.

धर्मराजा, तो शर उगारलेल्या ब्रह्मदंडाप्रमाणें अप्रतिम सामर्थ्यवान् व रावणाचा अंत करणारा होता. तो घोर बाण रामानें आकर्ण ओढलेल्या धनुष्यापासून सुटतांच महाज्वाला उत्पन्न झाल्या, त्या अमोघ बाणानें रथ, अश्व व सारथि यांसह तो राक्षसाधिप प्रज्वलित झाला. त्या प्रदीप्त अग्नीनें त्याला सर्वतः व्यापिलें.

अशा प्रकारें सहज कर्में करणाऱ्या रामानें रावणाचा वध केलेला पाहून गंधर्वचारणांसह सर्व देव संतुष्ट झाले. रावण मृत झाला व ब्रह्मास्त्राच्या तेजानें त्याचा सर्व लोकांपासून भ्रंश झाला.

राजा, त्या राक्षसेंद्राच्या देहांतील रक्त, मांस इत्यादि सर्व धातु ब्रह्मास्त्रानें दग्ध केल्यामुळें त्याचें भस्महि कोणाच्या दृष्टीं पडलें नाहीं. इ. १९. २९०.

---

## अध्याय २९१ वा.

[ १ देवांनीं केलेला रामाचा सत्कार. २ बिभीषणाला लंकाराज्यदान. अविंध्य-अमात्याचें सीतेसह रामापाशीं आगमन. रामानें केलेला तिचा त्याग. ३ सीताशुद्धि व देवतांचे वर. ४ रामाचे किष्किंधेंत गमन व अंगदाला यौवराज्याभिषेक. ५ अयोध्येस प्रयाण, भरतभेट व राज्यप्राप्ति. ]

**( १ ) मार्कंडेय—धर्मराजा, याप्रमाणें देवांचा द्वेष करणाऱ्या त्या क्षुद्र बुद्धि रावणाचा वध करून लक्ष्मण व सुग्रीवादि सुहृद् यांसह राम परम संतुष्ट झाला. रावण हत झालेला पाहून ऋषिश्रेष्ठांसह देवांनीं महाबाहु राघवाचा जययुक्त आशीर्वचनांनीं बहुमान केला. सर्व देवतांनीं कमलपत्राक्ष रामाची स्तुति केली. स्वर्गलोकस्थ गंधर्वांनीं पुष्पवृष्टि व स्तवन करून रामाचा सत्कार केला. नंतर ते आल्या मार्गानें परत जात असतां आकाश महोत्सवानें युक्त झाल्याप्रमाणें दिसूं लागलें. त्यानंतर परंतप प्रभु रामचंद्रानें लंकेचें राज्य बिभीषणाला अर्पण केलें.**

**( २ ) हे युधिष्ठिरा, लंकाधिपति बिभीषणानें जिचा सत्कार केला आहे अशा सीतेला बरोबर घेऊन अविंध्य नामक वृद्ध अमात्य लंकेंतून निघाला व रामापाशीं येऊन दीनपणें म्हणाला—" हे महात्मन्, या सदाचरणी देवी सीतेचा स्वीकार कर."**

**अविंध्यराक्षसाचे हे शब्द ऐकतांच राम रथांतून खालीं उतरला व त्या विजयी इक्ष्वाकुनंदनानें सीतेकडे अवलोकन केलें. तेव्हां जानकीचें मुखकमल अश्रूंनीं म्लान झालें होतें. ती शोकानें अत्यंत कृश झाली होती. तिचें सर्वांग मलीन झालें असून केसांच्या जटा वळल्या होत्या. तिचें वस्त्र कृष्णवर्ण झालें होतें. रथांत बसलेल्या त्या सर्वांगसुंदर जनकात्मजेची अशी दीन अवस्था झाली होती.**

**पण वैदेहीला पाहून तिला रावणाचा स्पर्श झाला असावा अशा शंकेनें रघुनंदन म्हणाला—" हे वैदेहि, जा. तूं आतां मुक्त झाली आहेस. मीं माझें कर्तव्य केलें. हे भद्रे, माझ्यासारख्या पतीला प्राप्त होऊन तुला वृद्धावस्थेपर्यंत राक्षसाच्या गृहीं रहावें लागूं नये म्हणून मीं त्या निशाचराचा वध केला.**

**धर्मशास्त्राचा निर्णय जाणणारा मजसारखा पुरुष परक्याच्या हातीं गेलेल्या स्त्रीचा क्षणभर तरी स्वीकार कसा करील ! हे मैथिलि, आज तूं सदाचरणी**

किंवा दुराचरणी, कशीही असलीस तरी श्वानानें चाटलेल्या हविर्द्रव्याप्रमाणें तूं मला त्याज्य आहेस. तुझा स्वीकार करणें मला योग्य वाटत नाहीं."

(३) हे कुंतीपुत्रा, रामाचे हे दारुण शब्द कानीं पडतांच ती देवी अत्यंत व्यथित झाली व तोडलेल्या कर्दलीप्रमाणें एकदम खालीं पडली. रामदर्शनाच्या हर्षानें तिच्या मुखावर जी प्रसन्नता दिसूं लागली होती, ती एका क्षणांत नष्ट झाली. निश्वासानें मलिन होणाऱ्या आरशाप्रमाणें त्या सुकुमारीचें प्रफुल्ल मुखकमल तत्काल म्लान झालें. रामाचें तें भयंकर भाषण ऐकून लक्ष्मणासह सर्व वानर मृतवत् निश्चेष्ट होऊन बसले.

त्यावेळीं विशुद्धात्मा चतुर्मुख ब्रह्मदेव विमानांतून अंतरिक्षांत आला व त्या पद्मयोनि जगत्स्रष्ट्या पितामहाचें राघवाला दर्शन झालें. त्याचप्रमाणें शक्र, अग्नि, वायु, यम, वरुण, कुबेर, पवित्र सप्तर्षि आणि तेजस्वी दिव्य देह धारण करणारा दशरथ राजा हे सर्व देदीप्यमान विमानांतून तेथें प्राप्त झाले. ब्रह्मदेवाचें अमूल्य विमान हंसयुक्त होतें. त्यावेळीं देव-गंधर्वांनीं व्याप्त झालेलें अंतरिक्ष तारकांनीं शोभणाऱ्या शरत्कालीन नभस्तलाप्रमाणें भासलें.

इतक्यांत यशस्विनी वैदेही उठून उभी राहिली व ज्याचें वक्षःस्थल विशाल आहे, अशा रामाला म्हणाली—"हे राजपुत्रा, मी तुला दोष देत नाहीं. कारण स्त्रियांची व पुरुषांची गति तुला विदित आहे. यास्तव तूं माझें हें वचन ऐक.

मीं जर पाप आचरिलें असेल तर सर्व भूतांच्या अंतर्भागीं संचार करणारा हा सदागति वायु माझे प्राण देहापासून वियुक्त करो. मीं जर पापाचरण केलें असेल तर, अग्नि, आप, आकाश, पृथ्वी व वायु माझे प्राण हरण करोत. हे वीरा, ज्याअर्थीं मी तुझ्यावांचून अन्य पुरुषाचें स्वप्नांतहि चिंतन केलें नाहीं, त्याअर्थीं देवांनीं निर्दिष्ट केलेला तूंच माझा पति हो."

युधिष्ठिरा, सीता असें बोलत आहे, तोंच अंतरिक्षांतून सर्व लोकांना साक्षिभूत अशी शुभ आकाशवाणी झाली. ती पुण्यप्रद वाणी श्रवण करून महात्म्या वानरांना परम हर्ष झाला.

वायु—हे राघवा, मी सदागति वायु आहें. मैथिलीचें हें वचन सत्य आहे. हे राजन्, ही राजकन्या निष्पाप आहे. तूं या आपल्या भार्येचा स्वीकार कर.

**अग्नि**—हे रघुनंदना, मी सर्व भूतांच्या शरीरांत स्थित असतों. मैथिलीनें तुझा लेशमात्रहि अपराध केलेला नाहीं.

**वरुण**—हे काकुत्स्था, सर्व भूतांच्या देहांत माझ्यापासूनच रस उत्पन्न होतात. तूं वैदेहीचा स्वीकार कर, असें मी तुला सांगतों.

**ब्रह्मदेव**—हे पुत्रा, क्षत्रियधर्मांत स्थित असलेल्या तुझें वर्तन अशाप्रकारचें असावें, यांत आश्चर्य नाहीं. तूं सदाचरणी आहेस. यास्तव हें माझें वचन ऐक—" हे वीरा, तूं आज ज्या राक्षसाचा वध केलास तो देव, गंधर्व, सर्प, यक्ष, दानव आणि महर्षि यांचा शत्रु होता. तो पूर्वी माझ्या प्रसादानें सर्व भूतांना अवध्य झाला होता. त्याची कांहीं कारणामुळें मीं कांहीं काल उपेक्षा केली. त्या दुरात्म्यानें स्वतःच्या वधासाठींच सीतेचें हरण केलें. नलकूबराच्या शापमिषानें मीं या वैदेहीचें रक्षण केलें आहे. ' हा दुरात्मा रावण परस्त्रीला तिच्या अनुमतीवांचून जर स्पर्श करील तर याच्या मस्तकाचे शतधा तुकडे होतील ' असा पूर्वी नलकूबरानें त्या राक्षसाला शाप दिला होता. यास्तव हे महाप्रभावशालि राघवा, तूं या पतिव्रतेविषयीं यत्किंचित्‌हि शंका घेऊं नको. हिचा अंगीकार कर. तूं देवांचें महत्कार्य केलें आहेस.

**दशरथ**—हे वत्सा, मी तुजवर प्रसन्न झालों आहें. तुझें कल्याण असो. मी तुझा पिता दशरथ आहें. हे पुरुषोत्तमा, तुला राज्यशासन करण्याची मी अनुज्ञा देतों.

**राम**—हे राजेंद्रा, तूं माझा पिता आहेस, यास्तव मी तुला अभिवादन करितों. आतां तुझ्या आज्ञेनें मी रम्य अयोध्या नगरीस जातों.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, त्यावेळीं संतुष्ट झालेल्या त्याच्या पित्यानें त्या राजीवनयन रामाला पुनः म्हटलें—" हे पुत्रा, तुझीं चौदा वर्षे पूर्ण झालीं आहेत, आतां तूं अयोध्येंत जाऊन राज्य कर. "

पित्याचें हें वचन ऐकून हृष्ट झालेल्या रामानें देवांना वंदन केलें. सुहृज्जनांनीं राघवाचें अभिनंदन केलें. त्यावेळीं तो राघव भार्येसह शचीनें युक्त असलेल्या इंद्राप्रमाणें शोभला. नंतर त्या परंतप रामानें अविंध्य राक्षसाला वर दिला व त्रिजटा राक्षसीचा धनादिकांनीं सत्कार केला.

त्यानंतर शक्रादि देवांसह ब्रह्मदेवानें ' हे कौसल्यानंदना, आम्हीं तुला कोणते इष्ट वर द्यावे, तें सांग, ' असें म्हटलें असतां रामानें पुढील वर मागून घेतले—

" माझी मति सर्वदा धर्मात स्थित असावी. शत्रूकडून माझा पराजय होऊं नये आणि राक्षसांनीं मारलेले हे सर्व वानर सजीव व्हावे. "

त्यावर ब्रह्मदेवानें 'तथास्तु' असें म्हणतांच ते सर्व वानर देहभानावर आल्याप्रमाणें उठून बसले. नंतर महाभागा सीतेनेंहि हनूमानाला असा वर दिला—" हे पुत्रा, जोंवर पृथ्वीवर रामाची कीर्ति राहील तोंवर तूं जिवंत रहाशील आणि माझ्या प्रसादानें तुला दिव्य भोगांची प्राप्ति होईल. "

इतक्यांत सहज कर्में करणारे ते वानर पहात असतांनाच इंद्रादि देव अंतर्धान पावले. रामाला जानकीची पुनः प्राप्ति झाली आहे, असें पाहून इंद्राचा सारथि मातलि सर्व सुहृज्जनांसमक्ष रामाला परम प्रीतीनें असें वचन बोलला—" हे सत्य पराक्रमी राघवा, तूं देव, गंधर्व, यक्ष, मानव, असुर व नाग इत्यादिकांचें दुःख दूर केलें आहेस. यास्तव हे सर्व देवासुरादि जीव ही पृथ्वी असेपर्यंत लोकांमध्यें तुझें यश गातील."

युधिष्ठिरा, त्यानंतर त्या देव सारथ्यानें रामाची अनुज्ञा घेतली व धनुर्धर-श्रेष्ठ राघवाचा सत्कार करून त्या आदित्यतुल्य तेजस्वी रथांतून ऊर्ध्वलोकीं प्रयाण केलें.

( ४ ) नंतर राम सीतेला पुढें करून सौमित्रीसह निघाला. त्यानें सुग्रीवादि सर्व वानरश्रेष्ठांना आपल्याबरोबर घेतलें व लंकेच्या संरक्षणाची योजना करून बिभीषणासह पुनः त्याच सेतूवरून समुद्राचें उल्लंघन केलें. त्या धर्मात्म्यानें आकाशचर व कामगामी पुष्पक विमानांतून आपल्या मुख्य मुख्य अमात्यांसह समुद्राच्या उत्तर तीरीं आल्यावर पूर्वी समुद्राची प्रार्थना करण्यासाठीं जेथें शयन केलें होतें तेथेंच सर्व वानरांसह वास्तव्य केलें. नंतर योग्य समय पाहून त्या उदारधी रामचंद्रानें सर्व वानरांना एकत्र जमवून त्यांचा सत्कार केला. त्यांना रत्नें देऊन सर्वप्रकारें संतुष्ट केलें व परत जाण्याची अनुज्ञा दिली. याप्रमाणें सर्व वानरादि निघून गेले असतां बिभीषण व सुग्रीव यांसह रामानें पुष्पक विमानांतून सीतेला सर्व वन दाखवीत पुनः किष्किंधानगरींत प्रवेश केला.

सुग्रीवाच्या त्या भव्य राजधानींत आल्यानंतर रामानें युद्धांत ज्यानें महत्कार्य केलें आहे अशा अंगदाला यौवराज्यावर अभिषेक करविला व त्या सर्व वीरांना बरोबर घेऊन लक्ष्मणासह आल्या मार्गानेंच पुनः स्वनगरीकडे प्रयाण केलें.

( ५ ) अयोध्येच्या समीप आल्यावर राष्ट्रपति रामानें भरताकडे हनुमान् दूत पाठविला. तेव्हां भरताचा आशय जाणून व त्याला घडलेला सर्व प्रिय वृत्तान्त निवेदन करून तो वायुपुत्र परत आला. हनूमान् आल्यानंतर सौमित्रीसह राघव नंदिग्रामास गेला. तेथें ज्याचें अंग मलीन झालें आहे, असा भरत वल्कलें परिधान करून बसला आहे, असें त्यास दिसलें. धर्मात्मा भरत पुढें पादुका ठेऊन आसनावर बसला होता व शत्रुघ्न त्याची सेवा करीत त्याच्या समीप रहात होता.

त्यावेळीं राम-लक्ष्मण व भरत-शत्रुघ्न या चारी भ्रात्यांना परस्परांच्या भेटीनें परम आनंद झाला. वैदेहीला पाहून भरत-शत्रुघ्न संतुष्ट झाले. नंतर भरतानें वनवास संपवून परत आलेल्या रामाला त्याची राज्यरूपी ठेव मोठ्या आनंदानें सत्कारपूर्वक परत दिली.

पूज्य वसिष्ठ व वामदेव यांनीं शास्त्रविहित शुभ दिवस पाहून श्रवण नक्षत्रावर रामाला यथाविधि राज्याभिषेक केला. त्यानंतर रामानें सुग्रीव, त्याचे सर्व सुहृज्जन व बिभीषण यांस स्वगृहीं जाण्याची अनुज्ञा दिली. विविध भोग्यवस्तु अर्पण करून त्यांचा मोठ्या प्रेमानें सत्कार केला व परम दुःखानें त्यांना निरोप दिला. पुष्पक विमानाचें पूजन करून तें कुबेराकडे पाठवून दिलें. पुढें राघवानें देवर्षींसहित गोमतीच्या तीरावर दहा अश्वमेध यज्ञ केले. अन्नादिकांची याचना करणारांस मुक्तद्वार असलेले ते क्रतु त्रिगुण दक्षिणांनीं युक्त होते. ३. १९. २९१.

---

## अध्याय २९२ वा.

[ १ मार्कंडेयानें केलेलें युधिष्ठिराचें सान्त्वन. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, याप्रमाणें अमित तेजस्वी रामचंद्रालाहि पूर्वी वनवासाचें तीव्र संकट भोगावें लागलें होतें. यास्तव हे परंतपा, तूं शोक करूं नको. हे नरश्रेष्ठा, तूं क्षत्रिय आहेस. आपल्या बाहुवीर्याचा आश्रय करून रहात आहेस. ज्याचें फल प्रत्यक्ष आहे, अशा सन्मार्गांत स्थित आहेस. तुझ्या ठिकाणीं पातकाचा लेशहि नाहीं. सुरासुरांसह इंद्रहि अशा मार्गाचें अवलंबन करीत नाहीं. वज्रधर शचीपतीनें मरुतांचें साह्य घेऊन वृत्र, नमुचि, दुर्धर्ष व दीर्घजिह्वा राक्षसी यांचा वध केला. सहायवान् पुरुषाच्या ठिकाणीं सर्व इष्टार्थ सर्वप्रकारें प्रतिष्ठित असतात.

हे धर्मराजा, ज्याचा भ्राता धनंजय आहे अशा तुला युद्धांत अजिंक्य असें काय आहे ? हा भयंकर पराक्रमी भीम व हे महा धनुर्धर वीर माद्रीसुत तुझे साह्यकर्ते असतांना तूं असा खिन्न कां होतोस ? तुझे हे बलवानांतील श्रेष्ठ भ्राते मरुद्गणांसह इंद्रसेनेलाहि जिंकण्यास समर्थ आहेत. या देवतुल्य धनुर्धरांच्या साह्यानें तूंहि रणामध्यें सर्व शत्रूंना पराभूत करशील.

हे भरतश्रेष्ठा, तुला या गोष्टीचा प्रत्यय आतांच आला आहे. स्ववीर्यानें मत्त झालेल्या त्या दुरात्म्या सिंधुराज जयद्रथानें द्रौपदीला हरण केलें असतां या महात्म्यांनीं तिला परत आणिलें. या वीरांनीं दुष्कर कर्म करून जयद्रथ-राजाला जिंकलें व त्याला तुझ्या वश व्हावयास लाविलें.

हे पांडुपुत्रा, राम जवळ जवळ असहायच होता, तथापि त्यानें भयंकर पराक्रमी राक्षसांचा युद्धांत वध करून वैदेहीला परत आणिलें. त्या राघवाचे वानर, अस्वलें इत्यादि भिन्न भिन्न जातीचे आरण्यक मित्र होते व त्यांच्याच साह्यानें त्यानें राक्षसांना जिंकलें, याचा विचार कर आणि शोक करूं नको. हे परंतपा, तुझ्यासारखे महात्मे शोक करीत नसतात.

**वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें धीमान् मार्कंडेयानें आश्वासन दिलें असतां राजा युधिष्ठिर दुःख टाकून पुनः त्याला प्रश्न करूं लागला. ३.१९.२९२.

येथें एकोणिसावें रामोपाख्यानपर्व समाप्त झालें.

---

# पतिव्रतामाहात्म्यपर्व २०.



## अध्याय २९३ वा.

[ १ मार्कंडेयानें केलेला सावित्रीच्या उपाख्यानाचा आरंभ. २ अश्वपतीचें अपत्यार्थ अनुष्ठान. ३ सावित्रीदेवतेच्या वरानें सावित्रीची उत्पत्ति. ४ पित्याच्या आज्ञेनें तिचें वरशोधार्थ गमन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे महामुने, मी स्वतःसाठीं किंवा या माझ्या भ्रात्यांसाठीं शोक करीत नाहीं. किंवा शत्रूंनीं माझें राज्य हरण केलें, याचाहि मला

खेद वाटत नाहीं. परंतु या द्रुपदात्मजेचे क्लेश पाहून मात्र मला अतिशय विषाद वाटतो. दुरात्म्या कौरवांनीं कपट द्यूतांत आम्हांला जिंकून दास केलें असतां या कृष्णेनें आम्हांला सोडविलें. पापी जयद्रथानें या साध्वीचें वनांतून बलात्कारानें हरण केलें. तथापि ही साध्वी स्वधर्मापासून ढळली नाहीं. हे ब्रह्मन्, या महाभागा राजकन्येसारखी अन्य पतिव्रता तूं पूर्वीं कधीं पाहिली किंवा ऐकली आहेस काय ?

( २ ) मार्कंडेय—हे राजन्, राजकन्या सावित्रीनें कुलस्त्रियांचें सर्व महाभाग्य कसें प्राप्त करून घेतलें तें मी सांगतों, ऐक. पूर्वी मद्रदेशांत 'अश्वपति'-नांवाचा एक परम धार्मिक राजा होता. तो सत्यप्रतिज्ञ व जितेंद्रिय महात्मा ब्राह्मणभक्त असून यज्ञयाग व दानादि करण्यांत अतिशय तत्पर असे. सर्व भूतांच्या हितांत रत असलेला तो क्षमाशील भूपति प्रजाजनांना प्रिय होता. परंतु त्याला दिर्घकालपर्यंत अपत्य झालें नाहीं. त्यामुळें जसें जसें त्याचें वय होत चाललें तसा त्याला त्याविषयीं खेद वाटूं लागला.

त्या राजानें अपत्यप्राप्तीसाठीं तीव्र नियम आचरिले. तो जितेंद्रिय नृपाल नियमित वेळीं परिमित आहार करून ब्रह्मचर्यानें राहूं लागला. सावित्री जिची देवता आहे, अशा ऋचेनें प्रत्येक दिवशीं एक लक्ष होम करून नंतर तो षष्ठकालीं मित भोजन करीत असे.

त्या राजानें सतत अठरा वर्षें हें व्रत आचरिलें. अठरा वर्षें पूर्ण झालीं असतां सावित्री संतुष्ट झाली. तिनें अग्निहोत्राच्या वेदींतून प्रकट होऊन राजाला दर्शन दिलें. त्या वरद सावित्रीनें हृष्ट होऊन राजास म्हटलें—" हे पार्थिवा, तुझें ब्रह्मचर्य, शुचिर्भूतपणा, दम, नियम आणि निस्सीम भक्ति हीं पाहून

---

१ "सोमो वधूयुरभवदश्विनास्तामुभावरा सूर्यां यत्पत्ये शंसंतीं मनसा सविताऽददात्"—ही सावित्रीदेवताक ऋचा आहे. 'जेव्हां त्वष्टयानें आपली सावित्री कन्या सूर्याला दिली, तेव्हां सोम तिचा अनुचर झाला व ती पतीच्या कल्याणासाठीं जेव्हां प्रार्थना करूं लागली तेव्हां त्वष्टयानें प्रसन्न मनानें पुत्ररूप दोन अश्विनिकुमार हेच दोन वर तिला दिले' असा या मंत्राचा अर्थ आहे. त्यावरून या मंत्राचा लक्ष होम केल्यानें अपत्यप्राप्ति होते, असें ज्ञात होतें.

२ सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत जो दिवसाचा काल, त्याचे आठ भाग करून त्यांतील सहाव्या भागीं, असा याचा अर्थ आहे.

ी प्रसन्न झाल्यें आहें. यास्तव हे मद्रराजा, तुला इष्ट असलेला वर माग. तूं र्मामध्यें कदापि प्रमाद करूं नको.

अश्वपति—हे देवि, मी अपत्येच्छेनें व धर्मप्राप्तीसाठीं हें व्रत आचरिलें ाहे. तूं जर मजवर प्रसन्न झाली असशील तर 'मला कुलोद्धारक अनेक त्र व्हावे,' हाच वर मी तुजपाशीं मागत आहें. संतति हाच परम धर्म होय, सें ब्राह्मणांनीं मला सांगितलें आहे.

सावित्री—हे राजन्, तुझा हा मनोदय जाणून मीं पूर्वींच भगवान् पिता-हाला तुझ्या पुत्राविषयीं सांगितलें होतें. त्या स्वयंभूच्या प्रसादानें तुला वकरच एक तेजस्विनी कन्या होईल. आतां यावर तूं पुत्रार्थ कांहींहि बोलूं को, मी संतुष्ट होऊन पितामहाच्या आज्ञेनेंच तुला हें सांगत आहें.

मार्कंडेय—युधिष्ठिरा, तेव्हां 'ठीक आहे,' असें बोलून त्या राजानें सा-वेत्रीचें वचन मान्य केलें आणि 'लवकरच तसें घडून यावें' अशी देवीची नः प्रार्थना केली. नंतर सावित्री अंतर्धान पावली असतां तो नृपति आपल्या गरीस परत आला व प्रजेचें धर्मानें पालन करीत आपल्या राजधानींत ाहिला.

( ३ ) पुढें कांहीं काल लोटला असतां त्या नियतव्रत राजाच्या ज्येष्ठ धर्म-त्नीनें गर्भ धारण केला. त्या मनुकन्या राजपुत्रीचा तो गर्भ शुक्लपक्षांतील ंद्राप्रमाणें वाढूं लागला. योग्य समय प्राप्त होतांच ती राजमहिषी प्रसूत ाली. तिला एक सुंदर राजीवनयना कन्या झाली. राजानें त्या कन्येचे जात-र्मादि सर्व विहित संस्कार केले. सावित्रीदेवीला उद्देशून होम केल्यामुळें या देवीनें प्रसन्न होऊन ही कन्या दिली, म्हणून पित्यानें तिचें नांव सावि-ीच ठेविलें.

ती राजकन्या जणुकाय मूर्तिमती श्रीच होती. ती नृपनंदिनी दिवसें दिवस ाढत जाऊन कांहीं कालानें यौवनावस्थेस प्राप्त झाली. त्यावेळीं त्या सर्वांग-ुंदर सुकुमारीला पाहून लोक 'ही देवकन्याच आहे' असें समजूं लागले. ण आपल्या तेजानें देदीप्यमान होणाऱ्या त्या कन्येला कोणी वरीना. कारण तेला पहावयास आलेला प्रत्येक राजपुत्र तिच्या तेजानें दिपून जात असे.

एकदा एका पर्वकालीं ती राजकुमारी अभ्यंग स्नान करून देवालयांत गेली. ेथें तिनें यथाविधि होम करून ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें. त्या लावण्य-

वती राजकन्येनें इष्ट देवतेचें पूजन केलें व तिची प्रसादभूत पुष्पमाला, तीर्थ इत्यादि घेऊन ती आपल्या महात्म्या पित्यासमीप आली. तेव्हां ती साक्षात् लक्ष्मीसारखी शोभली. ती नृपात्मजा पित्याला तो प्रसाद समर्पण करून त्याच्या बाजूला हात जोडून उभी राहिली असतां या देवतातुल्य सुस्वरूप कन्येला यौवनावस्था प्राप्त झाली तरी अद्यापि कोणीहि वर वरीत नाहीं, हें पाहून तो नृपाल अत्यंत दुःखी झाला.

( ४ ) राजा—हे कन्ये, तुझ्या विवाहाचा काल प्राप्त झाला असूनहि अद्यापि माझ्यापाशीं तुझी याचना कोणीच करीत नाहीं; हा काय चमत्कार आहे. यास्तव तूं स्वतःच आपल्याला अनुरूप अशा गुणवान् भर्त्याचा शोध कर आणि तुला इष्ट पुरुष आढळला असतां मला कळीव. म्हणजे मी विचार करून त्याला तुझें दान करीन आणि तूंहि आपल्या इच्छेप्रमाणें त्याला वर.

हे कल्याणि, मीं ब्राह्मणांच्या मुखानें धर्मशास्त्रांतील एक वचन ऐकलें आहे. "योग्यकालीं कन्यादान न करणारा पिता, पतिधर्माचें पालन न करणारा पति, व पिता मृत झाला असतां मातेचें संरक्षण न करणारा पुत्र, असे हे तिघे निंद्य आहेत." असा त्याचा भावार्थ आहे. यास्तव वत्से, तूं माझें हें सांगणें मान्य करून अनुरूप वर शोधण्याची त्वरा कर व ज्यायोगें देवता मला दोष देणार नाहींत, असें कर.

मार्कंडेय—राजा, तो मद्रराजा अश्वपति आपल्या कन्येला असें बोलून वृद्ध अमात्यांना 'प्रवासाचीं वाहनादि सर्व साधनें सज्ज करून हिच्याबरोबर तुम्ही जा' असें म्हणाला. तेव्हां ती तपस्विनी पित्याच्या चरणांना वंदन करून व त्याचें वचन मान्य करून लज्जेनें वरसंशोधनार्थ निघाली. ती राजकन्या सुवर्णाच्या रथांत बसून वृद्ध अमात्यांसह राजर्षींच्या अनेक रम्य तपोवनांत गेली. त्यांतील वृद्ध व मान्य राजर्षींना अभिवादन करीत तिनें क्रमानें सर्व वनांतून संचार केला. ती नृपात्मजा सर्व तीर्थांमध्यें मुख्य मुख्य ब्राह्मणांना धन देत व अनेक प्रदेश पहात चालली. ३. २०. २९३.

---

१ अप्रदाता पिता वाच्यो वाच्यश्चानुपयन्पतिः। मृते भर्तरि पुत्रश्च वाच्यो मातुररक्षिता ॥

## अध्याय २९४ वा.

[ १ नारदासह अश्वपति बसला असतां सावित्रीचें प्रत्यागमन. २ तिनें निवडलेल्या वराचें वर्णन. ३ नारदानें कथन केलेलें त्याचें गुणवत्त्व व अल्पायुष्ट्व. ४ राजाचा तिला दुसरा वर पहाण्याचा उपदेश व सावित्रीचा त्यालाच वरण्याचा निश्चय. ५ नारदाचा आशीर्वाद. ६ विवाहाची तयारी. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे कुंतीपुत्रा, त्यानंतर कांहीं कालानें एकदा मद्रराज अश्वपतीकडे नारद आला. योग्य उपचारानंतर त्या देवर्षीसह राजा सभेमध्यें गोष्टी बोलत बसला होता. इतक्यांत सावित्री सर्व तीर्थें व आश्रम यांतून संचार करून अमात्यासह पितृगृहीं परत आली. त्या विनयसंपन्न सुकन्येनें आपला पिता नारदासह बसला आहे, असें पाहून त्या उभयतांच्या चरणांना शिरसा वंदन केलें.

तेव्हां **नारद** म्हणाला—हे भूपाला, ही तुझी कन्या कोठें गेली होती व कोठून आली ? ही आतां तारुण्यावस्थेस प्राप्त झालेली दिसत आहे. तिचा विवाह अजून कां करीत नाहींस !

**अश्वपति**—हे देवर्षे, याच कार्यासाठीं मीं तिला पाठविलें होतें व दीर्घप्रवास करून ही नुक्तीच परत येत आहे, यास्तव तिनें कोणता पति वरला आहे, हें तिच्याच मुखानें ऐक.

**मार्कंडेय**—राजा, नंतर पित्यानें ‘ हे वत्से, आम्हांला आतां तुझ्या प्रवासाचा सविस्तर वृत्तान्त सांग ’ असें म्हटलें असतां सावित्रीनें त्याची आज्ञा मान्य करून त्या उभयतांना घडलेलें सर्व वृत्त सांगण्यास आरंभ केला.

( २ ) **सावित्री**—शाल्वदेशामध्यें द्युमत्सेननांवाचा एक प्रसिद्ध राजा होता. तो धर्मात्मा कांहीं कालानंतर अंध झाला. त्या वेळीं त्याचा पुत्र बाल्यावस्थेंत आहे व राजाची दृष्टि नष्ट झाली आहे, हें छिद्र पाहून त्याच्या समीपवर्ती पूर्व शत्रूनें त्या नृपतीचें राज्य हरण केलें. तेव्हां तो भूपाल जिचें अपत्य अल्पवयी आहे अशा भार्येसह अरण्यांत निघून गेला व त्या महा वनांत तीव्र तपश्चर्या करीत राहिला. त्याचा तो पुत्र स्वनगरींत जन्म पावला असून तपोवनांत वाढला आहे. तो सत्यवान् मला अनुरूप भर्ता आहे. त्याला मीं मनानें वरिलें आहें.

( ३ ) नारद्—अरे अरे ! राजा, या सावित्रीनें अज्ञानामुळें हें मोठें अकार्य केलें आहे. तो राजपुत्र सत्यवान् गुणसंपन्न आहे. त्याची माता व पिता सर्वदा सत्य भाषण करीत असतात. म्हणून ब्राह्मणांनीं त्यांच्या पुत्राचें ‘सत्यवान्’ असें नांव ठेविलें. त्या राजकुमाराला बाल्यापासून अश्व फार आवडतात. तो बालपणीं मातीचे अश्व तयार करीत असे व चित्रेंहि अश्वांचींच काढीत असे. म्हणून त्याला ‘अश्वचित्र’ असेंहि म्हणतात.

राजा—हे भगवन्, तो नृपात्मज सत्यवान् तेजस्वी, बुद्धिमान्, क्षमाशील, शूर व पितृवत्सल आहे ना ?

नारद्—भूपते, तो राजकुमार सूर्यासारखा तेजस्वी आहे. बृहस्पतितुल्य बुद्धिमान् आहे. महेंद्रासारखा शूर व पृथ्वीसारखा क्षमाशील आहे.

अश्वपति—तो सत्यवान् राजपुत्र दाता, ब्राह्मणभक्त, रूपवान्, उदार व प्रियदर्शन आहे काय ?

नारद्—नृपश्रेष्ठा, तो द्युमत्सेनाचा बलाढ्य पुत्र संकृतीच्या प्रसिद्ध रंतिदेवासारखा श्रेष्ठ दाता आहे. त्याची ब्राह्मणभक्ति व सत्यनिष्ठा औशीनर शिबीच्या तुल्य आहे. तो ययातीसारखा उदार असून चंद्रासारखा प्रसन्नवदन आहे. त्याचें स्वरूप अश्विनिकुमारांसारखें अप्रतिम आहे. सारांश, तो नृपात्मज, दान्त, मृदु, शूर, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय, अनसूयक व द्युतिमान् असून सर्वांशीं मित्रत्वानें वागणारा आणि अकार्याविषयीं लज्जा बाळगणारा आहे. त्याचा स्वभाव सरल असून तो निश्चयी आहे, असें तपोवृद्ध व शीलवृद्ध लोक त्याच्याविषयीं सांगत असतात.

अश्वपति—हे मुने, तूं एवढा वेळ त्या राजपुत्राचे सर्व गुणच सांगितलेस, आतां त्याच्या ठिकाणीं कांहीं दोष असले, तर त्यांचेंहि कथन कर.

नारद्—हे राजा, त्या राजकुमारांत एकच वगुण्य आहे व तें सर्व गुणांचें अतिक्रमण करून राहिलें आहे. त्याच्या या दोषाचें मोठ्या प्रयत्नानेंहि निवारण करतां येणें शक्य नाहीं. भूपते, ऐक. आजपासून एका वर्षानें त्या सत्यवानाचें आयुष्य क्षीण होऊन तो देहत्याग करील. हाच एक त्याच्यांत महादोष आहे.

( ४ ) राजा—बाळे सावित्रि, ये. मी काय सांगतों, तें ऐक. तूं दुसरा वर पहा. या सर्वगुणसंपन्न असलेल्याहि राजपुत्रामध्यें अल्पायुष्य हा एकच

महादोष त्याच्या इतर सर्व गुणांचें महत्त्व नष्ट करीत आहे. 'तो राजपुत्र एका वर्षानें देहत्याग करील' असें हा देवांना पूज्य असलेला भगवान् नारदमुनि मला सांगत आहे.

**सावित्री**—हे तात, कोष्ठपाषाणांचीं शकलें एकदाच केलीं जातात. कन्येचें दान एकदाच करितात आणि 'देतों' हें वचन एकदाच दिलें जातें. या तीन गोष्टी एकदाच होत असतात. त्या दोनदा घडत नसतात. यास्तव मीं ज्याला एकदा मनानें वरिलें आहे तो दीर्घायु असो, किंवा अल्पायु असो, सद्गुणी असो, किंवा गुणरहित असो, तोच माझा भर्ता आहे. मी आतां दुसऱ्या वराला कदापि वरणार नाहीं. मनानें निश्चय करून मग वाणीनें तिचा उच्चार होतो. त्यानंतर तेंच कर्म कृतीनें केलें जातें. त्यामुळें माझें मन मला प्रमाण आहे.

( ५ ) **नारद्**—हे नरश्रेष्ठा, तुझ्या या सावित्री कन्येची बुद्धि स्थिर आहे. तिचें या धर्मापासून निवारण करतां येणें कदापि शक्य नाहीं. शिवाय राजपुत्र सत्यवानांत जे गुण आहेत, ते दुसऱ्या कोणत्याहि पुरुषांत नाहींत. यास्तव तूं आपली कन्या त्यालाच अर्पण करावीस, असें आतां मलाहि वाटतें.

**राजा**—ज्याअर्थीं सावित्री आपल्या निश्चयापासून ढळणार नाहीं, आणि तूंहि मला सत्य व हित सांगत आहेस त्याअर्थीं मी असेंच करीन. तूं माझा गुरुच आहेस.

**नारद्**—हे राजा, तुझ्या या सावित्रीचें कन्यादान निर्विघ्नपणें पार पडो. तुमचें कल्याण असो. आतां मी तुझा निरोप घेतों.

( ६ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, असें बोलून नारद आसनावरून उठला व स्वर्गलोकीं निघून गेला. इकडे राजा अश्वपति कन्येच्या विवाहोचित तयारीला लागला. ३. २०. २९४.

---

१ सकृदंशो निपतति सकृत्कन्या प्रदीयते । सकृदाह ददानीति त्रीण्येतानि सकृत्सकृत् ॥ २ मनसा निश्चयं कृत्वा ततो वाचाऽभिधीयते ॥ क्रियते कर्मणा पश्चात्प्रमाणं मे मनस्ततः ॥

## अध्याय २९५ वा.

[ १ अश्वपतीचें कन्येसह वनस्थ द्युमत्सेनापाशीं गमन व त्याची सावित्रीला स्नुषात्वानें स्वीकारण्याविषयीं प्रार्थना. २ सावित्री-सत्यवान्‌विवाह व सावित्रीचें पतीसह वनांत वास्तव्य. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे पार्था, त्यानंतर त्या मद्राधिपानें कन्यादानाचा निश्चय करून विवाहोचित सर्व साहित्य तयार करविलें, सर्व वृद्ध ब्राह्मण, ऋत्विज व पुरोहितादि, यांस बोलावून आणिलें आणि शुभ दिवशीं सुमुहूर्तावर त्या सर्वांना घेऊन कन्येसह प्रयाण केलें. अश्वपति राजा त्या पवित्र अरण्यांत जाऊन पोंचल्यावर रथांतून उतरला व पायांनींच चालत द्युमत्सेनाच्या आश्रमाकडे निघाला. अल्पावकाशांतच तो राजा सर्व द्विजांसह त्या राजर्षीच्या समीप गेला. त्यावेळीं तो महाभाग राजा द्युमत्सेन एका शालवृक्षाखालीं तृणासनावर बसला होता. अश्वपतीनें त्या चक्षुर्हीन राजर्षीचा यथाविधि सत्कार करून ‘ मी अश्वपति आहें ’ असें स्वतःचें नांव त्यास नम्रपणें निवेदन केलें.

त्यावेळीं त्या धर्मवेत्त्या राजर्षीनें अश्वपतीला अर्घ्य, आसन व गाय अर्पण करून त्याचें आतिथ्य केलें आणि ‘ आपलें आगमन कां झालें ? ’ असा त्या मद्राधीशाला प्रश्न केला.

तेव्हां अश्वपतिराजानें आपल्या आगमनाचें कारण, सत्यवानाविषयीं आपल्या मनांतील आशय व पुढील कर्तव्य, हें सर्व त्यास निवेदन करून म्हटलें—“हे धर्मज्ञ राजर्षे, ही माझी सावित्री नांवाची सद्गुणी कन्या आहे, तिचा तूं स्वधर्मानें स्नुषात्वानें स्वीकार कर.”

**द्युमत्सेन**—हे नृपश्रेष्ठा, मीं राज्यापासून च्युत होऊन वनाचा आश्रय केला आहे. आम्ही नियमनिष्ठ होऊन तापस धर्म आचरीत आहों. अशा वनवासांतील आश्रमांत रहाण्यास तुझी ही कन्या पात्र नाहीं. ही राजकन्या अशा क्लेशांत कशी राहील !

**अश्वपति**—हे धर्मनिष्ठा, सुख आणि दुःख हीं दोन्ही उत्पत्ति-विनाशशील आहेत, हें मी व माझी कन्या जाणून आहों. यास्तव माझ्यासारख्याला तुझें हें उत्तर योग्य नव्हे. शिवाय हे नृपाला, मी याचा निश्चय करूनच तुझ्यापाशीं आलों आहें. यास्तव नम्र होऊन आलेल्या मज सुहृदाची तूं निराशा करूं नको. मी प्रेमानें तुझ्या समीप आलों असतां माझा असा निषेध करणें

तुला उचित नाहीं. हे राजर्षे, आपण उभयतां कुलानें व योग्यतेनें समान आहों. यास्तव आपला आप्तसंबंध जडणें सर्वथा युक्त आहे. माझी ही कन्या सत्यवानाला अनुरूप भार्या आहे. तिचा तूं स्नुषा म्हणून स्वीकार कर.

**द्युमत्सेन**—हे मद्राधिपा, तुझ्याशीं आप्तसंबंध जडावा अशी माझी पूर्वीं-पासूनच मनीषा होती. परंतु मी आतां राज्यभ्रष्ट झालों आहें; म्हणून माझ्या मनांत हा विचार आला. तुझ्या कन्येला स्नुषा करण्याचा माझा हा पूर्वमनोरथ पूर्ण होण्याचा योग ज्याअर्थीं अशा रीतीनें जुळून आला आहे, त्याअर्थीं आतां तें मंगल कार्य आज घडून येऊं दे. राजा, तूं माझा इष्ट अतिथि आहेस.

(२) **मार्कंडेय**—हे कौंतेया, नंतर आश्रमवासी सर्व द्विजांना बोलावून आणून त्या दोघां नृपतींनीं सत्यवान्-सावित्रीचा यथाविधि विवाह करविला. अश्वपति राजानें आपल्या कन्येला गृहोचित सर्व साहित्य अर्पण करून तिचें सालंकृत कन्यादान केलें आणि तो मोठ्या आनंदानें आपल्या नगरीला परत गेला.

इकडे सत्यवान् सर्व गुणसंपन्न सहधर्मचारिणीचा लाभ झाल्यामुळें अतिशय संतुष्ट झाला. सावित्रीलाहि इष्ट पतीच्या प्राप्तीनें परम आल्हाद झाला. त्या राजकन्येनें पिता परत जातांच आपलीं सर्व भूषणें व अलंकार काढून ठेविले, मूल्यवान् वस्त्रांचा त्याग केला आणि वल्कलें व काषाय वस्त्र परिधान केलें. त्या सुशीलेनें परिचर्या, सदाचार, सत्यभाषण, स्नेह, जितेंद्रियत्व व सर्वांना इष्ट असलेलें आचरण या सद्गुणांच्या योगानें सर्वांची प्रीति संपादन केली.

ती साध्वी चरणसंवाहन, आच्छादन इत्यादिकांच्या योगानें आपल्या श्वश्रूची सेवा करीत असे. देवपूजादिकांचें साहित्य तयार करून देणें, नम्र भाषण इत्यादि कार्यांनीं ती श्वशुराचीहि शुश्रूषा करीत असे. त्याचप्रमाणें प्रियभाषण, सर्व कार्यांतील नैपुण्य, चित्तशांति व एकान्तांतील परिचर्या यांच्या योगानें ती पतिव्रता प्रिय पतीचें रंजन करीत असे. याप्रमाणें त्या आश्रमांत रहात असतां त्यांचा कांहीं काल निघून गेला. तथापि नारदाचें वचन तिच्या मनांत वारंवार घोळत होतें, त्यामुळें ती राजकन्या अहर्निश त्याचेंच चिंतन करीत खिन्न होत असे. ३. २०. २९५.

## अध्याय २९६ वा.

[ १ सावित्रीनें आचरिलेले तीन दिवसांचें उपोषण व्रत. २ पतीच्या मृत्युदिनाचें चिंतन व श्वश्रू-श्वशुरांच्या आज्ञेनें त्याच्याबरोबर अरण्यांत गमन. ]

( १ ) **मार्कंडेय**—हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें बराच काल निघून गेला व सत्यवानाचा मृत्युदिन समीप आला. नारदानें जें वचन सांगितलें होतें, तें नित्य हृदयांत वागवून सावित्री एकेक दिवस मोजीत असतां वर्ष संपत आलें व आतां चवथ्या दिवशीं पतीला मृत्यु येणार, असा विचार करून ती सती तीन दिवसांचें व्रत आरंभून रात्रंदिवस सतत उभी राहिली. तिचा तो नियम ऐकून द्युमत्सेनाला अतिशय खेद वाटला, तो उठून सावित्रीपाशीं आला व तिचें सान्त्वन करीत म्हणाला—

" हे वत्से, तूं हें अतिशय तीव्र व्रत आरंभिलें आहेस. तीन दिवस तूं भोजन केलें नाहींस. असा उपवास करणें परम दुष्कर आहे. "

**सावित्री**—हे तात, आपण मनाला ताप करून घेऊं नका. मी हें व्रत आतां लवकरच समाप्त करीन. कांहीं कारणानेंच मीं या व्रताचा निश्चय केला आहे.

**द्युमत्सेन**—तुला ' व्रतभंग कर ' असें सांगण्यास मी केव्हांहि समर्थ नाहीं. यास्तव हें व्रत सत्वर समाप्त कर, असेंच सांगणें आमच्या सारख्यांना युक्त आहे.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, असें बोलून तो उदार मनाचा राजा स्वस्थ बसला. सतत उभी असलेली सावित्री एखाद्या काष्ठाप्रमाणें दिसूं लागली. हे भरतर्षभा, उद्यां पतीचा मृत्युदिन आहे, या विचारानें दुःखित झालेल्या सावित्रीनें सतत स्थित होऊनच ती रात्र घालविली. दुसरा दिवस उजाडला असतां आज हा दुष्ट दिवस उगवला आहे, असें म्हणून त्या तपस्विनीनें प्रदीप्त अग्नीमध्यें आहुत्या दिल्या. सूर्योदय होतांच आपल्या पौर्वाह्णकालीन क्रिया केल्या. नंतर ती राजस्नुषा श्वश्रू, श्वशुर व तेथील आश्रमवासी वृद्ध द्विज यांना यथाक्रम अभिवादन करून व पुनः हात जोडून नियमनिष्ठ होऊन उभी राहिली.

त्यावेळीं त्या तपोवननिवासी तापसांनीं सावित्रीला सौभाग्यसूचक शुभ व हितकर असे आशीर्वाद दिले. तपस्वी जनांच्या त्या शुभ वचनाचा ध्यानयोगपरायण झालेल्या सावित्रीनें ' तथास्तु ' असें म्हणून मनानें स्वीकार केला.

नारदवचनाचें चिंतन करीत अतिशय खिन्न झालेली ती राजकन्या त्या अशुभ कालाची व त्या घोर क्षणाची मार्गप्रतीक्षा करूं लागली.

नंतर एकांतांत उभ्या असलेल्या त्या नृपात्मजेला तिचीं श्वश्रू व श्वशुर हीं दोघें मोठ्या प्रेमानें म्हणालीं—" हे वत्से, तूं हें व्रत आरंभिलेंस व तें समाप्तहि केलेंस. आतां आहाराची वेळ झाली आहे. यास्तव तूं अगोदर भोजन कर व मग तुझें इतर कार्य कर."

सावित्री—सूर्यास्त झाल्यानंतर कृतकार्य होऊन भोजन करण्याचा मीं निश्चय केला आहे आणि माझ्या मनांतील हाच संकल्प आहे.

( २ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, सावित्री भोजनाविषयीं असें जों बोलत आहे, तोंच सत्यवान् खांद्यावर परशु टाकून वनांत जावयास निघाला. तेव्हां सावित्री त्याला म्हणाली—" आपण एकटेच वनांत जाऊं नका. मी आपल्या बरोबर येयें. आज मी आपणांपासून दूर रहाणार नाहीं."

सत्यवान्—तूं या पूर्वी कधीं वनांत गेलेली नाहींस, तेथील मार्ग दुर्गम आहे. शिवाय तूं व्रत आणि उपवास यांनीं श्रांत झाली आहेस. तुला कसें चालवेल ? आज तूं पायांनीं चालूं शकणार नाहींस.

सावित्री—छे, उपवासानें मला मुळींच ग्लानि आलेली नाहीं. किंवा मी श्रांतहि झालें नाहीं. उलट वनांत जाण्याचा मला मोठा उत्साह वाटत आहे. यास्तव आपण मला प्रतिबंध करूं नका.

सत्यवान्—तुझी जर वनांत येण्याची इच्छाच आहे तर मी तुझें प्रिय करण्यासाठीं तुला बरोबर नेईन. परंतु तूं अगोदर वडिलांची आज्ञा घे. म्हणजे मजवर दोष येणार नाहीं.

मार्कंडेय—धर्मराजा, पतीचें हें सांगणें मान्य करून सावित्री आपल्या सासु-सासऱ्यांच्या समीप गेली व त्या उभयतांस नमस्कार करून म्हणाली—"हा माझा भर्ता फल-मूलादि आणण्यासाठीं महावनांत जात आहे, त्याच्या बरोबर जाण्याची माझी इच्छा आहे. आज मी त्याचा विरह सहन करण्यास समर्थ नाहीं. यास्तव आपण वडिलांनीं मला जाण्याची अनुज्ञा द्यावी. आपला पुत्र गुरु व अग्निहोत्र यांचें साहित्य आणण्यासाठीं जात आहे. यास्तव त्याचें निवारण करतां येत नाहीं. इतर कांहीं कार्यासाठीं जर तो वनांत जाण्यास निघाला असता, तर त्यास 'आज जाऊं नका' असें म्हटलें असतें.

शिवाय सुमारें वर्षामध्यें मी या आश्रमांतून कोठें बाहेर पडलें नाहीं. यास्तव हें प्रफुल्ल वन पहाण्याची माझी फार इच्छा आहे.

**द्युमत्सेन**—पित्यानें अर्पण केल्यापासून आजपर्यंत या माझ्या सावित्री-स्नुषेनें मजपाशीं कधीं कशाचीहि याचना केल्याचें मला स्मरत नाहीं. यास्तव आज या वधूची इच्छा पूर्ण होऊं दे. ठीक आहे, वत्से, जा. मार्गामध्यें सत्य-वानाकडे लक्ष असूं दे बरें !

**मार्कंडेय**—राजेंद्रा, याप्रमाणें त्या उभयतांची अनुज्ञा घेऊन ती यश-स्विनी भर्त्याच्या बरोबर निघाली. तिच्या अंतःकरणाला आंतून वेदना होत होत्या तरी बाह्यतः ती पतीबरोबरच हंसत चालली होती. ती तपस्विनी सावित्री मयूरांनीं सेवन केलेलीं, रम्य व विचित्र उपवनें पहात चालली असतां सत्यवानानें तिला मधुर वचनानें म्हटलें—" सावित्रि, या पवित्र नद्या कशा वेगानें वहात आहेत ! आणि हे श्रेष्ठ वृक्ष कसे प्रफुल्ल दिसत आहेत, पहा!"

त्यावेळीं ती निष्पाप पतिव्रता नारदाच्या वचनाचें स्मरण करून आतां आपल्या भर्त्याचा मृत्युकाल समीप येत चालला आहे, या विचारानें सर्व अवस्थांमध्यें पतीच्या मुखाकडे सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करीत होती. त्याच्या मरणकालाचें स्मरण होतांच त्या साध्वीचें हृदय दोन शकलें झाल्याप्रमाणें द्विधा होत असतांहि ती राजकन्या मोठ्या धैर्यानें पतीच्या मागोमाग मंदगतीनें जाऊं लागली. ३. २०. २९६.

---

## अध्याय २९७ वा.

[ १ सत्यवान् काष्ठे तोडीत असतां उद्भवलेला असह्य मस्तकशूल, वेदना व शयन. २ यमाचें दर्शन. ३ सावित्री-यमसंवाद व वरप्राप्ति. ]

( १ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, नंतर त्या वीर्यवान् सत्यवानानें वनांतील वृक्षांचीं फळें तोडलीं. त्या कामांत सावित्री त्याला साह्य करीत होती. तिनें तीं सर्व फळें एका परडींत भरून घेतलीं. नंतर सत्यवान् लाकडें तोडूं लागला. इतक्यांत काष्ठें तोडीत असतां त्या राजपुत्राच्या शरीराला घाम सुटला. श्रमानें त्याच्या मस्तकांत वेदना होऊं लागल्या. तेव्हां श्रमपीडित झालेला तो राजपुत्र आपल्या प्रिय पत्नीपाशीं आला व म्हणाला—

**सत्यवान्**—हे सावित्रि, या श्रमानें माझें मस्तक अतिशय दुखत आहे, अंग ठणकत आहे व हृदयांतहि असह्य वेदना होत आहेत. मला अतिशय

अस्वस्थ वाटत आहे. मस्तक तर शूलानें विद्ध झाल्याप्रमाणें जड झालें आहे. त्यामुळें हे कल्याणि, मला निजावेंसें वाटतें. माझ्यानें आतां उभें रहावत नाहीं.

प्रिय पतीचे हे शब्द ऐकतांच ती साध्वी पतीच्या अगदीं समीप गेली व त्याचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन भूमीवर बसली. याप्रमाणें सत्यवानानें तिच्या अंकावर मस्तक टेंकून शयन केलें असतां ती तपस्विनी नारदवचनाचा विचार मनांत आणून तो मुहूर्त, क्षण, वेळ व दिवस यांचें चिंतन करूं लागली.

( २ ) इतक्यांत एक सूर्यासारखा तेजस्वी पुरुष तिच्या दृष्टीं पडला. त्या देदीप्यमान पुरुषानें मस्तकावर जटा बांधल्या असून तो श्यामवर्ण होता. त्यानें तांबडें वस्त्र परिधान केलें होतें. त्याचे नेत्र आरक्त होते व त्यानें हातांत भयंकर पाश धारण केला होता. तो धिप्पाड पुरुष सत्यवानाच्या बाजूला उभा राहून त्याच्याकडे निश्चल दृष्टीनें पाहूं लागला. त्या भीषण पुरुषाला पहातांच सावित्रीचें हृदय भयकंपित झालें. तिनें प्रिय पतीचें मस्तक आपल्या अंकावरून उचलून हलकेच भूमीवर ठेविलें व एकदम उठून दुःखार्त झालेली ती अबला हात जोडून त्याच्याशीं भाषण करूं लागली.

( ३ ) **सावित्री**—हे देवेशा, तूं देवता आहेस हें तुझ्या या अतिमानुष स्वरूपावरूनच मीं ओळखलें आहे. यास्तव तूं कोणतें दैवत आहेस ! काय करण्याची तुझी इच्छा आहे ! व तूं येथें कोणत्या हेतूनें आला आहेस ! हें मला सांग.

**यम**—हे सावित्रि, तूं पतिव्रता आहेस व त्याचप्रमाणें तपस्विनीहि आहेस. म्हणूनच मी तुझ्याशीं भाषण करितों. हे शुभे, मी यम आहें. या तुझ्या सत्यवान् पतीचें आयुष्य क्षीण झालें आहे, यास्तव मी या राजपुत्राला बांधून नेण्यासाठीं आलों आहें. हाच माझा येथें येण्याचा हेतू आहे, असें समज.

**सावित्री**—हे प्रभो, मानवांना नेण्यास तुझे दूत येत असतात, असें श्रुत आहे, असें असतां आज तूं स्वतः कां आलास !

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, सावित्रीचा हा प्रश्न ऐकून पितृराज भगवान् यमानें त्या साध्वीचें प्रिय करण्याच्या इच्छेनें आपला उद्देश सविस्तर सांगण्यास आरंभ केला.

यम—हे पतिव्रते, हा तुझा पति धर्मनिष्ठ, रूपवान् व गुणांचा केवळ सागरच आहे. अशा श्रेष्ठ प्राण्याला नेण्यास माझे दूत पात्र नाहींत. यास्तव मी स्वतः या कार्यासाठीं आलों आहें.

राजा, साध्वी सावित्रीला इतकें बोलून यमानें सत्यवानाच्या हृदयांत स्थित असलेल्या सूक्ष्मशरीरी अंगुष्ठमात्र पुरुषाला आपल्या पाशानें बद्ध केलें व त्याच्या देहांतून त्या पुरुषाला बलात्कारानें ओढून काढलें. तेव्हां यमाच्या वश झालेल्या प्राणाचें आकर्षण करितांच तो राजपुत्र निस्तेज झाला. त्याचा श्वासोच्छ्वास बंद पडला व निश्चेष्ट होऊन पडलेला त्याचा देह म्लान दिसूं लागला. इतक्यांत त्याच्या पाशबद्ध जीवात्म्याला घेऊन यमराज दक्षिण दिशेकडे जाऊं लागला. तेव्हां दुःखार्त झालेली सावित्री त्याच्या मागोमाग निघाली. ती पतिव्रता नियमनिष्ठ असून, व्रतामध्यें स्थित होती.

तेव्हां ती महाभागा आपल्या मागून येत आहे, असें पाहून यम म्हणाला—
"हे सावित्रि, तूं परत फिर व आपल्या भर्त्याच्या मृतदेहाचें और्ध्वदेहिक कर. तूं पतीच्या ऋणांतून मुक्त झाली आहेस व जेथपर्यंत त्याच्या बरोबर जाणें शक्य होतें, तेथपर्यंत तूं त्याला अनुसरली आहेस."

पण यमाचें हें वचन ऐकूनहि ती साध्वी परत न फिरतां तशीच त्याच्या मागोमाग चालली व त्या देवास म्हणाली—"हे यमराज, माझा पति जेथें स्वतः जाईल किंवा त्याला दुसरें कोणी नेईल तेथें मींहि जावें, हा सनातन धर्मच आहे. शिवाय तप, गुरुभक्ति, पतिप्रेम आणि तुझा प्रसाद यांच्या सामर्थ्यानें माझी गति अप्रतिहत आहे. मला कोणीहि प्रतिबंध करूं शकणार नाहीं. तत्त्वदर्शी विद्वान् 'सात पावलें एकत्र चालत गेल्यानें मैत्री होते' असें म्हणतात. यास्तव मी आतां तुझ्या मैत्रीला पात्र झालें आहें. त्या मित्रभावाला स्मरून मी कांहीं सांगत्यें तें ऐक.

अजितेंद्रिय पुरुष वनांत राहूनहि यज्ञादिरूप धर्म आचरीत नाहींत. परंतु जे जितेंद्रिय असतात, ते वनामध्यें व ग्रामामध्येंहि स्त्रीसंबद्ध यज्ञादि धर्म

१ अंगुष्ठप्रमाण हृदयाकाशांत स्थित असल्यामुळें पुरुषाला येथें 'अंगुष्ठमात्र' म्हटलें आहे. कर्मेंद्रियपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, प्राणपंचक, अंतःकरणचतुष्टय, भूतसूक्ष्मपंचक, अविद्या, काम, कर्म या पुर्यष्टकानें परिवेष्टित झालेल्या सूक्ष्मशरीरवान् जीवाचें हें औपाधिक प्रमाण आहे. ( सु. ब्र. सू. अ. १. पृ. ८५. )

आचरितात. जितेंद्रिय पुरुष वनांत व ग्रामांतहि ब्रह्मचर्य व त्यागरूप संन्यास हे दोन्ही धर्म आचरूं शकतात. धर्म विज्ञानासाठीं आहे. म्हणजे आत्मविज्ञान हें धर्माचें फल आहे. म्हणूनच वेदवेत्ते संत 'धर्म हें प्रधान साधन आहे' असें म्हणतात. पण या चतुर्विध धर्माचें अनुष्ठान एकाच वेळीं संभवत नाहीं. यास्तव त्यांतील एकाच आश्रमाच्या धर्मानें आम्ही चारी आश्रमांतील लोक ज्ञान-मार्गाला प्राप्त झालों आहों.

कोणत्याहि एका आश्रमाचा धर्म, दंभादिकांचा त्याग करून, श्रद्धापूर्वक यथाविधि आचरिला असतां तोच धर्म ज्ञानप्रद होतो, असें विद्वानांचें मत आहे. आम्हांला अनुरूप असा पहिला गृहस्थाश्रमच आहे. नैष्ठिक ब्रह्मचर्य किंवा पारिव्राज्य हा धर्म आम्हांला इष्ट नाहीं. कारण आमचा प्रधानभूत गृहस्थधर्म अद्यापि सिद्ध झालेला नाहीं. यास्तव माझ्या भर्त्याचें हरण करून तूं आम्हां उभयतांच्या धर्माचा नाश करूं नको. गृहस्थाश्रमच प्रधान आहे, असेंहि वेदवत्ते समजतात."

**यम**—हे सावित्रि, उदात्तादि स्वर, अकारादि अक्षर व ककारादि व्यंजनें यांनीं युक्त व त्यामुळेंच निर्दोष व युक्तियुक्त अशा या तुझ्या भाषणानें मी संतुष्ट झालों आहें. यास्तव हे पतिव्रते सावित्रि, या सत्यवानाच्या जीवितावांचून तुला इष्ट असलेला दुसरा कोणताहि वर तूं मजपासून मागून घे आणि परत फिर.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, यमाचें हें अनुकूल वचन ऐकून सावित्रीनें आपल्या मनांत 'मी माझ्या प्रिय पतीला याच्या पाशांतून सोडवीनच.' असा निश्चय केला व ती प्रथम अन्य वर मागण्याच्या इच्छेनें म्हणाली—"भगवन्, माझा श्वशुर अंध झाला आहे. त्यामुळें तो स्वराज्यापासून च्युत होऊन या वनांतील आश्रमांत येऊन राहिला आहे. त्याला तुझ्या प्रसादानें चक्षूंचा लाभ होऊन तो राजा अग्नि व सूर्य यांसारखा तेजस्वी व बलवान् होवो."

**यम**—हे निष्पाप राजकन्ये, मी तुला हा वर देतों. तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व घडून येईल. तूं चालण्याच्या या परिश्रमानें अतिशय श्रांत झालेली दिसतेस. यास्तव परत फिर व आपल्या श्वशूरापाशीं जा. म्हणजे तुझ्या श्रमांचा परिहार होईल व तुला अधिक क्लेश होणार नाहींत.

**सावित्री**—हे साधो, भर्ता समीप असतांना मला श्रम कोठून होणार! जेथें पति असेल तेथेंच माझें गमन निश्चित आहे. हे देवेशा, तूं माझ्या पतीला

जेथें नेत आहेस तेथेंच मी गमन करणार. शिवाय तूं माझें आणखींहि एक वचन ऐक.

सज्जनांची एकदा जरी ओळख झाली तरी ती महाफल देणारी असते. त्यामुळेंच सज्जनांना परम मित्र म्हणतात. सत्पुरुषांची संगति केव्हांहि निष्फल होत नाहीं. यास्तव निरंतर सज्जनांच्या सहवासांत रहावें. ( पूर्वीं सावित्रीनें आश्रमधर्मांना ज्ञानसाधनत्व आहे, असें सांगितलें व येथें सत्संग हेंच ज्ञानाचें साधन आहे, असें सुचविलें आहे. )

**यम**—हे साध्वि, तूं विद्वानांच्याहि ज्ञानाची वृद्धि करणारें हितकर, युक्तियुक्त व चित्ताकर्षक भाषण करीत आहेस. यास्तव हे भामिनि, तूं सत्यवानाच्या जीवितावांचून आणखीं एखादा इष्ट वर मागून घे.

**सावित्री**—हे प्रभो, माझ्या बुद्धिमान् श्वशुराचें राज्य पूर्वीं एका शत्रूनें हरण केलें आहे. तें त्याचें राज्य त्याला पुनः प्राप्त व्हावें व त्या माझ्या गुरूनें स्वधर्माचा कधींहि त्याग करूं नये, हा दुसरा वर मी तुजपाशीं मागत आहें.

**यम**—हे नृपात्मजे, तुझ्या श्वशुराला लवकरच त्याचें राज्य प्राप्त होईल व तो राजा स्वधर्मापासून कधींहि च्युत होणार नाहीं. हे अनिंदिते, तुझा हा मनोरथहि मीं पूर्ण केला आहे. आतां तूं परत जा. म्हणजे तुला श्रम होणार नाहींत.

**सावित्री**—हे यमराज, तूं या सर्व प्रजांना नियमानें बद्ध केलें आहेस, तूं त्यांचा निग्रह करणारा आहेस आणि तूंच त्यांना इष्ट फलांशीं संयुक्त करितोस. त्यांच्या पापकर्मांप्रमाणें त्यांस अगोदर यातना देऊन शेवटीं सत्कर्मांचें फलहि देतोस. पण जे ज्ञानी निष्काम असतात ते तुझ्या अधीन होत नाहींत व देहाशीं संयुक्त होऊन फलहि भोगीत नाहींत. पण जे ज्ञान संपादन न करतां तुझ्या अधीन होतात ते संसारसुख अनुभवितात.

तूं सकाम पुरुषांचा असा निग्रह करितोस म्हणूनच तुझें यमत्व प्रसिद्ध आहे. हे देवा, मी आणखींहि कांहीं सांगत्यें तें ऐक.

सर्व भूतांविषयीं शरीर, वाणी व मन यांनीं अद्रोह, दया व दान हा सत्पुरुषांचा सनातन धर्म आहे. हा मनुष्यलोक प्रायः असाच अल्पायु आहे व मनुष्यें शक्ति-कौशलहीन आहेत. हे साधो, माझ्यासारखीं मनुष्यें आयुष्य, शक्ति व कौशल यांनीं हीन असूनहि शरण आलेल्या अमित्रावरहि दया करि-

तात. मग तुझ्यासारख्या सज्जनाविषयीं काय बोलावें ? ते शरण आलेल्या अमित्रावरहि दया करतील यांत काय संशय ! आणि माझ्यासारख्या दीन अबलेवर तर ते दया करतीलच यांत संशय नाहीं.

**यम**—हे साध्वि, तृषित पुरुषाला शीत जल जसें तृप्त करितें, तसेंच तूं मला तृप्त करणारें हें वाक्य बोलत आहेस. यास्तव हे शुभे, या सत्यवानाच्या जीवितावांचून कोणताहि इष्ट वर माग.

**सावित्री**—हे वैवस्वता, माझा पिता भूपाल असूनहि त्याला पुत्र नाहीं. यास्तव त्या माझ्या पित्याला शंभर औरस पुत्र व्हावे व त्यांनीं त्याच्या कुलाची वृद्धि करावी, हा तिसरा वर मी तुजपाशीं मागत आहें.

**यम**—सावित्रि, तुझ्या पित्याला कुलवर्धक तेजस्वी शंभर पुत्र होतील. हे नृपात्मजे, मीं तुझा हाहि मनोरथ पूर्ण केला आहे, यास्तव तूं आतां परत फीर. तूं फार दूरवर चालून आली आहेस.

**सावित्री**—हे भगवन्, भर्त्याच्या सांनिध्यामुळें मला हा मार्ग दूर वाटत नाहीं. माझें मन तर याहिपेक्षां दूर धांवत आहे. पण आतां तुझ्या मागोमाग जात असतांनाच माझ्या मनांत आलेली गोष्ट मी तुला सांगत्यें ऐक. तूं सूर्याचा प्रतापवान् पुत्र आहेस, म्हणूनच विद्वान् लोक तुला वैवस्वत म्हणतात. सर्व प्रजा तुझ्या समप्रशासनानें तुला वश होऊन राहिल्या आहेत. तूं 'हा शत्रु व हा मित्र' इत्यादि भेददृष्टि न ठेवतां त्यांच नियमन करितोस म्हणूनच हे ईश्वरा, तुला 'धर्मराज' असें म्हणतात. तूं धर्मानेंच दीप्त होत आहेस व तुझा धर्महि अतिशय प्रकाशत आहे.

हे देवेशा, या मर्त्यलोकीं एखाद्या साधूवर जरी विश्वास ठेविला तरी इष्टसिद्धि होते. मग मीं तर तुझ्यासारख्या साक्षात् धर्मावर विश्वास ठविला आहे. सत्पुरुषावर जसा विश्वास बसतो, तसा आपला आपल्यावरहि नसतो. म्हणूनच सर्व जीव श्रेष्ठ लोकांवर पूर्ण विश्वास ठेवून त्यांच्यापासून अलौकिक सिद्धीची इच्छा करितात. सर्व भूतांच्या सौहृदामुळेंच विश्वास उत्पन्न होतो आणि म्हणूनच सर्व जीव देवतुल्य सात्त्विक पुरुषावर पूर्ण विश्वास ठेवतात.

**यम**—हे प्रियवादिनि, तूं जसें बोललीस, तसें वचन यापूर्वी मीं आजपर्यंत कोणाच्याहि मुखानें ऐकलेलें नाहीं. या तुझ्या स्तुतिवचनानें मीं संतुष्ट झालों आहें. या सत्यवानाच्या जीवितावांचून तुला वाटेल तो चौथा वर मागून घे.

**सावित्री**—मला सत्यवानापासून शंभर औरस पुत्र व्हावे व आमचे ते पुत्र बलवीर्यसंपन्न आणि कुलाचा उद्धार करणारे व्हावे. हे सत्यसंकल्प ईश्वरा, हा चवथा वर मी तुजपाशीं मागत आहें.

**यम**—हे अबले, तुला संतोष देणारे बलवीर्यशाली शंभर पुत्र होतील. हे नृपात्मजे, तूं श्रांत होऊं नको. आपल्या आश्रमाकडे परत जा. तूं फारच दूरवर चालत आली आहेस.

**सावित्री**—हे दयालो, माझ्यासारख्या साध्वी स्त्रियांची सर्वदा शाश्वत धर्मामध्येंच प्रवृत्ति होते. पतीपासून अपत्योत्पत्ति हाच त्यांचा शाश्वतधर्म आहे. ( पण हे साध्वी, तुझ्या पतीचें आयुष्य क्षीण झालें आहे. तेव्हां तुला त्याच्यापासून संतति कशी होईल ? उत्तर )—हे देवराज, तुझ्यासारखे संत वर देऊन व्यथित होत नाहींत व ते आपलें वचन कधीं अन्यथा होऊं देत नाहींत. ( पण ही अत्यंत अशक्य गोष्ट कशी घडेल ! उत्तर—) सत्पुरुषांचा सात्त्विक व समर्थ लोकांशीं झालेला समागम कधींहि निष्फल होत नाहीं. तुझ्यासारख्या महात्म्यांना अशक्य असें कांहींच नाहीं. सत्पुरुषापासून कोणाला भीतिहि नसते. त्यामुळें मी तत्त्वतः निर्भय आहें.

सत्पुरुष आपल्या सत्यवचनाचें रक्षण करितात. यास्तव तुलाहि सत्याचें पालन करणेंच उचित आहे. सत्पुरुष सत्याच्या बलानें सूर्याला संचार करावयास लावितात. ते तपानें भूमीचें धारण करितात. भूत, भविष्यत् व वर्तमान या तिन्ही कालीं संतच सर्व प्राण्यांची गति आहे आणि संताचा सहवास करणारे सज्जन कदापि क्लेश पावत नाहींत. हे प्रभो, आर्यांनीं आचरिलेलें हें शाश्वत सद्वृत्त आहे; असें जाणून दुसऱ्यांवर उपकार करणारे संत उपकार व प्रत्युपकार यांकडेहि लक्ष देत नाहींत.

सत्पुरुषाचा प्रसाद केव्हांहि व्यर्थ होत नाहीं. अर्थ किंवा मान यांचीहि हानि होत नाहीं. ( दरिद्राचा प्रसाद धन मिळविण्याच्या उपयोगी नाहीं. श्रीमंताचा प्रसाद धनद जरी असला तरी मानद नाहीं. पण सज्जनांचा प्रसाद मान देणारा आहे आणि तो दरिद्री व श्रीमान् यांच्या प्रसादाहून श्रेष्ठ आहे. खल पुरुषाच्या ठिकाणीं प्रसादाचा अभावच असतो, हें प्रसिद्ध आहे.) आणि ज्याअर्थीं सज्जनांच्या ठिकाणीं प्रसाद, अर्थ व मान हे तिन्ही गुण नियमानें नित्य रहातात, त्याअर्थीं संत सर्वांचे रक्षक आहेत. हे देवा, तूं संत आहेस, तुझ्या ठिकाणीं हे श्रेष्ठ गुण सर्वदा वास करितात. यास्तव तूं आम्हां दीनांचा रक्षक हो.

**यम**—हे पतिव्रते, तूं जसें जसें हें धर्मयुक्त, मनाला पटणारें, मनोहर शब्दांनीं युक्त व अर्थपूर्ण भाषण करितेस, तसा तसा माझ्या मनाचा तुझ्याविषयीं उत्तम ग्रह होत चालला आहे. यास्तव तुला जो इष्ट असेल तो उत्तम वर मागून घे.

**सावित्री**—हे वरदा, तूं मला नुक्ताच पुत्रप्राप्तीचा वर दिला आहेस. तो श्रेष्ठ वर योग्य दांपत्यावांचून फलद्रूप होणें शक्य नाहीं. कारण क्षेत्रजादि पुत्र ही कांहीं फलप्राप्ति नव्हे. मदयंतीला जसा वसिष्ठापासून पुत्र झाला तसा अन्य भर्त्याचा आश्रय करून पुत्र संपादन करणें मला इष्ट नाहीं. यास्तव हे मानदा, हा माझा प्रिय पति सत्यवान् जिवंत होवो, असा वर मी तुजपाशीं मागत आहें. सत्यवानावांचून मीहि मृतच आहें.

हे यमधर्मा, पतीवांचून प्राप्त होणाऱ्या सुखाची, स्वर्गाची किंवा ऐश्वर्याची मला मुळींच इच्छा नाहीं. पतीवांचून जिवंत रहाण्यासहि मी समर्थ नाहीं. हे उदारा, तूंच पूर्वी मला शतपुत्रांचा वर दिलास व आतां माझ्या पतीच्या प्राणांचें हरण करीत आहेस. तस्मात् 'सत्यवान् जिवंत होवो' हा वर मला दे, म्हणजे तुझें वचन सत्य होईल.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, सावित्रीच्या या वक्तृत्वपूर्ण भाषणानें यमधर्म संतुष्ट झाला. त्यानें 'तथास्तु' असें म्हणून आपला पाश मुक्त केला व प्रसन्न होऊन सावित्रीला म्हटलें—"हे भद्रे, हें पहा, मीं तुझ्या पतीच्या जीवात्म्याला सोडून दिलें आहे. आतां तुझा भर्ता रोगमुक्त होऊन तुला नेण्यास समर्थ होईल व त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. या राजपुत्राला तुझ्यासह चारशें वर्षांचें आयुष्य प्राप्त होईल. हा महात्मा यज्ञ-यागादि धर्माचरणानें लोकांत प्रसिद्ध होईल. सत्यवानापासून तुला शंभर पुत्र होतील. ते सर्व क्षत्रिय राजे पुत्र-पौत्रांसह 'सावित्रा' या नांवानें प्रसिद्ध होतील व तुझें नांव इहलोकीं शाश्वत राहील.

तुझ्या मालवी मातेलाहि तुझ्या पित्यापासून शंभर पुत्र होतील. ते सर्व पुत्र-पौत्रांसह 'मालव्य' नांवानें प्रसिद्ध होतील. ते तुझे भ्राते देवतुल्य क्षत्रिय होतील."

---

१ न कामये भर्तृविनाकृता सुखं न कामये भर्तृविनाकृता दिवम् ॥
न कामये भर्तृविनाकृता श्रियं न भर्तृहीना व्यवसामि जीवितुम् ॥

याप्रमाणें सावित्रीला वर देऊन प्रतापवान् यमधर्म त्या पतिव्रतेला परतवून आपल्या सदनाला परत गेला. यम परत गेला असतां सावित्रीहि जेथें पतीचा मृतदेह होता तेथें आली. तोंपर्यंत तें कलेवर काळें-नीळें झालें होतें. सावित्रीनें त्याच्या समीप जाऊन भूमीवर पडलेलें पतीचें तें मृत शरीर जवळ घेतलें व त्याचें मस्तक पूर्ववत् आपल्या मांडीवर ठेवून ती भूमीवर बसली.

तेव्हां सत्यवान् देहभानावर येऊन सावित्रीशीं बोलूं लागला. त्यावेळीं एखादा प्रवासाहून आलेला मनुष्य जसा पुनः पुनः इतस्ततः पहात असतो, तसा वारंवार सावित्रीकडे प्रेमानें पाहून तो म्हणाला—"सावित्रि, मी बराच वेळ निजून राहिलों, तूं मला जागें कां केलें नाहींस ? मला ओढून नेणारा तो श्यामवर्ण पुरुष कोण होता !"

**सावित्री**—हे प्रभो, आपण माझ्या मांडीवर मस्तक ठेवून फार वेळ निद्रा घेतलीत. आपण ज्याला पाहिलें तो प्रजेचें नियमन करणारा भगवान् यमराज होता. तो देव आतांच निघून गेला. हे महाभाग, आपण बरीच विश्रांति घेतली, आतां आपली झोंपहि उडाली आहे. तेव्हां आतां जर शक्य असेल तर उठावें. किती रात्र झाली आहे, पहा !

**मार्कंडेय**—राजा, तो देहभानावर आलेला राजपुत्र सुखानें निजून उठल्याप्रमाणें उठून बसला व सर्व वन आणि दिशा अवलोकन करीत सावित्रीला म्हणाला—"हे शुभे, मी तुझ्यासह फलें आणण्यासाठीं या वनांत आलों. पण काष्ठें तोडीत असतां माझ्या मस्तकांत वेदना उत्पन्न झाली. त्या मस्तकशूलानें पीडित झाल्यामुळें माझ्यानें उभें रहावेना; तेव्हां मी तुझ्या मांडीवर मस्तक ठेवून निजलों. इतकें सर्व मला स्मरतें. तुझ्या स्पर्शानें माझें मन निद्रापरवश झालें.

नंतर मीं एक अंधकारासारखा भीषण व महाबलाढ्य घोर पुरुष पाहिला. तो कोण होता, हें तुला जर ठाऊक असेल तर मला सांग. मला हें स्वप्न दिसलें किंवा हे सर्व सत्यच आहे."

यावर सावित्री म्हणाली—हे राजपुत्रा, आतां रात्र होत चालली आहे. मी उद्यां आपल्याला हा सर्व वृत्तान्त सांगेन. आतां उठावें. आपल्या मातापितरांकडे लक्ष द्यावें. सूर्य अस्ताला गेला व आतां हा रात्रीचा गाढ अंधकार कसा पसरला आहे पहा. क्रूर शब्द करणारे हे हिंस्र पशु हृष्ट होऊन फिरत आहेत. वनामध्यें मृग

संचार करीत असतां त्यांच्या पावलांचा पाचोळयांतून निघणारा शब्द ऐकूं येत आहे. या घोर भालू नैऋत्य दिशेचा आश्रय करून कर्कश ध्वनि करीत आहेत. खरोखर तो शब्द ऐकून माझ्या मनाला कंप सुटला आहे.

**सत्यवान्**—सुकुमारि, हें वन अतिशय भयंकर आहे व त्यांत घनदाट अंधकार पसरला आहे. त्यामुळ तुला मार्ग सांपडणार नाहीं व तू जाऊं शकणार नाहींस.

**सावित्री**—आज दावाग्नीनें हें वन दग्ध केलें असतां एक शुष्क वृक्ष अद्यापि जळत राहिला आहे. त्याला वायु प्रज्वलित करीत असल्यामुळें कोठें कोठें अग्नि दिसत आहे. त्यांतील थोडा अग्नि आणून मी येथें काष्ठें प्रज्वलित करित्यें. आपल्या जवळ हीं काष्ठें आहेतच. यास्तव आपण चिंता करूं नये. आपल्याला अद्यापि कांहीं तरी व्यथा होत असावी, असें दिसतें. आपल्याला जर आतां जाण्याचा उत्साह वाटत नसेल व गाढ अंधकारानें व्याप्त झालेल्या या वनांत मार्ग सांपडणार नाहीं, असें वाटत असेल तर उद्यां प्रातःकालीं दिसूं लागलें म्हणजे आपण जाऊं. आपली जर याला अनुमति असेल व आपल्याला माझें म्हणणें रुचत असेल तर एक रात्र आपण येथेंच राहूं या.

**सत्यवान्**—माझ्या मस्तकांतील वेदना कधींच थांबली व अंगहि दुखत नाहीं. आतां तुझ्या अनुग्रहानें मी माता-पित्यांना भेटण्याची इच्छा करीत आहें. मी या पूर्वीं आश्रमांतून केव्हांहि अकालीं बाहेर गेलों नाहीं. कारण संध्याकाल होतांच, माझी माता मला नेहमीं बाहेर जावयास प्रतिबंध करीत असते. दिवसाहि मी बाहेर गेलों असतां माझीं माता-पिता चिंता करीत असतात आणि माझा पिता आश्रमवासी लोकांसह माझा शोध करूं लागतो.

मला एखाद्या दिवशीं बाहेरून येण्यास किंचित् वेळ लागला कीं, माझी माता व पिता ' अरे बाबा, घरीं येण्यास किती हा उशीर करतोस ! ' असें मोठ्या खेदांनें मला वारंवार म्हणत असतात. आज त्या उभयतांची माझ्या काळजीनें काय अवस्था झाली असेल ! मी इतका वेळ दृष्टीं न पडल्यामुळें त्यांना अतिशय दुःख होईल ! पूर्वीं एकदा रात्रीं मला परत जाण्यास असाच उशीर झाला होता, त्या वेळीं तीं दोघेंहि—माझीं वृद्ध माता-पितरें अतिशय दुःखार्त होऊन अश्रु ढाळूं लागलीं. तीं माझीं प्रेमल जनक-जननी नेहमीं प्रेमपूर्वक मला असें म्हणत असतात—

" बाळा, तुझ्या वांचून एक क्षणभरहि आम्हीं जिवंत रहाणार नाहीं. तूं जोंवर आहेस, तोंवरच आमचें जीवित निश्चित आहे. आम्हां वृद्ध अंधांची तूंच दृष्टि आहेस. वत्सा, तूंच आमच्या वंशाचा आधार आहेस. तूंच आम्हांला पिंड देणारा आहेस. तूंच आमचा वंशकर पुत्र आहेस व तूंच आमची कीर्ति वाढविणारा आहेस."

हे सावित्रि, माझ्या वृद्ध माता-पित्यांची खरोखरच मी यष्टि आहें. आज रात्रीं मी आश्रमांत परत आलों नाहीं असें पाहून त्यांची काय अवस्था झाली असेल! अरे अरे, या सर्व अनर्थाला कारण होणाऱ्या माझ्या निद्रेचा मी तिरस्कार करितों. या निंद्य निद्रेमुळें माझीं निरपराध माता व पिता माझ्या जीविताविषयीं साशंक झालीं असतील. या संकटांत सांपडून मीहि मोठ्या संशयांत पडलों आहें. माझ्या माता-पित्यांवांचून जिवंत रहाण्यास मी समर्थ नाहीं. माझा अंध पिता व्याकुल होऊन यावेळीं आश्रमवासी जनांतील प्रत्येकाला माझ्याविषयीं वारंवार विचारीत असेल! मला माझ्या स्वतःसाठीं खेद वाटत नाहीं, पण माझ्या वृद्ध पित्याविषयीं अतिशय दुःख होत आहे. माझी परम दुर्बल माता निरंतर आपल्या पतीलाच अनुसरत असते. तीं उभयतां आज माझ्यासाठीं परम चिंतातुर झालीं असतील. खरोखर त्यांच्या जीवावरच मी जिवंत आहें. मींच त्यांचें पालन केलें पाहिजे. त्या उभयतांचें प्रिय करणें हेंच माझें मुख्य कर्तव्य आहे.

**मार्कंडेय**—राजा, असें बोलून तो मातृ-पितृभक्त व त्यांना प्रिय असलेला राजपुत्र दुःखार्त झाला आणि दोन्ही हात वर करून उच्च स्वरानें रोदन करूं लागला. तेव्हां पतीला शोकाकुल झालेलें पाहून धर्मचारिणी सावित्रीनें स्वहस्तानें त्याचे अश्रुयुक्त नेत्र पुसले व त्या मंजुभाषिणीनें त्याचें असें सान्त्वन केलें.

**सावित्री**—मीं जर तप आचरिलें असेल, दान दिलें असेल व हवन केलें असेल, तर आजची ही रात्र माझी श्वश्रू, श्वशुर, पति व मी या सर्वांस सुखकारक होवो. मीं पूर्वी विनोदादि प्रसंगींहि कधीं असत्य भाषण केल्याचें मला आठवत नाहीं. त्या सत्यप्रभावानें माझे पूज्य श्वश्रू-श्वशुर जिवंत राहोत.

**सत्यवान्**—सावित्रि, आतां चल, विलंब लावूं नको. मी माता-पित्यांच्या दर्शनाविषयीं अतिशय उत्सुक झालों आहें. आपण सत्वर जाऊं या. माझ्या अंध पित्याचा किंवा वृद्ध मातेचा जर कां कांहीं विपरीत परिणाम झाला असला,

तर तें अप्रिय पाहून मी जीव ठेवणार नाहीं, हें मी तुला स्वतःची शपथ घेऊन सांगतों. यास्तव हे साध्वि, तुझें चित्त धर्मामध्यें रत असेल, मी जीवंत रहावें असें तुला वाटत असेल व माझें प्रिय करण्याची तुझी इच्छा असेल तर आपण अगोदर आश्रमाकडे जाऊं या.

**मार्कंडेय**—हे पांडुपुत्रा, सत्यवानाचें हें वचन ऐकून सावित्री एकदम उठली, तिनें आपले मोकळे सुटलेले केंस सांवरून बांधले व आपल्या दोन्ही हातांनीं धरून पतीला उठविलें. तेव्हां सत्यवान् उठून उभा राहिला. त्यानें आपल्या हातानें अंगावरील धूलि झाडली, सर्व दिशांकडे एकदा दृष्टि फिरविली व तो फल-मूलादिकांनीं भरलेल्या परडीकडे पहात उभा राहिला.

तेव्हां त्याचा आशय जाणून सावित्री म्हणाली—"हीं फळें आपण उद्यां आणावीं. आज तीं येथेंच असूं देत. आपल्या जीविकेचें साधन असा हा परशु तेवढा मी घेत्यें."

इतकें बोलून सावित्री जेथें ती परडी होती तेथें गेली. तिनें फलादिकांनीं भरलेली ती परडी वृक्षाच्या एका शाखेला टांगून ठेविली व ती परशु घेऊन पतीच्या समीप परत आली. त्या पतिव्रतेनें आपल्या डाव्या स्कंधावर प्रिय पतीचा उजवा हात ठेविला व उजव्या हातानें त्याला धरून ती गजगामिनी आश्रमाकडे निघाली.

**सत्यवान्**—हे भीरु, नेहमींच्या संवयीनें या वनांतील मार्ग माझ्या माहितींतले आहेत. शिवाय वृक्षांच्या शाखांतून चंद्रप्रकाश मधून मधून पसरला आहे. त्यामुळें मार्गहि दिसत आहे. आपण ज्या मार्गानें फळें गोळा करीत गेलों, त्याच मार्गानें आतां परत जात आहोंत. यास्तव हे शुभे, चल. आतां व्यर्थ विचारांत पडूं नको. पुढें हा जो पलाशवृक्षांचा समूह दिसत आहे त्याच्याजवळ ह्या मार्गाचे दोन भाग होतात. यास्तव त्याच्या दक्षिणेकडील मार्ग सोडून तूं उत्तरेकडील मार्गानें चल. मला आतां उत्साह वाटत आहे व चालण्याची शक्तीहि आली आहे. माझ्या माता-पितरांना भेटण्यास मी अतिशय उत्सुक झालों आहें.

**मार्कंडेय**—युधिष्ठिरा, याप्रमाणें सावित्रीशीं बोलत तो राजपुत्र प्रिय पत्नीसह त्वरेनें आश्रमाकडे चालला. ३. २०. २९७.

---

## अध्याय २९८ वा.

[ १ सत्यवानाचा त्याच्या पित्यानें वनांत केलेला शोध. २ ऋषींचें आश्वासन. ३ सावित्रीसह सत्यवानाचें आश्रमांत आगमन. ४ वनांतील वृत्तान्तकथन. ]

( १ ) **मार्कंडेय**—धर्मराजा, इतक्यांत इकडे महाबलाढ्य द्युमत्सेनाला अकस्मात् दृष्टि प्राप्त झाली. त्यामुळें तो प्रसन्न मनानें सर्वत्र पाहूं लागला. पण सत्यवानाला जाऊन दीर्घ काल झाला तरी तो अद्यापि परत येत नाहीं, हें पाहून तो चिंतातुर झाला व आपल्या शैब्या भार्येसह पुत्राच्या शोधार्थ निघाला. त्या राजदाम्पत्यानें रात्रीं वनें, आश्रम, नद्या व सरोवरें यांतून संचार करून पुत्राचा सर्वत्र शोध केला.

कोठें कांहीं शब्द ऐकूं आला कीं तीं दोघें पुत्राच्या शंकेनें मुख वर करून पहात व सावित्रीसह सत्यवान् येत आहे असें म्हणत. याप्रमाणें त्या महावनांत हिंडत असतां त्यांचे पाय विदीर्ण झाले. दगड, कांटे व ठेंचा लागून झालेल्या व्रणांतून रक्त वाहूं लागलें. त्यांचे देहहि कुश, कंटक इत्यादिकांनीं विद्ध झाले. तथापि तीं दोघें पुत्रशोधार्थ उन्मत्ताप्रमाणें त्या वनांत धांवत होतीं.

त्या उभयतांची अशी दीनावस्था पाहून आश्रमवासी विप्र त्यांच्या सभोंवार जमले व त्यांचें सान्त्वन करून त्यांना आश्रमांत परत घेऊन आले. आपल्या आश्रमांत येऊन भार्येसह बसलेल्या त्या राजाला वृद्ध तापसांनीं पूर्वींच्या नृपालांच्या विचित्र कथा सांगून आश्वासन दिलें. याप्रमाणें ब्राह्मणांनीं धीर दिला असतांहि तीं दोघें वृद्ध पुत्रदर्शनासाठीं व्याकुल झालीं व पुत्राच्या बाल्यावस्थेंतील लीलांचें स्मरण करून दुःख करूं लागलीं. शोकार्त झालेलीं तीं उभयतां करुण वाणीनें पुनः पुनः असा विलाप करूं लागलीं—" हे पुत्रा, तूं कोठें आहेस ? हे साध्वि वधू, तूं कोठें गेलीस ? "

( २ ) त्यांचा हा विलाप ऐकून सत्यवचनी ब्राह्मण त्या वृद्धांचें पुनः सान्त्वन करूं लागले. **सुवर्चा**—हे राजा, ज्याअर्थीं तुझ्या पुत्राची भार्या सावित्री तप, दम व आचार यांनीं युक्त आहे, त्याअर्थीं सत्यवान् निश्चयानें जिवंत आहे. असें समज.

**गौतम**—हे नृपते, मीं सांग-वेदाचें अध्ययन केलें आहे, माझा तपःसंचय फार मोठा आहे. मी आबाल ब्रह्मचारी आहें. मीं गुरु व अग्नि यांस संतुष्ट केलें आहे. मीं शांत चित्तानें सर्व व्रतें आचरिलीं आहेत. मीं सर्वदा वायुभक्षण व उपवास यथाविधि केले आहेत. या सर्व तपोबलानें मी दुसऱ्यांचें सर्व हृद्गत

जाणतों. यास्तव मी जें सांगत आहें तें सत्य आहे, असें समज. सत्यवान् जिवंत आहे. तूं भिऊं नको.

**शिष्य**—ज्याअर्थी माझ्या गुरूच्या मुखांतून निघालेलें वचन कदापि मिथ्या होत नसतें, त्याअर्थी सत्यवान् जिवंत आहे.

**ऋषि**—ज्याअर्थी सत्यवानाची भार्या सावित्री सर्व सुलक्षणांनीं युक्त आहे, त्याचप्रमाणें सौभाग्यचिह्नांनींहि मंडित आहे, त्याअर्थी सत्यवानाच्या जीविताला भय नाहीं.

**भारद्वाज**—या राजपुत्राची साध्वी भार्या सावित्री तपस्विनी, दमनशील व सदाचारसंपन्न आहे. यास्तव सत्यवानाच्या जीविताविषयीं संशयच नाहीं.

**दाल्भ्य**—हे भूपते, ज्याअर्थी तुझी नष्ट झालेली दृष्टि तुला अकस्मात् प्राप्त झाली आहे आणि सावित्री व्रत आचरून आहार न करतां भर्त्याबरोबर गेली आहे, त्याअर्थी सत्यवान् निःसंशय जिवंत आहे.

**आपस्तंब**—ज्याअर्थी शांत दिशेमध्यें हे पशुपक्षी मधुर शब्द करीत आहेत व तुझें आचरण राजत्वाला योग्य असेंच आहे, त्याअर्थी सत्यवान् जिवंत आहे.

**धौम्य**—हे राजर्षे, तुझा पुत्र जसा सर्व गुणांनीं संपन्न असून लोकप्रिय आहे, तसाच तो दीर्घायुत्वाच्या लक्षणांनींहि युक्त आहे. यावरून सत्यवान् निश्चयानें जिवंत आहे, असें जाण.

( ३ ) **मार्कंडेय**—युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या सत्यवाक् तापसांनीं आश्वासन दिलें असतां द्युमत्सेन त्यांची योग्यता जाणून स्वस्थ झाला. त्यानंतर दोन घटकांनीं सावित्री आपल्या सत्यवान् भर्त्यासह आश्रमांत परत आली व तिनें मोठ्या संतुष्ट चित्तानें आपल्या पर्णशालेंत प्रवेश केला.

**ब्राह्मण**--हे पृथ्वीपते, तुला पुत्र भेटला व तूं पुनः चक्षुष्मान् झालास, हें पाहून आम्ही सर्व तुझ्या उत्कर्षाविषयीं प्रश्न करीत आहों. हे नृपश्रेष्ठा, पुत्राची भेट, सावित्रीचें दर्शन व चक्षूंची प्राप्ति या तीन लाभामुळें तुझा उत्कर्ष वाढत आहे. आम्ही सर्वांनीं जें म्हटलें तें सत्य आहे, यांत संशय नाहीं. तुझी सत्वरच अधिक समृद्धि होईल.

( ४ ) युधिष्ठिरा, असें बोलून ते सर्व ब्राह्मण अग्नि प्रज्वलित करून त्याच्या सभोंवार द्युमत्सेनापाशीं बसले. सत्यवान् व त्याची जननीहि तेथेंच येऊन बसली. त्यावेळीं शोकरहित झालेली सावित्री एका बाजूला उभी होती, तीहि

सर्वांच्या अनुज्ञेनें त्यांच्या समीप येऊन बसली. तेव्हां राजाच्या समीप बसलेले ते सर्व वनवासी जन मोठ्या जिज्ञासेनें त्या राजपुत्राला वनांतील वृत्तान्त विचारूं लागले.

ऋषि—हे राजकुमारा, तूं भार्येसह वनांतून या पूर्वींच कां परत आला नाहींस ? तुला एवढी अपरात्र कां झाली ? मार्गांत तुम्हांला कांहीं प्रतिबंध झाला कीं काय ? हे नृपात्मजा, तूं पिता, माता आणि आम्ही या सर्वांना असा संताप कां दिलास, हें कांहींच कळत नाहीं. यास्तव हे वीरा, तुझ्या विलंबाचें कारण आम्हांला सांग.

सत्यवान्—हे तापसहो, पित्याची अनुज्ञा घेऊन मी सावित्रीसह वनांत निघून गेलों. तेथें काष्ठें तोडीत असतां अकस्मात् माझें मस्तक भयंकर दुखूं लागलें व त्या वेदनेमुळें मीं शयन करतांच मला तत्काल गाढ निद्रा लागली. यापूर्वीं मी एवढा वेळ कधींच निजलों नव्हतों. पण जागृत होतांच आपणां सर्वांना काळजी वाटूं नये, म्हणून अशा अपरात्रीं परत आलों. यावांचून दुसरें कांहींच कारण नाहीं.

सत्यवानाचें हें भाषण ऐकून गौतम म्हणाला—हे नृपनंदना, तुझ्या या द्युमत्सेन पित्याला अकस्मात् दृष्टि कशी प्राप्त झाली, याचें कारण तुला ठाऊक नाहीं. परंतु या सावित्रीला माहित आहे. हे सावित्रि, तुला दृश्य व अदृश्य या दोन्ही गोष्टींचें ज्ञान आहे. तुझें तेज सावित्री-देवतेप्रमाणें आहे, हें मी जाणतों. तुला याचें कारण माहीत आहे. यास्तव सत्यवार्ता आम्हांला सांग. तें जर गुप्त नसेल तर आम्हांला कथन कर. तुझ्या मुखानें तें ऐकण्याची आमची इच्छा आहे.

सावित्री—हे द्विजश्रेष्ठहो, तुम्ही म्हणतां तें सत्य आहे. आपला संकल्प कदापि अन्यथा होत नसतो. यांत माझें रहस्य कांहींहि नाहीं. मी आपल्याला घडलेला वृत्तान्त निवेदन करत्यें, ऐका. देवर्षि नारदानें माझ्या पतीचा नियत मृत्युदिन मला पूर्वींच सांगितला होता. तो दिवस आज असल्यामुळें मी पतीपासून दूर राहूं शकलें नाहीं. वनामध्यें त्यानें शयन केलें असतां साक्षात् यम आपल्या दूतांसह तेथें आला व त्याचे प्राण घेऊन आणि ते बद्ध करून दक्षिण दिशेकडे जाऊं लागला. तेव्हां मीं त्या देवाला सत्यवचनानें संतुष्ट केलें व त्यानें प्रसन्न होऊन मला जे पांच वर दिले ते ऐका.

माझ्या पूज्य श्वशुराला चक्षु व राज्य यांची प्राप्ति हे दोन वर दिले. माझ्या पित्याला शंभर पुत्र व मलाहि शंभर पुत्र हे दोन वर मिळाले आणि शेवटल्या पांचव्या वरानें माझ्या सत्यवान् भर्त्याला चारशें वर्षें आयुष्य प्राप्त झालें आहे. पतीच्या जीवितासाठींच मीं हें व्रत आचरिलें. याप्रमाणें खरा वृत्तांत मीं आपल्याला सविस्तर सांगितला आहे. माझ्या या महा दुःखाचा परिणाम अशा रीतीनें सुखप्रद झाला आहे.

ऋषि—हे साध्वि, तूं सुशील व कुलीन आहेस. या नरेश्वराचें संकटग्रस्त झालेलें कुल तमोमय डोहांत बुडालें होतें, त्याचा तूं आपल्या सदाचरणानें व व्रताच्या पुण्यानें उद्धार केलास.

मार्कंडेय—धर्मराजा, याप्रमाणें त्या सर्व ऋषींनीं त्या श्रेष्ठ पतिव्रतेची प्रशंसा करून तिचा सत्कार केला आणि राजा द्युमत्सेन व राजपुत्र सत्यवान् यांची अनुज्ञा घेऊन ते आनंदित झालेले सर्व विप्र आपल्या आश्रमांत सुखानें निघून गेले. १. २०. २९८.

---

## अध्याय २९९ वा.

[ १ द्युमत्सेनाला प्रजेनें केलेला राज्याभिषेक. २ यमाच्या वरांची फलद्रूपता. ३ फलश्रुति. ]

( १ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, ती रात्र निघून गेली असतां दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होतांच ते सर्व तपोधन ऋषि आपापलीं पौर्वाह्णिक कर्में करून त्या राजर्षीच्या आश्रमांत जमले व सावित्रीचें महाभाग्य सांगून तृप्त न झालेले ते महर्षि द्युमत्सेनाला तो वृत्तान्त पुनः पुनः कथन करूं लागले. इतक्यांत शाल्वदेशांतील सर्व प्रजाजन राजाच्या आश्रमांत आले व त्याच्या पूर्व अमात्यानें शत्रूचा वध केल्याची वार्ता त्याला सांगूं लागले.

प्रजाजन—हे प्रभो, आपल्या मंत्र्यानें बांधव व साह्यकर्ते यांसह शत्रूंचा संहार केला आहे. शत्रुसैन्याचा पराभव होऊन ते पळून गेले. तुझ्या सर्व नागरिकांनीं ‘ द्युमत्सेनराजा अंध असो किंवा चक्षुष्मान् असो, तोच राजा आम्हांला मान्य आहे.’ असा एक मतानें निश्चय करून चतुरंग सेनेसह हीं वहानें घेऊन आम्हांला तुझ्या समीप पाठविलें आहे. यास्तव हे महाराज, तूं

सत्वर राजधानींत चल. तुझ्या विजयाची घोषणा नगरींत सुरू आहे. राजा, तुझें कल्याण असो. तूं या पितृ-पैतामहांच्या राज्याचा दीर्घकाल उपभोग घे.

कुंतीपुत्रा, नंतर कांतिमान् द्युमत्सेनाला दृष्टि प्राप्त झालेली पाहून ते सर्व प्रजाजन विस्मित झाले. त्यांचे नेत्र आश्चर्यानें विकसित झाले व त्या सर्वांनीं मस्तक नम्र करून राजाला अभिवादन व वृद्ध आश्रमवासी द्विजांना वंदन केलें. नंतर त्या सर्व विप्रश्रेष्ठांनीं राजाचा सत्कार केला असतां तो आपल्या नगरीकडे जावयास निघाला. राजपत्नी शैब्या आपल्या सुलक्षणी सावित्री स्नुषेसह उत्तम मेण्यांत बसून निघाली. त्या श्रेष्ठ वाहनांत मूल्यवान् आसन असून त्याला मनुष्यें वाहून नेत होतीं. त्यांच्या बरोबर सर्व सेना चालली होती.

युधिष्ठिरा, याप्रमाणें द्युमत्सेनानें बहुमानपूर्वक नगरींत प्रवेश केला असतां पुरोहितांनीं मोठ्या प्रीतीनें त्याला राज्याभिषेक व महात्म्या सत्यवानाला यौव-राज्याभिषेक केला. त्यानंतर दीर्घ कालानें सावित्रीला शंभर पुत्र झाले. ते सर्व कीर्तिमान् व शूरांनाहि अजिंक्य होते. त्याचप्रमाणें सावित्रीची माता मालवी, हिलाहि मद्राधिप अश्वपतीपासून शंभर पुत्र झाले. ते सर्वहि सावित्रीचे सोदर भ्राते अतिशय बलाढ्य निपजले. याप्रमाणें त्या श्रेष्ठ पतिव्रतेनें आपला पिता, माता, श्वश्रू, श्वशुर, स्वतः आपण व भर्त्याचें समग्र कुल यांचा संकटांतून उद्धार केला. त्याचप्रमाणें हे धर्मराजा, ही पांचाली सावित्रीसारखीच कुलांगना आहे. यास्तव ही शीलसंपन्न द्रौपदी तुम्हां सर्वांना तारील, यांत संशय नाहीं.

**वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें मार्कंडेय मुनीनें विविध पतिव्रतांच्या कथा सांगून युधिष्ठिराचें सान्त्वन केलें. तेव्हां तो पांडव शोक व संताप यांचा त्याग करून काम्यकवनांत समाधानानें राहूं लागला.

राजा, सावित्रीचें हें उत्कृष्ट आख्यान जो कोणी भक्तीनें श्रवण करील तो सुखी होईल. त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील व त्या मनुष्याला कदापि दुःख होणार नाहीं. ३. २०. २९९.

येथें विसावें पतिव्रतामाहात्म्यपर्व समाप्त झालें.

---

# कुंडलाहरणपर्व २१



## अध्याय ३०० वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ कुंडलांचें दान न करण्याविषयीं सूर्याचा कर्णाला उपदेश. ३ कर्णाचें उत्तर. ]

( १ ) **जनमेजय**—हे वैशंपायना, पूर्वीं लोमश मुनीनें 'पांडुपुत्र युधिष्ठिराला अद्यापि महद्भय आहे. तें धनंजय परत गेल्यावर मी निवृत्त करीन.' असें इंद्राच्या वचनावरून म्हटलें होतें. पण त्या धर्मात्म्यानें तें कोणालाहि सांगितलें नव्हतें. यास्तव कर्णापासून युधिष्ठिराला कोणतें महद्भय होतें, तें मला सांग.

( २ ) **वैशंपायन**—राजा, तूं विचारीत असलेली ही कथा मी तुला सविस्तर सांगतों ऐक. पांडवांच्या वनवासाचीं बारा वर्षें पूर्ण होऊन तेरावें वर्ष प्राप्त झालें असतां पांडुपुत्रांच्या हितेच्छेनें इंद्र कर्णापाशीं कुंडलांची भिक्षा मागावयास प्रवृत्त झाला. तेव्हां देवेंद्राचा हा आशय जाणून सूर्य, सहज कुंडलांसाठीं कर्णाकडे आला.

हे महाराज, त्या वेळीं तो उदार कर्ण उत्कृष्ट मंचकावर शयन करीत होता. त्या वीराची ती शय्या मूल्यवान् आस्तरणानें युक्त होती. तो ब्राह्मणभक्त सत्यवादी वैकर्तन स्वस्थ चित्तानें निजला असतां सूर्यानें ब्राह्मणरूपानें त्याला स्वप्नांत दर्शन दिलें.

हे भारता, पुत्रस्नेहामुळें त्या आदित्याचें मन दयेनें आर्द्र झालें. त्या प्रकाशमान सूर्यानें योगैश्वर्ययुक्त ब्राह्मणाचें रूप धारण केलें व तो कर्णाच्या हितासाठीं त्याला असें सान्त्व वचन बोलला—"वत्सा कर्णा, तूं सत्यप्रतिज्ञ लोकांमध्यें श्रेष्ठ आहेस. तूं माझें हें हितवचन ऐक. मी तुला आज स्नेहामुळें तुझें परम हित सांगत आहें. पांडवांचें हित करण्यासाठीं इंद्र तुझ्यापाशीं येणार आहे. तो देवेंद्र तुझ्या सहज कुंडलांचें हरण करण्याच्या इच्छेनें ब्राह्मणवेषानें येऊन तुजपाशीं याचना करील.

हे प्रियदर्शना, तूं भिक्षार्थी याचकाला दान देत असतोस, परंतु कदापि याचना करीत नाहींस, हें तुझें शील सर्व जगाला जसें विदित आहे, तसें त्या

पाकशासनालाहि कळलें आहे. हे कर्णा, ब्राह्मण द्रव्य किंवा अन्य जें कांहीं मागतील तें दान तूं त्यांना देत असतोस, कोणाहि याचकाला तूं केव्हांहि ‘नाहीं’ म्हणत नाहींस. हें तुझें औदार्य जाणून स्वतः इंद्र तुझीं कुंडलें व कवच यांची भिक्षा मागण्यास येईल. त्यावेळीं त्या याचकाला तूं आपलीं कुंडलें देऊं नको. त्याचें तूं मोठ्या धैर्यानें सान्त्वन कर. म्हणजे तुझें परम कल्याण होईल. तो तुजपाशीं कुंडलांची याचना करूं लागला, म्हणजे अनेक कारणें सांगून व कुंडलांची इच्छा करणाऱ्या त्या पुरंदराला रत्नें, स्त्रिया, धेनु आणि धन इत्यादि अनेक प्रकारच्या वस्तु अर्पण करून त्याचें निवारण कर. कारण हे कर्णा, तूं जर हीं तुझीं दोन सहज शुभ कुंडलें देऊन टाकशील, तर तुझ्या आयुष्याचा क्षय होऊन तूं मृत्यूच्या वश होशील. हे मानदा, तूं जोंवर या कवच-कुंडलांनीं युक्त आहेस, तोंवर रणामध्यें शत्रूला अवध्य आहेस. हें माझें वचन सत्य समज. तुला जर जीवित प्रिय असेल तर या रत्नकुंडलांचें रक्षण कर. तीं अमूल्य कुंडलें अमृतापासून उद्भवलीं आहते.”

कर्ण—हे भगवन्, मजविषयीं परम स्नेह दाखवून अशा प्रकारें माझ्याशीं भाषण करणारा तूं जातिब्राह्मण नाहींस, असें मला वाटतें. यास्तव ब्राह्मणवेष धारण करणारा तूं कोण आहेस, हें जाणण्याची माझी इच्छा आहे.

ब्राह्मण—अरे बाबा, मी सहस्रांशु सूर्य आहें. केवळ स्नेहामुळें मी तुला हें हितवचन सांगत आहें. माझ्या या उपदेशाप्रमाणें तूं वर्तन कर. त्यांतच तुझें परम कल्याण आहे.

( ३ ) कर्ण—हे प्रभो, ज्याअर्थीं तूं–भगवान् सूर्य माझ्या हितेच्छेनें मला उपदेश करून माझें रक्षण करण्याची इच्छा करीत आहेस, त्याअर्थीं त्यांतच माझें अत्यंत श्रेय आहे, यांत संशय नाहीं. परंतु माझें हें वचन ऐक. तुज वरद ईश्वराला प्रसन्न करून मी प्रेमानें प्रार्थना करितों कीं, मी जर तुला प्रिय असेन तर मला या व्रतापासून तूं निवृत्त करूं नको.

हे विभावसो, मी ब्राह्मणश्रेष्ठांना प्राणहि अर्पण करीन, हें माझें व्रत लोकांत प्रसिद्ध आहे. यास्तव इंद्र पांडुपुत्रांच्या हितासाठीं ब्राह्मणाच्या कपटवेषानें जरी माझ्याकडे कुंडलांची भिक्षा मागण्यास आला तरी हे देवश्रेष्ठा, मी हीं दोन्ही कुंडलें व हें उत्तम कवच त्याला निःशंकपणें देईन. पण त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेली माझ्या औदार्याची कीर्ति नष्ट होऊं देणार नाहीं.

हे भानो, माझ्यासारख्याला कीर्तीच अधिक प्रिय आहे. प्राणरक्षण नव्हे. यशानें युक्त असलेलें मरण लोकसंमत आहे. यास्तव मी याचना करणाऱ्या इंद्राला कवचासह कुंडलें अर्पण करीन. तो बल व वृत्र यांचा वध करणारा इंद्र जर माझ्यापाशीं पांडुपुत्रांच्या हितार्थ भिक्षेसाठीं येऊन उभा राहिला, तर मीं त्या शक्राला कवचासह कुंडलांचें दान केल्यानें माझी कीर्तीच होईल. मी आपलें जीवित देऊनहि कीर्तीला वरीन. कीर्तिमानाला स्वर्ग प्राप्त होतो व अपकीर्तीनें मनुष्याचा नाश होतो. कीर्तीच मनुष्याला इहलोकीं माते-प्रमाणें संजीवन देते.

मनुष्य जिवंत असला तरी अकीर्ति त्याला मृतवत् करून टाकिते. हे लोके-श्वरा, पूर्वीं ब्रह्मदेवानें हा पुरातन श्लोक स्वतः गाईला आहे—' कीर्ति हेंच पुरुषाचें आयुष्य आहे. परलोकीं कीर्ति हेंच त्याचें परायण आहे. इहलोकीं विशुद्ध कीर्ति आयुष्य वाढवितें. '

यास्तव हे प्रभो, मी माझ्या देहाबरोबर उत्पन्न झालेलीं हीं कुंडलें देऊन शाश्वत कीर्ति संपादन करीन. हे आदित्या, ब्राह्मणांना यथाविधि दान देऊन, संग्रामांत स्वशरीराचा होम करून, अतिशय दुष्कर कर्म आचरून आणि युद्धांत शत्रूंना जिंकून मी केवल यश संपादन करीन. युद्धामध्यें भ्यालेल्या व जीवितार्थी लोकांना अभय देऊन व वृद्ध, बाल आणि द्विज यांना भयापासून मुक्त करून मी या लोकीं श्रेष्ठ यश व परलोकीं उत्तम स्वर्ग प्राप्त करून घेईन. मी जीवित देऊनहि कीर्तीचें रक्षण करीन. हेंच माझें व्रत आहे. मी कपट-वेषधारी इंद्राला ही श्रेष्ठ भिक्षा देऊन देवलोकीं परम गतीला प्राप्त होईन. ३. २१. ३००.

---

## अध्याय ३०१ ला.

[ १ सूर्याचा कर्णाला हितोपदेश. ]

( १ ) सूर्य—तूं अशा रीतीनें आपलें आणि सुहृद्, पुत्र, भार्या व माता-पिता या सर्वांचें अहित करूं नको. मानवांनीं शाश्वत स्वर्ग देणारी कीर्ति आपल्या देहाची हानि होणार नाहीं, अशा प्रकारचें शौर्य व दान यांच्या

---

१ कीर्तिमानश्नुते स्वर्गं हीनकीर्तिस्तु नश्यति। कीर्तिर्हि पुरुषं लोके संजीवयति मातृवत्। अकीर्तिर्जीवितं हन्ति जीवतोपि शरीरिणः॥

योगानें संपादन करणेंच योग्य होय. पण तूं ज्याअर्थीं आपल्या प्राणांना संकटांत घालून शाश्वत कीर्ति इच्छीत आहेस, त्याअर्थीं ती कीर्ति तुझे प्राण घेऊन निघून जाईल, यांत संशय नाहीं.

मनुष्य जिवंत असला तर पिता, माता, पुत्र व या लोकीं जे इतरहि बांधव असतील, त्यांचें कार्य करूं शकतो. त्याच्या पराक्रमानें राजांचेंहि हित होत असतें. तूं जर जिवंत राहिलास तर तुझ्या पित्रादिकांना सुख होईल, पण तूं मरण पावलास तर त्यांना सुख कोठचें! हे महाबुद्धिमाना, पुरुषाची जिवंतपणीं होणारी कीर्तिच सुखप्रद होय. देह भस्मीभूत झाल्यावर त्या मृताला स्वकीर्तीचा काय उपयोग! मृत मनुष्य कीर्ति जाणत नाहीं. जिवंतपणींच कीर्तीचें सुख अनुभवितां येतें. गतप्राण झालेल्या शवाला घातलेली पुष्पमाला जशी व्यर्थ, तशीच मृत माणसाची कीर्ति निरुपयोगी आहे.

हे वैकर्तना, तूं माझा भक्त आहेस आणि भक्तांचें रक्षण करणें हा माझा धर्म आहे. म्हणून तुझ्या हितेच्छेनें मी तुला हें सांगत आहें. 'हा भक्त माझी परम भक्तीनें उपासना करीत आहे, हें पाहून माझ्याहि मनांत तुझ्याविषयीं स्नेह उत्पन्न झाला व मी तुला हें प्रेमानें सांगत आहें. यास्तव तूं माझ्या सांगण्याप्रमाणें वाग. शिवाय यांत देवनिर्मित कांहीं गूढ रहस्यहि आहे. तस्मात् मी तुला पुनः पुनः सांगतों कीं, तूं निःशंकपणें असें वर्तन कर.

हे राधेया, हें देवांचें गूढ तुला कळणें शक्य नाहीं. यास्तव मीहि आतांच तें तुला सांगत नाहीं. योग्यकालीं तुला तें सहजच कळेल. हे उदारात्म्या, मी तुला पुनः एकदा सांगतों तें ऐक. वज्रधर शक्र भिक्षार्थ आला असतां त्याला तूं आपलीं कुंडलें देऊं नको. हे कर्णा, या सुंदर कुंडलांच्या योगानें तूं विशाखा नक्षत्रांच्या दोन तेजस्वी ताऱ्यांमध्यें प्रकाशणाऱ्या पूर्णचंद्राप्रमाणें शोभत आहेस. जिवंत राहिलें तरच पुरुषाची कीर्ति त्याला सुखावह होते, असें तूं निश्चित समज.

यास्तव, हे वत्सा, कुंडलांची इच्छा करणाऱ्या त्या सुरेश्वराचा तूं निषेध कर. अनेक हेतुयुक्त वाक्यांनीं देवेंद्राची कुंडलेच्छा निवृत्त करणें तुला शक्य आहे.

प्रथम सर्वतः स्वतःचें रक्षण करावें. सर्पाला कदापि अंगुलि देऊं नये. शरीररक्षण हेंच आद्य धर्मसाधन आहे, इत्यादि युक्तियुक्त मधुर भाषणानें तूं त्या पुरंदराचें निवारण कर.

हे नरश्रेष्ठा, तूं नेहमीं सव्यसाचीबरोबर स्पर्धा करीत असतोस. पण शूर धनंजय समरामध्यें जेव्हां तुझ्याशीं युद्ध करण्यास उभा राहील, त्यावेळीं हे कर्णा, तूं जर या कुंडलांनीं युक्त असलास तरच युद्धामध्यें साक्षात् इंद्र जरी त्याला साह्य करीत असला तरी तो तुला जिंकण्यास समर्थ होणार नाहीं. पण यांच्या अभावीं तो तुला सहज पराभूत करील! यास्तव हे वीरा, तुला जर रणांत अर्जुनाला जिंकण्याची इच्छा असेल, तर हीं शुभ कुंडलें तूं त्या शचीपतीला देऊं नको. ३. २१. ३०१.

---

## अध्याय ३०२ रा.

[ १ कर्णाचा याचक इंद्राला विमुख न पाठविण्याचा निश्चय. २ सूर्याचा त्यास वासवी शक्ति मागून घेण्याचा उपदेश. ]

( १ ) **कर्ण**—हे गोपते सूर्या, आपण समजतां तसाच मी आपला परम भक्त आहें, परंतु मला अदेय असें कांहींच नाहीं. हे आदित्या, तुजवरील उत्कट भक्तीमुळें तूं मला अत्यंत इष्ट आहेस. तुजवर माझें जें प्रेम आहे तें माझी भार्या, पुत्र, सुहृद् यांवर किंबहुना माझ्या स्वतःवरहि नाहीं. महात्मे आपल्या इष्ट भक्तांचें निरंतर प्रिय करीत असतात, हें तुला ठाऊकच आहे.

हे भास्करा, 'हा कर्ण माझा इष्ट भक्त आहे व तो स्वर्गात मजवांचून अन्य दैवत जाणत नाहीं,' हें जाणूनच तूं मला हितवचन सांगितलेंस. यास्तव मी मस्तक नम्र करून पुनः पुनः तुझी याचना करितों व प्रार्थना करून सांगतों कीं, हे प्रभो, मला क्षमा कर. मी मृत्यूला जितका भीत नाहीं, तितका असत्याला भितों! यास्तव विशेषतः सज्जन द्विजांना दान करते वेळीं मी आपल्या जीविताचाहि विचार करीत नाहीं.

हे देवा, आतां तूं जें मला अर्जुनाविषयीं सांगितलेंस, ती तुझ्या मनांतील तापदायक भीति सोडून दे. मी अर्जुनाला युद्धांत निःसंशय जिंकीन. हे सूर्या, तुलाहि माझें अस्त्रबल माहित आहे. मला हीं श्रेष्ठ अस्त्रें जामदग्न्य राम व महात्मा द्रोणाचार्य यांच्यापासून प्राप्त झालीं आहेत. यास्तव हे सुरश्रेष्ठा, इंद्र भिक्षार्थ आला असतां मी स्वतःच्या जीविताचेंहि दान देईन, हें माझें व्रत तूं लक्षांत ठेव आणि मला अनुज्ञा दे.

(२) सूर्य—वत्सा, तूं इंद्राला हीं शुभ कुंडलें जर दिलींस तर तूंहि त्या महाबलाढ्य देवाला सांग कीं, हे शतक्रतो, मी तुला एका अटीवर कुंडलें देईन. हे कर्णा, तूं या कुंडलांनीं युक्त असेपर्यंत रणांत सर्व भूतांना अवध्य आहेस. यास्तव युद्धांत अर्जुनाकडून तुझा नाश करविण्यासाठींच तो इंद्र तुझी प्रार्थना करून कुंडलें हरण करण्याची इच्छा करीत आहे.

हे वत्सा, तूं मधुर वाणीनें त्या देवेशाला प्रसन्न करून हा अमोघ वर मागून घे. 'हे सहस्राक्षा, तुझी शत्रूंचा नाश करणारी अमोघ शक्ति मला दे आणि मी तुला माझ्या उत्तम कवचांसह कुंडलें देतों.' असा नियम करून तूं शक्राला कुंडलें दे. हे कर्णा, त्या शक्तीनें तूं रणांत शत्रूचा वध करण्यास समर्थ होशील. हे महाबाहो, ती देवराजाची अमोघ शक्ति सहस्रावधि शत्रूंचा नाश केल्यावांचून तुझ्या हातीं परत येणार नाहीं.

वैशंपायन—जनमेजया, असें बोलून तो आदित्य एकदम अंतर्धान पावला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं जपानंतर कर्णानें सूर्याला आपलें स्वप्न निवेदन केलें. त्या राधेयानें रात्रीं स्वप्नांत जें पाहिलें होतें व उभयतांचें जें भाषण झालें होतें, तें सर्व त्यानें तत्त्वतः यथाक्रम सूर्याला सांगितलें. तें ऐकून राहूचें दमन करणारा भानु हंसून कर्णाला म्हणाला "तूं पाहिलेंस तें सर्व सत्य आहे," तेव्हां कर्ण त्यावर विश्वास ठेवून शक्तीची आकांक्षा करीत वासवाची वाट पाहूं लागला. ३. २१. ३०२.

---

## अध्याय ३०३ रा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ कुंतिभोजराजाची कथा. ३ कुंतीला ब्राह्मण-परिचर्येची आज्ञा. ]

( १ ) जनमेजय—हे तपोधना, सूर्यानें कर्णाला न सांगितलेलें तें गुह्य कोणतें ? आणि तीं कवचकुंडलें कशा प्रकारचीं होतीं ? त्याला तीं कवच-कुंडलें कोठून प्राप्त झालीं ? हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव तो वृत्तान्त मला सांग.

(२) वैशंपायन—हे राजन्, विभावसूचें गुह्य कृत्य व त्या कवच-कुंडलांचें वृत्त मी तुला सांगतों, ऐक. पूर्वी एकदा कुंतिभोज राजाकडे प्रखर तेजस्वी दुर्वास-ऋषि आला होता. तो शीघ्रकोपी ब्राह्मण अतिशय उंच होता. त्याची श्मश्रु व जटा

वाढल्या होत्या, त्यानें दंड धारण केला असून तो दर्शनीय होता. त्याचें शरीर निर्दोष असून तो आपल्या तेजानें जणुं काय प्रदीप्त झालेला दिसत होता. त्याचा वर्ण मधाप्रमाणें पिंगट असून मधुर भाषण करणारा तो ऋषि तपःस्वाध्यायानें भूषित झाला होता.

असा तो महातपस्वी ब्राह्मण कुंतिभोज राजाला म्हणाला—हे विमत्सर राजा, मला तुझ्या गृहीं भिक्षान्न मिळावें अशी इच्छा आहे. परंतु तूं किंवा तुझे अनुचर यांनीं माझें अप्रिय करतां कामा नये. हें जर तुला मान्य असेल तर मी तुझ्या घरीं राहीन. मला वाटेल तेव्हां मी बाहेर जाईन व मनाला रुचेल तेव्हां परत येईन. त्याचप्रमाणें माझें आसन, शय्या इत्यादि परिचर्येंत कोणीं प्रमाद केला तर तो मला सहन होणार नाहीं.

तेव्हां कुंतिभोजानें प्रेमपूर्वक 'ठीक आहे' असें बोलून पुनः त्याला म्हटलें—"हे महाप्राज्ञा, माझी 'पृथा'-नामक यशस्विनी कन्या आहे. ती साध्वी, शीलसंपन्न व नियमनिष्ठ आहे. ती तुझा अवमान न करतां तुझ्या सेवेंत तत्पर राहील. तिच्या सुशील वर्तनानें तूं संतुष्ट होशील."

(३) इतकें बोलून राजानें त्या विप्राची यथाविधि पूजा केली व आपल्या विशालनयना पृथा कन्येजवळ येऊन म्हटलें—"हे वत्से, हा महाभाग ब्राह्मण माझ्या गृहीं रहाण्याची इच्छा करीत आहे. मीं त्याचें म्हणणें मान्य केलें आहे. हे कन्ये, तूं या ब्राह्मणाची योग्य परिचर्या करशील अशा विश्वासानें मीं त्या विप्राला 'रहा' असें म्हटलें आहे. तस्मात् माझा तो शब्द केव्हांहि मिथ्या होणार नाहीं, असा यत्न तूं कर.

हे पृथे, हा स्वाध्यायनिरत तपस्वी ब्राह्मण आहे. यास्तव तो जें कांहीं म्हणेल, तें त्याला शुद्ध मनानें देत जा. कारण ब्राह्मणच परम तेज व परम तप आहे. ब्राह्मणांच्या नमस्कारांनींच हा सूर्य स्वर्गामध्यें विराजत आहे. पूज्य ब्राह्मणांचा अवमान केल्यामुळें वातापि व तालजंघ हे महा असुर ब्रह्मदंडानें नाश पावले. बाले, अशा ब्राह्मणाची सेवा करण्याचा मोठा भार आज तुझ्या शिरावर आला आहे.

हे नंदिनि, तूं नित्य नियमनिष्ठ होऊन या ब्राह्मणाची परिचर्या कर. बाल्यापासूनच तुझी ही वृत्ति मला माहित आहे. तूं चित्तैकाग्र्यानें ब्राह्मण व सर्व गुरु आणि बंधु यांची सेवा करीत असतेस. त्याचप्रमाणें भृत्यवर्ग, मित्र व संबंधी

या सर्वांना संतुष्ट ठेवून वागत असतेस. मलाहि तूं आपल्या सौजन्यानें प्रसन्न केलें आहेस. तुझ्या प्रेमळ वर्तनामुळें नगरांत, अंतःपुरांत किंवा तुझ्या सेवकजनांत कोणीहि असंतुष्ट नसतें.

यास्तव हे बाले, त्या क्रोधी ब्राह्मणाच्या सेवेंत तुलाच नियुक्त करावें, असें मला वाटतें. त्याला प्रसन्न करण्यास तूंच समर्थ आहेस. हे पृथे, बाल्यापासूनच मीं तुला माझी कन्या मानली आहे. वृष्णिकुलोत्पन्न 'शूर'-नृपतीची तूं प्रिय कन्या आहेस. त्यानें 'मी आपलें प्रथम अपत्य तुला देईन' अशी प्रतिज्ञा केली होती, त्याप्रमाणें त्या नृपालानें स्वतः बालपणींच तुला मोठ्या प्रेमानें मला अर्पण केलें. त्यामुळें तूं माझी कन्या झाली आहेस. तूं वसुदेवाची भगिनी असून माझ्या सर्व अपत्यांत ज्येष्ठ आहेस.

हे वत्से, अशा उच्च कुलांत तुझा जन्म झाला असून तूं श्रेष्ठ कुलांत वाढत आहेस. एका सरोवरांतून दुसऱ्या सरोवरांत प्रवेश करणाऱ्या नलिनीप्रमाणेंच तूं सुखांतून सुखाला प्राप्त झाली आहेस. हीन कुलोत्पन्न लोक यत्किंचित् प्रतिबंध झाला असतां दुष्टपणा करीत असतात. प्रायः स्त्रिया बालभावामुळें विकारवश होतात, पण तूं राजकुलांत उत्पन्न झाली आहेस व तुझें रूपहि अद्भुत आहे. तूं अनेक विशिष्ट गुणांनीं युक्त असून मानी आहेस यास्तव दर्प, दंभ व मान यांचा त्याग करून तूं या ब्राह्मणाला संतुष्ट कर. या वरद विप्राला तूं प्रसन्न केलेंस, तर तुझें निश्चयानें कल्याण होईल, पण तो द्विजश्रेष्ठ जर क्रुद्ध झाला तर माझें समग्र कुल दग्ध करील." ३. २१. ३०३.

---

## अध्याय ३०४ था.

[ १ राजाला कुंतीचें उत्तर. २ राजाचें तिला प्रोत्साहन व प्रार्थनापूर्वक कन्येचें ब्राह्मणास सेवार्थ समर्पण. ]

( १ ) कुंती—हे राजेंद्रा, तूं त्या विप्रश्रेष्ठापाशीं जशी प्रतिज्ञा केली आहेस, तशी मी नियमनिष्ठ होऊन त्या ब्राह्मणाची परिचर्या करीन, हें मी अगदीं सत्य सांगतें. द्विजांचा सत्कार करणें हा माझा स्वभावच आहे. शिवाय तुझें प्रिय कार्य करणें मला श्रेयस्करच आहे. हे तात, तो पूज्य ब्राह्मण संध्याकाळीं येवो, सकाळीं, रात्रीं किंवा मध्यरात्रीं येवो, तो मजवर क्रुद्ध होणार नाहीं, अशाच प्रकारें मी त्याची सर्व सिद्धता ठेवीन. तुझ्या आज्ञेंत राहून द्विजाची सेवा व तुझें हित करण्याचा मला आज हा मोठाच अनुकूल अवसर प्राप्त झाला आहे.

हे महाराज, तूं निश्चिंत हो. तुझ्या घरीं रहाणाऱ्या विप्राचें अप्रिय मी कधींहि करणार नाहीं, हें मी तुला सत्य सांगतें. जें त्या द्विजाचें प्रिय व तुझें हित असेल, तेंच करण्याचा मीं यत्न करीन, यास्तव तूं आपल्या मनांतील चिंता सोडून दे. महाभाग ब्राह्मणांचा सत्कार केला असतां, ते तारण्यास व विपरीत आचरण केल्यास वध करण्यास समर्थ असतात, हें जाणणारी मी त्या द्विजश्रेष्ठाला संतुष्ट करीन. माझ्या दोषानें तुला त्या ब्राह्मणापासून यत्किंचित्हि व्यथा होणार नाहीं. पूर्वीं ज्याप्रमाणें सुकन्येच्या अपराधामुळें च्यवनमुनीनें राजाचें अनिष्ट केलें त्याप्रमाणें राजांनीं अपराध केला असतांहि ब्राह्मण त्यांचें अनिष्ट करितात हें मला अवगत आहे. यास्तव हे नरेंद्रा, तूं ब्राह्मणाला जसें वचन दिलें आहेस तशीच मी परम नियमानें युक्त होऊन त्याच्या परिचर्येंत तत्पर राहीन.

जनमेजया, कन्येचें हें भाषण ऐकून संतुष्ट झालेल्या राजानें तिला आलिंगून अनेक प्रकारें आश्वासन दिलें व पुढील सर्व कर्तव्याची दिशा दाखविली.

( २ ) राजा—हे निष्पाप कन्ये, तूं स्वतःच्या, माझ्या व कुलाच्या हितासाठीं निःशंकपणें याप्रमाणें वर्तन ठेव.

असें बोलून त्या महायशस्वी द्विजवत्सल कुंतिभोज राजानें आपली पृथा कन्या परिचर्येसाठीं त्या द्विजाच्या स्वाधीन केली व म्हटलें—"हे ब्रह्मन्, ही माझी कन्या बाला असून सुखांत वाढली आहे. हिनें जर कांहीं अपराध केला तर तो तूं मनावर घेऊं नको. वृद्ध, बाल व तपस्वी यांनीं जरी नित्य अपराध केला, तरी महाभाग ब्राह्मण प्रायः त्यांच्यावर क्रुद्ध होत नसतात. कोणीं फार मोठा अपराध केला तरीहि ब्राह्मणांनीं क्षमा करणेंच उचित आहे. यास्तव, हे द्विजश्रेष्ठा, या बालेनें तिच्या उत्साहानुरूप यथाशक्ति केलेल्या सत्काराचा स्वीकार कर."

त्यावर ब्राह्मणानें 'ठीक आहे' असें म्हटलें असतां राजानें मोठ्या प्रेमानें त्याला स्वतंत्र गृह दिलें. तें गृह हंसाप्रमाणें शुभ्र आणि चंद्रकिरणांप्रमाणें स्वच्छ व प्रसन्न होतें. त्या राजाच्या अग्न्यगारांत त्या विप्राचें तेजस्वी आसन ठेविलें होतें. तेथेंच त्याचें आहारादि सर्व सिद्ध असे. राजकन्या पृथा आलस्य व मान सोडून परम यत्नानें त्या ब्राह्मणाच्या सेवेंत तत्पर रहात होती. ती सती शुचिर्भूत होऊन त्या पूजार्ह ब्राह्मणाची देवाप्रमाणें यथाविधि परिचर्या करूं लागली. ३.२१.३०४.

---

## अध्याय ३०५ वा.

[ १ कुंतीनें केलेली ब्राह्मणसेवा. २ प्रसन्न झालेल्या ब्राह्मणानें तिला दिलेला वर. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, व्रताचरणी कुंतीनें त्या तीक्ष्ण व्रतें आचरणाऱ्या ब्राह्मणाला आपल्या शुद्ध मनानें संतुष्ट केलें. तो क्रोधी ब्राह्मण कधीं 'मी सकाळीं येतों' असें म्हणून संध्याकाळीं येत असे, किंवा 'रात्रीं येतों' असें सांगून सायंकालींच उपस्थित होत असे. परंतु त्या सर्व वेळीं त्याचें सर्वसंपन्न भक्ष्य-भोज्य, शयन-आसन इत्यादि सिद्ध ठेवून ती कन्या सर्वदा त्याच्या सत्कारांत दक्ष असे.

तो विप्र केव्हां त्या राजकन्येची निर्भर्त्सना करीत असे, कधीं अन्नांत दोष काढून तिला अपशब्द बोलत असे. तरीहि सुशील पृथेनें त्या ब्राह्मणाचें कदापि अप्रिय केलें नाहीं. तो द्विज नेहमीं अकालीं येऊन दुर्लभ असलेलें अन्न मागत असे. परंतु ती सुकन्या न त्रासतां त्या त्या वेळीं त्याला इष्ट असलेले पदार्थ तयार करून देत असे.

अशाप्रकारें शिष्य, पुत्र किंवा भगिनी यांप्रमाणें त्या निष्पाप कन्यारत्नानें ब्राह्मणश्रेष्ठाच्या इच्छेचें यत्किंचित्हि उल्लंघन न करतां त्याची प्रीति संपादन केली. पृथेची शमादि वृत्ति, परिचर्या व चित्तैकाग्र्य यांच्या योगानें तो द्विज संतुष्ट झाला व समाधिकालीं तिच्या कल्याणाचें चिंतन करूं लागला.

प्रतिदिवशीं सकाळीं व सायंकाळीं पिता तिला 'हे वत्से, तुझ्या परिचर्येनें ब्राह्मण प्रसन्न आहेना ?' असें विचारीत असे. तेव्हां ती यशस्विनी 'होय, तो परम संतुष्ट आहे,' असें त्याला सांगत असे. कन्येचें हें उत्तर ऐकून उदार मनाच्या कुंतीभोजाला संतोष वाटत असे.

याप्रमाणें एक संवत्सर पूर्ण झाला. तेव्हां तो तपस्वी ब्राह्मण निरपेक्ष उपकार करणाऱ्या पृथेच्या अंगीं यत्किंचित्हि दोष नाहीं, असें पाहून प्रसन्न मनानें तिला म्हणाला—"हे शुभे, तुझ्या या परिचर्येनें मी संतुष्ट झालों आहें. यास्तव या लोकीं मानवांना दुष्प्राप्य असलेले कोणतेहि इष्ट वर मागून घे. म्हणजे तूं आपल्या यशानें सर्व श्रेष्ठ स्त्रियांचा पराभव करशील."

**कुंती**—वेदवेत्त्या विप्रश्रेष्ठा, तूं आणि माझा पिता मजवर प्रसन्न झालां आहां, यांतच मी कृतकृत्य झाल्यें. हाच माझा श्रेष्ठ वर आहे. मला दुसऱ्या कोणत्याहि वराची इच्छा नाहीं.

( २ ) ब्राह्मण—हे भद्रे, तूं ज्याअर्थी माझ्यापासून कोणताहि वर मागण्याची इच्छा करीत नाहींस, त्याअर्थी देवतांना बोलाविण्याचा हा मंत्र ग्रहण कर. या मंत्रानें तूं ज्या ज्या दैवताचें आह्वान करशील, तें दैवत तुझ्या वश होऊन तुझ्यापुढें उभें राहील. तो देव स्वेच्छेनें असो किंवा अनिच्छेनें असो, तुझ्या अधीन होईल. या मंत्रानें प्रसन्न झालेला तो देव एखाद्या भृत्याप्रमाणें नम्र होऊन तुजपाशीं येईल.

वैशंपायन—राजा, ब्राह्मणाचें हें वचन ऐकून ती राजनंदिनी त्या वेळीं शापभयानें त्याच्यापुढें कांहींच बोलूं शकली नाहीं. त्यानंतर त्या ब्राह्मणानें 'अथर्वशिरस्'-नांवाच्या वेदभागांत श्रुत असलेला मंत्रसमूह त्या निरिच्छ बालेकडून ग्रहण करविला. याप्रमाणें कुंतीला मंत्र देऊन तो ब्राह्मण कुंतिभोजराजाला म्हणाला—"हे राजन्, तुझ्या कन्येच्या परिचर्येनें संतुष्ट होऊन मी येथें सुखानें राहिलों. तुझ्या गृहांतील उत्तम सत्कारानें मी तृप्त झालों आहें. आतां मी जातों," इतकें बोलून तो मुनि अंतर्धान पावला. तेव्हां विप्र तेथेंच गुप्त झालेला पाहून राजा विस्मित झाला व त्यानें पृथेची प्रशंसा केली. ३.२१.३०५.

---

## अध्याय ३०६ वा.

[ १ कुतीचें सूर्यास आवाहान. २ त्याचें आगमन. ३ कुंतीशीं संवाद. ]

( १ ) वैशंपायन—हे महाराजा, तो द्विजश्रेष्ठ निघून गेला असतां कांहीं कारणानें ती राजकन्या पृथा त्या मंत्राच्या बलाबलाचा विचार करूं लागली. "त्या महात्म्यानें मला कशा प्रकारचा मंत्रसमूह दिला आहे, त्याचें बलाबल मी लवकरच जाणीन." असा विचार करणारी ती बाला यदृच्छेनें ऋतुमती झाली. त्यायोगें बालभावानें लज्जित झालेली ती साध्वी राजप्रासादाच्या गच्चीवर गेली व श्रेष्ठ शय्येला पात्र असलेली ती पृथा तेथें बसली असतां तिनें पूर्व दिशेत उदय पावलेलें आदित्यमंडल पाहिलें.

तेव्हां तिची दृष्टि त्या सूर्यबिंबावर खिळली. परंतु त्या संध्याकालीन आदित्याच्या तेजानें तिला ताप झाला नाहीं. तिला दिव्यदृष्टि प्राप्त झाली व कवचकुंडलांनीं सुशोभित असलेल्या त्या भास्कराचें तिला दिव्य दर्शन झालें. त्यावेळीं पृथेला त्या मंत्राविषयीं कुतूहल उत्पन्न होऊन तिनें त्या देवाला बोलाविण्याचें मनांत आणिलें. तिनें आचमन करून चक्षुःश्रोत्रादि इंद्रियांना जलाचा स्पर्श केला व मंत्राचा जप करून सूर्याचें आवाहन केलें.

( २ ) हे राजन्, कुंतीनें बोलावितांच तो भानु मोठ्या त्वरेनें तेथें आला. त्याचा वर्ण मधासारखा पिंगट असून मान शंखासारखी होती. त्या महाबाहूनें किरीट व बाहुभूषणें धारण केलीं होतीं. तो देव हंसतच जणु काय दिशा प्रज्वलित करीत पृथेसमीप आला. त्यानें योगबलानें स्वतःचे दोन विभाग केले. त्यांतील एक अंतरिक्षांत जगताला तप्त करीत राहिला व दुसरा कुंतीपाशीं येऊन सामोपचारानें मधुर भाषण करूं लागला.

(३) सूर्य—हे भद्रे, तुझ्या मंत्रबलानें वश झालेला मी आलों आहें. मी तुझें कोणतें कार्य करूं, तें सांग म्हणजे मी तें करीन. हे राज्ञि, मी तुझ्या अधीन झालों आहें.

कुंती—हे भगवन्, तूं जसा आलास तसाच परत जा. मी सहज जिज्ञासेनें तुला बोलाविलें. मजवर प्रसन्न हो. कोपूं नको.

सूर्य—हे सुंदरि, तूं सांगत्येस त्याप्रमाणें मी परत जाईन, परंतु देवाला बोलावून त्याच्या प्रसादाला प्राप्त न होतां त्याला परत पाठविणें योग्य नव्हे. हे सुकन्ये, आपल्याला कवच-कुंडलांनीं युक्त व अप्रतिम वीर्यवान् पुत्र सूर्यापासून प्राप्त व्हावा अशी तुझी मनीषा आहे. यास्तव तूं आतां मला आत्मसमर्पण कर. तुझ्या मन-संकल्पाप्रमाणें तुला पुत्र होईल. तुझ्या समागमानंतर मी परत जाईन.

हे सुहासिनि, तूं जर आज माझें वचन नाकारून माझें प्रिय केलें नाहींस, तर मी क्रुद्ध होऊन तुझा पिता, दुर्वास ऋषि व तूं या सर्वांना शाप देईन. तुझ्या या कृतीमुळें मी त्या सर्वांना निःसंशय दग्ध करून टाकीन. तुझा मूढ पिता तुझा हा अन्याय जाणत नाहीं, म्हणून त्याला आणि तुझा स्वभाव व शील न जाणतां तुला मंत्र देणारा तो ब्राह्मण, यालाहि मी दंड करीन.

हे भाविनि, हे पहा, स्वर्गांतून इंद्रादि सर्व देव तूं फसविलेल्या मजकडे पाहून जणुं काय हंसतच आहेत. मीं तुला पूर्वींच जी दिव्य दृष्टि दिली आहे आणि ज्या दिव्य चक्षूंनीं तूं मजकडे पाहिलेंस, त्याच दृष्टीनें हे सर्व सुरगण पहा.

वैशंपायन—नंतर आकाशांत स्व-स्व-स्थानीं स्थित असलेल्या त्या सर्व देवांना त्या राजकन्येनें पाहिलें. आदित्य जसा प्रचंड तेजस्वी व देदीप्यमान होता, तसेच तेहि सर्व देव प्रकाशत होते. त्यांना पाहून लज्जित झालेली ती

बाला भयभीत होऊन सूर्याला म्हणाली—"हे गोपते, तूं आपल्या विमानाकडे निघून जा. मी कन्या असल्यामुळें असें दुराचरण करणें योग्य नव्हे. माझा पिता, माता, किंवा जे अन्य गुरुजन असतील त्यांनाच माझ्या देहाचें दान करण्याचा अधिकार आहे. स्त्रियांचें देहरक्षण हेंच श्रेष्ठ शील मानलें जातें. यास्तव मी या लोकीं माझ्या धर्माचा लोप होऊं देणार नाहीं. हे भास्करा, मीं अज्ञानानें मंत्रबल पहाण्याच्या इच्छेनें तुला बोलाविलें, यास्तव 'मी बाला आहें' असें समजून तूं मला क्षमा कर."

सूर्य—हे कुंति, तूं बाला आहेस, म्हणूनच मी तुजवर हा अनुग्रह करितों. अन्य कोणालाच अशा प्रकारच्या अनुग्रहाचा लाभ मिळत नसतो. हे भीरु, तूं मला आत्मसमर्पण कर. त्यामुळेंच तुझ्या मनाला शांति प्राप्त होईल. मला मंत्रानें बोलावून आणून माझें आगमन व्यर्थ होणें योग्य नव्हे. मीं इष्ट कार्य केल्यावांचून परत जाणें उचित नाहीं. मी जर तसाच परत गेलों तर लोकांत माझा उपहास होईल व देव माझी निंदा करतील. यास्तव हे शुभे, तूं माझा स्वीकार कर, त्यायोगें तुला माझ्यासारखा तेजस्वी पुत्र होईल व तूंहि सर्व लोकांत प्रसिद्ध होशील, यांत संशय नाहीं. ३. २१. ३०६.

---

## अध्याय ३०७ वा.

[ १ कुंतीचें अधर्मभीतीनें निषेधपर वचन. २ सूर्यानें केलेलें तिचें समाधान. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, याप्रमाणें त्या कन्येनें अनेक प्रकारें युक्तियुक्त मधुर भाषण केलें, परंतु ती यशस्विनी त्या सहस्रांशूचें निवारण करण्यास समर्थ झाली नाहीं. त्या तमोनुद सूर्याला निरुत्तर करण्यास असमर्थ असलेल्या त्या बालेनें शापभयानें बराच वेळ असा विचार केला—"माझा पिता व तो ब्राह्मण निरपराध असतांना त्यांना माझ्या दोषामुळें या क्रुद्ध विभावसूचा शाप कां बाधावा! अल्पवयी सज्जनांनीं चित्ताच्या परवशतेमुळें जरी एखादी हिंसा केली तरी ते निष्पापच असतात. खरोखर! मजसारख्या अज्ञ जनांनीं सूर्यासारख्या प्रखर तेजस्वी देवाशीं व दुर्वासासारख्या उग्र तपस्वी ब्राह्मणांशीं कदापि विशेष सलगी करूं नये. आज मी अतिशय भयभीत झाल्यें आहें व या देवानें माझा हात दृढ धरून ठेवला आहे. त्याला मी स्वतःच आत्मसमर्पण करून हें अकार्य कसें आचरूं!"

**वैशंपायन**—हे राजसत्तमा, शापभयानें त्रस्त झालेली ती राजकुमारी मनांत असा अनेक प्रकारें विचार करीत होती. तिला आपल्या आप्तबांधवांची व सखीजनांची फार भीति वाटत होती. मोहानें परवश झालेली ती बाला लज्जेनें व्याप्त झाली व मंद स्वरानें पुनः सूर्याचें मन परावृत्त करण्याचा प्रयत्न करूं लागली.

**कुंती**—हे देवा, माझी माता, पिता व इतर आप्त-बांधव जिवंत आहेत. यास्तव ते सर्व गुरुजन जिवंत असतांना मीं तुला अशा प्रकारें विधिवर्जित आत्मसमर्पण केल्यानें धर्मलोप होईल आणि माझ्या या दुष्कृतीनें या श्रेष्ठ कुलाची कीर्ति नष्ट होईल. किंवा तूं जरी हा धर्मच मानीत असलास तरी माझ्या बांधवांनीं मला अर्पण केल्यावांचून मी तुझी इच्छा कशी करावी! मी सती आहें, तेव्हां त्यांच्या अनुज्ञेवांचून तुला आत्मसमर्पण कसें करूं ? हे दुर्धषा, प्राण्याचा धर्म, यश, कीर्ति व आयुष्य हीं सर्व तुझ्याच अधीन आहेत.

( २ ) **सूर्य**—हे शुचिस्मिते, तुझी माता, पिता किंवा गुरुजन यांतील कोणाचीहि तुझ्या देहावर सत्ता नाहीं. याविषयीं मी तुला एक धर्म्यवचन सांगतों तें ऐक. हे भाविनि, 'कमि' या धातूचा अर्थ 'कामना करणें' असा आहे आणि कुमारी सर्वांची कामना करितात म्हणून त्यांना 'कन्या' हें नांव प्राप्त झालें आहे. यास्तव हे कन्ये, तूं स्वतंत्र आहेस.

यांत कोणत्याहि प्रकारचा अधर्म नाहीं. मी लोकहित करण्याच्या इच्छेनें अधर्माचरण कसें करीन ! सर्व स्त्रिया आणि पुरुष यांचे संबंध स्वैर आहेत. हीं लोकांचा स्वभावच आहे. विवाहादि संस्कार हे बाह्य नियम आहेत, असें स्मृत आहे. तूं माझ्या समागमानंतर कन्याच रहाशील आणि तुला महायशस्वी महाबाहु पुत्र होईल.

**कुंती**—हे भगवन्, तुझ्यापासून होणारा पुत्र कवच-कुंडलांनीं युक्त असेल काय ? तो महाबाहु शूर व महाबलाढ्य निपजेल ना ?

**सूर्य**—हे भद्रे, तो महाबाहु दिव्य कवच व कुंडलें यांसह उत्पन्न होईल. तीं त्याचीं सहज भूषणें अमृतमय असतील.

**कुंती**—हे देवा, तुझ्यापासून होणारा तो पुत्र जर अमृतमय सहज कवच-कुंडलांनीं युक्त होईल, तर मी तुझें सांगणें मान्य करित्यें. तो माझा पुत्र तुझ्या सारखाच रूप, वीर्य, बल व धर्म यांनीं संपन्न असावा.

**सूर्य**—हे राज्ञि, अदितीनें मला जीं कुंडलें दिलीं आहेत, तीं मी त्याला अर्पण करीन, आणि माझें हें उत्कृष्ट कवचहि देईन.

**कुंती**—हे भगवन्, ठीक आहे, मी तुझी इच्छा पूर्ण करीन, पण तूं म्हणतोस तसा श्रेष्ठ पुत्र मला झाला पाहिजे.

**वैशंपायन**—राजा, तेव्हां त्या आकाशचर योगात्म्या भास्करानें ' तथास्तु ' असें बोलून त्या राजकन्येच्या नाभीला स्पर्श केला. त्यावेळीं सूर्याच्या तेजानें विह्वल झालेली ती बाला देहभान विसरली व शय्येवर पडली.

**सूर्य**—हे सुंदरि, मी आतां तुला कृतकार्य करितों. तूं सर्व शस्त्रधारण करणारांत श्रेष्ठ अशा पुत्राला जन्म देशील आणि तूं पूर्ववत् कन्याच रहाशील.

**वैशंपायन**—हे पांडवेया, तेव्हां ती लज्जित झालेली बाला सूर्याला ' ठीक आहे ' असें म्हणाली. नंतर सूर्याची प्रार्थना करणारी ती कुंतीराजाची सलज्ज कन्या भग्न झालेल्या लतेप्रमाणें त्या पवित्र शय्येवर मोहित होऊन पडली. सूर्यानें आपल्या तेजानें तिला मोहित करून योगबलानें तिच्या देहांत प्रवेश केला. त्यानें तिला दूषित न करितां तिचें कौमार्यरक्षण केलें. नंतर कांहीं वेळानें ती बाला देहभानावर आली. ३. २१. ३०७

---

## अध्याय ३०८ वा.

[ १ कर्णाची उत्पत्ति. २ कुंतीनें त्याला पेटींत घालून नदींत सोडते वेळीं केलेला विलाप. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पृथ्वीपते, त्यानंतर माघ शुक्ल प्रतिपदेस कुंतीनें गर्भ धारण केला व तिच्या उदरीं आकाशचर चंद्राप्रमाणें त्या बालकाचा उद्भव झाला.

त्या अल्पवयी बालेनें आप्तजनांच्या भीतीनें आपली गर्भधारणा गुप्त ठेविली. त्यामुळें तिची गर्भावस्था बाहेर कोणालाच कळली नाहीं. त्या दीर्घदर्शी कुमारीनें स्त्रियांनाहि ही वार्ता समजूं दिली नाहीं. आपलें रहस्य राखण्यांत दक्ष असलेल्या त्या राजकन्येनें अंतःपुरांतील धात्रीच्या एका कन्येवांचून कोठेंहि या प्रकाराची वाच्यता केली नाहीं.

राजा, पुढें योग्य कालीं ती कन्या प्रसूत झाली व त्या देवाच्या प्रसादानें तिला देवतुल्य पुत्र झाला. तो बालक आपल्या पित्याप्रमाणेंच सहज कवचानें

आणि सुवर्णासारख्या उज्ज्वल कुंडलांनीं युक्त होता. त्याचे स्कंध वृषभासारखे व नेत्र सिंहासारखे होते.

तो बालक जन्म पावतांच त्या मानी पृथेनें धात्रीशीं संकेत केला व त्याला एका उत्कृष्ट लांकडी पेटींत घातलें. ती पेटी आंतून मृदु आस्तरणांनीं युक्त असून, जलाचा आंत प्रवेश होऊं नये म्हणून तिला बाहेरून मेणाचा लेप केला होता. कुंतीनें अतिशय खिन्न मनानें तिचें गुळगुळित उत्तम झांकण घट्ट बसविलें व ती पेटी अश्वनदीमध्यें सोडून दिली.

( २ ) हे राजन्, कौमार्यावस्थेंत गर्भधारणा होणें, हें निंद्य होय, असें जाणत असूनहि त्या अर्भकाला नदींत सोडतांना पुत्रस्नेहानें ती कन्या व्याकुल झाली व शोक करूं लागली. पेटी नदींत सोडतेवेळीं रडणारी कुंती काय म्हणाली तें ऐक—" हे बाळा, अंतरिक्ष, पृथ्वी, देव, भूतें व जलचर प्राणी यांच्या पासून पीडा न होतां तुझे मार्ग सुखकर होवोत. तुला कोणीहि शत्रु नसो. एखादा चोर तुझ्या समीप येतांच त्याच्या मनांतील तुजविषयींचा दुष्ट विचार नाहींसा होवो. सलिलेश्वर वरुण राजा व अंतरिक्षांतील वायु तुझें रक्षण करो. जगताला तप्त करणाऱ्या ज्या सूर्यानें मला दिव्य विधीनें तुझ्यासारखा पुत्र दिला, तो तुझा पिता तुझें रक्षण करो. आदित्य, इंद्र, रुद्र, साध्य, विश्वेदेव, मरुत, इंद्रासह दिशा व त्यांचे ईश्वर दिक्पाल हे सर्व देव सम व विषम कालीं तुझें संरक्षण करोत. या सहज कवचानें चिह्नित असलेल्या तुला मी विदेशांतहि ओळखूं शकेन.

हे वत्सा, नदीप्रवाहांतून वहात जाणाऱ्या तुला दिव्य दृष्टीनें पहाणारा तुझा जनक विभावसु देव धन्य होय. जी भाग्यवती स्त्री तुझें पुत्रत्वानें लालनपालन करील व तृषित झालेल्या तुझें दुग्धपानानें पोषण करील ती धन्य होय. हे देवात्मजा, तूं आदित्यासारखा तेजस्वी आहेस. दिव्य कवच-कुंडलांनीं युक्त आहेस. तुझे नेत्र कमलपत्राप्रमाणें असून आरक्त पद्मदलाप्रमाणें उज्ज्वल आहेत. तुझें ललाट व केंस अतिशय सुंदर आहेत. ' अशा देवतुल्य पुत्राचें मी पालन करीन ' असें तुला प्राप्त होणाऱ्या स्त्रीला कधीं स्वप्न तरी पडलें असेल काय ? धूलीनें व्याप्त झालेल्या देहानें भूमीवर रांगणाऱ्या तुझे अस्पष्ट मधुर शब्द ऐकणारे लोक धन्य होत. हिमालयाच्या वनांत उत्पन्न झालेल्या सिंहाप्रमाणें यौवनारूढ झालेल्या तुला जे पाहतील ते खरोखर भाग्यवान् होत. "

हे राजन्, याप्रमाणें अनेक प्रकारें करुण स्वरानें विलाप करणाऱ्या पृथेनें अश्वनदीच्या जलप्रवाहांत ती पेटी सोडून दिली. पुत्रदर्शनलालसेनें ती अतिशय शोकार्त झाली होती. पण ती राजकन्या 'ही वार्ता आपल्या पित्याला कळेल' या भीतीनें ती पेटी रात्रीं नदींत सोडून धात्रीसह राजमंदिरांत परत आली व पुनः शोकाकुल झाली. ती पेटी अश्वनदींतून वहात वहात चर्मण्वती नदींत गेली. तेथून यमुनेंत व यमुनेंतून गंगेंत जाऊन शेवटीं ती चंपा नगरीपाशीं आली. तो सूतांचा प्रदेश होता. नदीतरंगांनीं वाहून नेला जाणारा तो पेटींतील बालक अमृतापासून उत्पन्न झालेलीं दिव्य कवच-कुंडलें धारण करीत होता. ईश्वरनिर्मित दैवानेंच त्याचें रक्षण केलें. ३. २१. ३०८.

---

## अध्याय ३०९ वा.

[ १ राधेला नदींतून वहात येणाऱ्या पेटीची प्राप्ति. २ त्यांतील बालकाचा पुत्रत्वाने स्वीकार व पालन. ३ कर्णाची अस्त्रविद्या व कौरवांशीं सख्य. ४ इंद्राचें भिक्षार्थ आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याच वेळीं धृतराष्ट्राचा सखा व सारथि अधिरथ आपल्या भार्येसह भागीरथीच्या तीरावर आला. त्याची भार्या या भूलोकीं अप्रतिम रूपवती होती. त्या 'राधा'-नामक महाभागेनें अपत्यासाठीं विशेषतः पुष्कळ यत्न केले, तथापि तिला पुत्र झाला नव्हता. ती राधा नदीतीरावर येतांच जलप्रवाहांतून वहात येणारी ती पेटी यदृच्छेनें तिच्या दृष्टीं पडली. त्या पेटीच्या संरक्षणार्थ तिला दूर्वा-कंकणादिरूप नाडा-दोरा बांधला होता. ती पेटी कुंकुमाच्या हातांनीं चिह्नित केली होती. जाह्नवीच्या लाटांनीं ती पेटी आपोआप तीराच्या समीप आली.

तेव्हां राधेनें कुतूहलानें ती पेटी धरून ठेवविली व तें वृत्त अधिरथ सूताला निवेदन केलें. तेव्हां त्यानें ती जलांतून ओढून तीरावर आणली व शस्त्रानें तिचें झांकण उघडलें. तों त्यांत एक बालक दिसला. तो तरुण आदित्याप्रमाणें तेजस्वी असून सुवर्ण कवचानें युक्त होता. अमूल्य कुंडलांनीं त्याचें वदन शोभत होतें. अशा त्या बालकाला पाहून भार्येसह सूताचे नेत्र विस्मयानें प्रफुल्ल झाले. तो त्या अर्भकाला मांडीवर घेऊन भार्येला म्हणाला—" हे भीरु, मी जन्मल्यापासून आजच असलें अद्भुत आश्चर्य प्रथम पहात आहें. खरो-

खर हा देवपुत्रच आपल्याला प्राप्त झाला आहे, असें मला वाटतें. अपत्य-हीन असलेल्या आपल्याला देवानेंच हा पुत्र दिला आहे, असें मी निश्चित समजतों."

( २ ) राजा, असें बोलून त्या सूतानें त्या बालकास भार्येच्या स्वाधीन केलें. तेव्हां राधेनें त्या दिव्य स्वरूपी पुत्राचा यथाविधि स्वीकार केला. तो देवतुल्य पुत्र कमलगर्भाप्रमाणें कोमल असून त्याची कांति देदीप्यमान होती. राधेनें त्याचें यथाविधि पोषण केलें असतां तो वीर्यवान् कुमार वाढूं लागला. तेव्हांपासून राधेला दुसरेहि औरस पुत्र झाले. तो बालक सहज कवच व सुवर्ण कुंडलें यांनीं युक्त असलेला पाहून ब्राह्मणांनीं त्याचें 'वसुषेण' असें नांव ठेविलें. याप्रमाणें तो अमित पराक्रमी आदित्यात्मज सूतपुत्रत्वाला प्राप्त होऊन 'वसुषेण' या नांवानें प्रसिद्ध झाला. त्या प्रभूला 'वृष' असेंहि म्हणतात.

( ३ ) राजा, अंगदेशांत दिव्य कवचानें युक्त असलेला वीर्यवान् श्रेष्ठ पुत्र सूताच्या गृहांत वाढत आहे, असें गुप्त हेरानें पृथेला निवेदन केलें. अधिरथ-सूतानें आपला पुत्र वाढला आहे, असें पाहून त्याला योग्य समयीं हस्तिना-पुरास पाठवून दिलें. तेथें त्यानें द्रोणाला शरण जाऊन अस्त्रविद्या संपादन केली व त्या वीर्यवानाचें दुर्योधनादिकाशीं सख्य जडलें. तो वीर द्रोण, कृप व परशुराम यांच्यापासून चतुर्विध अस्त्रांचें ज्ञान मिळवून महाधनुर्धर म्हणून लोकांत प्रसिद्ध झाला.

तो कुंतीपुत्र धार्तराष्ट्रांच्या संगतीनें पांडवांशीं वैर करूं लागला तो महात्म्या अर्जुनाशीं युद्ध करण्याची नित्य इच्छा करीत असे. हे विशांपते, अर्जुन जेव्हां प्रथम कर्णाच्या दृष्टीं पडला, तेव्हांपासूनच तो पार्थ व हा कौंतेय परस्परांची निरंतर स्पर्धा करूं लागले. हे महाराज, अशा प्रकारचें हें सूर्याचें गुह्य होतें, यांत संशय नाहीं. सूर्य व पृथा यांचा तो पुत्र सूतकुलामध्यें वाढला. पण सहज कवच व कुंडलें यांनीं युक्त असलेला तो कर्ण रणांत अवध्य आहे, हें जाणून युधिष्ठिर संतप्त झाला.

( ४ ) हे राजेंद्रा, कर्ण नित्य माध्याह्नकालीं जलांत उभा राहून सूर्याची स्तुति करीत असे. त्यावेळीं ब्राह्मण त्याच्यापाशीं धनेच्छेनें येत असत. कारण त्यावेळीं याचना करणाऱ्या द्विजाला अदेय असें त्याला कांहींच नव्हतें. हें त्या सूतपुत्राचें व्रत जाणून इंद्र ब्राह्मण-वेष धारण करून आला व 'भिक्षां

देहि ' असें बोलून त्याच्यापुढें उभा राहिला. तेव्हां राधेयानें त्याचें स्वागत करून त्याला असें उत्तर दिलें. ३. २१. ३०९.

---

## अध्याय ३१० वा.

[ १ कर्ण व इंद्र यांचा संवाद. २ कर्णानें कवच-कुंडलें देऊन वासवी शक्तीचें केलेलें ग्रहण. ३ कवचकर्तन पाहून देवांनी केलेला त्याचा सत्कार. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, ब्राह्मणाच्या कपटवेषानें देवराज इंद्र आला असतां कर्णानें त्याचें स्वागत केलें, परंतु त्याचा मानस जाणला नाहीं. कर्ण त्याला म्हणाला—" हे ब्रह्मन्, तुला कोणत्या दानाची इच्छा आहे ! रत्नमालांनीं भूषित असलेल्या श्रेष्ठ प्रमदा, ग्राम, किंवा धेनूंचे अनेक कळप यांतील तुला काय देऊं ?"

**ब्राह्मण**—हे उदारा, कंठांत रत्नमाला धारण करणाऱ्या स्त्रिया किंवा अशा प्रकारच्या प्रीति वाढविणाऱ्या अन्य वस्तु यांची मला इच्छा नाहीं. या वस्तु तूं इतर याचकांना दे. हे निष्पापा, तूं जर सत्यव्रत असशील तर तुझें हें सहज कवच व अप्रतिम कुंडलें मला दे. याच दानाची मला इच्छा आहे. तें आपल्या देहापासून काढून मला सत्वर दे. हाच माझा सर्व लाभांत श्रेष्ठ लाभ आहे, असें मी समजतों.

**कर्ण**—हे विप्रा, मी तुला गृहार्थ भूमि, गायी किंवा जन्मभर तुझा निर्वाह होईल असें धान्य पेरलेलें शेत देईन, परंतु कवच-कुंडलें देणार नाहीं.

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें कर्णानें अनेक प्रकारें सांगितलें, तरीहि त्या याचना करणाऱ्या द्विजानें अन्य वर मागितला नाहीं. कर्णानें त्या विप्राचें सान्त्वनपूर्वक यथाशक्ति व यथाविधि पूजन केलें. परंतु त्या ब्राह्मणानें अन्य वस्तूंची याचना केली नाहीं.

हा द्विजश्रेष्ठ दुसरा कोणताच वर मागत नाहीं हें पाहून राधेय त्याला हंसतच म्हणाला—" हे विप्रा, हें माझें सहज कवच असून हीं कुंडलें अमृतापासून उद्भवलेलीं आहेत. त्यांच्या योगें मी या लोकीं अवध्य आहें. यास्तव मला त्यांचा त्याग करतां येत नाहीं. हे ब्राह्मणश्रेष्ठा, या विशाल पृथ्वीचें सुखकर निष्कंटक राज्य तूं मजपासून मागून घे. पण हीं कुंडलें व हें सहज कवच यांनीं वियुक्त झालों असतां मी शत्रूला वध्य होईन. "

इतकी प्रार्थना करूनहि भगवान् पाकशासन आपला आग्रह सोडीत नाहीं, असें पाहून कर्ण पुनः त्याला हंसून म्हणाला—"हे प्रभो देवेशा, मीं तुला पूर्वींच ओळखलें आहे. तूं ज्या वस्तु मागत आहेस त्या वस्तु तुला मोबदल्या-वांचून दान देणें शक्य नाहीं व न्याय्यहि नाहीं. तूं साक्षात् देवदेवेश्वर, सर्व भूतांचा ईश्वर व भूतांचा उत्पादकहि आहेस, यास्तव तूं मला वर दे. हे इंद्रा, मीं जर तुला कवचासह कुंडलें दिलीं, तर मी शत्रूंना वध्य होईन आणि लोकांत तुझा उपहास होईल. यास्तव हे शक्रा, तूं मला मोबदला देऊन हीं कवच-कुंडलें घेऊन जा. त्यावांचून मी तीं देणार नाहीं.

शक्र—हे कर्णा, या पूर्वींच रवि तुझ्यापाशीं आला होता, हें मला माहित आहे. त्यानेंच ही युक्ति तुला सांगून ठेवली आहे, यांत संशय नाहीं. ठीक आहे, माझें वज्र सोडून तूं जें कांहीं मागशील तें मी तुला देईन. तुझी काय इच्छा आहे तें सांग.

( २ ) वैशंपायन—भारता, इंद्राचें हें वचन ऐकून संतुष्ट झालेल्या कर्णानें वासवाच्या समीप जाऊन प्रसन्न मनानें त्याची अमोघ शक्ति मागितली.

कर्ण—हे वासवा, माझें कवच व कुंडलें घेऊन युद्धांत शत्रूंचा संहार करणारी तुझी अमोघ शक्ति मला दे.

हे नृपश्रेष्ठा, कर्णाची ही याचना ऐकून इंद्रानें घटकाभर विचार केला व तो शक्तीविषयीं म्हणाला—"हे कर्णा, तुझें हें सहज कवच व हीं कुंडलें मला दे आणि माझी शक्ति या अटीवर ग्रहण कर. ही अमोघ शक्ति माझ्या हातांतून सुटली म्हणजे असंख्य शत्रूंचा वध करून पुनः मज दैत्यसंहार-काच्या हातीं परत येत असते. ती ही शक्ति तुझ्या हातीं आली असतां एका गर्जना करणाऱ्या व ताप देणाऱ्या बलिष्ठ शत्रूचा वध करून पुनः मजकडे परत येईल.

कर्ण—हे इंद्रा, एका शत्रूपासून मला भय आहे. त्या गर्जना करणाऱ्या व ताप देणाऱ्या माझ्या वैऱ्याचा रणांत वध करण्याची माझी इच्छा आहे.

इंद्र—हे सूतपुत्रा, तूं समरांत एका बलाढ्य व गर्जना करणाऱ्या शत्रूचा वध करशील. परंतु तुला ज्या एका वीराच्या वधाची इच्छा आहे, त्याचें रक्षण महात्मा कृष्ण करीत आहे. ज्याला वेदवेत्ते विद्वान् वराह, अपराजित व अचिंत्य नारायण असें म्हणतात, त्या भगवानाकडून तो धनुर्धर संरक्षित आहे.

**कर्ण**—ठीक आहे, प्रतापवान् एकाच वीराचा वध करण्यासाठीं तुझी अमोघ शक्ति मला दे. हे देवेंद्रा, माझीं हीं कवच-कुंडलें मी तुला देहापासून कापून देईन, परंतु त्यामुळें माझें शरीर विकृत दिसूं नये.

**इंद्र**—हे कर्णा, तुझें स्वरूप अव्यंग राहील. तें यत्किंचित्‌हि विकृत दिसणार नाहीं. किंवा तुझ्या देहाला कोठें व्रणहि पडणार नाहीं. कारण तूं अनृताची इच्छा करीत नाहींस. तुझ्या पित्याचें जसें तेज व वर्ण आहे, तशाच वर्णानें तूंहि पुनः युक्त होशील. शिवाय हे वीरा, तूं या शक्तीविषयीं एक गोष्ट लक्षांत ठेव. दुसरीं शस्त्रें विद्यमान असतांना, जीविताचा संशय नसतांना, किंवा प्रमत्तपणानें तूं जर ही शक्ति सोडलीस तर ती शत्रूवर न पडतां तुझाच नाश करील.

**कर्ण**—हे शक्रा, तूं जसें मला सांगत आहेस, त्याचप्रमाणें जेव्हां जीविताविषयीं परम संशय प्राप्त होईल, तेव्हांच मी या शक्तीचा उपयोग करीन, हें मी तुला सत्य सांगतों.

( ३ ) **वैशंपायन**—हे विशांपते, नंतर कर्णानें ती प्रज्वलित शक्ति ग्रहण केली आणि तीक्ष्ण शस्त्र घेऊन आपल्या देहावरील कवच कापून काढिलें. हे राजा, कर्ण आपल्या हातानें स्वशरीराचा भाग कापून काढीत आहे, हें पाहून सर्व देव, दानव व मानव सिंहनाद करूं लागले. परंतु कर्णाच्या मुखावर यत्किंचित्‌हि विकार दिसला नाहीं. शस्त्रानें स्वशरीराचे अवयव कापून काढून स्मित मुखानें स्थित असलेल्या त्या नरश्रेष्ठ कर्णाला पाहून स्वर्गांत दिव्य दुंदुभी वारंवार वाजूं लागल्या व अंतरिक्षांतून दिव्य पुष्पवृष्टि झाली.

राजा, कर्णानें आपल्या देहापासून दिव्य कवच कापून काढून तें तसें आर्द्र असतांनाच वासवाला अर्पण केलें, नंतर त्यानें आपल्या कानांतील कुंडलेंहि कापून काढलीं व तीं इंद्राच्या स्वाधीन केलीं. अंग कापून काढण्याच्या या अद्भुत कृत्यामुळें तो वीर ' कर्ण ' या नांवानें प्रसिद्ध झाला.

याप्रमाणें शक्र कर्णाला फसवून हंसतच निघून गेला. त्या शक्रानें कर्णाच्या औदार्याची लोकांत कीर्ति पसरविली आणि ' पांडवांचें कार्य झालें ' असें मानून त्यानें इंद्रलोकीं प्रयाण केलें. याप्रमाणें कर्ण वंचित झाल्याचें पाहून सर्व धार्तराष्ट्र दीन व दर्परहित झाले. आणि सूतपुत्राची ही अवस्था ऐकून वनस्थ पांडव संतुष्ट झाले.

**जनमेजय**—हे मुने, त्यावेळीं ते पांडव वीर कोठें रहात होते, त्यांनीं ही प्रिय वार्ता कोणाकडून ऐकली ? तें बारावें वर्ष पूर्ण झाल्यानंतर त्यांनीं काय केलें ? तें मला सविस्तर कथन कर.

**वैशंपायन**—राजा, वर वर्णन केल्याप्रमाणें त्या पांडुपुत्रांनीं कृष्णेला सोडवून आणलें, काम्यकवनांतील आश्रमांतून जयद्रथाला पलायन करावयास लाविलें आणि मार्कंडेयाच्या मुखानें देवर्षींचीं पुरातन चरित्रें विप्रांसह सविस्तर श्रवण केलीं. ३. २१. ३१०.

येथें एकविसावें कुंडलाहरणपर्व समाप्त झालें.

---

# आरणेयपर्व २२



## अध्याय ३११ वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ ब्राह्मणाच्या अरणीचें मृगानें केलेलें हरण. ३ मृगाचा शोध. ]

( १ ) **जनमेजय**—हे विप्रश्रेष्ठा, याप्रमाणें दुरात्म्या जयद्रथानें भार्येचें हरण केलें असतां पांडुपुत्रांनीं अतिशय क्लेश सहन करून कृष्णेला सोडवून आणिलें. त्यानंतर त्या वीरांनीं काय केलें ?

**वैशंपायन**—राजा, कृष्णेच्या हरणामुळें अतिशय क्लेश पावलेले पांडव काम्यकवन सोडून निघाले. राजा युधिष्ठिर भ्रात्यांसह पुनः द्वैतवनांत येऊन राहिला. चित्रविचित्र वृक्षांनीं व्याप्त असलेल्या त्या रम्य वनांत स्वादु फलें व मूलें विपुल होतीं. त्या वनांत व्रतस्थ राहून केवल फलाहार करणारे ते पांडव भार्येसह सुखानें राहूं लागले.

ते पांचहि पांडुपुत्र त्या द्वैतवनांत रहात असतां ब्राह्मणांच्या कार्यासाठीं त्या धर्मात्म्या नियतव्रत पराक्रमी वीरांना सुखपरिणामीं विपुल क्लेश भोगावे लागले. हे राजा, त्या वनांत रहात असतां पांडुपुत्रांना ब्राह्मणासाठीं कशा प्रकारचे क्लेश भोगावे लागले ते सांगतों, ऐक.

(२) एकदा एका तपस्वी ब्राह्मणानें त्या वनांतील एका वृक्षावर आपली अरणी व मंथा ठेविला आणि तो अन्य कार्यांत व्यग्र झाला. इतक्यांत अकस्मात् एक मृग

तेथें आला व तो स्वभावतःच त्या वृक्षाला अंग घासूं लागला. तेव्हां ब्राह्मणाची अरणि त्या मृगाच्या दीर्घ शृंगांमध्यें अडकली. त्यामुळें तो मृग घाबरून त्वरेनें इतस्ततः पळत सुटला. तेव्हां आपल्या अरणीसह तो महावेगवान् मृग शीघ्रगतीनें आश्रमापासून दूर निघून गेला आहे, असें पाहून तो ब्राह्मण आपल्या अग्निहोत्राचा विच्छेद होऊं नये म्हणून पांडवांकडे आला.

अजातशत्रु युधिष्ठिर त्या वेळीं भ्रात्यांसह वनांतील एका रम्य प्रदेशीं विश्रांति घेत बसला होता. इतक्यांत तो ब्राह्मण मोठ्या त्वरेनें तेथें आला व संतप्त होऊन म्हणाला—"हे राजन्, मी अरणीसह मंथा वृक्षावर ठेविला असतां एक मृग तेथें आला व त्याच वृक्षाला आपलें अंग घासूं लागला. तेव्हां वृक्षाला अंग घासणाऱ्या त्या मृगाच्या शृंगाला ती अरणी अडकली. त्याबरोबर भयभीत होऊन तो शीघ्रगामी मृग अरणीसह आश्रमापासून दूर निघून गेला आहे. माझ्या अग्निमंथनाचें साधन, अरणि नष्ट झाल्यामुळें माझें अग्निहोत्र विच्छिन्न होईल, म्हणून मी तुम्हांकडे आलों आहें. तुम्ही वीर क्षत्रिय आहां. यास्तव त्या मृगाचा पाठलाग करून माझी अरणि परत आणून द्या. मार्गांत उमटलेल्या पावलांवरून तुम्ही त्याचा शोध करूं शकाल. माझ्या या धर्माचें रक्षण करण्यास तुम्हांवांचून अन्य कोणी समर्थ नाहीं."

(३) ब्राह्मणाचें हें वचन ऐकून युधिष्ठिर संतप्त झाला व मृगाचा शोध करण्यासाठीं धनुष्य घेऊन भ्रात्यांसह त्वरेनें निघाला. ते सर्व नरश्रेष्ठ पांडव कवचें व धनुष्यें धारण करून मृगाच्या शोधार्थ धांवत गेले. ब्राह्मणाच्या कार्यासाठीं यत्न करणाऱ्या त्या धर्मात्म्यांनीं लवकरच त्या मृगाला गांठिलें. त्यांना तो मृग समीप असल्याप्रमाणें दिसत होता; परंतु, नाराच-कर्णिकादि अनेक तीक्ष्ण बाण सोडूनहि ते महारथ त्या मृगाला विद्ध करूं शकले नाहींत. शेवटीं ते वीर त्या मृगाला मारण्याचा यत्न करीत असतां तो एकाएकीं दिसेनासा झाला.

ब्राह्मणाच्या अरणीचें हरण करणारा तो मृग अकस्मात् गुप्त झाला आहे, असें पाहून अतिशय श्रांत झालेले ते पांची वीर खिन्न झाले. ते क्षुधा व तृषा यांनीं व्याकुल झाले व त्या गहन वनांत एक प्रचंड वटवृक्ष पाहून त्याच्या शीतल छायेंत विश्रांति घेण्यासाठीं बसले.

याप्रमाणें ते बसले असतां नकुल अतिशय खिन्न व क्रुद्ध होऊन ज्येष्ठ भ्रात्याला म्हणाला—"हे राजन्, आमच्या कुलांत केव्हांहि धर्मलोप किंवा

अर्थलोप झालेला नाहीं. आम्ही आलस्यानें कदापि कर्तव्यपराङ्मुख झालों नाहीं. सर्व भूतांच्या कार्यासाठीं आम्हीं सर्वदा तत्पर असतों. कोणतेंहि कार्य उपस्थित झालें असतां आम्ही तें तत्काल करितों. असें असतांना आम्ही या ब्राह्मणाच्या कर्मलोपनिमित्त दोषाला कसे प्राप्त झालों!" ३.२२.३११.

---

## अध्याय ३१२ वा.

[ १ पांची पांडवांनीं प्राप्त संकटाचीं सांगितलेलीं भिन्न भिन्न कारणें. २ युधिष्ठिराच्या आज्ञेनें नकुलाचें जलार्थ सरोवरावरगमन, यक्षानें केलेला प्रतिकार व यक्षाच्या अवज्ञेनें त्याचें पतन. ३ इतर तिन्ही भ्रात्यांचें क्रमानें जलार्थ गमन व नकुलाच्याच गतीची प्राप्ति. ४ युधिष्ठिराचें भ्रातृशोधार्थ गमन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—वत्सा, आपत्तीला मर्यादा नाहीं, निमित्त नाहीं किंवा कारणहि नाहीं. पुण्य आणि पाप या दोहोंच्या फलाचा प्रारब्धरूप धर्मच विभाग करीत असतो.

**भीम**—दुःशासनानें कृष्णेला दासीप्रमाणें कौरवसभेंत जेव्हां ओढून नेलें तेव्हां मीं त्याचा तेथेंच वध केला नाहीं, म्हणून आम्हांला हे क्लेश प्राप्त झाले, यांत संशय नाहीं.

**अर्जुन**—त्या सूतपुत्रानें जेव्हां मर्मभेदक, हृदयविदारक व अंतःकरणाला दग्ध करणारें निंद्य भाषण केलें, तेव्हां मी शांत बसलों, त्यामुळें आम्हांला आज हें संकट सहन करावें लागत आहे.

**सहदेव**—हे भारता, शकुनीनें तुला जेव्हां अक्षद्यूतानें जिंकलें, त्याच वेळीं मीं त्याला गतप्राण केलें नाहीं म्हणूनच आम्ही या अनर्थांत सांपडलों.

( २ ) **वैशंपायन**—राजा, नंतर युधिष्ठिर नकुलाला म्हणाला—"वत्सा, या वृक्षावर चढून सर्व दिशांचें निरीक्षण कर आणि जवळपास कोठें जल किंवा जलाच्या आश्रयानें वाढणारे वृक्ष दिसतात का पहा. कारण हे तुझे सर्व भ्राते श्रांत व तृषार्त झाले आहेत."

तेव्हां ठीक आहे, असें बोलून नकुल सत्वर वृक्षावर चढला व सर्वत्र दृष्टि फिरवून ज्येष्ठ भ्रात्याला म्हणाला—"येथें उदकाच्या आश्रयानें वाढणारे विपुल वृक्ष मला दिसत आहेत. शिवाय सारस पक्ष्यांचाहि ध्वनि ऐकूं येत आहे. त्यावरून येथें समीपच जल असावें यांत संशय नाहीं."

तेव्हां कुंतीपुत्र युधिष्ठिर त्याला म्हणाला—तर मग वत्सा, सत्वर जा व तुझ्या या भात्यांतून जल घेऊन ये.

धर्मराजाच्या आज्ञेप्रमाणें नकुल शीघ्रगतीनें निघाला व जलाशयाच्या समीप आला. तेथें त्यानें सारसांनीं व्यापलेलें निर्मल जल पाहिलें व तो तें जल प्राशन करणार, इतक्यांत त्यानें अंतरिक्षांतून अशी वाणी ऐकली—'अरे बाबा, तूं हें जल प्राशन करण्याचें साहस करूं नको. कारण जो माझ्या प्रश्नांचें उत्तर देईल, त्यानेंच हें जल प्राशन करावें व तें घेऊन जावें, असा माझा पूर्व नियम आहे. यास्तव तूं माझ्या प्रश्नांचें उत्तर देऊन पाणी पी व तें घेऊनहि जा.

परंतु त्या यक्षवचनाचा अनादर करून अत्यंत तृषार्त झालेला नकुल तें शीतल जल प्याला व तत्काल तेथेंच निश्चेष्ट होऊन पडला. इकडे नकुलाला जाऊन बराच वेळ झाला, तरी तो परत येत नाहीं, हें पाहून युधिष्ठिर सहदेवाला म्हणाला—" हे वीरा, तुझ्या भ्रात्याला जाऊन पुष्कळ वेळ झाला, अद्यापि तो कां बरें परत आला नाहीं ? तूं जाऊन त्याला घेऊन ये आणि येतांना जलहि आण. "

( ३ ) तेव्हां सहदेव 'ठीक आहे' असें बोलून त्या दिशेकडे निघाला व त्वरेनें तेथें जाऊन पोंचला. तों आपला भ्राता नकुल भूमीवर मृतवत् होऊन पडला आहे, असें त्याला दिसलें. तथापि तो माद्रेय बंधुशोकानें संतप्त व तहानेनें व्याकुल होऊन जलाशयाजवळ धांवत गेला. तेव्हां पूर्वोक्त वाणी त्याच्याहि कानीं पडली. परंतु अंतरिक्षांतून होणाऱ्या त्या शब्दांकडे दुर्लक्ष करून सहदेवानें जल प्राशन केलें व तत्काल तो भूमीवर पडला.

त्यानंतर कुंतीपुत्र युधिष्ठिर धनंजयाला म्हणाला—हे अर्जुना, तुझे दोघेहि भ्राते अद्यापि कसे परत येत नाहींत! तूं त्यांचा शोध कर व जल घेऊन त्यांच्यासह परत ये. वत्सा, आम्हां सर्व दुःखितांचा आधार तूंच आहेस.

युधिष्ठिरानें असें सांगतांच गुडाकेश पार्थ धनुष्य-बाण धारण करून व खड्ग उगारून मोठ्या त्वरेनें त्या सरोवरापाशीं आला आणि उदक प्राशन करण्यासाठीं जलाच्या समीप जात आहे तोंच त्याला आपले दोन्ही भ्राते गतप्राण झाल्याप्रमाणें निश्चेष्ट होऊन पडलेले दिसले. त्यांना पाहून अत्यंत दुःखार्त झालेल्या त्या कौंतेयानें धनुष्य सज्ज करून त्या वनांत सर्वत्र दृष्टि फिरविली. परंतु त्या महारण्यांत त्याला एकहि प्राणी दिसला नाहीं. तेव्हां तो श्रांत होऊन जलप्राशनार्थ धांवला.

इतक्यांत अंतरिक्षांतून पुढील शब्द त्यानें ऐकले—" हे कौंतेया, जलाच्या समीप कशाला येत आहेस ? तुला स्वसामर्थ्याच्या बलावर या उदकाला स्पर्श करतां येणार नाहीं. पार्था, तूं जेव्हां माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देशील, तेव्हांच हें जलप्राशन करण्यास व नेण्यास समर्थ होशील. "

याप्रमाणें त्या अदृश्य यक्षानें निवारण केलें असतांहि पार्थ म्हणाला–' अरे, तूं कोणीहि कां असेनास, प्रकट होऊन पुढें ये व मग मला प्रतिबंध कर. जोंवर तूं माझ्या बाणांनीं विद्ध झाला नाहींस, तोंवरच तुझ्या या वल्गना आहेत. माझ्या शरांनीं विच्छिन्न झालास म्हणजे तूं पुनः असें बोलणार नाहींस."

असें बोलून पार्थानें आपला शब्दवेध प्रदर्शित करीत अस्त्रानें अभिमंत्रित केलेल्या शरांचा सर्व दिशांमध्यें वर्षाव चालविला. तृषेनें पीडित झालेल्या धनंजयानें कर्णिकादि अमोघ बाणांची अंतरिक्षांतहि वृष्टि केली.

तें पाहून यक्ष म्हणाला—पार्था, तुझा हा यत्न व्यर्थ आहे. प्रथम माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे व मग जल प्राशन कर. माझ्या प्रश्नांचें उत्तर न देतां जर हें उदक प्यालास तर तुझें अस्तित्व नाहींसें होईल.

यक्षानें असें बजाविलें असतांहि धनंजय त्याची अवज्ञा करून जल प्याला व तेथेंच संज्ञाहीन होऊन पडला. त्यानंतर युधिष्ठिर भीमाला म्हणाला—" बा वृकोदरा, तुझे तिघे भ्राते केव्हांचे जलार्थ गेले आहेत, ते अद्यापि आले नाहींत. तूं जाऊन त्यांना घेऊन ये व जलहि आण."

तेव्हां ज्येष्ठ भ्रात्याची आज्ञा मान्य करून भीमसेन वेगानें निघाला व जेथें त्याचे तीन भ्राते निश्चेष्ट होऊन पडले होते, त्या जागीं येऊन पोंचला. आपल्या भ्रात्यांची ती स्थिति पाहून भीम दुःखानें व तृषेनें व्यथित झाला. हें कोणातरी यक्ष-राक्षसाचें कृत्य असावें, असें त्या महाबाहूला वाटलें व आतां निश्चयानें युद्धाचा प्रसंग येणार, असा त्यानें मनांत विचार केला. ' ठीक आहे, मी अगोदर पाणी तर पिऊन येतों ' असें म्हणून तो पिपासु वृकोदर त्या सरोवराकडे धांवला.

तेव्हां यक्षानें पूर्वोक्त शब्द उच्चारून दोघां माद्रीपुत्रांप्रमाणेंच त्याला प्रतिकार केला. परंतु अमित तेजस्वी यक्षाच्या प्रश्नाला उत्तर न देतां जल प्राशन करणारा तो बलाढ्य वायुपुत्र भीमहि तत्काल तेथें पडला.

( ४ ) जनमेजया, याप्रमाणें चारी भ्राते परत येत नाहींत, हें पाहून युधिष्ठिर सचिंत झाला. त्याचें अंतःकरण चिंतेनें दग्ध होऊं लागलें. तो स्वतः उठला व त्या धर्मराजानें अस्वस्थ चित्तानें त्या निर्जन वनांत प्रवेश केला. तें घोर अरण्य ' रुरु '-संज्ञक मृग, वराह व पक्षी यांनीं सेवन केलेलें असून नील व भास्वर वर्णाच्या वृक्षांनीं शोभत होतें. तेथें पक्ष्यांचा मंजुल शब्द व भ्रमरांचा गुंजारव ऐकूं येत होता. युधिष्ठिर आपल्या भ्रात्यांचा शोध करीत चालला असतां कांहीं वेळानें त्या महावनांतील तो जलाशय त्याच्या दृष्टीं पडला. तें सरोवर विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें असून सोनेरी वर्णाच्या कमलांनीं युक्त व इतर वृक्षांनीं व्याप्त होतें. ३. २२. ३१२.

---

## अध्याय ३१३ वा.

[ १ निश्चेष्ट पडलेल्या भ्रात्यांस पाहून युधिष्ठिराचा विलाप. २ यक्षदर्शन, त्याचा जलप्राशनास प्रतीकार. ३ यक्षप्रश्न. ४. संतुष्ट झालेल्या यक्षाचा वर. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धर्मपुत्र युधिष्ठिर त्या सरोवराच्या समीप जाऊन पोंचतांच युगान्तसमय प्राप्त झाला असतां स्वर्गांतून च्युत होणाऱ्या चार लोकपालांप्रमाणें आपले शक्रतुल्य पराक्रमी श्रेष्ठ भ्राते गतप्राण होऊन पडलेले त्याला दिसले. धनुष्य-बाण अस्ताव्यस्त पडलेले असून मृतवत् पडलेला तो अर्जुन आणि निश्चेष्ट होऊन पडलेला भीम व नकुल-सहदेव, यांना पाहून त्या धर्मात्म्यानें दीर्घ व उष्ण निश्वास सोडला. शोकानें त्याचा कंठ दाटून आला. आपले सर्व भ्राते असे मृत होऊन कसे पडले ? या विचारानें तो कुंतीपुत्र अतिशय विलाप करूं लागला.

**युधिष्ठिर**—अरे अरे, वृकोदरा, मी हें आज काय पहात आहें ? ' मी युद्धामध्यें दुर्योधनाच्या दोन्ही मांड्या गदेनें फोडीन ' ही तुझी प्रतिज्ञा आज कुरूंची कीर्ति वाढविणाऱ्या तुज महात्म्याच्या मृत्यूमुळें व्यर्थ व्हावी ना ! हे महाबाहो, सामान्य मनुष्याचें वचन मिथ्या होत असतें, असें श्रुत आहे; परंतु बा भीमा, तुझी दिव्य वाणीहि कशी असत्य झाली !

हे धनंजया, देवांनींहि तुझ्या जन्मकालीं ' हे कुंति, तुझा हा पुत्र सहस्राक्ष इंद्राहूनहि पराक्रमी निपजेल ' असें म्हटलें होतें आणि उत्तर पारियात्र पर्वतावरील सर्व भूतांनींहि ' हा वीर आपलें गत ऐश्वर्य पुनः प्राप्त करून घेईल,

रणांत याला जिंकणारा कोणी नाहीं व याला अजिंक्य असाहि कोणी नाहीं' असें सांगितलें होतें. तें आज खोटें कसें झालें ? अशाप्रकारचा हा सर्वांचा नेता जिष्णु आज मृत्युवश कसा झाला ? ज्याच्या आधारावर आम्ही हीं सर्व दुःखें सहन करीत आहों, तो माझा प्रिय भ्राता राज्य मिळविण्याविषयींच्या माझ्या सर्व आशा नष्ट करून भूमीवर स्वस्थ निजल्यासारखा पडला आहे! ज्या नाथाचा आश्रय करून आम्हीं हीं दुःखें सहन केलीं, त्या वीराची अशी दशा व्हावी ना ! हे दोघे कुंतीपुत्र रणांत प्रमत्त वीर असून सर्वदा शत्रूंचा संहार करणारे आहेत. हे बलिष्ठ भीमार्जुन सर्व अस्त्रांचा पराभव करणारे असतां आज शत्रूच्या वश कसे झाले !

तसेंच हे उभयतां माद्रीपुत्रहि चेतनाहीन होऊन पडले आहेत ! खरोखर मज अभाग्याचें हृदय पाषाणाचेंच असलें पाहिजे, म्हणूनच या माद्रेयांना गतप्राण होऊन पडलेलें पहात असूनहि तें विदीर्ण होत नाहीं. हे माझ्या वीर भ्रात्यांनों, तुम्ही सर्व शास्त्रज्ञ, देश-कालज्ञ, व्यवहारज्ञ व तपोयुक्त असतांना आपल्याला उचित असें शौर्याचें कर्म केल्यावांचून भूमीवर कसे शयन करतां ?

या वीरांच्या शरीरावर कोठेंच क्षत झालेलें नाहीं. त्यांनीं आपल्या धनुष्यांना स्पर्शहि केल्याचें दिसत नाहीं. असें असतां हे अजिंक्य नरश्रेष्ठांनों, तुम्ही संज्ञा-शून्य होऊन भूमीवर कसे पडलां ?

**वैशंपायन**—राजा, तो महामति युधिष्ठिर अशा प्रकारें बहुविध विलाप करीत अतिशय शोकसंतप्त झाला. निश्चल पर्वतशिखराप्रमाणें बलाढ्य भ्रात्यांना गाढ निद्रा लागलेली पाहून त्या महात्म्याच्या देहाला घाम सुटला. तो अतिशय खिन्न झाला. त्याच्या मनाची शोचनीय स्थिति झाली व भ्रात्यांना उद्देशून बराच वेळ असा विलाप केल्यावर शोकसागरांत निमग्न झालेला तो ज्येष्ठ पांडव त्यांच्या मृत्यूचें कारण काय असावें याचा मनांत विचार करूं लागला.

तो धर्मपुत्र देश-कालज्ञ असून इतिकर्तव्यता जाणत होता. त्या महामतीनें पुष्कळ विचार केला, परंतु भ्रात्यांच्या मरणाचें कोणतेंच कारण त्याला दिसेना. पुनः बराच वेळ विलाप केल्यावर युधिष्ठिरानें आपलें मन स्थिर केलें व या वीरांना कोणीं बरें पाडलें असावें, याचा पुनः मनांत विचार चालविला.

तो कौंतेय स्वतःशींच म्हणाला—"या वीरांच्या शरीरावर शस्त्रप्रहार झाल्याचें दिसत नाहीं. या प्रदेशांत कोणाचीं पावलें उमटलेलीं नाहींत.

यावरून माझ्या शूर बंधूंचा वध करणारें हें कोणी महाभूत असावें असें मला वाटतें. यास्तव मी एकाग्रचित्तानें याचा विचार करीन. किंवा हें जल विषयुक्त असेल. दुर्योधनानें आम्हांला मारण्यासाठीं हें दुष्कर्म केलें असावें. ज्याला कार्य व अकार्य सर्वदा तुल्यच वाटत असतें, त्या कुटिलबुद्धि शकुनीनें हें गुप्त कारस्थान कशावरून रचलें नसेल ! त्या पापाचरणी दुरात्म्यावर कोणीं विश्वास ठेवावा ! किंवा त्या पाप कर्में करणारांनीं गुप्त हेरांकडून तर हें दुष्कर्म करविलें नसेल !

अशाप्रकारें त्या बुद्धिमानानें पुष्कळ विचार केला. नंतर त्या जलाशयाकडे पाहून तो म्हणाला—" हें जल यत्किंचित्‌हि दूषित झालेलें नाहीं. अतिशय प्रसन्न दिसत आहे. त्यामुळें हें विषयुक्त असेल असें वाटत नाहीं. शिवाय या माझ्या भ्रात्यांच्या मृत देहांवरहि कांहींच विकृति दिसत नसून त्यांची मुखकांति प्रसन्न दिसत आहे.

या एकेका वीराचें बल महाप्रवाहाच्या वेगासारखें प्रचंड असतां एका कालांतक यमावांचून त्यांच्याशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे ? "

असा पुष्कळ विचार करीत तो धर्मात्मा जलप्राशनार्थ त्या सरोवरांत उतरला. इतक्यांत अंतरिक्षांतून असे शब्द त्याच्या कानीं पडले. यक्ष—" हे राजपुत्रा, मी शैवाल व मत्स्य भक्षण करणारा बक आहें. मींच तुझ्या भ्रात्यांना मृत्यूच्या स्वाधीन केलें आहे आणि तूंहि जर माझ्या प्रश्नांचें उत्तर न देतां जलप्राशन करशील, तर तुला त्यांच्यांतीलच पांचवा होऊन पडावें लागेल. "

( २ ) इतकें बोलून यक्षानें आपला पूर्वोक्त प्रतिबंधक नियम त्याला सांगितला. तो ऐकून युधिष्ठिर म्हणाला—" हे देवा, तूं रुद्र, वसु, मरुत् किंवा दुसरी कोणती प्रधान देवता आहेस ? कारण हें अद्भुत कर्म सामान्य पक्ष्याचें नाहीं. माझे हे–एक हिमालय, दुसरा पारियात्र, तिसरा विंध्य व चवथा मलय यांसारखे चौघे भ्राते आहेत. या चौघां पर्वतप्राय बलिष्ठांना कोणत्या अमित तेजस्वी वीरानें पाडविलें ! हे बलवानांतील श्रेष्ठ वीरा, तूं हें अतिशय दुष्कर कर्म केलें आहेस. महायुद्धांत ज्या नरपुंगवांचे प्रहार देव, गंधर्व, असुर किंवा राक्षसहि सहन करण्यास समर्थ नाहींत, त्या पराक्रमी वीरांना तूं गतप्राण केलेंस, हें केवढें आश्चर्य आहे ! तूं हें कृत्य कसें केलें असशील हें मला कळत नाहीं, किंवा तुझा या निर्घृण कर्मांतील हेतूहि माझ्या लक्षांत येत नाहीं. माझ्या मनांत याविषयीं मोठें कुतूहल उत्पन्न झालें आहे !

या प्रकारामुळें मला अतिशय भय वाटत आहे, त्यामुळें माझें हृदय उ
झालें असून मस्तक भ्रांत झालें आहे. तस्मात् ' हे भगवन्, आपण कोण अ
असें मी विचारीत आहें.

**यक्ष**—हे पांडवा, तुझें कल्याण असो. मी जलचर पक्षी नाहीं, मी
आहें. मींच तुझ्या या सर्व महाबलाढ्य भ्रात्यांचे प्राण हरण केले आहेत.

**वैशंपायन**—हे राजन्, त्या यक्षाची ती कठोर अक्षरांनीं युक्त असले
अशुभ वाणी ऐकतांच धर्मराज जलाशयापासून दूर सरला. तोंच वृक्षा
आश्रयानें उभा असलेला एक पर्वतप्राय यक्ष त्याला दिसला. तो यक्ष त
वृक्षासारखा उंच होता. त्याचें शरीर विशाल असून नेत्र भयानक होते. त्य
कांति सूर्य किंवा अग्नि यांप्रमाणें देदीप्यमान असून तो दुराधर्ष होता. तो बो
युधिष्ठिराला बजावीत मेघगंभीर वाणीनें व उच्च स्वरानें बोलूं लागला—

**यक्ष**—हे राजन्, तुझ्या या भ्रात्यांचें मीं वारंवार निवारण करीत अ
तांहि त्यांनीं माझा अनादर करून बलात्कारानें जल प्राशन केलें. तेव्हां
त्यांचा जीव घेतला. यास्तव हे राजन्, तुला जर आपल्या प्राणरक्षणाची इ
असेल तर तूं हें पाणी पिऊं नको. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन मग यथे
जल प्राशन कर व घेऊन जा. या जलाशयावर पूर्वीपासून माझी सत्ता अ

**युधिष्ठिर**—हे यक्षा, तुझ्या या पूर्वपरिग्रहयुक्त जलाची मला इच्छा ना
आत्मप्रशंसा करणाराची सज्जन कदापि प्रशंसा करीत नसतात. यास्तव तूं
प्रश्न विचार, मी त्याचें यथामति उत्तर देण्याचा यत्न करीन.

( ३ ) **यक्ष**—आदित्याला उदय पावण्याची प्रेरणा कोण करितो ? त्या
सभोंवार रहाणारे त्याचे चर कोण आहेत ? त्याचा अस्त कोण करितो व
कशामध्यें प्रतिष्ठित होतो !

**युधिष्ठिर**—ब्रह्म त्याला वर नेतें. देव त्याच्या सभोंवार रहाणारे चर आ
धर्म त्याला अस्ताला नेतो व तो सत्यांत प्रतिष्ठित होतो.

---

१ यक्ष व युधिष्ठिर यांची ही प्रश्नोत्तरमालिका आत्मतत्त्वाचा निर्णय कर
साठीं आरंभिली आहे. ' आत्मवेत्ता शोकाचें उल्लंघन करितो. ' अशा अर्था
' तरति शोक आत्मवित् ' या श्रुतीमध्यें ज्ञानाचें सफलत्व श्रुत असल्यामुळें त्या
सिद्धीसाठीं यांत उच्च-नीच साधनें सांगितलीं आहेत.

२. प्रश्नांतील आदित्य या शब्दाचा अर्थ जीव असा आहे. कारण तो श्रो
इंद्रियांनीं शब्दादि विषयांचें ग्रहण करितो. 'मी गोरा, अंध, दुःखी व कर्ता अ

यक्ष—श्रोत्रिय कोणत्या साधनानें होतो ! त्याला कोणत्या उपायानें महत्प्राप्ति होते ! हे राजा, तो द्वितीयवान् व बुद्धिमान् कशानें होतो !

युधिष्ठिर—आचार्यमुखानें वेदार्थाचा निश्चय केल्यानें ब्राह्मण श्रोत्रिय म्ह० वेदाध्यायी होतो. केवल अक्षरग्रहणानें होत नाहीं. तपानें श्रुतार्थाचें आलोचन केल्यानें व युक्तीनें प्रमाणगत-प्रमेयगत-असंभावनादि दोषांची निवृत्ति केल्यानें तो महद्ब्रह्माचा निश्चय करितो. योगयुक्त सात्त्विक धृति म्ह० निदिध्यासन ( गी. भा. अ. १८-३३ पृ. ११८१ ), अशा धृतीनें अविद्याकृत जीवरूपाहून विलक्षण असलेलें जें त्याचें प्रत्यग्रूप त्यानें युक्त होतो आणि या तिन्ही साधनांविषयींची निश्चयात्मक बुद्धि गुरूपदेशानेंच प्राप्त होते. त्यामुळें तो बुद्धिमान् होतो. अर्थात् श्रवण, मनन, निदिध्यासन व आचार्योपदेश हे आत्मदर्शनाचे उपाय आहेत.

यक्ष—ब्राह्मणांचें देवत्व कोणतें ? सज्जनांचा धर्म कोणता ? त्यांचा मानुषभाव कोणता व त्यांच्या ठिकाणीं असज्जनासारखें काय आहे ?

---

इत्यादि अनुभवामुळें देहतादात्म्यरूपानें भासणारा व वाद्याकडून अनेकप्रकारें कल्पिला जाणारा जो जीव, त्याला 'ब्रह्म' म्ह० वेद, 'उन्नयति' म्ह० देहादिकांहून पृथक् करितो. 'नावेदविन्मनुते तं बृहन्तम्' म्ह० वेदाला न जाणणारा पुरुष विभु आत्म्याचें चिंतन करूं शकत नाही, असें श्रुतिवचन असल्यामुळें श्रुतिच आत्मतत्त्व निर्णयाविषयी प्रमाण आहे. शमादि हे देवच त्याचे चर म्ह० साह्यकर्ते आहेत. 'अस्त' म्ह० स्वस्थान. 'अपहतपाप्मादि' छान्दोग्योक्त गुणाष्टकविशिष्ट जीवकारणभूत हार्द आकाश—हृदयस्थ ब्रह्म. कर्मोपासनारूप धर्मच साक्षात् किंवा परंपरेनें त्याला त्या स्वस्थानास पोंचवितो. तो आदित्याख्य जीव अशा आपल्या सगुणब्रह्मभावास प्राप्त होऊन व त्याचा बाध करून सत्य—सर्वबाधावधिभूत शुद्ध चिन्मात्रामध्यें प्रतिष्ठित होतो. याविषयीं 'स एव विद्वान्०' ही ऐतरेय श्रुति प्रमाण आहे. (ऐ० भा० पृ० १६५) प्रथम शास्त्रजन्य ज्ञान, नतर शमादि संपन्न साधकाची देहादि अध्यासनिवृत्ति, त्यानतर स्वर्गाख्य सगुणब्रह्माचें दर्शन व शेवटी कैवल्य हा या ऐतरेय श्रुतीचा अर्थ आहे.

१ वेद हें कैवल्याचें साधन आहे, असें सांगितलें. आतां युधिष्ठिर त्याचें दृष्टद्वार—प्रत्यक्ष साधन सांगत आहे.

[1]**युधिष्ठिर**—वेदाध्ययन हेंच विप्रांचें स्वर्गलोक प्राप्त करून देणारें देवत्व आहे. समाधि व सदाचार हाच त्यांच्या ठिकाणीं सज्जनांचा धर्म आहे. जन्म-मरण प्राप्त करून देणारा देहादि अनुभव हाच त्यांचा मानुषभाव व देव-ब्राह्मणादिकांना दोष देणें, हाच त्यांचा असदाचार आहे.

**यक्ष**—क्षत्रियांचें देवत्व कोणतें ? त्यांच्या ठिकाणीं कोणता सद्धर्म असतो ? त्यांचा मानुषभाव कोणता व असदाचार कोणता ?

**युधिष्ठिर**—इष्वस्त्र म्ह० सांग धनुर्वेदाध्ययन हें क्षत्रियांचें स्वर्गलोक देणारें देवत्व आहे. यज्ञ हा सदाचार, भय हा मानुषभाव व आर्तांचा परित्याग हा असदाचार आहे.

**यक्ष**—एक यज्ञिय साम कोणतें ? एक यज्ञिय यजु कोणतें ? त्यांच्या यज्ञाचा स्वीकार कोण करतो व यज्ञ कोणाचें उल्लंघन करीत नाहीं ?

**युधिष्ठिर**—निरुद्ध केलेला प्राण व मन हेंच यज्ञांतील साम व यजु आहे. म्ह० निरुद्ध प्राण व एकाग्र मन हीं ज्ञान-यज्ञोपकारक आहेत. मुख्य ऋचाच ज्ञानाला उत्पन्न करिते. याविषयीं बृहदारण्यकांतील सप्तान्न ब्राह्मणांत (बृ. भा. १-५-३. भाग १. पृ. ३०६) आत्महितासाठीं प्रजापतीनें प्राण, मन व वाक् हीं तीन अन्नें उत्पन्न केलीं, असें वर्णन केलें आहे. ज्ञानयज्ञ उपनिषद्रूप वाणीचें उल्लंघन करीत नाहीं व ती वाणी हीच मुख्य ऋचा आहे.

**यक्ष**—आहूतींनीं देवांना तृप्त करणाऱ्या पुरुषांना कोणतें श्रेष्ठ फल मिळतें व पितरांना तृप्त करणारांना कोणतें फल प्राप्त होतें ? याच लोकीं प्रतिष्ठेची इच्छा करणारांना श्रेष्ठ काय आहे आणि संततीची इच्छा करणारांस कोणतें उत्तम फल मिळतें !

[2]**युधिष्ठिर**—देवयज्ञानें देवतांस तृप्त करणारांना सर्व लोकोपकारक वृष्टि हेंच श्रेष्ठ फल मिळतें. पितृतर्पण करणारांना क्षेत्र, उद्यान इत्यादि आत्मोपकारक फल मिळतें. या लोकांतील प्रतिष्ठेची इच्छा करणाराला गौरी व प्रजेच्छूंना पुत्र हें श्रेष्ठ फल मिळतें.

---

१ श्रवणादिकांचा अधिकार प्राप्त होण्याचीं निमित्तें युधिष्ठिर पुढील तीन उत्तरांनीं सांगतो.

२ शमादि व प्राणजयादि साधनांचा असंभव झाला असतां यज्ञादिकांचेंच अनुष्ठान करावें, असें आतां युधिष्ठिर सांगतो.

**यक्ष**—बुद्धिमान्, लोकपूजित, विषयांचा अनुभव घेणारा व सर्व भूतांना संमत असा कोणता पुरुष जिवंत असूनहि नसल्यासारखा असतो ?

**युधिष्ठिर**—देवता, अतिथि, भृत्य म्ह० आश्रित, पितर व स्वतः आपण या पांचांना जो हव्यादि देत नाहीं, तो जिवंत असला तरी मृतच होय.

**यक्ष**—भूमीहून अधिक गुरु-जड काय आहे ? आकाशाहून उच्चतर काय आहे ? वायूहून अधिक वेगवान् कोण आणि तृणाहून अधिक विपुल काय आहे ?

**वैशंपायन**—राजा, यक्षाचा हा प्रश्न ऐकून पूर्वोक्त साधनें आचरण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानें माता-पितरांची शुश्रूषा, मनोनिरोध व तृणवत् तुच्छ असलेल्या चिंतेचा त्याग करावा, अशा आशयानें **युधिष्ठिर** म्हणाला—माता भूमीहून गुरुतर आहे, पिता आकाशाहून उच्चतर आहे, मन वायूहून शीघ्रतर आहे व चिंता तृणाहून विपुल आहे.

**यक्ष**—झोंप लागली असतां निमिषोन्मेष कोण करीत नाहीं ? उत्पन्न झाल्यावर हालचाल कोण करीत नाहीं ? हृदय कोणाला नाहीं ? व वेगानें कोण वाढतें ?

**युधिष्ठिर**—निजलेला मत्स्य निमिषोन्मेष करीत नाहीं. उत्पन्न झालेलें अंडें चलन-वलन करीत नाहीं. पाषाणाला हृदय नाहीं व नदी वेगानें वाढते.

**यक्ष**—प्रवाश्याचा मित्र कोण ? त्याचप्रमाणें सद्गृहस्थ, रोगातुर व मरणोन्मुख मनुष्य यांचा मित्र कोण ?

मनोनिरोध करण्यास दानच श्रेयस्कर आहे, अशा आशयानें **युधिष्ठिर** म्हणाला—हे यक्षा, ज्याप्रमाणें व्यापाऱ्यांचा समूह हाच प्रवाश्याचा मित्र आहे, सद्भार्या सद्गृहस्थाचा मित्र आहे व वैद्य रोगग्रस्ताचा मित्र आहे, त्याचप्रमाणें दान हा मुमूर्षूचा मित्र आहे.

---

१ गायी व पुत्र हीं दृष्ट फलें आहेत. तथापि अतिथींचा संतोष व श्राद्ध प्रदानादि यांच्या द्वारा तीं उपकारक असल्यामुळें परंपरेनें पुरुषाच्या श्रवणादि अधिकार प्राप्तीचीं साधनें होतात; पण युधिष्ठिर या पूर्वोक्त साधनांपासूनहि भ्रष्ट झालेल्या पुरुषाची निंदा करीत आहे.

२ हेंच प्रश्नोत्तर तीर्थयात्रापर्वांत (खंड ३ अध्याय १३३ पृ. ३१५) अष्टावक्र, व जनकराजा यांच्या संवादांत सविस्तर वर्णिलें आहे. यास्तव येथें त्याचा विस्तार केला नाहीं. या दोन श्लोकांचा अध्यात्मपर अर्थ त्यांत पहावा.

यक्ष—सर्व भूतांचा अतिथि कोण ? सनातन धर्म कोणता ? आणि हे राजेंद्रा, अमृत व हें सर्व जगत् किंस्वरूप आहे ?

वैशंपायन—जनमेजया, यज्ञादिकांतील दानाला चित्तशुद्धीच्या द्वारा आणि यज्ञादिकाला चित्तैकाग्र्यद्वारा समष्टि-उपासनेच्या प्रवृत्तीचें हेतुत्व असल्यामुळें दान व यज्ञादि या दोहोंनाहि मोक्षोपकारकत्व आहे, अशा आशयानें युधिष्ठिर म्हणाला—" आहवनीयादिरूप अग्नि हाच सर्व भूतांचा अतिथि आहे. गाईचें दूध हेंच सोमाख्य अमृत आहे. त्या गोक्षीररूप सोमाचें हवन करणें हाच नित्य धर्म आहे व तो मोक्षाचें साधन असल्यामुळें अमृत आहे. ( आतां मोक्षाचें द्वार सांगतों– ) वायूच हें सर्व जगत् आहे. ( वायूच व्यष्टि व समष्टि अशी श्रुति असल्यामुळें पिंड-ब्रह्मांडात्मक वायुरूपत्वाची प्राप्ति हेंच मोक्षद्वार आहे, असा याचा भावार्थ. )

यक्ष—एकटाच कोण संचार करितो ? एकदा उत्पन्न झालेलाच पुनः कोण जन्म पावतो ? हिमाचें औषध काय ? व महत् आवपन कोणतें ?

पूर्वोक्त वायूचाहि संहार झाल्यावर काय अवशिष्ट राहतें, तें सांगण्याच्या इच्छेनें **युधिष्ठिर** म्हणाला—एकटा सूर्यच संचार करितो. म्ह० सूर्याप्रमाणें चित्प्रकाशरूप असलेला आत्माच प्रकाश पावतो. चंद्रमा हीच ज्याची देवता आहे, तें मनच अविद्यावशात् पुनः पुनः उत्पन्न होतें व तें दुःखप्रद जगाची कल्पना करितें. ( अविद्येच्या निवृत्तीचा उपाय सांगतों– ) तत्त्वमस्यादि अग्निरूप वाक्च अविद्याजाड्याचें औषध–निवारक आहे. शरीराख्य भूमि हेंच मोठें आवपन–विद्या व अविद्या यांचें निधानस्थान आहे. कारण या शरीरांतच संसारित्वाप्रमाणें असंसारी ब्रह्मभावहि साक्षात् अनुभविला जातो.

यक्ष—एकच धर्म्य स्थान कोणतें ! म्ह० सर्वधर्म कोणत्या एका साधनांत अंतर्भूत होतो ! यश, स्वर्ग्यसाधन व सुख यांतील प्रत्येकाचें एकेक पर्यवस्थान कोणतें !

---

१ या प्रश्नोत्तर मालिकेंतील पहिल्या दोन प्रश्नांनीं साधनांसह ब्रह्मविद्येचा उपन्यास केला. पुढील सात प्रश्नांनीं ' त्वं ' पदार्थाचें शोधन केलें. त्या पुढील तीन प्रश्नांनीं साधनासह तत्पदार्थाचें शोधन केलें. तत्पदार्थ व त्वंपदार्थशोधन म्ह० ईश्वर व जीव यांना उपाधिशून्य शुद्ध चैतन्यरूपानें प्रदर्शित करणें. आतां पुनः भिन्नप्रकारानें साधनांचाच उपदेश करून तत्त्वंपदार्थाचा अभेद या पुढील नऊ प्रश्नांनीं दाखविला आहे.

**युधिष्ठिर**—दक्षता हें एक धर्म्यपद आहे म्ह० एका दक्षतेमध्यें सर्व धर्मांचें पर्यवसान होतें. दानामध्यें सर्व यश पर्यवस्थित होतें. एका सत्यामध्यें सर्व स्वर्गसाधनें अंतर्भूत होतात आणि एका शीलामध्यें सर्व सुख परिसमाप्त होतें.

**यक्ष**—मनुष्याचा आत्मा कोण? दैवकृत सखा कोण? त्याचें उपजीवन व परायण काय?

**युधिष्ठिर**—हे यक्षा, मनुष्यानें उद्योग, दान, सत्य व शील यांचें सेवन तर करावेंच; पण त्यांतल्या त्यांत दान हाच पुत्रतुल्य आत्मा आहे. भार्या हाच दैवकृत सखा व पर्जन्यवत् उपजीवन आहे. तथापि दान सर्वांचें परायण आहे. कारण तें आत्मप्रद आहे, रमणीय फल देणारें आहे व 'दिल्यावांचून प्राप्त होत नाहीं,' असें शास्त्रवचन असल्यामुळें उपजीवनाचें कारणहि आहे.

**यक्ष**—धनाला हितावह असलेल्या धन्य वस्तूंतील उत्तम धन्य वस्तु कोणती? धनांतील उत्तम धन, लाभांतील उत्तम लाभ व सुखांतील उत्तम सुख कोणतें!

**युधिष्ठिर**—दक्षता हेंच धन्यांतील उत्तम धन्य म्ह० धनाला हितावह साधन आहे. वेदशास्त्राध्ययन हेंच उत्तम धन आहे, स्वर्ण-रौप्यादि हें नव्हे. आरोग्य हें धर्माचें उत्तम साधन असल्यामुळें तोच श्रेष्ठ लाभ होय व संतोष हेंच सर्वोत्तम सुख आहे. उद्योग, अध्ययन, आरोग्य व संतोष हीं चार साधनें दृष्टफलाच्या द्वारा ज्ञानावर उपकार करितात.

**यक्ष**—लोकांमध्यें श्रेष्ठ धर्म कोणता? सदा फल देणारा धर्म कोणता? कशाचें नियमन केलें असतां शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं! कोणाशीं केलेला समागम जीर्ण होत नाहीं!

**युधिष्ठिर**—सर्व भूतांना अभय देणें, एतद्रूप संन्यास, हाच श्रेष्ठ धर्म आहे. प्रणव हा मोक्षमंत्र असून 'त्रयी'-शब्दानें येथें त्रिमात्र प्रणव विवक्षित आहे. त्याचा आश्रय केलेला जो धर्म तो अकार, उकार व मकार, यांचे अर्थ, एतद्रूप स्थूल, सूक्ष्म व कारण, या उपाधींचा क्रमानें उत्तरोत्तर प्रविलाप करून अर्धमात्रार्थभूत तुरीय ब्रह्मामध्यें अवस्थित होणें, हाच अविनाशी फलरूप धर्म आहे. कारण तुरीय ब्रह्मावस्थानरूप ब्रह्म हें साक्षात् मोक्षसाधन आहे. त्या धर्माच्या प्राप्तीचा मनोनिग्रह हाच उपाय असून त्याच्या योगानें आत्मतत्त्वाचा साक्षात्कार होतो व पुरुष सुखाचेंहि उल्लंघन करितो. यास्तव मनोनिग्रह केल्यानें जीव शोक करीत नाहीं व मनोनिग्रहाच्या मार्गाचा उपदेश करणारे जे कृपाळु संत, त्यांचा सहवास केला असतां तो केव्हांहि जीर्ण होत नाहीं.

यक्ष—कशाचा त्याग केल्यानें मनुष्य प्रिय होतो ? कोणत्या वस्तूचा अव्हेर केल्यानें तो शोक करीत नाहीं ? कशाचा परित्याग केला असतां मनुष्य अर्थवान् व सुखी होतो ?

मानादि चतुष्टयाचा त्याग हेंच मनोनिग्रहाचें दृष्ट द्वार आहे. या आशयानें युधिष्ठिर म्हणतो—मान सोडल्यानें मनुष्य प्रिय होतो. क्रोध सोडून शोक करीत नाहीं. कामाचा त्याग करून अर्थवान् होतो व लोभाचा परिहार करून सुखी होतो.

यक्ष—ब्राह्मण, नटनर्तक, भृत्य आणि राजे यांतील प्रत्येकाला कशासाठीं दान दिलें जातें ?

युधिष्ठिर—ब्राह्मणाला दिलेलें दान धर्मवृद्धीला कारण होतें, नट-नर्तकांना दिलेलें दान यश वाढवितें. भृत्यांना दिलेलें दान त्यांचें पोषण करतें. पण राजाला केवल भीतीनें दान दिलें जातें. या चारी प्रकारच्या दानांतील ब्राह्मणाला दिलेलें दान धर्मोपयोगी असल्यामुळें परंपरेनें मोक्षसाधनहि होतें. इतरांना दिलेलें दान तसें मोक्षोपकारक होत नाहीं.

यक्ष—हा लोक कशानें आवृत आहे व तो कशानें प्रकाशित होत नाहीं ? पुरुष मित्रत्याग कां करितो ? त्याला स्वर्गप्राप्ति कां होत नाहीं ?

युधिष्ठिर—जरा, मरण, शोक, मोह, इत्यादिकांचा आश्रय, असें जें स्थूल-सूक्ष्म-शरीरद्वयरूप अज्ञानकार्य, त्यानें हा चिद्रूप आत्मा आवृत झाला आहे. कल्पित सर्पानें जशी रज्जु अदृश्य होते, त्याप्रमाणें हा अनुभवरूप आत्माहि शरीरद्वयरूप कल्पित उपाधीनें अदृश्य झाला आहे. यास्तव अज्ञानाच्या नाशासाठीं त्रयी धर्माची अत्यंत आवश्यकता आहे.

यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, सुषुप्तींत दोन्ही देहांचा अभाव झालेला असल्यामुळें त्याबरोबर अज्ञानाचा नाशहि झालाच आहे. मग आतां त्रयी धर्मांचा काय उपयोग ! तर त्याचें उत्तर ऐक.

---

१ दानबलानें मानादिकांना जिकून मनोनिग्रह करणाऱ्या पुरुषांचा आत्यंतिक नाश होईल. अकारादि-मात्रार्थरूप स्थूलादि उपाधींचा उत्तरोत्तर उपाधींत लय करणें एतद्रूप त्रयीधर्माची काय आवश्यकता आहे ? अशा आशयानें यक्षानें हा प्रश्न केला आहे.

सुषुप्तींतहि मूल अज्ञानानें त्याला झांकून टाकिलें आहे, म्हणून तो अनुभवाला येत नाहीं. यास्तव त्रयी धर्मानें पूर्वोक्त प्रकारें तिन्ही देहांचा उत्तरोत्तर कारणांत अवश्य प्रविलाप करावा म्हणजे स्थूल शरीर सूक्ष्म शरीररूप आहे, सूक्ष्म शरीर कारण शरीररूप आहे व कारण शरीर चिदात्मरूप आहे, असें उत्तरोत्तर चिंतन करावें. ज्ञान व विज्ञान यांचाच परस्पर विरोध आहे आणि संसार हें अज्ञानाचें कार्य आहे, त्यामुळें नुस्त्या चित्तनिरोधानें त्याचा नाश होणार नाहीं. तर सर्पाचा बाध करून रज्जूला जाणल्यानेंच जसा समूल भयाचा नाश होतो, त्याप्रमाणें देहत्रयाचा बाध करून स्वरूपाचें ज्ञान झाल्यानेंच समूल संसाराचा नाश होतो.

हे यक्षा, लोभामुळें पुरुष मित्रांचा त्याग करितो व ऐहिक विषयासक्तीमुळें स्वर्गाला जात नाहीं. यास्तव लोभ व संग यांचा त्याग करून ज्ञानच संपादन करावें.

**यक्ष**—पुरुष, राष्ट्र, श्राद्ध, व यज्ञ हीं कशानें मृत होतात ?

लोभ व संग यांचा त्याग न केल्यास कोणता दोष उद्भवतो, हें सांगण्याच्या आशयानें **युधिष्ठिर** म्हणाला — यक्षा, दरिद्र—लुब्धचित्त पुरुष मृत होय. कारण तो दानादि करण्यास असमर्थ असतो. ज्याप्रमाणें राजरहित राष्ट्र मृत असतें, त्याप्रमाणें प्राणरूपी राजाचें संचारस्थान असलेलें हें दरिद्र्याचें शरीर जिवंत असूनहि मृतच आहे. श्रोत्रियरहित श्राद्ध मृत असून दक्षिणारहित यज्ञहि मृत आहे.

**यक्ष**—दिशा कोणती ? उदक कशाला म्हणतात ? अन्न कोणतें व विष काय आहे ? राजा युधिष्ठिरा, आतां श्राद्धाचा काल कोणता तें सांग आणि तूं हें जल प्राशन कर व घेऊनहि जा.

**युधिष्ठिर**—वेदप्रमाणनिष्ठ संत हेच उपदेष्टे आहेत. म्ह० आचार्यवचनानेंच ब्रह्म जाणावें. जल म्ह० पिंड-ब्रह्माण्डात्मक कार्य व त्यावर अभिमान ठेवणारा चेतन व्यष्टि-समष्टि जीव या जलशब्दावरून लक्षित होतो व आकाश—अव्याकृत कारण, यावरून त्याचा अभिमानी ईश्वर लक्षित होतो. येथें जल व आकाश यांचा ' जलं आकाशं, ' असा एक विभक्त्यन्त प्रयोग केलेला

१ याप्रमाणें लोभादिकांचा त्याग, दानादिकांचें अनुष्ठान, शमादिसंपत्ति व श्रवणादिक यांनीं युक्त असलेल्या पुरुषाला ज्ञातव्य असलेलें जें ब्रह्मात्मैक्य तेंच सांगण्यासाठीं यक्ष हा प्रश्न करीत आहे.

असल्यामुळें सामानाधिकरण्य संबंध आहे, त्यामुळें उपाधीचा अंश टाकून शुद्ध चिन्मात्र, या अर्थीं लक्षणा केल्यानें अभेद सिद्ध होतो. सर्व वेदान्तांतील ज्ञातव्य अर्थ हा एवढाच आहे.

गौः–इंद्रियें, अन्नं–इंद्रियग्राह्य शब्दादि अर्थजात. जलामध्यें टाकलेलें लवण जसें त्यांत लीन होतें, त्याप्रमाणेंच इंद्रियांमध्यें विषयरूप अन्नाचा लय करावा. जीवोपाधि व ईश्वरोपाधि या दोन्ही उपाधींना मिथ्यात्व असल्यामुळेंच अधिष्ठानामध्यें आरोपिताचा लय सहज साध्य आहे.

प्रार्थना म्ह० काम, हेंच जणुंकाय विष आहे. कारण कामच जन्म-मरणाचा हेतु आहे. ( यास्तव कामाचा त्याग व गुरूपदेशानें प्रपंचाचा प्रविलाप करून प्रत्यक्-ब्रह्माचा अभेद म्ह० ऐक्य प्रत्यक्ष अनुभवावें; असा या सर्व उत्तरांचा आशय आहे. ) ब्राह्मण म्ह० ब्रह्मवेत्ता, तोच श्राद्धाचा म्ह० श्रद्धेनें प्रदेय वस्तूचा समय आहे. म्ह० ज्यावेळीं सत्पात्राचा लाभ होईल, त्याचवेळीं धर्मज्ञानादिकांचें अनुष्ठान करावें व शिक्षण घ्यावें. ( येथें साधनासह ब्रह्मविद्या समाप्त झाली. तथापि दुसरींहि ज्ञानसाधनें व ज्ञान्याचीं लक्षणें विचारण्याची इच्छा करणारा युधिष्ठिर यक्षाला म्हणतो— ) यक्षा, मीं जें सांगितलें त्याविषयीं तुझें काय मत आहे ? तुझ्या मतानें एवढ्या साधनांनीं व ज्ञानानें कृतकृत्यत्व प्राप्त होतें कीं नाहीं ? ( या यक्षाच्या सर्व प्रश्नांचें उत्तर दिल्यावांचून हा भ्रातृजीवनादि सुखावह वर देणार नाहीं, असें जाणून युधिष्ठिरानें हा साभिप्राय प्रश्न केला आहे. )

**यक्ष**—तपाचें लक्षण काय ? दम कोणता ? श्रेष्ठ क्षमा व ह्री यांचें लक्षण काय आहे ?

**युधिष्ठिर**—स्वधर्मवर्तित्व हेंच तप. मनाचें दमन हाच दम, शीतोष्णादि द्वंद्वांचें सहिष्णुत्व हीच क्षमा व अकार्यापासून निवृत्ति हीच लज्जा.

**यक्ष**—हे राजा, ज्ञान, शम, परा, दया व आर्जव यांचीं काय लक्षणें सांगितलीं आहेत ?

**युधिष्ठिर**—तत्त्वार्थबोध हेंच ज्ञान, चित्ताची प्रशांति हाच शम, सर्व भूतांच्या सुखाची इच्छा करणें, हीच दया व समचित्तता हेंच आर्जव होय.

---

१ तपःप्रभृति आठ ज्ञानसाधनांची लक्षणें या व याच्या पुढील प्रश्नांत सांगितलीं आहेत.

यक्ष—पुरुषांचा दुर्जय शत्रु कोणता ? अनंत व्याधि कोणता ? साधु कोणाला म्हणतात व असाधु कसा कसतो ?

युधिष्ठिर—क्रोध हा अति दुर्जय शत्रु आहे. लोभ हा नित्य व्याधि आहे. साधु सर्व भूतांच्या हितामध्यें रत असतो व असाधु निर्दय असतो. ( अर्थात् क्रोध, लोभ व निर्दयत्व यांचा त्याग करून सर्व भूतांच्या हितांत रत व्हावें. )

यक्ष—राजन्, मोह[1] कोणता ? मान, आलस्य व शोक यांचीं लक्षणें काय आहेत ?

युधिष्ठिर—धर्मांविषयींचें मूढत्व हाच मोह. आत्माभिमानित्व म्ह० मी वरिष्ठ, श्रीमान्, विद्वान् इत्यादि आढ्यता हाच मान, धर्मांचें आचरण न करणें हें आलस्य व अज्ञान हाच शोक होय.

यक्ष—ऋषींनीं श्रेष्ठ स्थैर्य, धैर्य, स्नान व दान यांचीं कोणतीं लक्षणें सांगितलीं आहेत ?

युधिष्ठिर—स्वधर्मांत स्थिर स्थित होणें हेंच स्थैर्य. इंद्रियनिग्रह हेंच धैर्य, राग-द्वेषादि मनोमलाचा त्याग करणें हें स्नान व भूतांचें रक्षण हेंच दान होय.

यक्ष—पंडित कोणाला समजावें व नास्तिक कोणाला म्हणावें ? मूर्ख कोण ? काम कोणता व मत्सर कोणता ?

युधिष्ठिर—धर्मज्ञालाच पंडित समजावें. परलोक न मानणाराला नास्तिक म्हणावें व तोच मूर्ख होय. मूर्ख त्याहून निराळा नाहीं. संसाराला कारण होणारी वासना हाच काम व मनःसंताप हाच मत्सर होय.

यक्ष—अहंकार व दंभ यांचीं लक्षणें कोणतीं ? परम दैव कोणतें व पैशुन्य कशाला म्हणतात ?

युधिष्ठिर—महदज्ञान हाच अहंकार, लोकांमध्यें ख्याति व्हावी, म्हणून आचरिलेला जो धर्म, तोच दंभ होय. दानाचें फल हेंच दैव व परदूषण हेंच पैशुन्य होय. ( यास्तव दंभ, दर्प व पैशुन्य यांचा त्याग करून, यदृच्छालाभ-संतुष्ट होऊन निष्काम कर्म करावें. )

यक्ष—धर्म, अर्थ व काम हे परस्परविरोधी आहेत, यास्तव नित्य विरुद्ध असलेल्या त्यांचा एका पुरुषामध्यें संगम कसा होतो ? ( कारण अर्थ व काम हे विरोधी असतांना मुख्य धर्मांचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं. )

---

१ या पुढील तीन प्रश्नांनीं मोहादिकांच्या लक्षणाचा विचार केला आहे.

**युधिष्ठिर**—जेव्हां अग्निहोत्रादि धर्म हा संन्यासासारखा भार्याविरोधी होत नाहीं व भार्या दानादिप्रतिबंधकावांचून धर्मामध्यें विरोधिनी होत नाहीं, तेव्हां धर्म अर्थ प्रसवतो व भार्या कामपूर्ति करिते. त्यामुळें अशा गृहस्थाच्या ठिकाणीं या त्रिवर्गाचा एकत्र संभव होतो. ( अर्थात् गृहस्थांनाहि धर्मद्वारा मोक्षाधिकार आहे. )

**यक्ष**—हे भरतश्रेष्ठा, अक्षय नरक ( म्ह० नित्य संसारित्व ) कशानें प्राप्त होतो ? या माझ्या प्रश्नाचें उत्तर तूं सत्वर दे.

**युधिष्ठिर**—आसुरी संपत्ति हेंच नित्य संसारित्वाचें कारण आहे. उदाहरणार्थ—याचना करणाऱ्या निष्कांचन ब्राह्मणाला स्वतः बोलावून आणून मागाहून ‘ कांहीं देत नाहीं, जा ’ असें जो बोलतो तो अक्षय नरकास जातो म्ह० नित्य संसारी होतो. वेद, धर्मशास्त्र, ब्राह्मण, देव, श्राद्ध-तर्पणादि पितृधर्म, यांमध्यें जो मिथ्या दृष्टि ठेवितो तो अक्षय नरकांत पडतो.

धन विद्यमान असतांना जो लोभानें दान देत नाहीं, स्वतः उपभोग घेत नाहीं व याचकाला द्रव्य देण्याचें नाकरितो, तो अक्षय नरकास प्राप्त होतो.

**यक्ष**—हे राजा, कुल, वृत्त, वेदाध्ययन व वेदार्थज्ञान यांतील कोणत्या उपायानें ब्राह्मण्य प्राप्त होतें, तें मला निश्चित सांग.

**युधिष्ठिर**—बा यक्षा, मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतों, तें तूं सावधान चित्तानें ऐक. कुल हें ब्राह्मण्याचें कारण नव्हे, केवल वेदाक्षरपाठ व त्याचें अर्थज्ञान हीं दोहीं मिळून एकच साधन आहे. पण तेंहि ब्राह्मण्याचें साधन नव्हे. केवल वृत्त म्ह० सदाचार हेंच द्विजत्वाचें कारण आहे, यांत संशय नाहीं. विशेषतः ब्राह्मणानें आपल्या वृत्ताचें यत्नानें रक्षण करावें. ज्याचा सदाचार क्षीण झालेला नसतो, तो ब्राह्मणहि कधीं क्षीण होत नाहीं. पण जो आपल्या आचारापासून च्युत होतो तो सर्व पुरुषार्थांपासून भ्रंश पावतो. वेदाचें अध्ययन करणारा व वेदाचे पाठ सांगणारा आणि इतरहि जे शास्त्रचिंतक आहेत ते सर्व मूर्ख व व्यसनी आहेत. कारण त्यांना त्या त्या विषयाचें व्यसनच लागलेलें असतें. पण वेद-शास्त्रादिकांत सांगितल्याप्रमाणें जो

१ वृत्तं यत्नेन संरक्ष्यं ब्राह्मणेन विशेषतः ।
अक्षीणवृत्तो न क्षीणो वृत्ततस्तु हतो हतः ॥

आचरण करितो, तो पंडित होय. चारी वेदांचें अध्ययन करूनहि जो दुर्वृत्त असतो तो शूद्राहूनहि हीन आहे. पण याच्या उलट जो अल्पाध्ययन करून व अग्निहोत्रादि नित्यकर्मपरायण असूनहि दमनशील असतो, तो खरा ब्राह्मण होय.

यक्ष—प्रिय भाषण करणाऱ्याला कोणता लाभ होतो? विचारपूर्वक कार्य करणाराला कोणतें फल मिळतें? अनेक मित्र संपादन करणाराचें कोणतें हित होतें व स्वधर्मांत रत असणारांस कोणती गति प्राप्त होते, तें सत्वर सांग.

युधिष्ठिर—प्रियवचनवादी सर्वांना प्रिय होतो. विचारपूर्वक कार्य करणाराचा अतिशय उत्कर्ष होतो. अनेक मित्र संपादन करणारा सुखानें रहातो व स्वधर्मरत असणारास श्रेष्ठ गति मिळते.

यक्ष—राजन्, संतुष्ट कोण? आश्चर्य कोणतें? मार्ग कोणता? व वार्ता कोणती? या माझ्या चारी प्रश्नांचें उत्तर दे व तुझे मृत भ्राते जिवंत होवोत.

कर्म, उपासना व ज्ञान यांचें अंतरंग साधन वैराग्य आहे, असें सांगण्याच्या आशयानें युधिष्ठिर म्हणतो—हे जलचर यक्षा, जो गृहस्थ स्वगृहांत पांचव्या किंवा सहाव्या दिवशीं नुस्ती शाक शिजवून खातो पण इतरांपाशीं अन्नाची याचना करीत नाहीं, ज्याला कोणाचें ऋण नसतें व ज्याला कधीं प्रवास करण्याचा प्रसंग येत नाहीं तो संतुष्ट होय. ( ऋण व प्रवास न करतां यदृच्छालाभसंतुष्ट व्हावें असा याचा भावार्थ. )

प्रत्येक दिवशीं असंख्य प्राणी मरून यमलोकीं जातात, पण त्यांच्या मागें राहिलेले आप्त त्यांच्या स्थावराची इच्छा करितात, याहून अधिक आश्चर्य तें काय? ( यास्तव आपला देहहि विनाशी आहे, याचें चिंतन करून व प्राप्त भोगांचाहि त्याग करून सत्वर परमार्थासाठीं यत्न करावा.

कोणताहि तर्क स्थिर स्थित होत नाहीं. म्ह० तर्कानें कसलाच निर्णय होत नाहीं. श्रुतिहि परस्पर विरुद्ध अर्थ सांगतात. तिचें व्याख्यान करणारे मुनीसुद्धां तशाच विरुद्ध अर्थाचें प्रतिपादन करितात. ज्याचें मत प्रमाण मानावें असा एकच ऋषि नाहीं. धर्माचें तत्त्व बुद्धिलक्षण गुहेमध्यें अतिशय गूढस्थानीं स्थापिलेलें आहे. यास्तव महाजनांना संमत असलेला जो मार्ग

१ चतुर्वेदोपिदुर्वृत्तः स शूद्रादतिरिच्यते ।
योऽग्निहोत्रपरो दान्तः स ब्राह्मण इति स्मृतः ॥

तोच खरा मार्ग होय. तस्मात् अनंत धर्मशास्त्रादि विद्यांसाठीं परिश्रम न करतां बहुजनसंमत मार्गाला अनुसरावें.

काल भूतांना रात्र व दिवस हींच ज्याचीं काष्ठ आहेत अशा सूर्यरूपी अग्नीनें मास व ऋतु, याच पळीनें महामोहमय कढईत पुनः पुनः ढवळून शिजवीत आहे, हीच वार्ता. ( स्त्र्यादि भोगसाधनेंहि चिरकाल टिकणारीं नाहींत, असें जाणून सर्वतः विरक्त व्हावें, असा याचा भावार्थ. )

कर्म व ज्ञान यांच्या फलाचा विवेक करण्यासाठीं यक्ष म्हणाला—" हे शत्रुतापना युधिष्ठिरा, तूं माझ्या सर्व प्रश्नांचें यथार्थ उत्तर दिलेंस. आतां कोणता पुरुष जिवंत असतो व कोणता पुरुष पूर्णकाम होतो, हें मला सांग."

युधिष्ठिर—ज्याच्या सकाम किंवा निष्काम पुण्य कर्मानें स्वर्ग व भूमि यांस व्यापणारा शब्द उद्भवतो व जोंवर तो कीर्तिशब्द अस्तित्वांत असतो, तोंवरच तो पुरुष म्हटला जातो. ( पुरुषाची पुण्यजन्य कीर्ति असेपर्यंतच तो जिवंत असतो. पुनः तो या लोकीं येऊन पूर्ववासनानुरूप कर्में करितो. पण तीं करतां करतां क्रमानें तो निष्काम झाल्यास मुक्त होतो आणि सकाम असल्यास वासनापाशानें अधिक बद्ध होतो. ज्याला प्रिय व अप्रिय, सुख व दुःख, भूत व भविष्यत् हीं तुल्य असतात, तो ब्रह्मवेत्ताच पूर्ण काम सर्वधनी होय. )

याप्रमाणें यमधर्मानें आपल्या पुत्राच्या ( युधिष्ठिराच्या ) ज्ञानाचें परीक्षण करून त्याच्या धर्मनिष्ठेची परीक्षा करण्यासाठीं त्यास म्हटलें—" हे राजा, तूं जिवंत असलेल्या व पूर्णकाम सर्वधनी पुरुषाचें यथार्थ व्याख्यान केलेंस. यास्तव तुझ्या या चार भ्रात्यांतील तुला इष्ट असलेला एक भ्राता जिवंत होवो."

युधिष्ठिर—हे यक्षा, ज्याचा श्यामवर्ण असून नेत्र आरक्त आहेत, जो साल वृक्षासारखा उंच असून ज्याचें वक्षःस्थल विशाल आहे, तो महाबाहु नकुल जिवंत होवो.

यक्ष—युधिष्ठिरा, भीमसेन तुला अतिशय प्रिय आहे व अर्जुन तर तुम्हां सर्वांचा आधार आहे, असें असतां तुझा सापत्न भ्राता नकुलच जिवंत व्हावा असें कां इच्छितोस ? ज्याचें बल दहा सहस्र हत्तींच्या बला इतकें प्रचंड आहे, त्या बलाढ्य भीमाला सोडून नकुलाच्या जीविताचीच कां इच्छा करितोस ! हा वृकोदर तुला प्रिय आहे, असें सर्व लोक म्हणतात. असें असतां या सापत्न नकुलाच्या कोणत्या प्रभावानें तूं त्याच्याच जीविताची इच्छा करितोस ?

सर्व पांडव ज्याच्या बाहुबलाचा आश्रय करून या भूलोकीं सुखानें रहात आहेत, त्या अर्जुनाला सोडून तूं नकुलाच्या अस्तित्वाचीच इच्छा कां करितोस?

**युधिष्ठिर**—यक्षा, धर्माचा घात केला असतां तो आपला नाश करितो व धर्माचें पालन केलें असतां तो आपलें रक्षण करितो. यास्तव मी धर्माचा त्याग करणार नाहीं. माझ्या हातून हत झालेला धर्म आमचा नाश न करो. समत्व हा सत्याहूनहि श्रेष्ठ धर्म आहे, असें मी समजतों. मी समत्वाची इच्छा करीत आहें. यास्तव हे यक्षा, नकुलच जिवंत होऊं दे.

सर्व लोक 'हा राजा धर्मशील आहे' असें मला समजतात, यास्तव मी स्वधर्मापासून ढळणार नाहीं. माद्रीपुत्र नकुलच तुझ्या वरानें जिवंत होवो. माझ्या पित्याला कुंती व माद्री अशा दोन भार्या होत्या. त्या माझ्या दोन्ही माता पुत्रवती असाव्या अशी माझी निश्चित बुद्धि आहे. मला जशी कुंती तशीच माद्री, त्यांच्याविषयीं माझ्या मनांत भेदभाव नाहीं. माझ्या दोन्ही मातांनीं पुत्रवती असावें, असें मी इच्छितों, यास्तव नकुलच सजीव होऊं दे.

( ४ ) **यक्ष**—हे वत्सा, ज्याअर्थी तुला अर्थ व काम यांहून समत्वच श्रेष्ठ वाटत आहे, त्याअर्थी तुझे सर्व भ्राते जिवंत होवोत. ३. २२. ३१३.

---

## अध्याय ३१४ वा.

[ १ चौघां पांडुपुत्रांचें पुनर्जीवन. २ युधिष्ठिराचा प्रश्न व यक्षरूपी धर्माचें स्वरूप कथन. ३ युधिष्ठिराची स्तुति व वरदान. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, यक्षानें हे शब्द उच्चारतांच ते चौघेहि पांडव उठून बसले व त्या सर्वांची क्षुधा आणि तृषा नाहींशी झाली.

(२) तेव्हां युधिष्ठिर म्हणाला—हे भगवन्, या सरोवरांत एका पायावर उभा असणारा तूं कोणता देव आहेस ? तूं यक्ष असावास असें मला वाटत नाहीं. तूं अष्टावसूंतील एक देवता आहेस किंवा रुद्र, मरुत्, देवेश्वर श्रेष्ठ इंद्र यांतील कोणी आहेस ? माझे हे भ्राते लक्षावधि योद्ध्यांशीं युद्ध करण्यास समर्थ आहेत. त्यांस देवांवांचून इतर कोणी गतप्राण करूं शकेल, असें मला वाटत नाहीं. शिवाय हे माझे भ्राते सुखानें निजून उठल्याप्रमाणें दिसत आहेत. त्यांचीं गात्रें यत्किंचित्हि श्रांत झालेलीं दिसत नाहींत. यावरून तूं आमचा कोणी सुहृद् आहेस किंवा आमचा पिता असावास, असें मला वाटतें !

**यक्ष**—वत्सा, मी तुझा जनक धर्म आहें. तुझी परीक्षा पहाण्यासाठीं येथें आलों आहें. हे सोम्य, यश, सत्य भाषण, बाह्येंद्रियांचा जय, शारीर व मानस, असें द्विविध शौच, अंतःकरणाचा सरळपणा, मार्दव, अक्रूरत्व, मनाचें स्थैर्य, दान, तप, स्वधर्माचरण व ब्रह्मचर्य हे माझेच देह आहेत. अहिंसा, समता, शांति, कृच्छ्र-चांद्रायणादि तप, अमात्सर्य, हीं धर्मप्राप्तीचीं द्वारें आहेत.

(१) पुत्रा, तूं मला सर्वदा प्रिय आहेस. तूं शम, दम, उपरति, तितिक्षा व चित्तैकाग्र्य या पांच आत्मदर्शन साधनांनीं युक्त असून पूर्व पुण्यवशात् षट्पदी-जय हें त्याचें फल तुला प्राप्त झालें आहे. क्षुधा, तृषा, शोक-मोह, जरा व मृत्यु या सहा ऊर्मींना येथें षट्पदी असें म्हटलें आहे. यांतील पहिल्या दोन ऊर्मि प्राणी उत्पन्न होतांच त्याला पीडा देऊं लागतात. इष्टवियोगजन्य चित्तसंताप हा शोक व अतिपापामुळें कार्याकार्याचें अनुसंधान न रहाणें हा मोह. या दोन ऊर्मि मध्यम वयांतच उद्भवतात. जरा-मृत्यु या उत्तर वयांत प्राप्त होतात व त्या जीवाला परलोकीं नेतात.

मी तुझा पिता धर्म आहे. तुझें कल्याण असो. मोक्षसुखाख्य अद्वयसच्चिदानंदाची तुला प्राप्ति होवो.

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें यक्षानें प्रश्नोत्तरमालिकेनें ब्रह्मविद्येचें प्रतिपादन करून व यश, सत्य, इत्यादि साधनें सांगून तिचा उपसंहार केला. आतां पूर्व प्रकरणाला आरंभ करीत तो त्याला पुनः म्हणाला—मी तुझें सत्त्व जाणण्याच्या इच्छेनेंच येथें आलों होतों. पुत्रा, मी तुझ्या समवृत्तीनें संतुष्ट झालों आहें. यास्तव मी तुला वर देतों. आतां हे निष्पापा, तूं इष्ट वर मागून घे. मी वरद आहें. माझी भक्ति करणाऱ्या पुरुषाला कदापि दुर्गति प्राप्त होत नाहीं.

**युधिष्ठिर**—हे देवश्रेष्ठा, एका ब्राह्मणाच्या अरणी व मंथा, यांसह एक मृग अरण्यांत पळून गेला आहे, त्या ब्राह्मणाचे अग्नि लुप्त होऊं नयेत हा मला पहिला वर द्यावा.

---

१ प्राचीन टीकाकारांनीं 'पंचसु रक्तः' याचा पंच महायज्ञांत अनुरक्त असा अर्थ करून काम-क्रोध, लोभ-मोह व मद-मान, ही षट्पदी होय, असें म्हटलें आहे. पण अध्यात्मप्रकरण व पुढील वाक्य यांकडे दृष्टि देऊन आम्हीं त्या अर्थाची उपेक्षा केली आहे, असें नीलकंठ म्हणतात.

यक्ष—हे कौंतेया, तुझी परीक्षा पहाण्यासाठीं मींच मृगवेष धारण करून त्या ब्राह्मणाचा अरणीसह मंथा हरण केला.

वैशंपायन—हे राजा, असें बोलून त्या धर्मानें ‘ मीं तुला हा वर दिला आहे ’ असें म्हटलें व दुसराहि वर मागण्यास सांगितलें.

युधिष्ठिर—हे प्रभो, आमचीं वनवासाचीं बारा वर्षे पूर्ण झालीं असून तेराव्या वर्षाला आतां आरंभ होईल. तरी या अज्ञातवासाच्या कालांत कोणाहि मानवानें आम्हांला ओळखूं नये, असा वर मला दे.

वैशंपायन—जनमेजया, यावर त्या भगवनानें ‘ तथास्तु ’ असें म्हटलें व त्या सत्यविक्रम पांडवाला आणखींहि असें आश्वासन दिलें. धर्म म्हणाला—“ हे पृथापुत्रा, तुम्हीं वेषान्तर न करतां स्वाभाविक स्वरूपानें जरी या पृथ्वीवर संचार केलात तरी हें तेरावें वर्ष संपेपर्यंत माझ्या प्रसादानें समग्र त्रैलोक्यांत तुम्हांला कोणी ओळखणार नाहीं. हे वीरांनो, तुम्हीं जें जें रूप धारण करण्याचा मनांत संकल्प केला असेल, तो तो वेष घेऊन विराटनगरींत गुप्तपणानें रहा. तेथें तुम्हांला कोणी ओळखणार नाहीं.

हे सोम्य, मींच तुझ्याविषयींच्या जिज्ञासेनें मृगरूपानें हरण करून नेलेल्या या अरणी त्या ब्राह्मणाला परत दे. हे नरश्रेष्ठा, तूं इष्ट वर मागून घे. मी तुला आणखीं वर देतों. तुला वर देत असतांना माझी तृप्तीच होत नाहीं. तिसऱ्या अप्रतिम महद्वराचा स्वीकार कर. हे राजन्, तुझा जन्म मजपासून झाला असून विदुरहि माझ्याच वंशापासून झाला आहे.

युधिष्ठिर—हे देवदेवा, तुज साक्षात् सनातन ईश्वराचें आज मला दर्शन घडलें आहे. यास्तव हे प्रभो, तूं संतुष्ट होऊन मला जो वर देशील, त्याचा मीं स्वीकार करीन. मी लोभ, मोह व क्रोध यांना सर्वदा जिंकावें व माझें मन दान, तप व सत्य यांतच सतत निरत असावें.

धर्म—हे पांडवा, तुझ्या ठिकाणीं हे गुण स्वभावतःच स्थित आहेत. तूं साक्षात् धर्मच आहेस. तुझी ही इच्छाहि पूर्ण होईल.

वैशंपायन—राजा, असें बोलून तो भगवान् लोकभावन धर्म तेथेंच अंतर्धान पावला. नंतर ते सर्व मानी भ्राते जणु काय सुखनिद्रेंतून उठल्याप्रमाणें क्लेशरहित होऊन मोठ्या उत्साहानें आपल्या आश्रमाकडे आले व त्यांनीं त्या तपस्वी ब्राह्मणाच्या अरणी त्याच्या स्वाधीन केल्या.

जनमेजया, या आख्यानांत भीमादि भ्रात्यांचें उत्थान व युधिष्ठिराची भेट, आणि धर्मराज व धर्म या पितापुत्रांचा कीर्तिवर्धक समागम वर्णिला आहे. जो जितेंद्रिय व मनोनिग्रही नर याचें पठन करील तो पुत्र-पौत्रांसह शतायु होईल. हें शुभ आख्यान जाणणाऱ्या पुरुषाचें मन सुहृद्भेद, परद्रव्य व परदारा यांचा अपहार, इत्यादि निंद्य कर्मांत कदापि आसक्त होणार नाहीं. ३. २२. ३१४.

---

## अध्याय ३१५ वा.

[ १ पांडवांनीं अज्ञातवासार्थ ब्राह्मणांची घेतलेली अनुज्ञा. २ धौम्यानें त्यांचें केलेलें सान्त्वन. ३ पांडवांचें वनांतून गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें यमधर्मानें अनुज्ञा दिली असतां त्या सत्यपराक्रमी पांडुपुत्रांनीं अज्ञातवासाचें तेरावें वर्ष कोणत्या गुप्त वेषांत राहून घालवावें, याचा परस्परांत संकेत केला व त्यांच्याबरोबर वनांत राहणारे त्यांचे भक्त व तपस्वी यांची अनुज्ञा घेण्यासाठीं ते त्यांच्याकडे गेले. त्यावेळीं ते तीक्ष्ण व्रतें आचरणारे वनवासीजन विद्वानांच्या समूहांत बसले होते. तेथें जाऊन त्या स्वधर्मनिष्ठ व्रती पांडवांनीं त्या महात्म्यांना हात जोडून आपला अज्ञातवासाचा विचार निवेदन केला.

**युधिष्ठिर**—हे तपोधनहो, धार्तराष्ट्रांनीं कपटानें आमचें राज्य हरण करून आमचे अनेक अपराध केले, हें आपणां सर्वांस विदित आहेच. आम्हीं बारा वर्षें वनवासाचे क्लेश भोगले. आतां हें शेवटलें तेरावें वर्ष अज्ञातवासाचें आहे. आम्ही आतां गुप्तवेषानें रहाणार आहोंत. तरी आम्हांला आपली अनुज्ञा असावी.

दुरात्मा दुर्योधन, कर्ण व शकुनि आमच्याशीं अत्यंत वैर करितात. ते आम्हांला शोधून काढण्यासाठीं भगीरथ यत्न करतील, ते आमच्या शोधार्थ गुप्त हेरांचीहि योजना करतील आणि आम्हीं ज्यांना आश्रय दिला आहे, त्या प्रजाजनांना व स्वजनांना ते पीडाहि देतील. यास्तव आम्ही आपल्या समुदायांत न रहातां अन्य राष्ट्रांत निघून जातों. आम्ही या सर्व ब्राह्मणांसह पुनः स्वराज्यांत स्थित होऊं, असा शुभयोग पुनः येईल काय !

**वैशंपायन**—राजा, असें बोलून तो दुःख व शोक यांनीं आर्त झालेला पवित्र धर्मपुत्र युधिष्ठिर अतिशय व्यथित झाला, त्याचे नेत्र अश्रुपूर्ण झाले व कंठ

सद्गदित झाला. दुःखानें त्याला मूर्च्छा आली. तेव्हां सर्व ब्राह्मणांनीं भ्रात्यांसह त्याला आश्वासन दिलें.

( २ ) नंतर धौम्य त्या नृपतीला असें अर्थपूर्ण वचन बोलला—हे राजन्, तूं विद्वान् असून सत्यनिष्ठ, जितेंद्रिय व दान्त आहेस, तुझ्यासारखे श्रेष्ठ पुरुष आपत्कालीं केव्हांहि असे मोहित होत नाहींत. देवांवरहि अशीं संकटें अनेक वेळां आलेलीं आहेत व त्या महात्म्यांनीं त्या त्या वेळीं शत्रूच्या निग्रहासाठीं कपटवेष धारण केले आहेत.

इंद्र निषधदेशीं जाऊन पर्वतशिखरावरील आश्रमांत कपटवेषानें राहिला व त्यानें गुप्त वेषानें शत्रुनिग्रहाचें कार्य केलें. विष्णूनें दैत्यांच्या नाशासाठीं अश्वशिराचें रूप धारण करून अदितीच्या गर्भामध्यें अज्ञातवासांत दीर्घकाल काढला. त्याचप्रमाणें त्यानें ब्राह्मण बटूचें वामनरूप धारण केलें व त्या कपट वेषानें तीन पावलांत बलीचें राज्य हरण केलें, तें तुला ठाऊकच आहे.

त्याचप्रमाणें अग्नीनें गुप्त वेषानें जलांत निवास करून देवांचें काय केलें, तेंहि तुला श्रुत आहे. हे धर्मज्ञा, हरीनें शत्रुनिग्रहासाठीं इंद्राच्या वज्रांत गुप्तपणें प्रवेश करून जें कर्म केलें तेंहि तूं ऐकलेंच आहेस. और्व महर्षीनें देवकार्यासाठीं मातेच्या मांडीमध्यें गुप्तपणें वास केला होता. तोहि वृत्तान्त तुला माहित आहे. सर्व भूलोकाला प्रकाशित करणाऱ्या तेजस्वी आदित्यानें गुप्तवेषानेंच पृथ्वीवरील सर्व शत्रूंना दग्ध केलें. भयंकर पराक्रमी विष्णूनें दशरथाच्या गृहीं छन्नरूपानें राहूनच युद्धांत रावणाचा वध केला. याप्रमाणें अनेक महात्म्यांनीं त्या त्या वेळीं कपटवेष धारण करून शत्रूंचा पराभव केला आहे. त्याप्रमाणें तूंहि शत्रूंना युद्धांत जिंकशील.

(३) अशा प्रकारें अनेक दृष्टान्त देऊन धौम्यानें युधिष्ठिराचें सान्त्वन केलें, परंतु त्या धर्मनिष्ठ कुंतीपुत्रानें कपटानें शत्रुवध करणें मान्य केलें नाहीं. तेव्हां महाबलाढ्य भीमसेन अतिशय हर्षानें राजाला म्हणाला—"हे महाराज, आजपर्यंत गांडीवधारी धनंजयानें तुझ्याकडे व धर्माकडे लक्ष देऊन कोणतेंहि साहस केलें नाहीं. भीमपराक्रमी व सामर्थ्यसंपन्न नकुल-सहदेव शत्रूंचा विध्वंस करण्यास उद्युक्त झाले असतां मी त्या उभयतांचें वारंवार निवारण करीत आलों. जोंवर तूं आम्हांला अनुज्ञा दिली नाहींस, तोंवर आम्ही शत्रूंवर चालून जाणार नाहीं. जेव्हां तूं आज्ञा करशील, तेव्हांच आम्ही सर्व शत्रूंचा तत्काल नाश करूं."

**वैशंपायन**—राजा, भीमसेनाचें हें भाषण ऐकून ब्राह्मणांनीं त्या भारतांना शुभ आशीर्वाद दिले, त्यांचा निरोप घेतला व ते ब्राह्मण आपापल्या गृहीं निघून गेले. सर्व वेदवेत्ते यति व विद्वान् मुनि धौम्यासह पांडवांच्या पुनर्दर्शनाच्या इच्छेनें तेथेंच राहिले. नंतर ते धनुष्यधारी पांच पांडव धौम्य व कृष्णा यांच्यासह तेथून निघाले व त्या प्रदेशांतून कोसभर दूर गेले. त्या नरश्रेष्ठांनीं दुसऱ्या दिवसापासून अज्ञातवासाच्या जीवनाचा आरंभ केला. ते पांची भ्राते पृथक् पृथक् शास्त्रें जाणणारे व सर्व मंत्रविशारद होते. संधि व विग्रह यांचा कालहि ते उत्तम प्रकारें जाणत होते. ते दीर्घदर्शी बुद्धिमान् पांडव पुढील कार्याचा विचार करण्यासाठीं एकत्र बसले. ३. २२. ३१५.

येथें बाविसावें आरणेयपर्व समाप्त झालें.

---

या पर्वाची फलश्रुति—सौति ऋषींना म्हणाला—हें आरण्यकपव ऐकणारा मनुष्य महापापापासून मुक्त होतो. धनरहित पुरुषाला धनप्राप्ति होऊन तो पुत्र-पौत्रांनीं युक्त होतो. कोणीहि स्त्री किंवा पुरुष शुचिर्भूत होऊन शुद्ध चित्तानें जी जी कामना करतील, ती ती त्यांची इच्छा पूर्ण होईल, यांत संशय नाहीं. हें आरण्यकपर्व श्रवण केलें असतां किंवा त्याचें अध्ययन केलें असतां ब्राह्मणांना पायसान्नाचें भोजन द्यावें आणि वस्त्र, गायी, सुवर्ण व रत्नें यांच्या दानांनीं त्यांचा सत्कार करावा.

ब्राह्मण संतुष्ट झाले असतां पांडुपुत्र, ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इत्यादि सर्व देवगण, त्याचप्रमाणें भूतें, मुनि, देवी आणि पितृगण हे सर्व संतुष्ट होतात. अन्न, वस्त्र, सुवर्णभूषणें यांनीं वाचकाचा यथाशक्ति सत्कार करावा. पठन करणाराला कांशाच्या चरवीसह अलंकारांनीं भूषित केलेली कपिला गाय द्यावी. पांडवांच्या संतोषासाठीं ब्राह्मण-भोजन घालावें. जो पुरुषश्रेष्ठ हें आरण्यक आख्यान श्रवण करितो, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्याला शेवटीं स्वर्गगति प्राप्त होते.

येथें तिसरें वनपर्व समाप्त झालें.

---

याच्या पुढें चवथ्या विराटपर्वाचा आरंभ होईल त्याचा हा पहिला श्लोक आहे—

जनमेजय उवाच—

कथं विराटनगरे मम पूर्वपितामहाः ।
अज्ञातवासमुषिता दुर्योधनभयार्दिताः ॥



# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## ४ विराटपर्व.



### प्रवेशपर्व १.



ॐ नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

#### अध्याय १ ला.

[ १ पांडवांचा विराट-नगरांतील अज्ञातवासाविषयीं संकेत. ]

**( १ ) जनमेजय[1] म्हणाला—हे वैशंपायन महर्षे, माझे पूर्वपितामह[2] दुर्योधनाच्या भीतीनें व्याकुल होऊन विराट-नगरामध्यें अज्ञातवासांत कसे राहिले ? त्यावेळीं दुर्योधनाचे हेर त्यांचा शोध करीत सर्व राष्ट्रांतून संचार करीत असतील !**

---

१ वनपर्व अध्याय ३१४ यांत सांगितल्याप्रमाणें शम-दमादि ज्ञानसाधनांत तत्पर व अशनाया-पिपासा इत्यादि षड्र्मींनीं रहित असलेला धर्म यमधर्माच्या आज्ञेप्रमाणें आपली प्रिय भार्या व भ्राते यांसह वेषान्तर करून कसे राहिले हें जाणण्याच्या इच्छेनें जनमेजय वैशंपायनास हा प्रश्न करीत आहे. या प्रश्नांत त्या राजानें यमधर्माच्या आज्ञेचाच अनुवाद केला आहे. या पर्वात ज्ञानी पांडवांचें अज्ञातवासांतील आचरण कसें होतें, तें सविस्तर वर्णिलें असून त्यापासून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे, हें निराळें सांगावयास नकोच.

२ माझा पूर्व—पिता परिक्षित, त्याचे पितामह पांडव.

तथापि त्यांना न कळतां ते तेथें गुप्तपणें कसे राहूं शकले ? महाभागा द्रौपदी मोठी पतिव्रता व सतत श्रीकृष्णचिंतन करणारी होती. तथापि ती साध्वी पारतंत्र्याचें दुःख अनुभवीत विराट-नगरांत एक वर्षभर कशी राहिली ?

वैशंपायन—हे राजा, तुझ्या पूर्वपितामहांनीं विराट-नगरांत गुप्त रीतीनें कसा वास केला, तें मी तुला सविस्तर सांगतों. सावधान चित्तानें ऐक. धार्मिकश्रेष्ठ युधिष्ठिराला यमधर्मापासून पूर्वोक्त वर मिळाले असतां तो आपल्या आश्रमास परत आला व त्यानें घडलेला सर्व वृत्तान्त ब्राह्मणांस निवेदन केला. यम-धर्मापासून परत मिळविलेल्या दोन अरणी ब्राह्मणास परत दिल्या. कारण त्या ब्राह्मणाच्या अरणी परत मिळविण्यासाठींच पांडव त्यांचें हरण करणाऱ्या मृगरूपी धर्माच्या मागोमाग गेले होते.

हे महात्मन्, त्यानंतर त्या उदार युधिष्ठिरानें आपल्या सव अनुजांस एकान्तांत एकत्र बोलाविलें व द्रौपदीसह शांतचित्तानें बसलेल्या त्या वीरांस तो धर्मपुत्र म्हणाला—"हे वीरहो, राज्यापासून वियुक्त झालेल्या आमचीं हीं बारा वर्षें कशीं तरी आज पार पडलीं आहेत; उद्यांपासून तेरावें वर्ष सुरू होणार. आतां आपल्याला एक वर्ष कष्टकर अज्ञातावस्थेंत घालवावयाचें आहे. यास्तव अर्जुना, आमचे शत्रु आम्हांस ओळखूं शकणार नाहींत, अशा कोणत्या प्रदेशांत किंवा नगरांत राहून आपण हें वर्ष घालवावें, असें तुला वाटतें, तें मला सांग."

ज्येष्ठ भ्रात्याचें हें वचन ऐकून महाधनुर्धर अर्जुन त्यास म्हणाला—हे नरेंद्रा, धर्मानें तुला वर दिला आहे. त्याच्याच कृपेनें आम्ही अनायासानें एक वर्षभर अज्ञातवासांत राहूं शकूं. आपल्याला गुप्तपणें रहाण्यास अशीं कांहीं रमणीय व गुप्त राष्ट्रें मी तुला सांगतों. त्यांतील एकादें स्थान तूं नियत कर. कुरुदेशाच्या आसपास अनेक रम्य देश आहेत, तेथें अन्नहि विपुल आहे. पंचाल, चेदि, मत्स्य, शूरसेन, पटच्चर, दशार्ण, नवराष्ट्र, मल्ल, शाल्व, युगंधर, विपुल कुंतीराष्ट्र, सुराष्ट्र व अवंति या देशांतील कोणत्या उत्तम देशांत रहाणें तुला आवडतें तें सांग. म्हणजे आपण सर्व एक वर्ष तेथेंच घालवूं.

त्यावर युधिष्ठिर म्हणाला—हे महाबाहो, त्या भगवान् प्रभूनें आपल्याला कोठें रहावयास सांगितलें आहे, तें तूं ऐकलेंच आहेस. सर्व भूतांचें नियमन करणाऱ्या धर्मराजानें जें सांगितलें आहे, तें अगदीं सत्य आहे. 'तुम्ही आपा-

पल्या स्वरूपानें जरी पृथ्वीवर संचार करीत राहिलां, तरी माझ्या प्रसादानें तुम्हांला या त्रैलोक्यांतील कोणीहि ओळखणार नाहीं.' असा त्या महात्म्यानें आम्हांला वर दिला आहे. यास्तव आपण सर्व आपसांत निश्चित संकेत करून रमणीय व सुखावह अशा विराट नगरींतच निर्भयपणें राहूं. मत्स्य देशाचा राजा विराट बलवान् असून पांडवांवर त्याचें प्रेम आहे. तो धर्मशील, दाता व वयोवृद्ध असल्यामुळें आम्हांलाहि नित्य प्रिय आहे. यास्तव हे वत्सा, आपण हें कष्टाचें वर्ष त्याच्याच नगरींत त्याचीं उचित कामें करीत घालवूं. यास्तव आपण त्याचीं कोणकोणतीं कार्यें करण्यास समर्थ होऊं याचा विचार करूं या. हे कुरुनंदनांनो, तुमच्यांतील कोण, कोणतें कर्म करण्यास समर्थ आहे, तें आपापल्या इच्छेप्रमाणें सांगा.

अर्जुन म्हणाला—हे पुरुषश्रेष्ठा, विराटाच्या राष्ट्रांत तूं काम कसें करिशील! हे साधो, त्या विराटनगरींत कोणतें कर्म करून आपल्या मनाचें रंजन करून घेशील! कारण हे राजा, तूं स्वभावतःच मृदु, दाता, ऱ्हीमान्, धार्मिक व सत्यपराक्रमी आहेस. तेव्हां हे पांडवा, संकटग्रस्त झालेला तूं तेथें काय करशील! याविषयीं मला मोठी चिंता वाटत आहे. प्रभो, सामान्य जन अनेक क्लेश सहन करून अधिक दुःखें भोगण्यास तयार झालेला असतो, पण राजाला तसा दुःखाचा परिचय नसतो, तेव्हां तूं या घोर आपत्तींतून कसा पार पडशील?

अर्जुनाचें हें स्नेहपूर्ण भाषण ऐकून मनांत व्याकुल झालेला **युधिष्ठिर** धीर स्वरानें म्हणाला—हे कुरुनंदनहो, विराटराजापाशीं जाऊन मी कोणतें कर्म करीन तें ऐका. 'कंक'-नामक ब्राह्मणाचें रूप धारण करून मी त्या महात्म्या राजाचा सभासद होईन. 'कंक'-शब्दाचा अर्थ छद्मद्विज म्ह० कपट वेषधारी ब्राह्मण असा आहे, किंवा 'यम' असाहि त्याचा अर्थ होतो. मी यमाचा पुत्र असल्यामुळें 'आत्मा वै पुत्र नामासि' या श्रुतीला अनुसरून मला पित्याचें नांव धारण करण्यानें अनृत भाषणाचा दोष लागणार नाहीं. मला द्यूताची अत्यंत आवड आहे. तेव्हां विराटसभेंत वैडूर्यरत्नें जडविलेले सुवर्णयुक्त हस्तिदंताचे, तांबडे व काळे ठिपके असलेले सुंदर फांसे हातांत घेऊन मी द्यूताचा डाव चालवीन व विराटराजाला त्याचे बांधव व अमात्य यांसह संतुष्ट करीन. अशा प्रकारें हृष्ट झालेला तो राजा मला केव्हांहि ओळखूं शकणार नाहीं आणि त्या राजानें जर मला प्रश्न केलाच तर 'मी पूर्वीं युधिष्ठिराचा प्राणाहूनहि प्रिय

सखा[1] होतों ' असें त्याला सांगेन. मी तेथें कशा प्रकारें राहीन हें तुम्हांला सांगितलें. आतां हे वृकोदरा, तूं विराटराजाच्या घरीं कोणतें काम करून आपल्या मनाचें रंजन करून घेशील तें सांग. ४. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १ भीमाचें उत्तर. २ युधिष्ठिराचा अर्जुनास विराटनगरांतील निवासाविषयीं प्रश्न व त्याचें उत्तर. ]

(२) **भीमसेन** म्हणाला—हे धर्मज्ञा, विराटराजापाशीं जाऊन ' मी पौरोगव[2]-नांवाचा बल्लव आहें ' असें त्यास सांगेन. मी कुशल सूपकार असल्यामुळें स्वयं-पाकघरांतील पाकसिद्धीचें काम उत्तमप्रकारें करीन. त्याच्या प्रवीण बल्लवांनीं या पूर्वीं केलेले जे भक्ष्य-भोज्यादि पदार्थ त्यांहूनहि उत्तम पदार्थ तयार करून मीं त्या राजाला प्रसन्न करीन. मी आपल्या कौशल्यानें इतर सूपकारांचा जरी पराभव केला, तरी त्यांनाहि उत्तम पाकक्रिया शिकवून त्यांचेंहि प्रेम संपादन करीन. मी काष्टांचे मोठमोठे भारे घेऊन येईन. तें माझें महत्कर्म पाहून तो विराट राजा मला सूदाध्यक्ष नेमील. हे भारता, माझीं तीं अतिमानुष कर्में पाहून त्या राजाचे इतर भृत्यहि मला राजाप्रमाणेंच मान देतील. मी भक्ष्य, अन्न, रस-पान, इत्यादिकांचा यथेष्ट विनियोग करूं लागलों म्हणजे इतर लोकांनाहि राजाप्रमाणें प्रिय होईन. बलाढ्य गज व मत्त वृषभ यांचा निग्रह करण्याचा प्रसंग आल्यास मी तो करून समाजामध्यें जे प्रतिमल्ल उपस्थित होतील, त्यांच्याशीं मल्लयुद्ध करून मी राजाचा संतोष वाढवीन. माझ्याशीं

---

१ येथील ' सखा ' या शब्दानें युधिष्ठिराचा आत्मा विवक्षित आहे, कारण आत्माच सर्व पदार्थांहून अधिक प्रिय आहे, ही गोष्ट वेदान्त शास्त्र व प्रत्येक जीवाचा अनुभव, यांवरून सिद्ध आहे. त्यामुळेंहि युधिष्ठिराकडे मिथ्या भाषणाचा दोष येत नाहीं. २ व्यवहारामध्यें स्वयंपाकघरांतील मुख्य बल्लवाला ' पौरोगव ' म्हणतात. ' पुरोगु ' म्हणजे वायु. कारण गर्भाशयस्थ गर्भामध्यें वायूच्या किरणाप्रमाणें असलेले प्राण प्रथम आविर्भूत होतात व त्यानंतर इतर इंद्रियांचा आविर्भाव होतो, हें शास्त्रसिद्ध आहे. त्या पुरोगूचा म्हणजे वायूचा जो पुत्र तो पौरोगव, असा या शब्दाचा यौगिक अर्थ आहे. त्यामुळें भीमाकडेहि असत्य भाषणाचा दोष येत नाहीं.

मल्लयुद्ध करणाऱ्या प्रतियोद्ध्यांस मी ठार मारणार नाहीं. उलट आखाड्यांत ते मरण पावणार नाहींत, अशाच प्रकारें मी त्यांस चित करीन. हे राजा, मला जर त्या विराटराजानें प्रश्न केला, तर मी 'युधिष्ठिरापाशीं मत्त गजाबरोबर क्रीडा करणारा व त्यांना जिंकणारा, तरुण वृषभाचें दमन करून त्यांना नम्र करणारा, सूपकर्ता व मल्लांशीं युद्ध करणारा होतों' असें त्यास सांगेन. राजा, याप्रमाणें मी आपलें खरें स्वरूप मोठ्या यत्नानें कोणालाहि कळूं न देतां राजगृहीं राहीन. मी हें तुला सत्यप्रतिज्ञेनें सांगत आहें. यास्तव मी विराट नगरींत गुप्तपणें कसा राहूं शकेन याची चिंता तूं करूं नको.

( २ ) युधिष्ठिर म्हणाला—पूर्वीं यमुनातीरावर श्रीकृष्णासह बसलेल्या ज्या महाबाहु कुरुनंदन पुरुषश्रेष्ठापाशीं अग्नि खांडववन दग्ध करण्याच्या इच्छेनें ब्राह्मणाचें रूप घेऊन आला, तो महाबलवान् धनंजय कोणतें कर्म करील ? ज्यानें आपल्या एकाच रथावर आरूढ होऊन इंद्राला जिंकिलें, सर्प व राक्षस यांचा संहार करून याचना करणाऱ्या अग्नीला तृप्त केलें व सर्पराज वासुकीची भगिनी जी उलूपी तिचें आपल्या सौंदर्यानें हरण केलें, तो प्रतियोद्ध्यांतील श्रेष्ठ अर्जुन विराटराजाच्या गृहीं कसलें काम स्वीकारील ? हे वृकोदरा, ताप देणाऱ्या सर्व पदार्थांत सूर्य, द्विजांमध्यें ब्राह्मण, सर्पांत विषारी सर्प, तेजस्वी पदार्थांमध्यें अग्नि, शस्त्रांमध्यें वज्र, गायींमध्यें विशाल वशिंड असलेला वृषभ सरोवरांत सागर, वृष्टीमध्यें पर्जन्य, नागांमध्यें 'धृतराष्ट्र'-नांवाचा नाग, गजामध्यें ऐरावत, प्रिय आप्तांमध्यें पुत्र व सुहृदांत भार्या श्रेष्ठ आहे; ज्याप्रमाणें त्या त्या जातीच्या पदार्थांत हे पूर्वोक्त पदार्थ विशिष्ट आहेत, त्याप्रमाणेंच सर्व धनुर्धरांत हा तरुण गुडाकेश श्रेष्ठ आहे.

हा बुद्धिमान् अर्जुन इंद्राहून निकृष्ट नाहीं किंवा वासुदेवाहूनहि न्यून नाहीं. ज्यानें इंद्रलोकीं पांच वर्षें राहून स्वसामर्थ्यानें अद्भुत अस्त्रविद्या संपादन केली व देवतुल्य तेजानें युक्त होऊन दिव्य अस्त्रें प्राप्त करून घेतलीं, त्या माझ्या पराक्रमी भ्रात्याला मी बारावा रुद्र, तेरावा आदित्य, नववा वसु, किंवा दहावा ग्रहच समजतों ! ज्याच्या सम असलेल्या दीर्घ बाहूंवर धनुष्याच्या दोरीचें घर्षण होऊन वृषभाच्या स्कंधावरील घट्ट्याप्रमाणें घट्टे पडले आहेत तो हा गांडीवधर अर्जुन पर्वतांतील हिमालयाप्रमाणें, नद्यांतील समुद्राप्रमाणें, देवांतील इंद्राप्रमाणें, वसूंतील अग्नीप्रमाणें, वनचरांतील सिंहाप्रमाणें किंवा पक्ष्यां-

तील गरुडाप्रमाणें मानवांमध्यें वरिष्ठ आहे. हा गांडीव धनुष्य धारण करणारा श्वेताश्व बीभत्सु विराटगृहीं कसा कालक्षेप करील ?

अर्जुन म्हणाला—हे महाराज, मी क्लीब आहें, अशी प्रतिज्ञा करून तेथें राहीन. हे राजा, माझ्या दोन्ही बाहूंवर जे प्रत्यंचेचे मोठाले घट्टे पडलेले आहेत, त्यांवर कंकणें धारण करून मी ते लपवून टाकीन. मी कानांमध्यें चकाकणारीं रत्नांचीं तेजस्वी कुंडलें घालीन. शंखवलांनीं माझे दोन्ही हस्त भूषित करीन. याप्रमाणें मी क्लीबाचा वेष घेईन, मस्तकावरील जटांची वेणी घालून 'बृहन्नला' हें नांव धारण करीन. हे राजन्, स्त्रीभावानें वारंवार प्राचीन राजांचीं चरित्रें कथन करून राजाच्या अंतःपुरांतील स्त्रियांचें व स्वतः राजाचेंहि रंजन करीन. त्याचप्रमाणें विराटराजाच्या स्त्रियांना नृत्य, गायन व विविध वाद्यांचें वादन शिकवीन. प्रजेच्या सद्वर्तनाची प्रशंसा करून मी आपल्या बुद्धीनें हें कपटक्लीबरूप धारण करून स्वतःचें स्वरूप गुप्त राखीन. हे राजेंद्रा, मला जर विराटाच्या राणीनें विचारिलें तर 'मी युधिष्ठिराच्या घरीं द्रौपदीची परिचारिका होतें' असें सांगेन आणि हे राजा, अशाप्रकारें अग्नि जसा उपायानें गुप्त राखावा, त्याप्रमाणें मी विराट-राजाच्या मंदिरांत सुखानें राहीन. ४. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ नकुल-सहदेव व द्रौपदी यांनीं केलेलें आपापल्या कार्याचें दिग्दर्शन. ]

(१) **वैशंपायन**—हे वीरा, धार्मिकांतील श्रेष्ठ व पुरुषप्रवीर असा जो तुझा प्रपितामह अर्जुन, तो असें भाषण करून स्वस्थ बसला असतां धर्मराज युधिष्ठिर आपल्या तिसऱ्या भ्रात्याला म्हणाला—"बा नकुला, तूं त्या विराटनगरीमध्यें राजाचें कोणतें कार्य स्वीकारून आपला काल घालविशील ? त्या

---

१ काव्यामध्यें 'र' आणि 'ल' यांचा अभेद मानितात. बृहत् म्ह० फार मोठा जो नर तो बृहन्नर ! म्हणजे नारायणाचा सखा हाच नर. येथें स्त्रीलिंगासाठीं 'आ' प्रत्यय लावून व 'र'चा 'ल' करून 'बृहन्नला' हें रूप सिद्ध केलें आहे. त्यामुळें अर्जुनाकडे मिथ्यावादित्वाचा दोष येत नाहीं. २ 'परिचारिका' या शब्दाचा रूढ अर्थ 'सेवा करणारी दासी,' व यौगिक अर्थ 'सर्वतः संचार करविण्याचें जिचें शील आहे, ती परिचारिणी, असा आहे. जी परिचारिणी तीच परिचारिका होय. अर्थात् द्रौपदीचा भर्ता हा या शब्दांतील गूढ आशय आहे.

राजाच्या राज्यांत तूं कोणतें कार्य करण्याचें मनांत आणिलें आहेस, तें मला सांग. वत्सा, तूं सुकुमार, शूर व अत्यंत दर्शनीय आहेस, त्यामुळें तूं केवळ सुखोपभोगासच योग्य आहेस. तथापि माझ्या अनयामुळें तुम्हां राजपुत्रांवर व या राजकन्येवर हा दुर्धर प्रसंग ओढवला आहे."

नकुल म्हणाला—हे पूज्य भ्रात्या, मी विराटराजाच्या नगरीमध्यें अश्वाध्यक्ष होईन. मी अश्वांचें रक्षण करण्यामध्यें व त्यांचें परीक्षण, शिक्षण इत्यादि कार्यांमध्यें प्रवीण आहें. मीं अश्वविद्या उत्तम प्रकारें संपादन केली आहे. मी अश्विनिकुमारांचा पुत्र असल्यामुळें स्वभावतःच आयुर्वेद जाणतों. यास्तव मी त्या ग्रंथांना जाणणारा असल्यामुळें 'ग्रांथिक' असें आपलें अन्वर्थ नांव सांगून त्या राजापाशीं राहीन. राजा, मला हें काम अतिशय प्रियहि आहे. अश्वविद्या व चिकित्सा यांत मी विशारद असून, हे कुरुराजा, तुझ्याप्रमाणेंच मलाहि अश्वांची फार आवड आहे. त्या विराट-नगरामध्यें जे कोणी मला विचारतील त्यांना 'पांडुपुत्र युधिष्ठिरानें मला पूर्वीं आपल्या सर्व अश्वांवर अधिकारी नेमिलें होतें,' असें सांगेन व याप्रमाणें मी त्या मत्स्य राजाच्या नगरांत गुप्त रीतीनें राहीन. तेथें मला कोणी ओळखील याविषयीं तूं मनांत शंकाहि बाळगूं नको.

नकुलाचें हें वचन ऐकून युधिष्ठिर आपल्या चवथ्या भ्रात्यास म्हणाला— "सहदेवा, तूं त्या राजाच्या जवळ कसा विहार करशील? योग्य व प्रिय असें कोणतें काम स्वीकारून तूं तेथें गुप्त रीतीनें रहाशील?"

सहदेव म्हणाला—हे गुरो, मी त्या राजाचा गो-परीक्षक होईन. हे राजा, मी गायी व बैल यांची परीक्षा करण्यांत फार कुशल आहें. गायींचें रक्षण व दोहन कसें करावें, हें मी उत्तम प्रकारें जाणतों. मी 'तंतिपाल' या नांवानें तेथें प्रसिद्ध होईन व मोठ्या सावधानतेनें विहार करीन. हे राजा, खांडवप्रस्थामध्यें असतांना तूं नेहमीं मला गायी व बैल यांच्यावर देखरेख करावयास सांगत होतास. त्यामुळें मला त्यांच्याविषयींचें

---

१ ज्या दीर्घ व स्थूल रज्जूला लहान लहान दावीं लावून त्यांना गुरें बांधून ठेवितात, त्या रज्जूला 'तंति' म्हणतात. अशा दावणीचें पालन करणारा तो तंतिपाल, हें अन्वर्थक लौकिक नांव असून 'तंति' म्ह० वाक्. मी तुझ्या वचनाचें पालन करणारा असल्यामुळें 'तंतिपाल' या शब्दाचा गूढ अर्थहि अन्वर्थ आहे. त्यामुळें मला मिथ्या भाषणाचा दोषहि लागत नाहीं.

उत्तम ज्ञान प्राप्त झालें आहे. गायींचीं लक्षणें, स्वभाव, शुभ चिह्नें आणि इतरहि सर्व मी उत्तम प्रकारें जाणतों. उत्तम लक्षणानें युक्त असलेल्या वृषभांनाहि मी त्यांच्याकडे पहातांच ओळखूं शकतों. ज्या वृषभांच्या मूत्राचें अवघ्राण केल्यानें वंध्या गायीहि गर्भ धारण करितात त्या बैलांनाहि मी जाणतों. दीर्घ परिचयामुळें मला हें कार्य मनापासून आवडतें. यास्तव मी तेंच काम स्वीकारून विराटनगरांत राहीन. मला तेथें कोणीहि ओळखणार नाहीं. मी आपल्या कार्यानें त्या राजाला संतुष्ट करीन.

सहदेवाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर मोठ्या खेदानें म्हणाला—ही आमची प्रिय भार्या द्रौपदी आम्हांला प्राणांहूनहि अधिक संमत आहे. कुलवृत्तीप्रमाणें ही आम्हांला परिपालन करण्यास योग्य आहे. यास्तव पार्वतीप्रमाणें असलेली ही भामिनी कृष्णा कोणतें कार्य स्वीकारून त्या राजनगरांत राहील? सामान्य स्त्रियांप्रमाणें हिला कोणतेंच गृहकृत्य करण्याची संवय नाहीं. ही यशस्विनी राजकुमारी अतिशय सुकुमार असून केवल सुखोपभोग घेण्यासच योग्य आहे. ही महाभाग्यवती कृष्णा पतिव्रता आहे. तेव्हां ती विराटनगरांत कशी राहूं शकेल? ज्या दिवशीं हिचा जन्म झाला, त्या दिवसापासून ही भामिनी पुष्पमाला, विविध सुगंध, विचित्र अलंकार, नानाप्रकारचीं वस्त्रें यांचा उपभोग कसा घ्यावा, एवढेंच जाणते. हिला क्लेशांचें नांवहि माहीत नाहीं. तेव्हां ही बाला पारतंत्र्यांत कशी राहील?

युधिष्ठिराचें हें चिंतायुक्त भाषण ऐकून द्रौपदी म्हणाली—महाराज, व्यवहारामध्यें 'सैरंध्री' व 'भुजिष्या' या नांवाच्या स्त्रिया असतात. त्या स्वतंत्रपणें रहातात आणि वरिष्ठ प्रतीच्या कर्मानें आपली उपजीविका करितात. 'सैरंध्री' या शब्दाचा अर्थ अंतःपुरांतील परिचारिका किंवा राजभार्या असा आहे व 'भुजिष्या' याचा अर्थ पालन करणारी असा आहे. उत्तम स्त्रिया या दोन श्रेष्ठ कार्यांवांचून दुसरी कोणतीहि परिचर्या करीत नाहींत, हें सर्व लोकांना माहीत आहे. त्यामुळें इतर लोक त्यांच्याकडे दोषदृष्टीनें पहात नाहींत. हे प्रभो, राजानें व राणीनें मला विचारल्यास 'मी सैरंध्री आहें, वेणी-फणी करण्यांत कुशल आहें, मी युधिष्ठिराच्या घरांत द्रौपदीची परिचारिका होऊन पुष्कळ

१ 'राहूचें शिर' याप्रमाणें द्रौपदीची परिचारिका हा गौणप्रयोग आहे. युधिष्ठिराची द्रौपदीरूप परिचारिका असा याचा अर्थ असल्यामुळें द्रौपदीकडे मिथ्यावादित्व येत नाहीं.

दिवस राहिलें होतें ' असें त्यांस सांगेन. विराटराजाची यशस्विनी भार्या जी सुदेष्णा तिच्याजवळ मी जाईन व मी माझें स्वरूप प्रकट न करतां तिची परिचर्या करीन. ती राजपत्नीहि माझें रक्षण करील. हे राजन्, आपल्याला माझ्यासाठीं खिन्न होण्याचें कारण नाहीं.

युधिष्ठिर म्हणाला—हे कृष्णे, तूं नेहमींच शुभ भाषण करितेस. हे भामिनि, तूं मोठ्या राजकुलांत उत्पन्न झाली आहेस. तुला पाप कसें तें ठाऊक नाहीं. तूं मोठी साध्वी व सद्व्रतामध्येंच स्थित आहेस. यास्तव ज्याप्रकारें आमचे पापी शत्रु पुनः सुखी होणार नाहींत व हे कल्याणि, ते तुला ओळखणार नाहींत, असेंच वर्तन तूं ठेव. ४. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ पांडवांनीं आपल्या परिवाराची पंचालदेश व द्वारका-नगरी यांकडे केलेली रवानगी. २ धौम्य ऋषीचा पांडवांना हितोपदेश व त्याचें त्यांच्या अग्नींसह पंचालदेशीं गमन. ]

( १ ) वैशंपायन—हे भारता, याप्रमाणें त्या सर्वांनीं आपापलीं अज्ञातवासांतील कार्यें कथन केलीं असतां युधिष्ठिर म्हणाला—" हे वीरांनो, तुम्हीं कोणतीं कामें करून रहाणार तें सांगितलेंत व दैवयोगानें मलाहि जें कार्य स्वीकारणें उचित वाटलें तें मींहि तुम्हांला सांगितलें. आतां हा आपला पुरोहित अग्निहोत्रादिकांचीं पात्रें अरणी, होमसाधनभूत धेनु, यांसह सूद-पौरोगवादिकांबरोबर द्रुपदराजाच्या घरीं जाऊन आपल्या अग्नीचें रक्षण करो. त्याच्याच बरोबर द्रौपदीच्या दासीहि पंचाल देशास जाऊं द्या. इंद्रसेनादि सारथि आमचे रिकामे रथ घेऊन सत्वर द्वारकेला जाऊं देत. या सर्वांनीं ' पांडव आम्हांला द्वैत-वनांत सोडून कोठें निघून गेले तें कांहीं ठाऊक नाहीं, ' असें सांगावें. कारण आपला हा संकेत एकांतांत झालेला आहे, त्याची कोणालाच माहिती नाहीं. तेव्हां असें सांगण्यानें त्यांच्याकडे मिथ्यावादित्वाचा दोष येणार नाहीं.

( २ ) राजा जनमेजया, याप्रमाणें त्या भ्रात्यांनीं आपल्या भार्येसह आपसांत पृथक् पृथक् कर्मांचा संकेत करून धौम्यमुनीचा निरोप घेतला. त्यावेळीं त्या ऋषीनें त्यांस असा हितोपदेश केला. धौम्य म्हणाला—हे पांडवहो, तुम्हांला

ब्राह्मणांशीं व सुहृदांशीं कसें वागावें हें चांगलें अवगत आहे. त्याचप्रमाणें विजययात्रेच्या प्रसंगीं, युद्धामध्यें किंवा अग्निहोत्रादिकांत कसें वर्तन ठेवावें, हेंहि तुम्हीं उत्तमप्रकारें जाणतां. तथापि मी तुम्हांला थोडीशी राजनीति सांगतों, ती ऐका. हे युधिष्ठिरा, तूं आणि अर्जुनानें कृष्णेचें रक्षण करावें. कारण कोणीहि स्वतंत्रपणें रहाणारी स्त्री साध्वी जरी असली तरी प्राकृतजन तिच्याविषयीं अन्यायाची कल्पना करूं लागतात, हें तुम्हांला विदितच आहे. विद्वानालाहि सुहृदांनीं प्रेमानें अवश्य बोध करावा. त्यायोगें धर्म, अर्थ व काम या तिहींची प्राप्ति होते, असा सनातन न्याय आहे. यास्तव हे राजपुत्रहो, ज्यायोगें तुम्ही या राजगृहांत राहून सर्व दोषांतून पार पडाल, अशा रीतीनें राजगृहीं कसें रहावें तें मी तुम्हांला सांगतों. लक्षपूर्वक ऐका. हे कुरुनंदनहो, राजगृहीं रहाणें विवेकी मनुष्यासहि दुःसह होतें. कोणी अपमान करो किंवा सन्मान करो, त्याकडे दुर्लक्ष करून तुम्हांला हें एक वर्ष अज्ञातवासांत काढलें पाहिजे. म्हणजे चौदाव्या वर्षीं तुम्ही सुखानें विहार कराल. राजाची भेट घ्यावयाची झाल्यास प्रथम द्वारपालाकडून त्याची अनुज्ञा घ्यावी व नंतर आंत प्रवेश करावा. राजावर केव्हांहि विश्वास ठेवूं नये. 'मी राजाला मान्य आहें' अशा विश्वासानें राजा एकांतांत संकेत करीत असतां तेथें जाऊं नये. कारण पुत्रादि प्रियजनावरहि विश्वास न ठेवणारा राजा, आपला रहस्य स्फोट होईल, या भीतीनें त्याला तत्काल मृत्यूच्या स्वाधीन करील. दुसऱ्याबरोबर वैर होऊं नये म्हणून, ज्यांवर कोणीं हक्क सांगणार नाहीं, अशाच आसनावर बसावें. राजगृहीं रहाणारानें 'मी राजाला प्रिय आहें.' असें मानून परक्याचें वहान, पर्यंक, उच्चासन, गज व रथ, यांवर केव्हांहि आरोहण करूं नये. नगरांतील द्यूत, मद्य, वेश्या इत्यादि, ज्या ज्या स्थलीं बसलें असतां 'हा शत्रूचा हेर असावा, किंवा द्यूतकार असावा' अशी दुष्टबुद्धि हेरांना शंका येईल, अशा ठिकाणीं राजमंदिरांत रहाणारानें केव्हांहि बसूं नये.

हे पांडुपुत्रहो, राजानें विचारल्यावांचून त्याला कधींहि उपदेश करूं नये. कांहीं न बोलतां स्वस्थ बसून रहावें व पराक्रमादि योग्य कालीं त्याचा स्तुतीनें सत्कार करावा. परंतु हे कौंतेयांनों, स्तुतिहि यथार्थ असेल तीच करावी, अन्यथा करूं नये. कारण राजे नेहमीं मिथ्या भाषण करणारांकडे दोषदृष्टीनें पहातात. त्याचप्रमाणें ते अनृतवादी मंत्र्यांचाहि अवमान करितात. सुज्ञ पुरुषानें राजस्त्रियांशीं, अंतःपुरांतील लोकांशीं, राजाला द्वेष्य असलेल्या व त्याचा द्वेष कर-

णाऱ्या माणसांशीं केव्हांहि मैत्री करूं नये. राजाच्या न कळत क्षुल्लक गोष्टहि करूं नये. अशा प्रकारें विचारपूर्वक राजाच्या संनिध राहिल्यानें त्याची केव्हांहि मानहानि होत नाहीं.

आपण राजसभेसारख्या उत्कृष्ट स्थानीं जरी जात असलों व तेथें आपल्याला नित्य श्रेष्ठ आसन जरी मिळत असलें तरी राजानें 'स्वस्थानीं बैस' अशी आज्ञा केल्यावांचून त्यावर बसूं नये. उलट जात्यंधाप्रमाणें तें स्थान आपल्याला जणुं काय दिसतच नाहीं, असें समजावें. राजमर्यादेचा विचार करून जोंवर राजा कांहीं बोलला नाहीं, किंवा त्यानें आसन दाखविलें नाहीं, तोंवर उभेंच रहावें. कारण नरश्रेष्ठ भूपाल मर्यादेचें उल्लंघन करणाऱ्या आपल्या पुत्राचा, पौत्राचा व भ्रात्याचाहि सत्कार करीत नाहींत. राजाची अग्नीप्रमाणें किंवा देवाप्रमाणें मोठ्या यत्नानें सेवा करावी. मिथ्या आचरणानें त्याची आराधना केल्यास तो तत्काल नाश करितो, यांत संशय नाहीं. त्याच्याशीं अति सलगी केल्यास तो अग्नीप्रमाणें जाळतो व अवज्ञा केल्यास देवाप्रमाणें सर्वस्वाचा अपहार करितो. आपला स्वामी असलेला राजा जें जें करावयास सांगेल, तें तें करावें व जें जें विचारील त्याचें उत्तर द्यावें. प्रमाद, शौर्यादिकांचा गर्व व कोप यांना सर्वथा वर्ज करावें. कार्य व अकार्य यांचा विचार करण्याचा प्रसंग आला असतां जें परिणामी सुखावह व प्रिय असेल तेंच सांगावें. पण प्रिय व हित या दोहोंचा एकत्र असंभव आहे, असें वाटल्यास प्रिय वचन सोडून जें हितावह असेल, तेंच बोलावें. परिणामीं हितावह न होणारें प्रिय भाषण केव्हांहि करूं नये.

सर्वार्थसंपादन करून देणाऱ्या राजाच्या गोष्टीमध्यें सर्वदा अनुकूल असावें. त्याचा इष्टार्थ संपादन करण्यासाठीं यत्न करावा. राजाचें ज्यामध्यें अहित असेल व जें त्याला प्रिय नसेल तें कधींहि बोलूं नये, त्याच्या प्रतिकूल वागूं नये किंवा त्याचें कार्य करण्यांत आळस करूं नये. 'मी या राजाला फार प्रिय आहें,' असें समजून त्याच्याशीं थट्टा विनोद करूं नये. त्याची अविच्छिन्न सेवा करावी. सावधान चित्तानें सतत त्याचें हित व प्रिय करावें. त्याला जें अनिष्ट असेल त्याचें सेवन करूं नये. त्याला अप्रिय असलेल्या लोकांबरोबर भाषण करूं नये. राजानें दिलेल्या स्वस्थानापासून कधींहि ढळूं नये. विद्यावान् पुरुषानें त्याच्या डाव्या किंवा उजव्या बाजूला बसावें व विचित्र कथांनीं त्याचें चित्तरंजन करावें. हातांत शस्त्रें धारण करून राजाचें रक्षण करणारे जे त्याचे भृत्य असतात, त्यांचें

स्थान राजसिंहासनाच्या पाठीमागें नियत केलेलें आहे. शूर व विद्वान् पुरुषानें राजाच्या समोर केव्हांहि बसूं नये. कारण शास्त्रानें त्याचा निषेध केला आहे. राजाच्या समक्ष भृत्यांना वेतन देण्याचें कार्य चाललें असतां हांक मारल्यावांचून उतावीळपणानें पुढें जाऊन तें कधीं घेऊं नये. कारण अशाप्रकारचें धाष्टर्य केल्यास तें सामान्य लोकांच्या मनांतहि अप्रीति उत्पन्न करितें, मग भूपतीविषयीं काय सांगावें ! राजानें एखाद्या वेळीं असत्य भाषण केल्यास तें इतर लोकांमध्यें प्रकट करूं नये. मिथ्या भाषण करणारे लोक जसे राजांना आवडत नाहींत, तसे पंडितंमन्यहि त्याच्या तिरस्कारास पात्र होतात. आपल्या स्वामीची अकीर्ति होईल, असें भाषण कधींहि करूं नये. मी मोठा शूर किंवा बुद्धिमान् आहें, असें समजून गर्विष्ठ होऊं नये. राजाचें हिताचरण करणारा पुरुष त्याला प्रिय होतो व सुखोपभोग घेतो. राजापासून फार मोठें ऐश्वर्य जरी मिळालें किंवा एखादें प्रिय स्थान प्राप्त झालें तरी राजाचें प्रिय व हित करण्यामध्यें दक्ष असावें. ज्याचा कोप अनर्थावह व प्रसाद अति हितावह असतो, त्याचें अहित कोणता विचारी पुरुष चिंतील ?

क्रोध व स्वाभाविक चापल्य यांचे सूचक असलेले ओष्ठ, बाहु व जानु यांचें चालन राजासमोर कधींहि करूं नये. त्याचें भाषण संपल्यावांचून मध्येंच बोलूं नये. राजसभेंत श्वासोच्छ्वास, संभाषण, शिंक, जांभई इत्यादि देहधर्म दुसऱ्याच्या लक्षांत येतील अशा रीतीनें करूं नयेत. इतर राजसेवकांकडून कांहीं हास्यास्पद प्रकार घडल्यास आपण अतिशय हृष्ट होऊं नये व एखाद्या उन्मत्ताप्रमाणें मोठमोठ्यानें हसूं नये. कारण श्रेष्ठ लोक तेवढ्याच कारणावरून त्याला क्षुद्र समजूं लागतात. त्याचप्रमाणें असें कांहीं निमित्त घडलें असतां मोठ्या धैर्यानें काष्ठाप्रमाणें निर्विकारहि राहूं नये. कारण इतका गंभीरपणा धरल्यास ' हा मूढ आहे,| याला कांहीं कळत नाहीं. ' असें म्हणतात, यास्तव अशाप्रसंगीं प्रसन्नतेचें द्योतक असें मृदु स्मित करावें.

जो अल्प लाभानें हृष्ट होतो, तो अल्पशा अपमानानेंहि व्यथित होईल, यांत संशय नाहीं. जो राजसेवेमध्यें एकाग्र चित्तानें गढून जातो तोच राजगृहांत टिकतो. जो राजा, राजपुत्र व त्याचे मुख्य मुख्य आश्रित यांच्या गुणांचें सर्वदा वर्णन करितो, तोच विद्वान् प्रिय अमात्य होऊन दीर्घकाल त्या अधिकारावर स्थिर राहतो. ज्या अमात्याला राजानें कांहीं कारणावांचून प्रतिबंध किंवा दंड केलेला असतो त्यानेंहि राजाची निंदा करूं नये. उलट प्रसंगीं

स्तुतीच करावी. म्हणजे त्याला त्याचें गेलेलें ऐश्वर्य पुनः प्राप्त होतें. जो राजाच्या देशांत रहात असेल, किंवा त्याच्या कडून मिळणाऱ्या वेतनावर उपजीविका करीत असेल, त्यानें प्रत्यक्ष किंवा परोक्ष राजाच्या गुणांचें वर्णनच करावें. जो अमात्य कांहीं तरी निमित्तानें लोकांना दंड करण्याची सल्ला देतो, तो राजाला जरी प्रिय असला, तरी बहुजनविरोधामुळें त्या स्थानावर दीर्घकाल राहूं शकत नाहीं. राजापासून आपल्याला धन-मानादिकांचा सर्वदा लाभ होईल, या गोष्टीकडे लक्ष देऊन राजाशीं दुसऱ्या कोणालाहि संवाद करावयास लावूं नये. उलट 'राजा तुमच्यासारख्यांशीं संभाषण करणार नाहीं,' असें सांगून इतरांना राजाच्या महत्त्वाचा प्रत्यय आणून द्यावा. युद्धामध्यें किंवा परराष्ट्रांतील लोकांशीं भाषण करण्याचा प्रसंग आला असतां राजाच्या अपेक्षेनें आपलें शौर्य किंवा युक्तिवादित्व अधिक प्रकट करावें, म्हणजे 'या राजाचा अमात्यहि जर इतका शूर व दीर्घदर्शी आहे, तर राजा किती शूर असेल!' असं वाटून शत्रु वचकतो व त्यामुळें राजा संतुष्ट होतो. जो पुरुष नेहमीं उत्साही, बुद्धिबलानें युक्त, शूर, सत्यवादी, अनिष्ठुर, जितेंद्रिय व सुशिक्षित असून छायेप्रमाणें राजाला अनुसरतो, तोच राजगृहांत राहूं शकतो. राजानें दुसऱ्या भृत्याला हांक मारिली असतांहि जो, तो येण्यापूर्वीच राजापाशीं जाऊन 'काय आज्ञा आहे?' असें विचारतो, तोच राजाला प्रिय होतो व राजसेवेंत दीर्घकाल राहूं शकतो. जो राजपुरुष धन, स्त्रिया इत्यादिकांचें रक्षण व बाह्य शत्रूंचा पराभव यांतील कोणतेंहि कार्य सांगितलें असतां साशंक किंवा भयभीत होत नाहीं, उलट मोठ्या धैर्यानें तें कार्य पार पाडतो, तोच राजाला प्रिय होतो.

बा युधिष्ठिरा, राजकार्यासाठीं आपलें घर सोडून जातांना जो स्त्री, पुत्र, अन्न, पान, इत्यादि सुखसाधनांचें चिंतन करीत नाहीं तर प्रवासादि दुःखानें सुख मिळविण्याची इच्छा करितो, तोच राजगृहांत वास करूं शकतो.

हे पांडवा, भृत्यानें राजासारखींच वस्त्रें, अलंकार इत्यादिकांचें धारण करूं नये. राजाच्या जवळ अनम्रतेनें कधींहि उभें राहूं नये. तर सर्वदा नम्रताच धरावी. राजानें कोणत्याहि कार्यामध्यें नियुक्त केलें असतां कोणीं लांच वगैरे दिल्यास त्याला स्पर्शहि करूं नये. कारण जो राजभृत्य अशा अन्यायानें धन मिळवितो, त्याला बंधन किंवा वध अवश्य प्राप्त होतो. राजानें जें वाहन, वस्त्र, अलंकार, किंवा दुसरें कांहीं दिलें असेल तेंच सतत धारण करावें. त्यामुळें तो भृत्य त्याला अधिक प्रिय होतो.

हे कुंतीपुत्रहो, याप्रमाणें मोठ्या यत्नानें आपापल्या चित्ताचें नियमन करून हें तेरावें वर्ष तुम्ही राजगृहीं अज्ञातवासांत घालवा आणि आपल्या उच्च शीलानें पुनः ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याची इच्छा करा. हे वीरांनो, एवढें हें वर्ष निघून गेलें म्हणजे तुम्ही स्वदेशास प्राप्त होऊन यथेच्छ क्रीडा करा.

युधिष्ठिर म्हणाला—हे पूज्य धौम्यमुने, आपण आम्हांला या वेळीं योग्य उपदेश केला आहे. हे ब्राह्मणा, तुझें कल्याण होवो. माता कुंती किंवा महा बुद्धिमान् विदुर यांवांचून आम्हांला असा उपदेश करणारा कोणी नाहीं. आतां या प्रसंगीं आम्हीं या दुःखांतून तरून जावें, आमचें प्रस्थान सुखावह व्हावें व आम्हीं विजयी व्हावें म्हणून जें शांतिक व पौष्टिक कर्म करणें उचित असेल, तें आपण करा.

राजा जनमेजया, युधिष्ठिरानें अशी प्रार्थना केली असतां द्विजश्रेष्ठ धौम्यानें प्रस्थानसमयीं विहित असलेलें सर्व स्वस्त्ययन यथाविधि केलें. त्या महात्म्यानें त्यांचे अग्नि प्रज्वलित केले व त्यांना पूर्वसमृद्धि प्राप्त व्हावी व त्यांनीं सर्व पृथ्वीला जिंकावें, म्हणून त्यांत मंत्रयुक्त हवन केलें. तेव्हां याज्ञसेनीसह पांची पांडवांनीं अग्नि व तपोधन ब्राह्मण यांस प्रदक्षिणा घातली आणि ते वीर तेथून निघून गेले. द्रौपदीला पुढें करून पांडव द्वैतवनांतून एकाएकीं गुप्तपणें निघून गेले असतां जप करणारांमध्यें श्रेष्ठ असलेला धौम्यमुनि त्यांचीं अग्निहोत्रें घेऊन पांचाल देशास निघून गेला. इंद्रसेनादि सूतहि युधिष्ठिराच्या आज्ञेप्रमाणें त्यांचे रथ व अश्व घेऊन यादवांकडे गेले आणि पांडवधनाचें रक्षण करीत ते कोठें गेले याची वार्ता कोणालाहि कळूं न देतां द्वारकानगरींत सुखानें राहिले. ४. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ पांडवांचें प्रयाण. २ शमीवृक्षांवर शस्त्रांचें आधान. ३ विराटनगरींत प्रवेश. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, ते वीर पांडुनंदन कमरेला तलवारी लटकावून, पाठीवर बाणांचे भाते बांधून आणि हातांत चर्ममय तलत्राण व अंगुलीत्राण घालून यमुनेच्या तीरावरून कडे-कडेनें जाऊं लागले. नंतर ते पायांनींच यमुनेच्या दक्षिण तीरावर येऊन पोंचले. वनवासापासून निवृत्त

झालेले व मत्स्यदेशाकडे जाण्याची इच्छा करणारे ते महाबलाढ्य धनुर्धर दुर्गम पर्वतावर आणि गहन वनांत रहात रहात व मार्गांमध्यें मृगांना वेध करीत निघाले. ते दशार्ण देश उत्तरेला व पांचाल देश दक्षिणेला टाकून त्या दोहोंच्या मधून यकृल्लोम व शूरसेन या राष्ट्रांचें उल्लंघन करून 'आम्ही मत्स्यदेशांतील व्याध आहोंत' असें सांगत वनांतून संचार करूं लागले. त्यांनीं शस्त्रें धारण केलीं होतीं, ते निस्तेज झाले होते व त्यांनीं जटा वाढविल्या होत्या. त्यामुळें ते धनुर्धर पांडव व्याधासारखेच भासत होते. त्यांचा इष्ट प्रदेश जवळ येतांच कृष्णा युधिष्ठिराला म्हणाली—"हे प्रभो, ही पहा अद्यापि आपल्याला पाऊल-वाट व विविध शेतेंच दिसत आहेत. यावरून विराटाची राजधानी पुष्कळ दूर असावी, हें उघड आहे. यास्तव आपण आतां एक रात्र येथेंच राहूं. कारण मी अतिशय थकल्यें आहें."

द्रौपदीचें हें वचन ऐकून युधिष्ठिर धनंजयाला म्हणाला—'हे वीरा, तूं या पांचालीला उचलून घे. एवढ्या वनांतून बाहेर पडलों कीं आपण राजधानींत प्रवेश करून तेथेंच वास करूं.

राजा, पारिक्षिता, युधिष्ठिराची ही आज्ञा कानीं पडतांच एखाद्या बलाढ्य गजराजाप्रमाणें अर्जुनानें द्रौपदीला उचलून घेतलें व तिला आपल्या स्कंधावर बसवून तो निघाला. अल्पावधींतच ते नगराच्या समीप आले, तेव्हां अर्जुनानें द्रौपदीला खालीं उतरविलें. राजधानी जवळ येतांच युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला— "हे धनंजया, आपण हीं सर्व शस्त्रें कोठें बरें ठेवून नगरांत प्रवेश करावा? कारण आपण जर या आयुधांसह नगरांत गेलों तर नगरवासी लोकांना निः-संशय भय वाटेल. हे वत्सा, तुझें हें गांडीव धनुष्य फार मोठें व लोकांत अतिशय प्रसिद्ध आहे. या आमच्या शस्त्रासह जर आम्हीं नगरांत प्रवेश केला, तर सर्व लोक आम्हांला तत्काल ओळखतील, यांत मुळींच संशय नाहीं आणि 'आमच्यांतील एकाला जरी कोणीं ओळखिल तरी आम्हीं पुनः वनवास करूं'

---

१ 'स्वराष्ट्रं प्रेप्सवः' असें मूळांत आहे. पांडव मार्गात कोणी विचारल्यास आम्ही मत्स्यदेशांतील व्याध आहोंत, असें सांगत चालले होते. म्हणून 'मत्स्यदेशाकडे जाण्याची इच्छा करणारे' असा येथें अर्थ केला आहे. 'पण—स्वराष्ट्रं प्रेप्सवः—स्वराज्य परत मिळविण्याची इच्छा करणारे'—असाहि याचा अर्थ ध्वनित होतो.

अशी आमची प्रतिज्ञा असल्यामुळें आम्हांला बारा वर्षें पुनः वनांत जावें लागेल."

अर्जुन म्हणाला—हे पुरुषश्रेष्ठा, या श्मशानासमीप उच्चप्रदेशीं हा एक विशाल शमीवृक्ष दिसत आहे. त्याच्या शाखा गहन असून त्या दूरवर पसरल्या आहेत व आपण येथें शस्त्रें ठेवीत आहोंत, हें पहाणारा कोणी मनुष्यहि आसपास दिसत नाहीं. शिवाय हें स्थान आडमार्गाला आहे, याच्या सभोंवार हिंस्र पशु व सर्पादिकांचें वसतिस्थान आहे. विशेषतः याच्या समीपच हें भयाण श्मशान आहे. त्यामुळें आपलीं शस्त्रें येथें सुरक्षित रहातील. यास्तव आपण या शमीवृक्षावर सर्व आयुधें ठेवून नगरांत प्रवेश करूं आणि त्यांत ठरल्याप्रमाणें निर्भयपणानें विहार करूं.

हे पांडवेया, याप्रमाणें राजा युधिष्ठिराला बोलून तो शूर पार्थ आपलीं शस्त्रें ठेवण्याच्या उद्योगास लागला. ज्या गांडीव धनुष्याच्या योगानें अर्जुनानें एका रथावर आरूढ होऊन देव, मनुष्य, इतर सर्व शूर राजे आणि विस्तीर्ण राष्ट्रें यांस जिंकिलें, त्या महाघोष करणाऱ्या व शत्रूंचा नाश करणाऱ्या भयंकर धनुष्यावरील गुण त्या कुरुपुंगवानें उतरविला. युधिष्ठिरानें ज्या धनुष्याच्या योगानें कुरुक्षेत्राचें रक्षण केलें, त्याची प्रत्यंचा उतरली. नंतर ज्या धनुष्यानें महापराक्रमी भीमसेन युद्धांत पांचालांना जिंकून विजयी झाला, दिग्विजयांत अनेक वीरांचा व नृपांचा पराभव केला, वज्रानें पर्वत विदीर्ण झाला असतां त्याचा जसा प्रचंड ध्वनि व्हावा तसा ज्या धनुष्याचा टणत्कार ऐकून शत्रु रणांगणांतून पळून जातात आणि ज्या धनुष्याच्या साह्यानेंच भीमसेनानें युद्धामध्यें जयद्रथाला रथांतून खालीं ओढलें, त्या प्रचंड धनुष्याची दोरी वृकोदरानें सोडली. त्यानंतर महाबाहु, मितभाषी, आरक्तवदन व कुरुकुलांतील सर्व रूपवानांहूनहि सुस्वरूप असलेल्या नकुलानें ज्या धनुष्याच्या योगानें पश्चिम दिशा जिंकली, त्या यशस्वी धनुष्याची 'ज्या' उतरली. शेवटीं आचारसंपन्न माद्रीपुत्र सहदेवानें ज्याच्या योगानें दक्षिण दिशा जिंकिली, तें धनुष्य गुणविरहित केलें. नंतर त्या सर्वांनीं आपलीं दीर्घ व दीप्त खड्गें, भाते व तीक्ष्ण बाण इत्यादि सर्व शस्त्रें एकत्र केलीं व तीं धनुष्यांसह बांधलीं.

हे भारता, त्यानंतर कुंतीपुत्र युधिष्ठिरानें 'हे वत्सा, या वृक्षावर चढून हीं सर्व आयुधें त्यावर व्यवस्थित ठेव.' अशी नकुलास आज्ञा केली. तेव्हां नकु-

लानें त्या शमीवृक्षावर चढून त्याच्या फांद्यांच्या फटींत व ढोलींत तीं ठेविलीं. त्या वीरानें जेथें तीं सुरक्षित रहातील व पर्जन्याच्या वृष्टीचा प्रवेश होणार नाहीं अशा गूढ भागांत रज्जुपाशांनीं दृढ बांधून ठेविलीं. नंतर शवाची दुर्गंधी व अमंगलता यांच्या भीतीनें लोक त्या शमीवृक्षाला दुरूनच टाळतील अशा आशयानें त्या पांडवांनीं एक मृत शरीर आणून तें त्या वृक्षावर टांगून ठेविलें आणि ' ही आमची ऐंशी वर्षांची माता आहे. आमच्या पूर्वापार कुलधर्माप्रमाणें आम्हीं हें शव वृक्षाला टांगून ठेविलें आहे ' असें तेथें समीप असणाऱ्या व त्यांचें हें कृत्य पहाणाऱ्या गोपालादिकांस सांगून ते शत्रूंचा संहार करणारे परंतप पांडव नगराकडे वळले. तेव्हां युधिष्ठिरानें आपसांत जय, जयंत, विजय, जयत्सेन व जयद्बल अशीं सांकेतिक नांवें ठरविलीं. नंतर त्या सर्वांनीं पूर्वप्रतिज्ञेप्रमाणें अज्ञातवासाचें तेरावें वर्ष विराटगृहीं घालविण्यासाठीं त्या विस्तीर्ण राजधानींत प्रवेश केला. ४. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ युधिष्ठिरानें केलेलें दुर्गास्तवन. २ दुर्गेचें दर्शन व तिचा पांडवांना वर. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें त्या सुरम्य विराटनगरींत जात असतां धर्मात्म्या युधिष्ठिरानें त्रिभुवनेश्वरी दुर्गादेवीचें मनांत असें स्तवन केलें.

" यशोदेच्या गर्भांतून उत्पन्न झालेल्या, नारायणानें वर दिलेल्या, नंदगोपाच्या कुलांत जन्मलेल्या, मंगलप्रद, कंसानें शिळेवर आपटलें असतां अंतरिक्षांत गेलेल्या, दिव्य मालांनीं शोभणाऱ्या, दिव्य वस्त्रें व ढाल-तलवार यांस धारण करणाऱ्या, दुर्गम संकटांतून तारणाऱ्या, सदा कल्याणकारक असलेल्या या वासुदेवभगिनीचें जे स्मरण करितात त्यांना ती चिखलांत रुतलेल्या दुर्बल गायीप्रमाणें पापापासून तारिते. अशा त्या भगवतीचें साक्षात् दर्शन होण्यासाठीं राजा युधिष्ठिरानें आपल्या भ्रात्यांसह तिला संबोधून विविध स्तोत्रांनीं तिचें स्तवन करण्यास आरंभ केला.

---

१ शमीवृक्षावरील आयुधांचें रक्षण करीत असल्यामुळें त्या शवाला पांडवांनीं आमची ' माता ' असें म्हटलें. आपल्या आयुधांचें रक्षण करणें हा क्षत्रियांचा धर्म असल्यामुळें त्यांनीं त्या आपल्या कृतीस ' कुलधर्म ' म्हटलें आहे. या दृष्टीनें त्यांच्याकडे अनृतवादित्व येत नाहीं.

हे देवि, तूं वर देणारी ब्रह्मचारिणी, कुमारी व कृष्णस्वरूपिणी आहेस. तुला नमस्कार असो. हे भगवति, तुझा आकार बालसूर्यासारखा असून तुझें मुख पूर्ण चंद्रासारखें आहे. तूं चतुर्भुज विष्णुस्वरूपिणी व चतुर्मुख ब्रह्मस्वरूपिणी आहेस. तूं सुंदर अवयवांनीं युक्त आहेस. हे देवि, मयूरपिच्छासारख्या चित्रविचित्र वर्णांचीं इंद्रनीलादि रत्नें जडविलेलीं कंकणें, केयूर व गदा यांस धारण करणारी तूं भगवान् विष्णूची कांता जी लक्ष्मी, तिच्या सारखीच भासत आहेस. हे आकाशगामिनि, तुझें ब्रह्मचर्यस्वरूप विशद आहे, त्यावरून तूं लौकिक लक्ष्मीसारखी चंचल नसून अनन्यगामिनी आहेस, हें व्यक्त होतें. तूं नीलमेघासारखी कृष्णवर्ण असून तुझें वदन संकर्षणासारखें आहे. तूं अष्टभुजांनीं शोभत आहेस. त्यांतील तुझे दोन बाहु वर व अभय देणारे असल्यामुळें उत्कृष्ट आहेत. तुझ्या तिसऱ्या हातांत पात्र, चवथ्या हातांत कमल व पांचव्या हातांत घंटा आहे. बाकीच्या तीन हातांत तूं पाश, धनुष्य व महाचक्र धारण करितेस. हींच तुझीं विविध आयुधें आहेत. तुझे दोन्ही कर्ण कुंडलांनीं विभूषित झाले असून हे विश्वव्यापिनि, तूं चंद्राशीं स्पर्धा करणाऱ्या आपल्या मुखानें शोभत आहेस. तूं सर्पशरीराकार वेणी घालून व सुंदर केशरचना करून त्यांवर विचित्र मुकुट धारण केला आहेस.

हे देवि, मंदरपर्वत जसा वासुकीच्या वेढ्यानें शोभतो, तशी तूंहि भुजंगाकार मेखलेनें विराजमान होतेस. मयूरपिच्छाच्या उंच ध्वजानें तूं सुशोभित झाली आहेस. हे देवि, कौमार्यव्रतांत स्थित होऊन तूं स्वर्गाला पावन केलें आहेस. हे महिषासुरमर्दिनि, त्रैलोक्याच्या रक्षणासाठीं तूं देवाकडून पूजिली व स्तविली जातेस. हे सुरेश्वरि, मजवर प्रसन्न हो, दया कर आणि कल्याणकारक हो. तूंच जया व विजया असून युद्धामध्यें विजय देणारीहि तूंच आहेस. यास्तव हे वरदे, मलाहि तूं विजयी कर. सांप्रत तूं मला वर दे. पर्वतश्रेष्ठ विंध्याद्रीवर तुझें शाश्वत निवासस्थान आहे. हे कालि, महाकालि, तुला मद्य-मांस व पशु प्रिय आहेत. तूं वरदा असल्यामुळें प्राचीन ब्रह्मादिकहि तुझी आज्ञा शिरसा वंद्य मानितात. हे कामचारिणि, जे मानव आपला दुःखभार उतरण्यासाठीं नित्य प्रभातकालीं तुझें स्मरण करितात किंवा तुला वंदन करितात, त्यांना या लोकीं संतति किंवा संपत्ति यांतील कांहींहि दुर्लभ होत नाहीं. तूं संकटांतून तारितेस म्हणून लोकांमध्यें ‘ दुर्गा ’ या नांवानें प्रसिद्ध आहेस.

हे महादेवि, महारण्यांत क्लेश पावत असलेल्या, महासागरांत बुडत अस-

लेल्या किंवा चोरांनीं अडविलेल्या जनांची तूंच परम गति आहेस. हे दुर्गे, जे नर अगाध जलांतून तरून जातेवेळीं किंवा निबिड अरण्यांतील दुर्गम मार्गांत तुझें स्मरण करितात ते कदापि क्लेश पावत नाहींत. तूं कीर्ती, श्री, धृति, सिद्धि, ह्री, विद्या, संतति, मति, संध्या, रात्री, प्रभा, निद्रा, ज्योत्स्ना, कांति, क्षमा व दया आहेस, तुझें पूजन केलें असतां मनुष्याचें बंधन, मोह, पुत्रनाश, धनक्षय, व्याधि, मृत्यु व भय या सर्वांचा अभाव होतो. यास्तव हे देवि सुरेश्वरि, राज्यभ्रष्ट झालेला मी तुला शरण आलों आहें. मी नम्र होऊन तुला शिरसा वंदन करीत आहें. हे कमलनयने, माझें रक्षण कर. हे सत्यस्वरूपे, तूं आम्हांला सत्यरूप हो. हे भक्तवत्सले दुर्गे, हे शरणीय देवि, मला आश्रय दे."

(२) हे भारता, याप्रमाणें युधिष्ठिरानें स्तवन केलें असतां त्या देवीनें प्रकट होऊन त्याला दर्शन दिलें. ती त्या पांडवाजवळ येऊन म्हणाली—"हे राजन्, माझें वचन ऐक. संग्रामामध्यें तुझा लवकरच विजय होईल. माझ्या प्रसादानें कौरवसेनेला जिंकून तूं निष्कंटक झालेल्या पृथ्वीचें राज्य पुनः भोगशील. हे महाबाहो, माझ्या प्रसादानें भ्रात्यांसह तुझें परम कल्याण होईल. तुला सौख्य व आरोग्य प्राप्त होईल. जे निष्पाप लोक माझें संकीर्तन करितील, त्यांस संतुष्ट झालेली मी राज्य, आरोग्य, आयुष्य व पुत्र देईन. हे राजा, तूं जशी माझी स्तुति केलीस त्याप्रमाणें जे कोणी प्रवासांत, नगरांत, युद्धांत, गहन अरण्यांत, समुद्रांत, दुर्गम पर्वतावर किंवा शत्रूपासून उद्भवलेल्या संकटप्रसंगीं माझें स्मरण करतील, त्यांना या लोकीं कांहींहि दुष्प्राप्य होणार नाहीं.

हे पांडवहो, जो मनुष्य हें श्रेष्ठ स्तोत्र भक्तीनें ऐकेल किंवा पठण करील, त्याचीं सर्व कार्यें सिद्धीस जातील. हे कौंतेयहो, मी तुम्हांवर प्रसन्न झालें आहें. विराटनगरींत राहिलेल्या तुम्हां सर्वांना माझ्या प्रसादामुळें कौरव किंवा इतर नगरवासी जन ओळखणार नाहींत."

राजा जनमेजया, ती वरदा देवी शत्रुनाशक युधिष्ठिराला असें बोलून व पांडवांचें रक्षण करून तेथेंच अंतर्धान पावली. ४. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ युधिष्ठिराचें विराटसभेंत गमन. २ त्याला मिळालेला राजाश्रय. ]

(१) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर अगोदर राजा युधिष्ठिर सभेमध्यें बसलेल्या राजा विराटाकडे आला. त्यानें वैडूर्य-रत्नजडित सुवर्णाचे फांसे

तांबड्या व पांढऱ्या सोंगट्या व पट असें द्यूताचें साहित्य एका वस्त्रांत गुंडाळून तें आपल्या खांकेंत धरलें होतें. कुरुवंशाची वृद्धि करणारा तो महायशस्वी युधिष्ठिर मत्स्यदेशाच्या कीर्तिमान् अधिपतीकडे जेव्हां चालला तेव्हां नरेंद्राकडून सत्कार केला गेलेला तो महात्मा विषारी महासर्पाप्रमाणें लोकांना दुष्प्रेक्ष्य झाला. देवाप्रमाणें अलौकिक स्वरूपानें व सामर्थ्यानें युक्त असलेल्या त्या पुरुषश्रेष्ठाकडे लोक पहात राहिले. तो वीर्यवान् युधिष्ठिर मेघसमूहांनीं आच्छादित झालेल्या सूर्याप्रमाणें किंवा भस्माच्छादित अग्नीप्रमाणें दिसत होता. शरत्कालच्या शुभ्र मेघांनीं झांकलेल्या चंद्राप्रमाणें सभेंत येत असलेल्या त्या पांडवाला दुरूनच पाहून विराटराजा आश्चर्यचकित झाला. पूर्ण चंद्राच्या प्रभेप्रमाणें ज्याचें मुख प्रसन्न आहे व ज्याचा प्रभावहि अवर्णनीय आहे, असा तो भव्यपुरुष आपल्याच पुढें उभा आहे, असें पाहून त्यानें जवळ बसलेल्या मंत्र्यांना व स्तुतिपाठकांना 'हा आज प्रथमच आपल्याकडे कोण आला आहे ?' असा प्रश्न केला.

तो म्हणाला—" हा श्रेष्ठ पुरुष एखाद्या राजासारखा सभेकडे अवलोकन करीत आहे. त्यावरून हा ब्राह्मण नसावा, हा कोणीतरी पृथ्वीपति असावा, असें मला वाटतें. यानें जरी ब्राह्मणाचा वेष घेतलेला आहे, तरी तो 'जातिब्राह्मण आहे,' अशी माझी मनोदेवता मला सांगत नाहीं. पण याच्या बरोबर कोणी दास नाहीं, रथ नाहीं किंवा हत्ती नाहीं ! तथापि याच्याकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास हा इंद्राप्रमाणें शोभत आहे. याच्या आजानुबाहुत्वादि शरीरचिह्नांवरून हा मूर्धाभिषिक्त राजा असावा, असें अनुमान होतें. एखादा मत्तगज जसा कमलिनीकडे जातो, तसा हा निर्भयपणें माझ्या समीप येत आहे. ( या वचनानें विराटानें आपल्या पराभवाची शंका प्रकट केली आहे. )

जनमेजया, तो भूपाल जों असे अनेक तर्क करीत आहे, तोंच युधिष्ठिर त्याच्या समोर येऊन म्हणाला—" हे राजा, मी द्विज असून उपजीविकेसाठीं तुझ्या समीप आलों आहें. माझें सर्वस्व नष्ट झालें आहे. यास्तव हे निष्पाप राजा, मी तुझ्या आश्रयास रहाण्याची इच्छा करितों. हे विभो, मी तुझ्या इच्छेप्रमाणें वर्तन करीन." ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून विराट राजाला अतिशय आनंद झाला. 'हे द्विजा, तुझें स्वागत असो' असें बोलून त्यानें त्याचा सत्कार केला. विराटानें प्रीतियुक्त मनानें त्या राजसिंहाचा स्वीकार करून

त्यास म्हटलें—" हे श्रेष्ठा, मी स्नेहानें तुला जो प्रश्न करीत आहें, त्याचें मला यथार्थ उत्तर दे. तूं कोणाचा कोण आहेस? कोणत्या राजाच्या राष्ट्रांतून येथें आला आहेस? तुझें गोत्र व नाम काय आहे? तूं कोणत्या विषयांत कौशल्य संपादन केलें आहेस?"

विराटराजाचे हे प्रश्न ऐकून युधिष्ठिर निर्विकार चित्तानें म्हणाला—हे राजन्, मी पूर्वीं युधिष्ठिराचा सखा होतों. मी व्याघ्रपात् गोत्रामध्यें उत्पन्न झालेला वैयाघ्रपद्य विप्र आहें. मी द्यूतामध्यें अनुकूल फांसे टाकण्यांत प्रवीण आहें. हे विराटा, मी 'कंक' या नांवानें प्रसिद्ध आहें.

युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून विराट म्हणाला—हे श्रेष्ठा, तुझ्या आगमनानें मी अतिशय प्रसन्न झालों आहें. मी तुला इष्ट वर देतों. मी सर्वथा तुझ्या अधीन झालों आहें. या मत्स्यदेशाचें अनुशासन तूंच कर. मला कुशल द्यूतकार सर्वदाच प्रिय आहेत. तूं देवासारखा दिसतोस, त्यामुळें तूं खरोखर राज्याला पात्र आहेस.

युधिष्ठिर म्हणाला—हे मत्स्यराजा, द्यूतप्रसंगीं द्यूतकारांतील पराभूत झालेला राजा किंवा राजपुत्र यांच्याशींहि धनासाठीं कलह उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं. यास्तव हे राजा, तुझ्या प्रसादानें मीं द्यूतांत जिंकलेलें धन कोणींहि तत्काल मला दिल्यावांचून राहूं नये, एवढाच वर तूं मला दे. द्यूतामध्यें सत्याचा लेशहि नसतो. पराजित झालेले द्यूतकार आपल्या विजयी प्रतिपक्षाशीं नित्य कलह करितात. मला कलहाची मोठी भीति वाटते. यास्तव तूंच त्यांतील सत्य काय आहे हें जाणून माझें धन मला देववावेंस, एवढीच माझी इच्छा आहे.

युधिष्ठिराचें हें न्याय्य भाषण श्रवण करून विराटराजा म्हणाला—हे श्रेष्ठा, क्षत्रियादि इतर कोणी जर तुझें अप्रिय करतील, तर त्यांना मी

---

१ मी युधिष्ठिर आहें व आतां तुझा सखा होण्याची इच्छा करीत आहें. असाहि अर्थ 'अहं युधिष्ठिरः पुरा तव सखा स्यासम्' असा अन्वय लावल्यानें होतो. २ व्याघ्राप्रमाणें प्राण्यावर झडप घालणारा जो यम त्याच्या गोत्रांत झालेला म्हणून वैयाघ्रपद्य. ३ ब्राह्मणादिकांना धनादिकांच्या योगानें तृप्त करीत असल्या-मुळें किंवा धर्मपुत्र असल्यामुळें विप्र आहें. ४ बृहदश्वापासून अक्षविद्या संपादन केल्यामुळें मी त्याचा शिष्य आहें, असा भावार्थ.

देहान्त दंड करीन व जे ब्राह्मण तुझें अप्रिय करतील त्यांना मी आपल्या राष्ट्रांतून घालवून देईन. आज येथें जमलेल्या सर्व नागरिकांनीं व राष्ट्रांतील लोकांनीं हें माझें वचन ऐकून ठेवावें. माझ्या राष्ट्राचा मी जसा प्रभु आहें तसा हा कंकहि आहे. हे कंका, तूं माझा मान्य सखा आहेस. तुला विपुल वस्त्रें, भोजन व पेय पदार्थ प्राप्त होतील. मीं तुझ्यासाठीं माझें द्वार अहोरात्र उघडें ठेविलें आहे. तूं माझें धन, स्त्रिया इत्यादि अंतर्गृहांतील ऐश्वर्य व सैन्य, उपवनें इत्यादि बाह्य ऐश्वर्य यांचें यथेष्ट पर्यालोचन कर. हे कंका, जे दरिद्रीलोक अनुवादासाठीं तुझ्याजवळ येतील, त्यांचें म्हणणें ऐकून घेऊन तूं राजदर्शनाच्या अवसराची वाट न पहतां वाटेल तेव्हां मला येऊन सांगत जा, म्हणजे मी त्यांस सर्व प्रकारचें धन देईन. मजपाशीं तुला कोणत्याहि प्रकारचें भय नाहीं. ब्राह्मणांच्या वृत्तीला एक क्षणाचाहि विलंब लावूं नये, असा माझा आशय आहे.

हे भारता, याप्रमाणें विराटराजाशीं त्या पुरुषश्रेष्ठाचा परिचय होऊन त्याच्यापासून श्रेष्ठ वर व स्नेह यांची प्राप्ति झाली व तो बुद्धिमान् कुरुनंदन मोठ्या आदरानें व सुखानें तेथें राहिला. त्याचें तें वेषांतर कोणालाहि ओळखतां आलें नाहीं. ४. १. ७.

---

## अध्याय ८ वा.

[ १ भीमसेनाचें राजसभेंत गमन व त्याला मिळालेला राजाश्रय. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्यानंतर ज्याचें शरीरबल भयंकर आहे, जो आपल्या अंगकांतीनें देदीप्यमान दिसत आहे, सिंहाच्या लीलागतीप्रमाणें ज्याची गति आहे, असा एक धिप्पाड पुरुष हातांत चिमटा, पळी, झारा, मांसादि पदार्थ तोडण्याचा कोशरहित तीक्ष्ण सुरा इत्यादि आयुधें हातांत घेऊन सूदाच्या रूपानें आपल्या सूर्यासारख्या परम तेजानें सर्व लोकांस प्रकाशित करीत मत्स्यराजापाशीं येऊन उभा राहिला. त्या वेळीं त्यानें कृष्णवर्ण वस्त्र परिधान केलें होतें व त्याचें शरीर मेरूप्रमाणें अभेद्य दिसत होतें. समीप आलेल्या त्याला पाहून राजा सभेंत बसलेल्या लोकांस म्हणाला—" हा तरुण पुरुष कोण बरें असावा ! याचे स्कंध सिंहासारखे उन्नत असून हा अतिशय रूपवान् दिसत आहे. या पुरुषाला मीं पूर्वी कधींहि पाहिलेलें नाहीं. हा सूर्यासारखा तेजस्वी दिसत आहे. पुष्कळ विचार करूनहि याचा आशय कळत नाहीं.

हा कोणत्या निश्चयानें येथें आला आहे, हेंहि तत्त्वतः माझ्या ध्यानांत येत नाहीं. याला पहातांच हा गंधर्वराज आहे कीं साक्षात् इंद्र आहे, अशी भ्रांति होते. यास्तव माझ्या दृष्टीसमोर येऊन उभा राहिलेला हा कोण आहे, हें समजून घ्या व त्याला जें इष्ट असेल तें द्या. विलंब लावूं नका."

राजा विराटाच्या या वचनानें प्रेरित झालेले त्याचे भृत्य सत्वर त्या धर्मानुज कौंतेयापाशीं जाऊन राजाच्या आज्ञेप्रमाणें त्याची विचारपूस करूं लागले. तेव्हां त्या भृत्यांस कांहींच उत्तर न देतां तो उदारबुद्धि पांडव राजापाशीं येऊन असें अदीन वचन बोलूं लागला—" हे नरेंद्रा, मी सूद म्हणजे स्वयंपाकी आहें. मला बल्लव म्हणतात. मी उत्तमोत्तम षड्रस व चतुर्विध अन्न तयार करितों. मला आपल्या आश्रयास ठेवून घे."

हें ऐकून विराट म्हणाला—हे बल्लवा, तूं सूद आहेस, या तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास बसत नाहीं. तूं मला सहस्रनेत्र इंद्रासारखा दिसतोस. तुझी स्वाभाविक अंगकांति, स्वरूप व पराक्रम यांच्या योगानें तूं कोणी सामान्य मनुष्य नसून नरश्रेष्ठ असावास असें मला वाटतें !

त्यावर भीमसेन म्हणाला—हे नरेंद्रा, मी खरोखरच स्वयंपाकी आहें. मी तुझा परिचारक आहें. उत्तम प्रकारचे विविध पदार्थ कसे करावे, हें मी चांगलें जाणतों. पूर्वीं युधिष्ठिरराजानेंहि मीं तयार केलेल्या विविध पदार्थांचा स्वाद घेतलेला आहे. हे पृथ्वीपते, मला मल्लयुद्धाची फार आवड आहे. माझ्या शरीर-बलाची बरोबरी करणारा एकहि मनुष्य नाहीं. मी यापूर्वीं अनेकवेळां मत्त गज व सिंह याच्या अंगावर धांवून गेलों आहें. हे निष्पाप राजा, मला आश्रय दे. मी तुझें सर्वदा प्रिय करीन.

त्या पुरुषाचें हें अद्भुत भाषण ऐकून विराटराजा संतुष्ट झाला व म्हणाला—"हे बल्लवा, मी प्रसन्न मनानें तुझे इष्ट मनोरथ पूर्ण करितों. तुझ्या इच्छेप्रमाणें तूं माझ्या स्वयंपाकघरांत बल्लवाचें काम कर. तुझें काम इतरांच्या कामासारखें असेल, असें मला मुळींच वाटत नाहीं. कारण तूं समुद्रवलयांकित पृथ्वीला पात्र आहेस. त्यामुळें तुझें महानसांतील कर्महि असामान्य असेल, यांत संशय नाहीं. बल्लवा, तुझ्या इच्छेप्रमाणें मी तुला माझ्या महानसावर सत्कारपूर्वक नेमितों. तेथें पूर्वींच नेमलेले जे माझे सूद आहेत त्या सर्वांवर मीं तुला मुख्य नेमिलें आहे. यास्तव तूं आपलें इष्ट कार्य करावयास स्वयंपाक गृहांत जा."

राजा जनमेजया, याप्रमाणें त्या भीमसेनाची महानसांतील अधिकारावर नेमणूक झाली असतां तो वीर अल्पावधींतच विराटराजाला आपल्या गुणांनीं अतिशय प्रिय झाला व त्या मत्स्यनगरींत तो मोठ्या सुखानें राहूं लागला. त्या अलौकिक वीराला तेथील सामान्य लोक किंवा विशिष्ट राजभृत्य यांतील कोणींहि ओळखूं शकलें नाहीं. ४. १. ८.

## अध्याय ९ वा.

[ १ विराटगृहीं द्रौपदीचा प्रवेश. ]

( १ ) वैशंपायन—राजा पारिक्षिता, त्यानंतर द्रौपदी सैरंध्रीचा वेष धारण करून एखाद्या आर्त स्त्रीप्रमाणें विराटाच्या नगरांत आली. त्यावेळीं तिनें आपले कुरळे, काळे, सडक, बारीक व मृदु केंस मागें सारून त्यांना गांठ दिली व त्या शुभ स्मित करणाऱ्या कमलनयनेनें ते आपल्या उजव्या बाजूला झांकून टाकिले. तिनें एकच मळकट वस्त्र परिधान केलें होतें. ती राजमार्गानें एखाद्या वेड्या स्त्रीप्रमाणें चालूं लागली. तेव्हां तिला पाहून त्या नगरांतील अनेक पुरुष व स्त्रिया तिच्याजवळ आल्या. त्यांना पाहून ती धांवूं लागली. तिच्या मागून तो स्त्री-पुरुषांचा समूहहि जाऊं लागला व त्यांतील कांहीं स्त्रिया तिला गांठून ' तूं कोण ? या नगरांत कां आली आहेस ? तुझी काय करण्याची इच्छा आहे ? ' असें विचारूं लागल्या. तेव्हां त्या स्त्री-पुरुषांस उद्देशून कृष्णा म्हणाली—"मी सैरंध्री आहें. येथें कांहीं काम मिळावें म्हणून आल्यें आहें. माझें पोषण करून मला योग्य असें काम कोणीं सांगितल्यास तें करण्याची माझी इच्छा आहे."

हे राजा, तिचें तें अलौकिक रूप व विचित्र वेष पाहून आणि मधुर भाषण ऐकून ही केवल अन्नाकरितां येथें आलेली दासी असावी, असें कोणालाहि वाटलें नाहीं. इतक्यांत विराटराजाची अतिप्रिय भार्या केकयराजपुत्री सुदेष्णा आपल्या राजमंदिरांतून राजमार्गाकडे पहात असतां द्रौपदी तिच्या दृष्टीं पडली. जिचें स्वरूप अप्रतिम आहे, अशा त्या एकवस्त्रा अनाथ द्रौपदीला पाहून तिचें मन द्रवलें. तिनें आपल्या दासी पाठवून तिला जवळ बोलावून घेतलें व म्हटलें—" बाई, तूं कोण आहेस व येथें कोणत्या उद्देशानें आली आहेस ? " राणीचा हा प्रश्न ऐकून द्रौपदीनें वर सांगितलेलेंच उत्तर तिला दिलें.

हे राजेंद्रा, द्रौपदीचें तें दीनवचन ऐकून सुदेष्णा म्हणाली—"हे भामिनि, 'मी सैरंध्री आहें.' असें तूं सांगतेस. पण सैरंध्रीस्त्रिया तुझ्या सारख्या अप्रतिम स्वरूपानें युक्त नसतात. तुझ्या आकारावरून तूं अनेक दासी व दास यांना आज्ञा करणारी अनेक भृत्यांची स्वामिनी असावीस, असें मला वाटतें. कारण तुझ्यामध्यें श्रेष्ठ स्त्रीचीं सर्व लक्षणें आहेत. तुझ्या पायांचे घोटे बाहेर दिसत नाहींत. तुझ्या मांड्या एकमेकींस स्पर्श करीत आहेत. तुझा शब्द, बुद्धि व नाभि हीं तिन्ही गहन आहेत. तुझी नासिका, दोन नेत्र, दोन कान, नखें, वक्षःस्थल व कंठ हे सहा अवयव उन्नत आहेत. तुझ्या हाता-पायांचे तळवे, नेत्रांचे अपांगभाग, ओष्ठ, जिह्वा व नखें हीं पांच स्थानें रक्त कमलाप्रमाणें लाल आहेत. तुझें भाषण हंसाप्रमाणें मनोहर आहे. तूं श्यामवर्ण असून, तुझे केशादि इतर भाग व शरीरप्रदेश चित्ताकर्षक व पुष्ट आहेत. तूं काश्मीर देशांतील अश्वेप्रमाणें मंदगतित्वादि लक्षणांनीं संपन्न आहेस. तुझ्या नेत्रांच्या पापण्या वक्र असून तुझे नेत्र कमलासारखे सुंदर आहेत. ओष्ठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें लाल आहेत. कटि कृश असून कंठ शंखाप्रमाणें तीन रेखांनीं युक्त आहे. तुझें मुख पूर्णचंद्राप्रमाणें आह्लादकारक आहे. तुझ्या अंगांतील शिरा गूढ आहेत. खरोखर जिचे नेत्र कमलपत्राप्रमाणें आहेत, जिच्या शरीराचा सुगंध शारदकमलाप्रमाणें आहे व जिनें आपल्या हातांत शारदकमल घेतलें आहे, अशा लक्ष्मीच्या स्वरूपाप्रमाणें तुझें स्वरूप अलौकिक आहे.

यास्तव हे कल्याणि, तूं कोण आहेस तें खरें सांग. तुझ्या सारखी स्त्री सैरंध्री किंवा दासी असणें केव्हांहि शक्य नाहीं. तूं कोणी तरी यक्षी, देवी, गंधर्वी, अप्सरा, देवकन्या, नागस्त्री, या नगराची देवता, विद्याधरी किंवा किन्नरी यांपैकीं कोणी तरी आहेस. अथवा तूं साक्षात् चंद्रप्रिया रोहिणीहि असशील; किंवा अलंबुषा, मिश्रकेशी, पुंडरीका, मालिनी, इंद्राची इंद्राणी, वरुणाची वारुणी, विधात्या प्रजापतीची किंवा त्वष्ट्याची भार्या, इत्यादि अनेक देवी, देवांमध्यें प्रसिद्ध आहेत! हे शुभे, त्यांच्यापैकीं तूं कोण आहेस तें मला खरें सांग."

सुदेष्णेचें हें आदरयुक्त भाषण ऐकून द्रौपदी म्हणाली—हे राज्ञि, मी देवी, असुरी, राक्षसी किंवा गंधर्वी यांतील कोणीहि नाहीं. मी अंतःपुरामध्यें केशप्रसाधनादि कार्य करणारी सैरंध्री आहें. मी प्रसंगीं कुमारावस्थेंत असलेल्या

राजाच्या अपत्यांचें पोषणहि करिल्यें, हें मी तुला सत्य सांगत आहें. मी केशप्रसाधन कसें करावें हें चांगल्याप्रकारें जाणत्यें. अंगाला लावण्याच्या अप्रतिम उट्या तयार करिल्यें. मल्लिका, इतर जातीचीं कमलें, चंपक पुष्पें इत्यादिकांच्या विचित्र व सुंदर माला गुंफित्यें. मीं कृष्णाची प्रिय भार्या[1] जी सत्यभामा व कुरुकुलांतील अद्वितीय सुंदरी जी पांडवपत्नी कृष्णा यांची पुष्कळ दिवस सेवा केली आहे. मला जेथें जेथें उत्तम भोजन मिळतें, तेथें तेथें मी सुखानें रहात्यें. मला अवश्य तितकीं वस्त्रें मिळालीं, म्हणजे मी तेवढ्यानेंच संतुष्ट होऊन तेथेंच रममाण होत्यें. देवी द्रौपदीनें स्वतःच माझें 'मालिनी' असें नांव ठेविलें आहे. हे देवि, त्या नरश्रेष्ठ पांडवांच्या पत्नीवर दुर्दैवानें दुर्धर प्रसंग ओढवल्यामुळें हे देवि सुदेष्णे, मी आज तुझ्या घरीं चालून आल्यें आहें.

द्रौपदीचें तें करुणवचन ऐकून सुदेष्णा म्हणाली—हे भामिनि, तूं जें सांगत आहेस, तें सर्व खरें आहे, याविषयीं मला मुळींच संशय वाटत नाहीं; पण राजा अत्यासक्तीनें जर तुझी इच्छा न करील, तर मी खरोखर तुला आपल्या मस्तकावर वाहीन. पण तुला पाहिल्यावर तो तुझी इच्छा करणार नाहीं, असें कधींहि घडणार नाहीं. कारण हे सुंदरि, या राजगृहांत व माझ्या अंतःपुरांत ज्या स्त्रिया आहेत, त्याहि तुजवर आसक्त होऊन तुजकडे पहात आहेत ! तूं स्त्रियांनाहि मोह पाडतेस, मग पुरुष तुला पाहून मोहित होतील, यांत काय आश्चर्य आहे ! हे भामिनि, माझ्या अंतःपुरांत असलेल्या या वृक्षाकडे पहा. तेहि तुझ्यापुढें जणुं काय नम्र होत आहेत. तेव्हां तूं कोणत्या पुरुषाला मोह पाडणार नाहींस ? हे शुभे, विराटराजा तुझें हें अलौकिक रूप पाहून मला सोडून सर्वथा तुजवर आसक्त होईल. हे कमलनयने, तूं आपल्या अनुरक्त दृष्टीनें ज्या पुरुषाकडे पहाशील, तोहि तत्काल कामवश होईल. मग हे स्मितवदने, जो पुरुष तुला सतत पाहील, तो कामासक्त झाल्यावांचून कसा राहील ! हे सुभ्रु, एखाद्या पुरुषानें आपल्या वधासाठींच जसें वृक्षावर आरोहण करावें, त्याप्रमाणेंच मीं तुला आपल्या अंतर्गृहांत आश्रय देणें, म्हणजे स्वतःचा नाश

१ कृष्णाची प्रिय भार्या जेव्हां खांडवप्रस्थास येत असे, तेव्हां ही द्रौपदी कौतुकानें तिचें केशप्रसाधनादि कार्य करीत असे व आपलेंच आपण आराधन करणेंहि संभवतें. 'मालिनी' हें नांव तिनें स्वतःच ठेविलें होतें. त्यामुळें तिच्याकडे मिथ्यावादित्वाचा दोष येत नाहीं.

करून घेणेंच आहे. ज्याप्रमाणें खेकडी आपल्या मृत्युरूप गर्भाला धारण करिते, त्याचप्रमाणें तुला आपल्या अंतःपुरांत ठेवून घेणें म्हणजे आपल्या मृत्युरूप गर्भालाच धारण करणें आहे.

सुदेष्णेचें हें भीतीयुक्त वचन ऐकून द्रौपदी किंचित् स्मित करून म्हणाली— " हे राजपत्नि, तूं भिऊं नको. मी विराटला किंवा दुसऱ्या कोणत्याहि पुरुषाला केव्हांहि प्राप्त होण्यासारखी नाहीं. कारण हे भामिनि, माझे पांच तरुण गंधर्व पति आहेत. ते एका महाबलाढ्य गंधर्व राजाचे पुत्र असून माझें सतत रक्षण करीत असतात. त्यामुळें मी एखाद्या सिंहिणीप्रमाणें परपुरुषाला भयंकर दुःख देणारी आहें. शिवाय मी सांप्रत तीक्ष्ण व्रताचरण करीत आहें. त्यामुळें कोणताहि परपुरुष माझा अभिलाष करण्यास समर्थ नाहीं. जो मला उच्छिष्ट अन्न देणार नाहीं व मजकडून आपलें पादप्रक्षालन करवून घेणार नाहीं, त्याच्यावर माझे गंधर्वपति प्रसन्न होतील. शिवाय माझा हा क्लेशकालहि फक्त एक वर्षभरच आहे. अशा नियमानें जो मला एक वर्षभर राहूं देईल, त्याचें परम कल्याण होईल. जो पुरुष मला इतर प्राकृत स्त्रियांसारखी सामान्य समजून माझा अभिलाष धरील, तो त्याच रात्रीं हा लोक सोडून परलोकीं जाईल.

शिवाय हे राज्ञि, मलाहि माझ्या शीलापासून भ्रष्ट करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. माझे गंधर्वपति कांहीं कारणानें सांप्रत जरी दुःख भोगीत आहेत, तरी ते मला अत्यंत प्रिय आहेत. हे शुभमुखि, ते गुप्त रीतीनें माझें नित्य रक्षण करीत असतात."

द्रौपदीचें हें सत्यवचन ऐकून सुदेष्णा प्रसन्न झाली व तिला म्हणाली— " हे नंदिनि, तूं आपल्या या वृत्तान्तानें मला संतोष देत आहेस. मी तुझ्या इच्छेप्रमाणें तुला आपल्या अंतःपुरांत ठेवून घेईन. तुजकडून कोणीहि पुरुष आपले पाय धुववून घेणार नाहीं व तुला कोणी उच्छिष्टहि देणार नाहीं. तुझें हें व्रत खंडित होणार नाहीं, असाच मी यत्न करीन."

राजा जनमेजया, याप्रमाणें विराटभार्येनें कृष्णेचें सर्व प्रकारें सान्त्वन केलें असतां ती साध्वी द्रौपदी पतिधर्मपरायण होऊन त्या नगरांत सुखानें राहूं लागली व सुदेष्णेच्या आश्रयानें रहाणाऱ्या तिला कोणींहि तत्त्वतः ओळखिलें नाहीं. ४. १. ९.

## अध्याय १० वा.

[ १ सहदेवाचा राजाश्रय. ]

( १ ) वैशंपायन—राजा पांडवेया, त्यानंतर सहदेवहि गोपांचा उत्तम वेष धारण करून व त्यांच्याच भाषेचा आश्रय करून विराटराजाकडे आला. तो राजमंदिरासमीप असलेल्या गुरांच्या गोठ्याजवळ येऊन उभा राहिला. राजानें आपल्या प्रासादांतून त्याला पाहिलें. त्याचें अद्भुत स्वरूप पाहून राजाला मोठा विस्मय वाटला व त्यानें भृत्यांना त्याला आपल्या समीप आणण्याची आज्ञा केली. आपल्या अंगकांतीनें देदीप्यमान झालेला तो पुरुषश्रेष्ठ आपल्याकडे येत आहे, असें पाहून राजा आसनावरून उठून त्याच्याजवळ गेला व "बाबा, तूं कोण आहेस ? कोठून आलास ? तुझी काय इच्छा आहे ? मीं तुला यापूर्वी कधींच पाहिलेलें नाहीं ! तुझा जो कांहीं सत्य वृत्तान्त असेल तो मला सांग." असें बोलला.

राजाचें हें वचन ऐकून शत्रुतापन सहदेव त्याच्या समीप गेला व मेघगर्जनेसारख्या गंभीर ध्वनीनें त्यास म्हणाला—" मी 'अैरिष्टनेमि'-नामक वैश्य आहें. मी पांडवांचा गोसंख्य होतों. मी त्यांच्या गायींचें पोषण करीत असें. पण सांप्रत ते राजसिंह कोठें आहेत, तें मला माहित नाहीं. यास्तव हे राजा, मी तुझ्या आश्रयानें रहाण्याची इच्छा करीत आहें. कारण कांहीं तरी उद्योग केल्यावांचून माझी उपजीविका चालणें शक्य नाहीं. महात्म्या पांडवांचा आश्रय सुटल्यामुळें मला आतां तुजवांचून दुसऱ्या कोणत्याहि राजाकडे जाण्याची इच्छा नाहीं."

त्याचें हें आश्चर्यकारक भाषण ऐकून विराटराजा त्याला म्हणाला—"हे वीरा, तुझ्या आकारावरून तूं समुद्रवलयांकित पृथ्वीचा राजा असावास, किंवा कोणी ब्राह्मण अथवा क्षत्रिय तरी असावास, असें मला वाटतें. तूं अलौकिक स्वरूप-

१ 'माझ्या रथचक्राची गति कोठेंहि कुंठित होत नाहीं,' असा या नांवांतील गूढ आशय आहे. २ वेश म्हणजे रूपान्तर प्रकट करणें, हेंच ज्याचें कर्म आहे तो वैश्य. ३ 'गो'-शब्द इंद्रियवाचक आहे. ज्ञानेंद्रियें पांच आहेत. पांचाची संख्या ज्याला आहे, तो गोसंख्य. मूळांत 'कुरुपुंगवानां गोसंख्यः' असे शब्द आहेत. त्यांतील 'कुरुपुंगवानां' ही निर्धारणे षष्ठी असल्यामुळें पांडवांतील पांचवा पांडव मी आहें, असा याचा गूढ आशय आहे. त्यामुळें सहदेवाकडे मिथ्यावादित्व येत नाहीं.

ान् आहेस. त्यावरून तुझ्याठिकाणीं वैश्यकर्म संभवत नाहीं. यास्तव हे ात्रुकर्शना, तूं कोण आहेस हें मला तत्त्वतः सांग. तूं कोणत्या राज्यांतून येथें ालास ? तुला कोणती विद्या अवगत आहे ? तूं आमच्या घरीं कोणतें कर्म करून रहाशील आणि वेतन काय घेशील ? हें सर्व मला सांग."

**सहदेव** म्हणाला—हे राजा, पांच पांडवांतील ज्येष्ठ भ्राता जो युधिष्ठिर याच्या शंभर शंभर गायींचें एकेक अशीं आठ कोटि खिल्लारें होतीं. याशिवाय याच्यापाशीं आणखींहि दोन कोटि पशु होते. मी त्या सर्वांची गणना करणारा व त्यांवर देखरेख करणारा होतों. मला ते सर्व 'तंतिपाल' या नांवानें ओळखात. गायींची व बैलांची परीक्षा कशी करावी, हें मला चांगलें अवगत आहे. यांचें भूत, भविष्यत् व वर्तमान वृत्त मी एका क्षणांत जाणूं शकतों. दहा योजनें दूर पसरलेल्या गायींचेंहि परीक्षण मी अल्पावधींत करूं शकतों, त्या महात्म्यानें माझे हे सर्व गुण चांगल्या प्रकारें जाणले होते. त्या कुरुराज युधिष्ठिरानें माझें हें कौशल अनेकदा अनुभविलेलें आहे. अल्पावधींत गायींची वृद्धि कशी करावी, त्यांच्यामध्यें गुरांचा कोणताच रोग कसा पसरूं देऊं नये, यांचे सर्व उपाय मी जाणतों. हे राजा, माझ्या ठिकाणीं ही अशा प्रकारची विद्या आहे. ज्यांच्या मूत्राचें अवघ्राण केल्यानें वंध्या गायीहि प्रसूत होतात, अशा प्रशस्त लक्षणांनीं युक्त असलेल्या वृषभांस मी ओळखूं शकतों.

सहदेवाचें हें कौशल ऐकून प्रसन्न झालेला राजा त्यास म्हणाला—हे तंतिपाला, मजपाशीं एकसारख्या रंगांच्या व मिश्र रंगांच्या एक कोटि गायी आहेत व इतरहि जातिवंत पशु आहेत. ते सर्व त्यांच्या पालकांसह मी तुझ्या स्वाधीन करितों. आजपासून ते तुझ्या देखरेखीखालीं राहोत.

हे जनमेजया, याप्रमाणें विराटराजानें ज्याच्या गुणांचा योग्य सत्कार केला आहे, असा तो नरश्रेष्ठ सहदेव तेथें सुखानें राहिला. त्याला तेथें कोणीहि ओळखिलें नाहीं. त्या उदार राजानें त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला योग्य वेतनहि दिलें. ४. १. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ अर्जुनाचा विराटगृहीं प्रवेश. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, त्यानंतर रूपसंपत्तीनें युक्त असलेला व स्त्रियांचे अलंकार धारण करणारा एक धिप्पाड पुरुष राजगृहाच्या तटाजवळील उंचवट्यावर

उभा असलेला लोकांच्या दृष्टीं पडला. त्यानें आपल्या कानांत सुंदर कुंडलें धारण केलीं असून हातांत शंखवलयावर शुभ सुवर्णकंकणें घातलीं होतीं. त्याचे बाहू दीर्घ असून केंस पाठीवर मोकळे सुटले होते. तो गजगतीनें चालत असून आपल्या प्रत्येक पावलानें भूमीला कांपवीत होता. तो विराटाच्या सभेजवळ येऊन पोंचला. आपल्या सभेमध्यें प्रवेश करीत असलेल्या त्या कपटवेषधारी, शत्रु-नाशक, असामान्य शरीरकांतीनें विराजमान होणाऱ्या, गजेंद्रतुल्य महेंद्रपुत्रास पाहून राजा आपल्या सर्व सभासदांस ‘ हा कोण ? कोठून येत आहे ? याचें मीं कधीं नांवहि ऐकलें नाहीं. ’ असें विचारूं लागला. पण राजाला सभासदां-तील कोणीहि त्याची माहिती सांगूं शकला नाहीं. तेव्हां विराटराजा मोठ्या विस्मयानें त्यांस म्हणाला—“ अहो, मनोधैर्यानें युक्त असलेला हा पुरुष देवासारखा दिसत आहे. हा श्यामसुंदर तरुण मत्त गजेंद्रासारखा निर्भयपणें सभेंत प्रवेश करीत आहे. यानें आपल्या हातांत शंखवलयें व शुभ सुवर्णकंकणें घातलीं आहेत. यानें आपली वेणी पाठीवर मोकळी सोडली असून कानांत कुंडलें घातलीं आहेत व हा आपले दोन्ही हात पसरून लीलेनें सभेंत येत आहे. याच्या गळ्यांत पुष्पमाला असून याचे केंसहि काळेभोर आहेत. यानें जरी स्त्रीवस्त्र परिधान केलें आहे, तरी हा एखाद्या कवच धारण करणाऱ्या सशर धनुष्मानाप्रमाणें शोभत आहे. हा आपापल्या वहानावर आरूढ होऊन शत्रूंवर चाल करून जाणाऱ्या सेनापतीप्रमाणें दिसत आहे. यास्तव याची विचारपूस मीच स्वतः करितों.”

इतकें बोलून तो विराटराजा त्याला म्हणाला—हे वीरा, तूं कोण आहेस ? तुझ्या आकृतीवरून तूं जो वेष धारण केला आहेस तसा नसावास ! कारण क्लीबांची आकृति अशी नसते. तूं कोणी तरी दिव्य पुरुष असावास असें मला वाटतें. तूं माझ्या पुत्रासारखा किंवा प्रत्यक्ष माझा आत्माच आहेस. हे वीरा, मी आतां वृद्ध झालों आहें; माझ्या वरील राज्यकारभार अमात्यावर सोंपवावा, अशी माझी इच्छा आहे. यास्तव तूंच माझा अमात्य होऊन मत्स्य-देशाचें राज्य कर.

विराटाचें हें अनुकूल वचन ऐकून अर्जुन म्हणाला—हे नृपश्रेष्ठा, मी गायन, वादन व नृत्य करितों. मी नृत्यकलेंत प्रवीण व गायनांत कुशल आहें. तुझ्या उत्तरा कन्येला नृत्य शिकविण्याकडे माझी योजना कर. हे राजा, मला

अशाप्रकारचें रूप कशामुळें प्राप्त झालें तें अत्यंत शोकजनक वृत्त तुला सांगून काय करावयाचें आहे ! कारण तें ऐकून तुलाहि खेद होईल. यास्तव मी मातृ-पितृहीन 'बृहन्नला'-नांवाची कन्या किंवा पुत्र आहें असें तूं समज.

यावर विराट म्हणाला—हे बृहन्नले, मी तुझा मनोरथ पूर्ण करितों. तूं माझी कन्या उत्तरा व तिच्या सख्या यांना नृत्य शिकीव. परंतु तूं हें कार्य करावेंस असें मला वाटत नाहीं. तें तुला उचित नाहीं. तूं समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करण्यासच योग्य आहेस.

राजा जनमेजया, त्या मत्स्यराजानें अर्जुनाला असें सांगून आपल्या अनेक मंत्र्यांचा विचार घेतला. बृहन्नला नृत्यादि कलेत प्रवीण आहे हें जाणून स्त्रि-यांकडून त्याच्या क्लीबत्वाची परीक्षा करविली व त्याविषयीं खात्री झाल्यावर त्यानें त्याला आपल्या कन्येच्या अंतःपुरांत पाठविलें. तेथें तो प्रभु धनंजय विरा-टाच्या कन्येला, तिच्या सख्यांना व परिचारिकांना गायन-वादन शिकवूं लागला. अल्पावधींतच तो त्या सर्व अंतःपुरजनांना प्रिय झाला. याप्रमाणें वेष पालटून राहिलेल्या व त्या सर्वांचें प्रेम संपादन करून सर्वदा दक्ष असलेल्या धनंजयाला अंतःपुरांत किंवा बाहेर कोणींहि ओळखूं शकलें नाहीं. ४.१.११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ नकुलाला विराटाचा आश्रय. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर अश्वशालेमध्यें अश्वाची पहाणी करीत असलेल्या विराट-राजाला आणखीं एक अद्भुत पुरुष दिसला. इतर लोकां-नाहि तो अभ्रांतून बाहेर पडलेल्या सूर्यमंडलासारखा भासला. तो सूक्ष्म दृष्टीनें अश्वांचें अवलोकन करीत इकडे तिकडे फिरत आहे, असें त्या मत्स्यराजानें पाहिलें व त्या नरश्रेष्ठानें आपल्या भृत्यांस म्हटलें—"हा देवासारखा दिस-णारा मनुष्य कोठून आला आहे ? हा माझ्या अश्वांकडे लक्षपूर्वक पहात आहे. त्यावरून तो अश्वपरीक्षक व अश्वविद्यानिपुण असावा, असें मला वाटतें. हा वीर देवासारखा शोभत आहे, त्याला सत्वर माझ्या समीप घेऊन या."

तेव्हां राजाज्ञेनें त्याच्या समीप आलेला नकुल म्हणाला—"हे भूपते, तुझा विजय असो. तुझें कल्याण होवो. मीं अश्वपालाचें काम केलेलें असून अश्वविद्येंत निपुण आहें. तूं जर मला आपल्या अश्वशालेवर नेमशील तर मी तुला सर्वदा संमत होईन."

त्याचें तें भाषण ऐकून विराट म्हणाला—" हे प्रियदर्शना, मी तुला वहानें, धन व गृह देतों. तूं माझ्या गृहीं अश्वपाल होण्यास योग्य आहेस. परंतु तूं कोण आहेस ? तूं कोणाच्या पदरीं होतास ? कोठून आलास व तुला कोणती विद्या अवगत आहे तें मला सांग. "

नकुल म्हणाला—पांच पांडवांतील ज्येष्ठ भ्राता जो युधिष्ठिर, त्यानें पूर्वी मला आपल्या अश्वशालेवर नेमिलें होतें. मी अश्वांच्या जाति व त्यांचें लक्षण जाणतों. मला त्यांना चांगलें शिक्षण देतां येतें. दुष्ट अश्वांचें दोषनिराकरण व अश्वांच्या सर्व व्याधींवरील औषधोपचार मला ठाऊक आहेत. माझ्या शिक्षेंतील अश्व कधींहि भित्रा निपजत नाहीं. घोडीहि कधीं नाठाळ निघत नाहीं. मग घोडा दुष्ट कसा निघणार ! मला पांडव युधिष्ठिर व सर्व लोक 'ग्रंथिक' म्हणजे अश्वशास्त्रज्ञ या नांवानें ओळखतात.

विराट म्हणाला—हे ग्रंथिका, माझी सव अश्वशाला मी आज तुझ्या स्वाधीन करीतों, माझे सव सारथि व अश्वपालक या सर्वांवर मी तुझी नेमणूक करितों. हे देवतुल्य नरश्रेष्ठा, तुला जर हें मान्य असेल तर तुला वेतन काय देऊं तें सांग. तुला हें अश्वपालाचें कम अनुरूप नाहीं. तथापि तूं राजाप्रमाणें तेजस्वी असल्यामुळें मला अतिशय संमत आहेस. तुझें हें प्रियदर्शन मला युधिष्ठिराच्या दर्शनाप्रमाणेंच वाटत आहे. हर हर ! ते निष्पाप पांडव भृत्यां-वांचून वनामध्यें कसे बरें रहात असतील !

हे भारता, याप्रमाणें विराटराजानें संतुष्ट होऊन सत्कार केलेला व श्रेष्ठ गंधर्वासारखा असलेला तो तरुण नकुल राजाचें प्रेम संपादन करून तेथें राहिला. त्याला कोणींहि ओळखलें नाहीं. अशा प्रकारें ते पृथ्वीपति अमोघ-दर्शन पांडव आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें विराटगृहीं मोठ्या दक्षतेनें राहून कष्टानें कालक्षेप करूं लागले. ४. १. १२.

येथें पहिलें पांडवप्रवेशपर्व समाप्त झालें.

---

# समयपालनपर्व २.



## अध्याय १३ वा.

[१ पांडवांचें विराटगृहीं वास्तव्य. २ भीमसेनानें केलेला जीमूतमल्लाचा वध.]

( १ ) **जनमेजय**—हे विप्रश्रेष्ठा, याप्रमाणें त्या महा पराक्रमी कुरुनंदन पांडवांनीं गुप्तवेषानें विराट-नगरांत राहून पुढें काय केलें ?

**वैशंपायन**—हे भारता, मत्स्यराजाच्या गृहांत आपापल्या कार्यांनीं राजाला संतुष्ट करीत गुप्त वेषानें रहाणाऱ्या त्या पांडवांनीं तेथें काय केलें तें सर्व सांगतों, ऐक. महात्म्या यम-राजाच्या व तृणबिंदूच्या प्रसादानें ते विराटाच्या नगरींत राहून अज्ञातवासाचा काल अशाप्रकारें घालवूं लागले. जनमेजया, युधिष्ठिर विराटराजाचा सभासद होऊन राजा, राजपुत्र व इतर लोक यांस प्रिय झाला. द्यूतांतील रहस्य जाणणारा तो पांडव सूत्रबद्ध पक्ष्याप्रमाणें द्यूतामध्यें त्या सर्वांस आपल्या इच्छेप्रमाणें क्रीडा करावयास लावीत असे. तो पुरुषश्रेष्ठ युधिष्ठिर द्यूतामध्यें विराटराजाला जिंकून जें धन मिळवीत असे, तें गुप्तपणानें आपल्या भ्रात्यांस देत असे. भीमसेनहि मत्स्यराजाकडून मिळालेलें विविध प्रकारचें मांस व इतर अनेक खाद्य पदार्थ युधिष्ठिराला जणुं काय विकत देत असे.

अर्जुनाला अंतःपुरांत जीर्ण वस्त्रें मिळत असत, तीं तो आपल्या सर्व भ्रात्यांना जणुं काय मोबदला घेऊनच देत असे. गोपालांचा वेष घेऊन राहिलेला सहदेवहि दहीं, दूध, तूप इत्यादि सर्व पांडवांना देत असे. नकुल अश्वपालाचें काम करून संतुष्ट झालेल्या राजाकडून जें धन मिळवीत असे, तें तोहि आपल्या चौघां बंधूंना देत असे आणि तपस्विनी कृष्णा, त्या आपल्या पांची भर्त्यांकडे पहात जणु काय त्यांची ओळखच नाहीं, अशाप्रकारें बाह्यतः वागत असे. याप्रमाणें ते पांची महारथ भ्राते परस्परांचा गुप्तपणें परामर्ष घेत त्या विराटराजाच्या गृहांत रहात होते. गर्भ ज्याप्रमाणें मातेच्या उदरांत अव्यक्त राहून क्लेश भोगीत असतो, त्याप्रमाणें पांडव गुप्त वेषानें राहून सेवाधर्माचें दुःख सहन करीत होते. त्यावेळीं धृतराष्ट्रपुत्रांच्या भीतीनें सर्वदा साशंक होणारे पांडव गुप्तपणानें द्रौपदीच्या संरक्षणाकडे पूर्ण लक्ष ठेवून त्या राजगृहीं वास करूं लागले.

( २ ) हे राजा, त्यानंतर चवथ्या महिन्यांत त्या समृद्ध मत्स्यराजाच्या नगरींत सर्वांना संमत असलेला ब्रह्मदेवाचा[1] महोत्सव सुरू झाला. त्यावेळीं ब्रह्मलोकांत किंवा कैलासांत जसा समाज जमतो, त्याप्रमाणें या मत्स्यराजाच्या देशांत चोहोंकडून हजारों मल्ल जमा झाले. ते सर्व महाबलाढ्य, महापराक्रमी मल्ल कालखंज असुरासारखे होते. ते वीर्य व बल यांनीं युक्त होते. राजाकडून सत्कार केले गेलेले, सिंहाप्रमाणें स्कंध, कटि व मान असलेले, अत्यंत निर्मल, प्रसन्नचित्त व अनेकदा विजयी झालेले ते सर्व मल्ल रंगभूमीवर राजाच्या संनिध बसले होते. त्यांच्यामध्यें एक महा बलाढ्य मल्ल होता. त्यानें मोठ्या वल्गना करीत सर्व मल्लांना आखाड्यांत उतरण्याचें आह्वान केलें. परंतु त्याच्याशीं मल्लयुद्ध करण्यास कोणीहि धजला नाहीं; विराटराजानें त्या सर्वांना जेव्हां खिन्न व अधोमुख होऊन बसलेलें पाहिलें, तेव्हां आपल्या वल्लवाला त्या मल्लाशीं युद्ध करावयास सांगितलें. राजानें प्रेरणा केली असतां भीमसेनानें मोठ्या कष्टानेंच तें मान्य केलें. आपल्या पारतंत्र्यामुळें किंवा एवढ्या समूहांत युद्ध केल्यास आपणास कोणी ओळखील या भीतीनें तो खिन्न झाला होता. आपला पराजय होईल या भीतीनें नव्हे.

त्यानंतर विराटानें सत्कार केला असतां तो नरव्याघ्र भीमसेन त्या विस्तीर्ण रंगभूमींत उतरला व त्यानें आपली कंबर कसली. तें पाहून सर्व प्रेक्षकांना फार संतोष झाला. आखाड्यांत उतरल्यावर ज्याचा पराक्रम प्रख्यात आहे, अशा वृत्रासुरासारख्या जिमूतमल्लाला भीमानें मल्लयुद्धास आह्वान केलें. ते दोन्ही मल्ल मोठे उत्साही व भयंकर पराक्रम करणारे होते. साठ वर्षांच्या तरुण व मदोन्मत्त गजांप्रमाणें ते दोघेहि धिप्पाड होते. जिमूतमल्ल आखाड्यांत उतरतांच त्या दोघांचें बाहुयुद्ध सुरू झालें. एकमेकांस पाहून ते दोघेहि हृष्ट झाले. ते परस्परांस जिंकण्याची इच्छा करीत होते. वज्र व पर्वत यांच्या समागमाप्रमाणेंच त्यांचें मल्लयुद्ध प्रेक्षकांना फार भयंकर वाटलें. ते दोघेहि एकापेक्षां एक अधिक बलवान् होते. प्रतिस्पर्ध्याला जिंकण्याची इच्छा करणारे ते दोघे एकमेकांचें छिद्र पाहूं लागले. प्रतिमल्लानें एखादा अवयव घट्ट धरला असतां तो

---

१ हा उत्सव शरदृतूंत नवीन धान्याची उत्पत्ति झाली असतां करतात. त्याला व्यवहारांत नव्याची पौर्णिमा असें म्हणतात.

सोडवून घेणें, बाहूंनीं परस्परांस आवळणें, प्रतिमल्लास उचलून जोरानें हालविणें, भूमीवर फेंकून त्याला चिरडण्याचा यत्न करणें, शत्रु धक्का द्यावयास पुढें आला असतां आपणच त्याला धक्का देऊन दूर सारणें, मर्मस्थानीं वज्रासारखे मुष्टींचे प्रहार करणें, डुकराप्रमाणें एकदम मुसंडी मारून व भयंकर आरोळी ठोकून प्रतिमल्लास चकविण्याचा यत्न करणें, प्रतिस्पर्ध्यास आपल्या खांद्यावर उचलून घेऊन खालीं फेंकणें, हस्ततलांनीं वज्रासारखा भयंकर प्रहार करणें, नखें टोंचणें, पादप्रहारांनीं त्याच्या गतीला प्रतिबंध करणें, दगडावर दगड फेंकला असतां जसा आवाज होतो, त्याप्रमाणें शत्रूच्या मस्तकावर आपलें मस्तक आपटून मोठा ध्वनि उत्पन्न करणें, मर्मस्थानीं गुढघ्यांचे प्रहार करणें, इत्यादि प्रकारें त्या दोघांचें विचित्र, घोर व शस्त्ररहित मल्लयुद्ध झालें. ते दोघेहि आपलें सर्व शरीरसामर्थ्य, मानसबल व विशाल बाहूंचें तेज यांना अनुरूप असेंच अपूर्व मल्लयुद्ध करीत होते. तें पाहून सर्व प्रेक्षक चकित झाले. ते मध्यें मध्यें हंसत असत व त्यांतील एखाद्याचें विचित्र कौशल्य पाहून ‘ धन्य, धन्य ’ अशा शब्दांनीं त्यांना प्रोत्साहनहि देत असत.

हे राजा, याप्रमाणें त्या दोघां अप्रतिम योद्धयांचें तें मल्लयुद्ध पाहून लोकांना कर्णोपकर्णीं ऐकलेल्या वृत्र-वासवांच्या युद्धाचीच आठवण झाली. याप्रमाणें कांहीं वेळ परस्परांस ओढणें, ढकलून देणें, प्रहार करणें, भयंकर सिंहनादानें प्रतिपक्षाला भिवविणें व परस्परांचे प्रहार चुकविणें, इत्यादि प्रकारांनीं विचित्र युद्ध करून शेवटीं मल्लयुद्धांत कुशल असलेल्या त्या दोघांनीं आपल्या लोखंडी परिघासारख्या दीर्घ भुजांनीं परस्परांस घट्ट आवळून धरिलें व प्रत्येक जण दुसऱ्याचा पराभव करण्याचा यत्न करीत असतां भीमसेनानें सर्व लोकांच्या समक्ष मोठ्या कौशल्यानें त्याच्या बाहुपाशांतून आपल्याला सोडवून घेतलें व आपल्या विजयी बाहूंनीं वेगानें त्याचें आकर्षण केलें. हे जनमेजया, ज्याप्रमाणें एखादा क्रुद्ध सिंह मत्त गजाचें आकर्षण करितो, त्याप्रमाणेंच सिंहनाद करणाऱ्या भीमानें भयानें दीन शब्द करणाऱ्या त्या जिमूताला वर उचलिलें व वेगानें गरगर फिरवून भूमीवर आपटलें. नंतर त्याला भूमीवर गडबडां लोळवून चांगलें तिंबविलें, तेव्हां तो प्रसिद्ध जिमूतमल्ल हतबल होऊन मूर्छित झाला व त्यानें प्राण सोडिला. तें पाहून सर्व मल्ल व मत्स्यदेशांतील सर्व लोक आश्चर्यचकित होऊन भीमाचें कौतुक करूं लागले.

याप्रमाणें तो प्रख्यात जिमूतमल्ल गतप्राण झालेला पाहून बांधवांसह विराटाला अतिशय हर्ष झाला व त्या कुबेराप्रमाणें उदार राजानें रंगभूमींतच बल्लवाला मोठ्या संतोषानें विपुल धन दिलें. अशाप्रकारें वृकोदरानें इतरहि महाबलाढ्य मल्लांचा पराजय करून द्वंद्वयुद्धांत त्यांचा वध केला. तेथें भीमाशीं मल्लयुद्ध करण्यास समर्थ असा एकहि पुरुष नाहीं, हें पाहून मत्स्यराजानें व्याघ्र, सिंह व गजेंद्र यांच्याशीं बल्लवाचें युद्ध करविलें. त्यांत भीमाचें बल व युद्धकौशल्य उत्तम रीतीनें प्रत्ययास आल्यामुळें राजानें अंतःपुरांतील स्त्रीप्रेक्षकांसमोर त्या बल्लवाकडून मत्त व बलाढ्य सिंहादिकांशीं पुनः युद्ध करविलें.

हे राजा, पांडुपुत्र अर्जुनानेंहि आपलें नृत्य व गायन यांच्या योगानें विराटराजा व अंतःपुरांतील स्त्रिया यांना संतुष्ट केलें. नकुलानें शिक्षित व महावेगवान् अश्वांच्या योगानें राजाचें प्रेम संपादन केलें. तेव्हां राजानें प्रेमानें त्याला विपुल धन दिलें. सहदेवानें उत्तम बैल तयार केल्याचें पाहून नरश्रेष्ठ मत्स्यराजानें त्यालाहि पुष्कळ धन दिलें. परंतु या सर्व महारथ पांडवांना अशा परसेवेच्या कष्टकर स्थितींत पाहून द्रौपदी अत्यंत दुःखानें निश्वास टाकीत असे. याप्रमाणें ते पुरुषश्रेष्ठ पांडव विराटराजाच्या गृहीं राहून आपापलीं कर्मे करीत अज्ञातवासाचा काळ घालवूं लागले. ४. २. १३.

येथें दुसरें समयपालनपर्व समाप्त झालें.

---

## कीचकवधपर्व. ३.



### अध्याय १४ वा.

[ १ कीचकानें द्रौपदीचा अभिलाष धरून तिच्याशीं केलेलें निंद्य भाषण व द्रौपदीनें त्याचा केलेला निषेध. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, त्या मत्स्यराजाच्या गृहांत ते महारथ पांडव असे गुप्तपणानें रहात असतां दहा महिने निघून गेले. हे पृथ्वीपाला, इतरांनीं परिचर्या करण्यास योग्य असलेली याज्ञसेनी सुदेष्णेची शुश्रूषा करीत मोठ्या कष्टानें त्या राज्ञीच्या मंदिरांत राहिली होती. पांचालीनें सुदेष्णादेवीला व अंतःपुरांतील स्त्रियांना आपल्या सद्वर्तनानें संतुष्ट केलें होतें.

राजा, याप्रमाणें त्यांचें अज्ञातवासाचें वर्ष संपत आलें असतां एकदा त्या द्रुपदकन्येला विराटाचा सेनापति जो महाबलाढ्य कीचक त्यानें पाहिलें. त्या देवतेप्रमाणें तेजस्वी असलेल्या कृष्णेला पाहून तो कामशरांनीं पीडीत झालेला कीचक तिची कामना करूं लागला व कामाग्नीनें संतप्त झालेला तो सेनापति सुदेष्णेपाशीं येऊन जणुं काय हंसतच तिला म्हणाला—"हे शुभे, विराटराजाच्या गृहांत या सुंदरीला मीं पूर्वीं कधींहि पाहिलें नाहीं. ही भामिनी मदिरेप्रमाणें आपल्या रूपानें व सुगंधानें मला उन्माद आणीत आहे. हे शोभने, ही हृदयंगमा देवांगना कोण आहे? ही कोठून आली? तें मला सांगा. हिनें माझें चित्त विह्वल केलें आहे. माझ्या या मनोव्याधीवर हिला आपल्या वश करून घेणें, यांवांचून दुसरें औषध नाहीं. अरे, ही शुभा तर तुझी परिचारिका दिसते! परंतु ही दिव्यरूपा असें हीन कर्म करण्यास अगदीं अयोग्य आहे. हिनें माझें जेवढें ऐश्वर्य आहे, त्या सर्वांची स्वामिनी व्हावें व माझ्यावर अधिकार चालवावा; विपुल गज, अश्व, रथ व अनेक सेवक यांनीं समृद्ध आणि विविध प्रकारच्या भोज्य व पेय पदार्थांनीं युक्त असलेल्या व सुवर्णाच्या विचित्र भूषणांनीं अलंकृत केलेल्या माझ्या मनोहर मंदिराला विभूषित करावें!"

असें बोलून कीचकानें सुदेष्णेचें अनुमोदन घेतलें व तो पांचालीपाशीं आला आणि ज्याप्रमाणें एखाद्या जंबुकानें वनांतील सिंहकन्येला वश करण्याचा प्रयत्न करावा, त्याप्रमाणें कृष्णेचें सान्त्वन करीत तो तिला म्हणाला—

"हे कल्याणि, तूं कोण आहेस? या विराटनगरांत कोठून आलीस? तें मला तत्त्वतः सांग. हे सुवदने, तुझें हें दिव्य स्वरूप, अलौकिक कांति व सुकुमार देह, हीं अप्रतिम आहेत. तुझें निर्मल मुख आपल्या प्रभेनें चंद्रासारखें शोभत आहे. हे सुभ्रु, तुझे नेत्र कमलपत्रासारखे शुभ व विशाल आहेत. तुझी वाणी कोकिलेसारखी मंजुल आहे. हे निष्पापे, तुझ्यासारखी एकहि सुस्वरूप स्त्री या पृथ्वीतलावर मीं पूर्वीं केव्हांहि पाहिली नाहीं. हे सुमध्यमे, तूं कमलवासिनी लक्ष्मी आहेस किंवा ऐश्वर्याची अभिमानिनी देवता आहेस? हे सुलोचने, ह्री, श्री, कीर्ति, अथवा कांति यांतील तूं कोण आहेस? अतिशय लावण्यवती असलेली तूं रति तर नाहींसना? चंद्राच्या अनुत्तम प्रभेप्रमाणें तूं शोभत आहेस. तुझ्या नेत्रांचें किंचित् उन्मीलन ज्योत्स्नेप्रमाणें मनाला आह्लाद देणारें आहे. तुझ्या या दिव्य किरणांनीं व्यापिलेल्या व अनुपम शोभेनें युक्त

असलेल्या मनोरम मुखचंद्रास पाहून कामवश होणार नाहीं असा या संपूर्ण जगतांत कोण आहे !

हे सुहासिनि, तुझें हें मनोहर वक्षःस्थल हार व अलंकार यांस योग्य असून तुझे पयोधर मनोरम, पुष्ट, वर्तुल व कमलाच्या कळ्याच्या आकाराचे आहेत. हे सुभ्रु, हे कामदेवाच्या शरांप्रमाणें मला पीडा देत आहेत. तुझें त्रिवलीनें युक्त व भारानें नम्र झालेलें उदर, कृश कटि व इतर सर्व अवयव अवलोकन करून असाध्य कामपीडेनें मला व्याकुल केलें आहे. माझ्या अंतःकरणांत कामाग्नि वणव्याप्रमाणें पेटला आहे. तुझ्या समागमसंकल्पानें अतिशय वृद्धि पावलेला मदनज्वर मला जाळीत आहे.

हे सुंदरि, माझ्या सर्व शरीराला जाळणाऱ्या या मदनाग्नीला तूं आत्मप्रदानरूप वृष्टीनें शांत कर. समागमरूप मेघानें त्याचा ताप घालीव. हे शशिमुखि, तुझ्या समागमाच्या आशेनें तीक्ष्ण होऊन माझ्या चित्ताला अतिशय व्याकुळ करणारे हे मदनबाण निर्दयपणें माझ्या हृदयाचें विदारण करीत आहेत. हे सुनयने, ते माझ्या हृदयांत प्रवेश करून मला मरणप्राय दुःख देत आहेत. तूं मजवर अनुग्रह न केल्यास हे प्रखर व दारुण मदनशर माझे प्राण घेतील. त्यांच्या पीडेनें मी मोहित झालों आहें. यास्तव हे देवि, आत्मसमर्पण व संभोग यांच्या योगानें तूं माझा उद्धार कर. मला जीवदान दे.

हे विलासिनि, तूं विचित्र पुष्पमाला व वस्त्रें धारण करून, सर्व आभरणांनीं भूषित होऊन, माझ्याबरोबर यथेच्छ कामसुख घे. हे सुंदरि, तूं या अंतःपुरांत दासी होऊन असें दुःख भोगीत राहूं नको. हे भामिनि, तूं खरोखर सुखालाच पात्र आहेस, मग अशी सुखरहित अवस्थेंत कां रहातेस ? हे गजगामिनि, मजपासून तूं अनुत्तम सुखाचा लाभ करून घे. अमृतासारख्या मधुर व विविध पेयांचें प्राशन करीत तूं माझ्याशीं यथेच्छ क्रीडा कर. नानाप्रकारचीं भोगसाधनें, अप्रतिम सौभाग्य व अलौकिक शुभ विषयोपभोग यांचा अनुभव घे. हे निष्पापे, तूं उत्तम प्रकारचीं पेयें प्राशन कर व मजपाशीं आनंदांत रहा.

हे सुंदरि, तुझें हें अनुपम रूप मला या वेळीं निरर्थक भासत आहे. तूं इतकी मनोहर असूनहि कोणाकडून न धारण केलेल्या शुभ पुष्पमालेप्रमाणें

शोभत नाहींस. माझ्या ज्या पूर्व स्त्रिया आहेत त्या सर्वांना मी सोडून देतों. हे स्मितमुखि, त्या तुझ्या दासी होवोत. मी दासाप्रमाणें तुझ्या आज्ञेंत स्थित राहीन. तूं मजवर अनुग्रह केल्यास मी सर्वथा तुझ्या अधीन होईन."

( ३ ) कीचकाचें तें निंद्य भाषण ऐकून द्रौपदी प्रथम त्याला सौम्य शब्दांनीं म्हणाली—" हे सूतपुत्रा, प्रार्थना करण्यास योग्य नसलेल्या माझी तूं व्यर्थ कामना करीत आहेस. मी वेणी-फणी करण्याचें क्षुद्र काम करणारी हीन वर्णाची सैरंध्री आहें. शिवाय मी परस्त्री आहें. तेव्हां सांप्रत तूं माझा अभिलाष धरणें योग्य नव्हे. तुझें कल्याण असो. सर्व प्राण्यांना त्यांच्या स्त्रिया अतिशय प्रिय असतात.

हे सूता, तूं धर्माचा योग्य विचार कर. तूं परस्त्रीची केव्हांहि इच्छा करूं नको. अकार्याचा त्याग करणें हेंच सज्जनांचें व्रत आहे. दुष्प्राप्य वस्तूवर अभिनिवेश ठेवून मोहवश झालेल्या पापात्म्याची दुष्कीर्ति होते; अथवा तो मृत्युमुखीं पडतो. "

हे राजा, सैरंध्रीचें हें निषेधपर वचन ऐकून व परस्त्रीचा अभिलाष करण्यांत प्राणघातक अनेक दोष उद्भवतात आणि लोकनिंदा होते, हें सर्व जाणत असूनहि तो काममोहित झालेला, अजितेंद्रिय दुर्बुद्धि कीचक द्रौपदीला पुनः म्हणाला—" हे वरानने, माझा असा अव्हेर करूं नको. हे सुहासिनि, मी तुझ्यावर अनुरक्त झालों असून यावेळीं कामविह्वल झालों आहें. असें असतांना तुझ्या वश होऊन प्रिय वचन बोलणाऱ्या माझा तूं असा तिरस्कार करीत आहेस, पण याबद्दल तुला पुढें खरोखर पश्चात्ताप होईल. हे सुमध्यमे, मी या संपूर्ण राष्ट्राचा प्रभु आहें. या पृथ्वीवर माझा पराक्रम अप्रतिम आहे. या भूतलावर माझ्यासारखें रूप, तारुण्य, भाग्य, उत्तम व शुभ भोग यांनीं संपन्न असलेला दुसरा एकहि मनुष्य नाहीं. हे कल्याणि, सर्व इच्छा पूर्ण करणारी ही समृद्धि व हे अनुपम भोग तुझ्यासाठीं सिद्ध असतांना तूं अशी दासीपणांतच तत्पर कां रहातेस? हे शुभानने, मीं दिलेल्या या राज्याची तूं स्वामिनी आहेस. यास्तव तूं माझा स्वीकार कर आणि या उत्कृष्ट भोगांचें सेवन कर."

दुरात्म्या कीचकाचें हें अशुभ भाषण ऐकून ती साध्वी द्रौपदी कीचकाची निंदा करून म्हणाली—" हे सूतपुत्रा, असा मोहांत पडूं नको आणि आजच आपल्या जीविताला मुकूं नको. पांच घोर पुरुषांकडून मी सतत रक्षण केली

जात आहें, असें तूं जाण. माझे पति गंधर्व आहेत, यामुळें तुला माझी प्राप्ति होणें सर्वथा अशक्य आहे. ते क्रुद्ध झाल्यास तुला एका क्षणांत यमलोकीं पाठवितील ! यास्तव हे कीचका, असा मोहित होऊं नको व आपल्या प्राणाला मुकूं नको. ज्याप्रमाणें एखादा नदीतीरावर असलेला मूढ बालक त्या नदींतून तरून पलीकडे जाण्याची इच्छा करितो, त्याप्रमाणें तूं हें साहस करण्याची इच्छा करीत आहेस. पुरुषांना अशक्य असलेल्या मार्गानें जाण्याची तूं इच्छा करीत आहेस. पण हे मंदात्मन्, माझ्या पतींचा अपमान करून तूं 'भू'-विवरांत जाऊन जरी लपलास, किंवा स्वर्गावर उडून गेलास, अथवा समुद्राच्या परतीराकडे धांवलास, तरी त्यांच्या हातून तूं जिवंत सुटणार नाहींस. कारण माझे पांच देवपुत्र पति आकाशामध्यें संचार करीत असून शत्रूंचा नाश करणें, हा त्यांचा स्वभावच आहे.

कीचका, एखादा मरणोन्मुख पुरुष कालरात्रीची जशी अपेक्षा करितो, त्याप्रमाणेंच तूं आज माझी प्रार्थना करीत आहेस. मातेच्या अंकावर शयन करून चंद्राला धरण्याची इच्छा करणारा मूढ शिशु जसा चंद्राला सुलभ मानितो, त्याप्रमाणें तूं मला सुलभ मानितोस, कीं काय ? पण हे मूढा, त्या सुप्रसिद्ध गंधर्वांच्या प्रिय पत्नीचा अभिलाष धरणाऱ्या तुझें या भूलोकीं तर कोणी रक्षण करणार नाहींच, पण स्वर्गांत जाऊन तूं देवांचा जरी आश्रय केलास तरी तेहि तुला सोडविण्यास समर्थ होणार नाहींत. हे कीचका, कामांध झालेल्या तुला तुझ्या हिताचें चिंतन करील अशी बुद्धिच नाहीं, असें मला वाटतें. कारण तुझ्या जीवनाची इच्छा करणारी बुद्धि जर तुला असती, तर तूं मजसारख्या वीरपत्नीचा अभिलाष धरिला नसतास." ४. ३. १४."

---

## अध्याय १५ वा.

[ १ कीचकाचा सैरंध्रीच्या प्राप्तीसाठीं सुदेष्णेशीं संकेत. २ सुदेष्णेच्या आज्ञेनें सैरंध्रीचें कीचकगृहीं गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, द्रुपदराजकन्येनें याप्रमाणें त्या कीचकाचा निंदापूर्वक निषेध केला असतां अनिवार्य कामामुळें देहभान विसरलेला तो सूतपुत्र कीचक सुदेष्णेपाशीं येऊन म्हणाला—" हे केकयराजपुत्रि, ज्यायोगें सैरंध्री मजकडे येईल, असा कांहीं उपाय योज. कोणत्या तरी

युक्तीनें ती गजगामिनी मला प्राप्त होईल असें कर. हे सुदेष्णे, ती जर मला वश झाली नाहीं तर मीं मोहानें प्राणहि सोडीन, यास्तव मीं जिवंत रहावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर तूं मला या कामीं साह्य कर."

हे भारता, याप्रमाणें विलाप करणाऱ्या कीचकाचें करुणवचन ऐकून त्या मानी विराटपत्नीला त्याची दया आली. याचे मनोरथ पूर्ण करण्यासाठीं आपण कोणता उपाय योजावा, याचा चांगला विचार करून व त्याच्या सिद्धीसाठीं यत्न करण्याचा निश्चय करून सुदेष्णा त्या सूतास म्हणाली—"तूं मद्यपान करणाऱ्या लोकांच्या उत्सवसमयीं म्हणजे येत्या चतुर्दशीस उत्तम अन्न व सुरा तयार करीव. त्या दिवशीं मी या सैरंध्रीला आमच्याकरितां तयार केलेली सुरा आणण्यासाठीं तुजकडे पाठवीन. मी तिला तुझ्या घरीं पाठविलें असतां निष्प्रतिबंध एकांतांत तूं तिचें आपल्या इच्छेप्रमाणें सान्त्वन करून ती तुला वश झाल्यास पहा."

राजा सुदेष्णेनें असें सांगितलें असतां, सूतपुत्र कीचक आपल्या घरीं परत आला व आपल्या भगिनीच्या उपदेशाप्रमाणें त्यानें राजाला योग्य अशी उत्तम प्रकारची सुरा आणविली व कुशल बल्लवांकडून नानाप्रकारचे उच्च-नीच भक्ष्य-भोज्य पदार्थ तयार करविले. ते सर्व सिद्ध झाले असतां कीचकानें सुदेष्णा-देवीला ते नेण्याविषयीं सांगून पाठविलें. तेव्हां सुदेष्णेनें ते आणण्यासाठीं सैरंध्रीला त्याच्याकडे जाण्याची आज्ञा केली.

( २ ) सुदेष्णा म्हणाली—हे सैरंध्रि, ऊठ, तूं सत्वर कीचकाच्या घरीं जाऊन त्यानें मजकरितां तयार करविलेलें पेय घेऊन ये. मला तें प्राशन करण्याची तीव्र इच्छा झाली आहे.

राज्ञीचें हें भाषण ऐकून अतिशय खिन्न झालेली सैरंध्री म्हणाली—हे देवि, मी त्या दुष्टाच्या घरीं पायहि ठेवणार नाहीं. तो किती निर्लज्ज आहे, हें तुलाहि माहीत आहे. हे राजपत्नि, मीं तुझ्या अंतःपुरांत रहात असतांना अशी यथेष्ट आच-रण करणारी न व्हावें व स्वपतीवांचून परपुरुषाचा मला स्पर्शहि न व्हावा, अशी इच्छा दर्शविली होती. ही केवळ इच्छाच नसून तें माझें व्रतहि आहे. हे भामिनि, मीं जेव्हां तुझ्या अंतःपुरांत प्रवेश करून तुझा आश्रय केला, तेव्हांच माझा हा निश्चय तुला सांगितला होता. त्याची तुला आठवण असेलच. हे साध्वि, कीचक मूढ असून कामानें उन्मत्त झाला आहे. तो नीच पुरुष मला पाहून कदाचित्

अतिप्रसंगहि करील! यास्तव मी त्याच्या घरीं जाणार नाहीं. हे राजपुत्रि, तुझ्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या दुसऱ्या पुष्कळ दासी आहेत, त्यांतील एखाद्या दासीला तूं त्याच्याकडे पाठीव. हे शुभे, तुझें कल्याण होवो, मी त्याच्या घरीं गेल्यास तो निःसंशय माझा अपमान करील.

तें ऐकून सुदेष्णा क्रोधानें म्हणाली—"हे सैरंध्रि, माझी आज्ञा तुला मान्य केलीच पाहिजे. मीं येथून पाठविलेल्या तुला तो कांहीं मारणार नाहीं, किंवा खाणार नाहीं. यास्तव, हें सुवर्णपात्र झांकणासह घेऊन जा आणि सत्वर सुरा घेऊन ये." असें बोलून त्या राजपत्नीनें तें सुरापात्र तिच्या हातीं दिलें. तेव्हां ती साध्वी द्रौपदी मनांत अतिशय भयभीत होऊन रडूं लागली. त्यावेळीं तिला दैवावांचून आपलें रक्षण करणारें दुसरें कोणीं दिसलें नाहीं. म्हणून ती त्यालाच शरण गेली व मोठ्या कष्टानें सुरा आणण्यासाठीं कीचकाच्या घराकडे निघाली.

राजा, जातां जातां त्या पतिव्रतेनें आपल्या मनांत 'मीं पतींवांचून अन्य पुरुषाचें स्वप्नामध्येंहि कधीं चिंतन केलेलें नाहीं. मीं या श्रेष्ठ धर्माचें जर सत्यानें पालन केलें असेल, तर त्या सत्याच्या महात्म्यानेंच नीच कीचक अनायासानेंच त्याच्या घरीं गेलेल्या मला स्ववश करूं शकणार नाहीं.' असें चिंतन केलें.

राजा जनमेजया, याप्रमाणें सत्यधर्माचा आश्रय करून त्या अबलेनें दोन घटिका सूर्याचें ध्यान केलें. तेव्हां त्या लोकसाक्षी आदित्यानें त्या पतिव्रतेवरील दुर्धर प्रसंग ओळखून एका राक्षसाला तिचें गुप्तपणें रक्षण करण्याची आज्ञा केली. तेव्हां त्या बलाढ्य राक्षसानें सर्व अवस्थेमध्यें त्या साध्वी द्रौपदीचें सांनिध्य सोडलें नाहीं. एखाद्या हरिणीप्रमाणें अतिशय भयभीत होऊन आपल्या गृहीं आलेल्या त्या कृष्णेला पाहून कीचकाला अतिशय आनंद झाला. मोठ्या जलाशयांत बुडत असलेल्या मनुष्याला एकाएकीं नौकेचा लाभ झाला असतां जसा परम आह्लाद होतो, त्याप्रमाणें अतिशय हृष्ट झालेला तो सूत आपल्या आसनावरून उठला. ४. ३. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ कीचकाचा सैरंध्रीशीं अतिप्रसंग. २ तिचें राजसभेत गमन व न्यायाची याचना. ३ युधिष्ठिरानें केलेलें सान्त्वन. ४ सुदेष्णेचें आश्वासन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें हर्षातिशयानें देहभान विसरलेला तो दुरात्मा कीचक द्रौपदीच्या समीप येऊन म्हणाला—

“ हे शुभे, तुझें स्वागत असो. आज मला ही रात्र चांगली उगवली. तूं माझी स्वामिनीच माझ्या घरीं आली आहेस. आतां तूं मला वश होऊन मजवर अनुग्रह कर. हे सुवर्णाचे हार, हीं कंकणें, शंखवलयें, भिन्न भिन्न नगरांतील शिल्प्यांनीं बनविलेलीं हीं शुभ कुंडलें, अमूल्य मणि व रत्नें, विचित्र वस्त्रें, आसनें व अजिनें, इत्यादि सर्व माझे भृत्य तुझ्यासाठीं घेऊन येवोत. तुझ्यासाठीं माझी दिव्य शय्या तयार केली आहे. तेथें चल आणि माझ्यासह हें मोहाच्या पुष्पापासून काढलेलें उत्तम मद्य प्राशन कर. ”

कीचकाचें हें निर्लज्जपणाचें भाषण ऐकून क्रुद्ध झालेली सैरंध्री त्याला म्हणाली—“ हे सूता, मी तुझ्या मंदिरांत आलेली नाहीं. सुदेष्णा राज्ञीनें ‘ मला अतिशय तहान लागली आहे, यास्तव मधुर पेय घेऊन ये ’ असें म्हणून मला तुझ्या मंदिरांतून सुरा नेण्यासाठीं पाठविलें आहे. ”

कीचक म्हणाला—हे भद्रे, माझी दुसरी दासी त्या राजपत्नीकडे हें मद्य घेऊन जाईल, असें बोलून त्या सूतपुत्रानें द्रौपदीचा उजवा हात धरिला. तेव्हां संतप्त झालेल्या त्या पांडवपत्नीनें म्हटलें—“ हे नीचा, ज्याअर्थीं मीं कामवश होऊन मनानेंहि कधीं माझ्या पतींवांचून अन्य पुरुषांशीं व्यभिचार केलेला नाहीं, त्याअर्थीं त्या सत्यव्रताच्या बलानेंच तुला या पापाचें फल मिळालेलें मी पाहीन.”

राजा जनमेजया, याप्रमाणें निर्भर्त्सना करणाऱ्या त्या विशालनयना द्रौपदीला धरण्याची इच्छा करणारा तो दुष्ट कीचक तिच्याकडे पाहून तिच्या अंगावरील वस्त्राचा पदर धरून तिला ओढूं लागला.

( २ ) तेव्हां वारंवार निश्वास टाकीत असलेल्या त्या राजपुत्रीनें जोरानें त्याला हिसडा दिला. त्याबरोबर तोडलेल्या वृक्षाप्रमाणें तो पापी कीचक भूमीवर पडला. याप्रमाणें दुरात्म्या कीचकानें धरिलें असतां त्याला भूमीवर पाडून ती थरथरा कांपत असलेली द्रौपदी विराटराजा व युधिष्ठिर जेथें बसले होते, त्या सभेला शरण गेली. परंतु ती त्या सभेकडे धांवत असतां कीचकानें मागून येऊन तिचे केंस धरिले व विराटराजाच्या समक्ष तिला लाथ मारून भूमीवर पाडिलें.

त्यावेळीं सूर्यानें तिच्या रक्षणासाठीं ज्या गुप्त राक्षसाची योजना केली होती, त्यानें अतिशय वेगानें कीचकाला दूर भिरकावून दिलें. तेव्हां राक्षसाच्या प्रहा-

रानें हतबल झालेला तो कीचक छिन्नमूल झालेल्या वृक्षाप्रमाणें गडबडां लोळत भूमीवर निश्चेष्ट पडला.

कीचकानें कृष्णेचा केलेला हा अपमान तेथें बसलेला असहिष्णु भीमसेन व युधिष्ठिर या दोघांनीं पाहिला आणि त्या दुरात्म्या कीचकाचा वध करण्याची इच्छा करणारा भीमसेन क्रोधानें कडकडां दांत खाऊं लागला. त्याचे दोन्ही नेत्र लाल झाले. त्या वीरानें आपले नेत्र वटारल्यामुळें पापण्या स्वाभाविक निमेष विसरून स्थिर झाल्या. स्वेदयुक्त उग्र भुंवया ललाटावर चढल्या. त्या शत्रुनाशकानें जोरानें ललाटाचें मर्दन केलें व क्रोधानें देहभान विसरलेला तो पांडवसिंह एकाएकीं स्वस्थानावरून उठूं लागला. तें पाहून युधिष्ठिरानें आपल्या पायाचा आंगठा हातानें दाबून भीमाला स्थानावरून न उठण्याची खूण केली व आपल्याला कोणी ओळखील या भीतीनें त्याचा निषेध केला. त्यानंतर एखाद्या मत्त गजाप्रमाणें समोरच्या वृक्षाकडे पहाणाऱ्या भीमसेनाचें निवारण करीत युधिष्ठिर म्हणाला—"हे बल्लवा, तुला लाकडें हवीं आहेत म्हणून कां तूं या वृक्षाकडे असा टवकारून पहात आहेस? तुला जर लाकडेंच पाहिजे असतील, तर बाहेरच्या वृक्षांचीं तोडून घेऊन ये."

युधिष्ठिर असें बोलत आहे, तोंच रोदन करीत असलेली ती सुकुमारी याज्ञसेनी सभाद्वारांत येऊन पोंचली व मनांतून खिन्न झालेल्या आपल्या पतीकडे पहात अज्ञातवासाच्या प्रतिज्ञेनें धर्मबद्ध झालेली ती भामिनी आपल्या उग्र दृष्टीनें जणुंकाय जाळीतच विराटराजाला म्हणाली—" हे मत्स्याधिपते, ज्यांच्या भीतीनें पांच देशांच्या पलीकडे सहाव्या देशांत राहणाराहि शत्रु सुखानें निद्रानन्द अनुभवीत नाहीं. जे दान देतात पण कोणापाशीं याचना करीत नाहींत, जे ब्राह्मणभक्त व सत्यवादी असून ज्यांच्या धनुष्यांचा टणत्कार व दुंदुभींचा घोष सतत ऐकूं येतो त्या तेजस्वी,

---

१ ज्यांचा शत्रु भयानें व्याकुल होऊन पंचेंद्रियांनीं ग्राह्य असलेल्या पांच विषयांच्या अपेक्षेनें सहाव्या मनोमात्रग्राह्य स्वप्न-मनोरथादि रूप विषयांमध्येंहि झोंप घेऊं शकत नाहीं त्याला लोकप्रसिद्ध झोंपेचा लाभ होईल ही आशाच व्यर्थ आहे. विराट-नगरीपासून पांच देशांच्या पलीकडे असलेल्या हस्तिनापुरांतील धृतराष्ट्र-दुर्योधनादिकांना झोंपेचा नुस्ता भासहि होत नाहीं; मग खरी झोंप तर दूरच राहिली, असाहि या वाक्याचा आशय आहे.

दमनशील, बलाढ्य व मानी वीरांच्या मज मानिनी भार्येला या सूतपुत्रानें लत्ताप्रहार केला आहे. ते माझे पराक्रमी भर्ते जर धर्मपाशानें बद्ध झालेले नसते, तर त्यांनीं आज या सर्व लोकांचा संहार केला असता. ते शरणागताचें रक्षण करणारे महारथ आज गुप्तवेषानें या पृथ्वीवर कोठें बरें फिरत आहेत ! ते अतिशय बलाढ्य, अतुल पराक्रमी वीर सूतपुत्रानें त्यांच्या प्रिय साध्वी भार्येला पादप्रहार केला असतांहि तो क्लीबाप्रमाणें कसा बरें सहन करितात ! त्या दुरात्म्यानें मज भार्येला असें ताडन केलें असतांहि ते त्याचा वध करण्याची इच्छा कशी करीत नाहींत ! त्यांचा तो क्रोध कोठें गेला ? हा विराटराजा धर्मदूषक झाला असतां, आतां मी काय करूं ? जो राजा निरपराध असलेल्या मला ताडन केलेलें प्रत्यक्ष पहात असतांहि राजधर्माला अनुसरून नीच कीचकाला शिक्षा करीत नाहीं, तो खरोखर राजाच नव्हे. हे मत्स्याधिपा, तुझा हा चोरांसारखा धर्म राजसभेंत शोभत नाहीं. हे राजा, तुझ्यासमक्ष यानें मला असा लत्ताप्रहार करणें योग्य नव्हे !

हे सभासद या दुष्ट कीचकाचा अतिप्रसंग लक्षांत ठेवोत. पापी कीचक तर धर्मभ्रष्ट आहेच, पण हा विराटराजाहि धर्म जाणत नाहीं आणि हे सर्व सभासद अशा अधार्मिकाची उपासना करीत आहेत !!"

हे भारता, याप्रमाणें अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्या कृष्णेनें मत्स्यराजाची निंदा केली. तेव्हां विराटराजा म्हणाला—" हे सैरंध्रि, तुमचा हा कलह माझ्या समोर झालेला नाहीं. तेव्हां त्यांत कोणाचा काय अपराध आहे, हें कळल्यावांचून मी याचा निर्णय कसा करूं ?"

तेव्हां कृष्णेनें त्या सभेपुढें सर्व वृत्तान्त निवेदन केला. तो ऐकून सर्व सभासद 'धन्य धन्य' असें म्हणून तिची प्रशंसा व नीच कीचकाची निंदा करूं लागले. ते सभासद म्हणाले—"ही कमलनयना चारुगात्री ज्याची भार्या असेल, तो परम भाग्यवान् होय. अशा साध्वीचा हा अपमान पाहून त्याला दुःख कसें बरें होणार नाहीं ? अशा प्रकारची श्रेष्ठ स्त्री मनुष्यांत दुर्लभ आहे. ही सर्वांगसुंदरी कोणी तरी देवता असावी असें आम्हांला वाटतें."

( १ ) जनमेजया, याप्रमाणें ते सभासद कृष्णेकडे पाहून तिची प्रशंसा करीत असतां युधिष्ठिराच्या ललाटावर क्रोधानें घाम आला व तो कौंतेय आपल्या प्रिय महिषीला म्हणाला—"हे सैरंध्रि, येथें उभी राहूं नको. सुदेष्णा

राज्ञीच्या मंदिरांत जा. भर्त्याला अनुसरणाऱ्या वीरांगनांना असेच क्लेश भोगावे लागतात. शुश्रूषेनें क्लेश भोगणाऱ्या स्त्रियाच पतिलोकाला जिंकतात. तुझ्या पतींचा क्रोध व्यक्त करण्याचा हा काल नसावा, असें मला वाटतें. त्यामुळें तुझे ते सूर्यासारखे तेजस्वी गंधर्वपति तुझ्या रक्षणासाठीं धांवून आले नसावेत. हे साध्वि, तूं अकालज्ञ आहेस, म्हणून एखाद्या निर्लज्ज नटीसारखी आक्रोश करून या राजसभेंत द्यूत खेळणाऱ्या सभासदांना विघ्न करीत आहेस. हे सैरंध्रि, तूं जा. गंधर्व तुझें प्रिय करतील आणि ज्यानें तुझा अपराध केला आहे त्याचा वध करून तुझें दुःख घालवितील.''

युधिष्ठिराचें हें सान्त्व वचन ऐकून द्रौपदी म्हणाली—ज्यांची मी धर्मचारिणी आहें, ते अतिशय दयावान् आहेत. पण त्यांतील ज्येष्ठ द्यूतांत आसक्त असल्यामुळें ते कोणालाहि वध्य होतील असें मला वाटतें.

( ४ ) असें बोलून द्रौपदी सुदेष्णेच्या मंदिराकडे त्वरेनें निघून गेली. तिचे केंस मोकळे सुटले होते, पुष्कळ वेळ रडल्यामुळें नेत्र लाल झाले होते. त्यामुळें मेघमंडलांतून निघालेल्या चंद्राप्रमाणें तिचें निस्तेज मुख शोभत होतें. तिला पाहून सुदेष्णा म्हणाली—'' हे भद्रे, तुला कोणीं मारिलें कीं काय ? तूं अशी रडतेस कां ? तुझें अप्रिय कोणीं केलें ? तुझा असा अपराध करून कोणता मूर्ख आपल्या सुखाला अंतरला आहे ? ''

द्रौपदी म्हणाली—हे राज्ञि, तुझ्यासाठीं सुरा आणावयास मी गेल्यें असतां, एखाद्या निर्जन वनामध्यें क्रूर पशु जसा दुसऱ्या दुर्बल जीवावर झडप घालितो, त्याप्रमाणें त्या नीच कीचकानें सभेमध्यें विराटराजासमक्ष मला लत्ताप्रहार केला.

सुदेष्णा म्हणाली—हे सैरंध्रि, तुझी जर इच्छा असेल, तर दुर्लभ असलेल्या तुझा अवमान करणाऱ्या त्या कामासक्त कीचकाचा मी वध करवीन.

द्रौपदी म्हणाली—हे देवि, तुझ्याकडून त्या नीचाचा वध करविण्या इतकी मी अनाथ नाहीं, मी सनाथ आहें. त्या पाप्यानें ज्यांचा हा अक्षम्य अपराध केला आहे ते अन्य वीर त्याचा वध करण्यास समर्थ आहेत. या अधमाचा इहलोक सोडून जाण्याचा काल समीप आला आहे, हें मला स्पष्ट दिसत आहे. ४. ३. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ द्रौपदीनें पाकशालेंत निजलेल्या भीमसेनाची घेतलेली भेट. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें सुदेष्णेला बोलून त्या सूतपुत्रानें ताडन केल्यामुळें त्याच्या वधाची इच्छा करणारी ती द्रुपदात्मजा आपल्या निवासस्थानीं गेली. नंतर त्या राजपुत्रीनें आपलें सर्व अंग व परिधान केलेलें वस्त्र जलानें स्वच्छ धुवून शरीराची यथाशास्त्र शुद्धि केली आणि ती आपल्या या दुःखाचा निर्णय कसा होईल, याचा रडत रडत विचार करूं लागली. ती स्वतःशींच म्हणाली—" मी आतां काय करूं ? कोठें जाऊं ? माझें कार्य कसें होईल."

राजा, असा विचार करीत असतां तिचें मन अकस्मात् भीमसेनाकडे गेलें व याप्रसंगीं ' भीमसेनावांचून माझें प्रिय करणारा दुसरा कोणी नाहीं ' असें मनांत म्हणून ती रात्रीं आपल्या शयनावरून उठली. ती कमलनयना कृष्णा वस्तुतः सनाथ असतांनाहि माझें रक्षण करणारा आज कोणी मला भेटेल का ? अशी नाथाची इच्छा करीत अतिशय दुःखित मनानें सत्वर भीमसेनाच्या घरीं आली.

**सैरंध्री म्हणाली**—हे महाराज, मला लत्ताप्रहार करणारा तो पापिष्ठ सेनापति जिवंत असतां आज आपल्याला निद्रा तरी कशी आली ?

हे राजा, असें बोलून त्या मनस्विनीनें वृकोदराच्या पाकशालेंत प्रवेश केला. तेथें भीमसेन एखाद्या सिंहाप्रमाणें घोरत स्वस्थ निजला होता. त्या महात्म्या भीमसेनाच्या अप्रतिम रूपानें व उग्र तेजानें त्या पाकशालेची शोभा वाढली होती. ती सुहासिनी पांचाली त्या पाकशालेंत निजलेल्या भीमसेनापाशीं जाऊन उभी राहिली. तेव्हां एखाद्या धिप्पाड वृषभाजवळ जशी यौवनसंपन्न तीन वर्षांची शुभ्र धेनु कामातुर होऊन उभी रहाते, तशी आपल्या श्रेष्ठ पतीपाशीं शुभ्रवस्त्र परिधान करून उभी राहिलेली निस्तेज द्रौपदी शोभली. परंतु ती साध्वी त्या प्रसंगीं कामातुर झालेली नसून द्वेषातुर होऊन त्याच्यापाशीं आली होती. भीमसेनाला गाढ झोंप लागलेली पाहून गोमतितीरावरील प्रफुल्लित विशाल सालवृक्षाला एखादी लता जशी बिलगते त्याप्रमाणें त्या मध्यम पांडुपुत्राला पांचालीनें दोन्ही बाहूंनीं आलिंगन दिलें. दुर्गम वनामध्यें निजलेल्या सिंहाला जसें सिंहिणीनें किंवा गजेंद्राला हत्तिणीनें झोंपेंतून उठवावें तसें त्या निष्पाप द्रुपदात्मजेनें त्या निद्रित भीमसेनाला जागें करून आपल्या विणेसारख्या मंजुळ

स्वरानें म्हटलें—"हे वीरश्रेष्ठा, उठा, उठा; मृतासारखे असे निजून काय राहिलांत ! कोणाहि जिवंत वीराच्या भार्येला स्पर्श करणारा पातकी पुरुष इहलोकीं फार दिवस रहात नाहीं."

राजा, याप्रमाणें राजकन्या पांचालीनें उठविलें असतां तो मेघासारखा नीलवर्ण भीमसेन मऊ कापसाच्या गाद्यांनीं युक्त असलेल्या पर्यंकावर उठून बसला आणि आपल्या प्रिय महिषीला म्हणाला—"हे कृष्णे, तूं कोणत्या कार्यासाठीं इतक्या त्वरेनें मजपाशीं आली आहेस ? तुझी प्रकृति ठीक दिसत नाहीं. तूं निस्तेज व कृश दिसत आहेस. यास्तव तुला जें कांहीं सांगावयाचें असेल तें सविस्तर सांग. मग तें सुख, दुःख, द्वेष्य किंवा अप्रिय कां असेना, तें पूर्णपणें ऐकून मी त्याच्या निवारणासाठीं योग्य उपायाचा विचार करीन. हे याज्ञसेनि, मीच तुला सर्व कामांत विश्वसनीय आहें व मी तुला आपत्तींतूनहि वारंवार मुक्त करीत असतों. यास्तव तुझें विवक्षित कार्य मला सत्वर सांग आणि इतर कोणीं जागे होण्यापूर्वीं तूं आपल्या घरीं जाऊन शयन कर." ४. ३. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ द्रौपदी व भीमसेन यांचा संवाद, युधिष्ठिराच्या दुःखाचें वर्णन. ]

( १ ) द्रौपदी म्हणाली—जिचा पति युधिष्ठिर आहे, त्या मला सुख कोठलें ? माझें सर्व दुःख जाणत असूनहि माझ्या शोकाचें कारण कां बरें विचारतां ? त्या द्यूतप्रसंगीं कौरवांच्या सभेंत दुर्योधनाच्या आज्ञेनें प्रातिकामीनें 'तूं कौरवांची दासी झाली आहेस, यास्तव सभेंत चल' असें जें म्हटलें, तें त्याचें वचनहि मला अद्यापि जाळीत आहे. मग दुष्ट दुःशासनानें सभेंतील समाजापुढें जेव्हां मला ओढून नेलें, तेव्हां माझ्या अंतःकरणाची काय स्थिति झाली होती, हें काय सांगूं !

हे प्रभो, अशा प्रकारचें दुःख अनुभवून मज द्रौपदीवांचून इतर कोणती राजकन्या माझ्यासारखी जिवंत रहात असेल ! वनवासांत गेल्यावर दुरात्म्या जयद्रथानें मला स्पर्श केला. हा दुसरा बिकट प्रसंग तरी इतर कोणती राजस्त्री सहन करील ? आणि आतां मत्स्यराजाच्या समक्ष व तो द्यूतकार पहात असतां त्या नीच कीचकानें माझ्या अंगावर पादप्रहार केला. हा अपमान सहन करूनहि

कोणती वीरपत्नी मजसारखी जिवंत राहील ! पण मी असे अनेक प्रकारचे क्लेश भोगीत असतां आपलें तिकडे लक्षहि नाहीं. अशा स्थितींत मला जिवंत राहून तरी काय करावयाचें आहे !

हे पुरुषश्रेष्ठा, या विराटराजाचा तो श्यालक परम दुरात्मा आहे. तो दुष्ट सेनापति राजमंदिरांत सैरंध्रीच्या वेषानें रहाणाऱ्या मला 'माझी भार्या हो' असें नित्य म्हणत असतो. हे शत्रुनाशका, आपण त्याचा वध करणेंच उचित आहे. तो नीच कीचक मला शय्येवर बोलविण्याचें निंद्य भाषण करूं लागला म्हणजे कालानें पक्व झालेल्या फलाप्रमाणें माझें हृदय विदीर्ण होत असतें.

ज्याच्या कर्मामुळें आम्हांला हें अनंत दुःख भोगावें लागत आहे, त्या आपल्या द्यूतकार ज्येष्ठ भ्रात्याची निंदा करा. कारण अशा द्यूतासक्त पुरुषांवांचून इतर कोणता मनुष्य आपलें राज्य घालवून सर्वस्वाचा नाश करून घेईल बरें !

अहो, युधिष्ठिर नित्य सकाळीं व संध्याकाळीं, अशा दोन्ही वेळां हजार सुवर्ण मोहरा लावून जरी द्यूत खेळला असता, तरीहि आमची अलोट संपत्ति कित्येक वर्षें पुरली असती. आमच्या राष्ट्रांतील रौप्य, सुवर्ण, रत्नें, वस्त्रें, पशूंनीं, युक्त असलेलीं वहानें, बकऱ्या व मेंढ्या यांचे कळप, अश्व व खेचरें यांच्या पागा या सर्वांचे जरी त्यानें पण लाविले असते, तरी त्यांचा कधींहि क्षय झाला नसता, इतकी विपुल संपत्ति आमच्यापाशीं होती. पण द्यूताच्या मिषानें त्या सर्व ऐश्वर्याच्या शिखरावरून खालीं ढकलून दिलेला तो राजा आपल्या पूर्वकर्मांचें चिंतन करीत एखाद्या भ्रान्ताप्रमाणें स्वस्थ बसला आहे. जो राजा मार्गानें जाऊं लागला असतां त्याच्या मागून सुवर्णमालांनीं युक्त असलेले दश सहस्र गज व अश्व जात असत तोच राजा आज द्यूतावर उपजीविका करीत आहे ! इंद्रप्रस्थांत ज्या युधिष्ठिराच्या दारापुढें अमित पराक्रमी नृपालांचे सहस्रावधि रथ उभे असत, ज्याच्या पाकशाळेंत शेकडों दासी हातांत पात्रें घेऊन रात्रं-दिवस अतिथींना भोजन घालीत असत, ज्या श्रेष्ठ दात्यानें लक्षावधि सुवर्णाच्या नाण्यांचें दान दिलें, त्या धर्मात्म्यावर या द्यूतामुळें आज केवढा अनर्थ ओढवला आहे, पहा !

रत्नजडित कुंडलें धारण केलेले मधुर स्वरसंपन्न असंख्य सूत व मागध सकाळ-संध्याकाळ ज्या सम्राटाची स्तुति करीत असत, ज्याच्या

सभेंत तप व स्वाध्याय यांनीं युक्त असलेले व भिन्न भिन्न इच्छा मनांत धरून प्राप्त झालेले हजारों ऋषि नित्य बसलेले असत, ज्या युधिष्ठिरानें अठ्ठायशीं हजार स्नातक व गृहस्थ यांना आश्रय देऊन त्या प्रत्येकाला तीस तीस दासी दिल्या होत्या व त्या सर्वांचें तो पालन करीत असे, जो उदार राजा प्रतिग्रह न घेणाऱ्या दहा हजार जितेंद्रिय यतींचें पोषण करीत असे, तो नरेश्वर आज या स्थितीला प्राप्त झाला आहे. ज्याच्या अंगीं अनिष्ठुरता, दया, औदार्य, इत्यादि सद्गुण वास करीत आहेत, जो धृतिमान् सत्यसंकल्प राजा अंध, वृद्ध, बाल व राष्ट्रांतील दुःस्थितीला पोंचलेले विविध लोक यांचें रक्षण करीत असे, जो भूतदयेनें प्रेरित होऊन स्वतःजवळ जें कांहीं असेल तें इतरांस नित्य वांटून देण्याची इच्छा करीत असे, तो उदारबुद्धि युधिष्ठिर आज पारतंत्र्यामुळें मत्स्यराजाचा सेवक होऊन राहिला आहे व विराटराजाच्या सभेंत द्यूत खेळणारा हा युधिष्ठिर स्वतःला ' कंक ' म्हणवून घेत आहे !

पूर्वीं इंद्रप्रस्थांत रहात असतांना ज्याला सर्व नृपति खंडणी आणून देत असत, तोच पृथ्वीपति आज दुसऱ्यापासून वेतनाची इच्छा करीत आहे. पृथ्वीचें पालन करणारे सर्व भूपाल ज्याच्या अधीन होऊन राहिले होते, तो राजश्रेष्ठ आज दुसऱ्याच्या वश होऊन राहिला आहे. ज्या धर्मराजानें सूर्याप्रमाणें आपल्या प्रखर तेजानें सर्व पृथ्वीला तप्त करून सोडिलें होतें, तोच युधिष्ठिर आज विराटाचा सभासद होऊन बसला आहे. हे वीरश्रेष्ठा, ऋषींनीं परिवेष्टित होऊन सभेंत बसलेल्या ज्या युधिष्ठिराची इतर राजे उपासना करीत असत, तोच सम्राट् आज अन्य राजाची उपासना करीत बसला आहे, पहा ! सभासदाप्रमाणें बसलेल्या व इतरांची स्तुति करून प्रिय भाषण करणाऱ्या या युधिष्ठिराला पाहून माझा संताप खरोखर वाढत आहे. हा महाप्राज्ञ धर्मात्मा युधिष्ठिर केवळ उपजीविकेसाठीं आपल्या योग्यतेला न शोभणारें हें काम करीत असलेलें पाहून कोणाला दुःख होणार नाहीं ! हे पुरुषव्याघ्रा, मयसभेंत बसलेल्या ज्याच्या सेवेंत समग्र वसुंधरा तत्पर होती, तो भरतश्रेष्ठ आज अन्य राजाचा आश्रित झाला आहे, पहा ! हे भीमसेना, याप्रमाणें मी अनेक प्रकारच्या दुःखांनीं पीडलें आहें. एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें शोकसागरांत बुडालेल्या मजकडे आपलें लक्ष कां बरें जात नाहीं ? ४. ३. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ भीमादि चार पांडवांच्या दारुण सेवाधर्मांचें द्रौपदीनें केलेलें वर्णन. ]

(१) **वैशंपायन**—राजा, जनमेजया, याप्रमाणें दुःखाकुल झालेल्या द्रौपदीनें युधिष्ठिराच्या परिस्थितीचें मोठ्या खेदानें वर्णन करून पुनः म्हटलें—" हे भारता, मी आतां जें आपल्याला अतिशय अप्रिय वाटणारें भाषण करणार आहें, त्यामध्यें दोषदृष्टि करूं नका. कारण मी तें केवल दुःखानें व्याकुल होऊन बोलत आहें. मला सर्वथा पूज्य असलेल्या पांडवांची निंदा करण्याच्या उद्देशानें मी तें बोलत नाहीं. हे भरतश्रेष्ठा, स्वतःला सर्वथा अयोग्य असलेलें हीन सूदकर्म करीत राहून 'मी बल्लव आहें' असें सांगणारे आपण कोणाच्या शोकाला वाढवीत नाहीं ! सर्व लोक आपल्याला विराटाचा सूपकार म्हणून ओळखतात. अशा लोकैक वीराला असलें हीन भृत्यत्व प्राप्त व्हावें, याहून अधिक दुःखकर तें काय आहे ? सर्व पाक सिद्ध झाला असतां आपण जेव्हां विराटापाशीं येऊन 'मी बल्लव सूद आलों आहें, भोजन तयार आहे' असें सांगूं लागतां, तेव्हां माझें मन अत्यंत व्यथित होतें. तो राजा प्रसन्न होऊन जेव्हां आपल्याला हत्तीशीं झुंजावयास लावितो, तेव्हां अंतःपुरांतील स्त्रिया हंसतात व माझें मन उद्विग्न होतें.

हे कौंतेया, ती विराटपत्नी पहात असतांना तिच्या मंदिरांत जेव्हां तो राजा आपल्याला वाघ, सिंह व रान रेडे यांच्याशीं युद्ध करावयास लावतो, तेव्हां मला मूर्च्छा येते. तें पाहून ती केकयराजपुत्री सुदेष्णा उठून आपल्या परिचारिकांशीं व त्या परिचारिकाहि उभ्या राहून राणीशीं आपसांत माझ्याविषयीं हळुहळू कुजबुज करूं लागतात व मला सचिंत पाहून त्या म्हणतात—"ही सर्वांगसुंदरी स्नेहामुळें, सहवासामुळें व स्वाभाविक प्रेमानें हा महा पराक्रमी बल्लव गजादि पशूंबरोबर युद्ध करूं लागला, म्हणजे त्याला पाहून खिन्न होते. ही सैरंध्री सुस्वरूप आहे व बल्लवहि रूपसंपन्न आहे. शिवाय स्त्रियांचें मन मोठें गूढ असतें, तें कोणाला कळत नाहीं. पण हीं दोघेंहि परस्परांस अनुरूप आहेत. ही सैरंध्री त्याच्या नित्य सहवासामुळें दीनवादिनी होते. हीं दोघेंहि आमच्या राजवाड्यांत एकाच वेळीं आलीं आहेत." इत्यादि बोलून ती राज्ञी माझ्याकडे नित्य बोट दाखवीत असते आणि तें ऐकून मला क्रोध आलेला पाहिला कीं, तिचा आपणा उभयतांच्या संबंधाविषयीं संशय दृढ होत जातो. ती असें

बोलूं लागली म्हणजे मला अतिशय खेद होतो. हे भीमसेना, भयंकर पराक्रमी असलेल्या आपणांस असें दुःख प्राप्त झालें असतां व युधिष्ठिर अशा दुःस्थितींत असतां तें पाहून शोकमग्न झालेल्या मीं जीवंत तरी कसें रहावें ?

हे प्रभो, ज्या वीरानें एका रथांत बसून देव, मनुष्यें व इतरहि सर्व, यांस जिंकिलें, तोच हा तरुण अर्जुन विराटराजाच्या कन्यांचा नर्तक झाला आहे. ज्या पार्थानें खांडववन देऊन अग्नीला तृप्त केलें, तोच आज कूपांतील शांत झालेल्या अग्नीप्रमाणें अंतःपुरांत स्वस्थ बसला आहे. ज्या पुरुषश्रेष्ठापासून शत्रूला सदैव भीति वाटत असे, तो धनंजय आज लोकनिंदित वेषानें रहात आहे. ज्या धनुर्धराचे परिघासारखे दोन्ही बाहु प्रत्यंचेच्या आघातांनीं कठिण झाले आहेत, तो धनंजय हातांत शंखवलयें धारण करून दुःखी होऊन बसला आहे. ज्या योद्ध्याच्या धनुष्याचा टणत्कार ऐकून शत्रु थरथरां कांपतात, तोच आज आपल्या सुस्वर गीतध्वनीनें संतुष्ट झालेल्या स्त्रियांचें रंजन करीत आहे. ज्या धनंजयाच्या मस्तकावर सूर्यासारखा दिप्त मुकुट शोभत असे, तो आज आपल्या केंसांची वेणी घालून मस्तक सुशोभित करीत आहे. हे भीमसेना, अशाप्रकारें केंसांची वेणी घातलेल्या व कन्यांनीं परिवेष्टित झालेल्या त्या धनुष्य धारण करणाऱ्या पार्थाला पाहिलें कीं माझें मन अतिशय व्यथित होतें. ज्या महात्म्याला समस्त दिव्य अस्त्रें प्राप्त आहेत व जो सर्व विद्यांचा आधार आहे, तो आज कानांत स्त्रियांच्या कुड्या घालून बसला आहे. महासागर जसा वेलेचें उल्लंघन करीत नाहीं. त्याप्रमाणें अप्रतिम तेजस्वी हजारों राजे समरामध्यें ज्या वीराचें आकलन करूं शकत नाहींत, तोच आज विराटराजाच्या कन्यांना नृत्य शिकवीत बसला आहे. ज्या महारथाच्या रथघोषानें वन, पर्वत व स्थावर-जंगमासह सर्व पृथ्वी कांपत असे, तो नरव्याघ्र आज वेष पालटून या राजकन्यांचा परिचारक झाला आहे.

हे भीमसेना, ज्या महाभागाचा जन्म होतांच कुंतीचा शोक नाहींसा झाला, त्या आपल्या अनुजानें आज मला शोक करावयास लाविलें आहे. त्याला सुवर्ण कुंडलांनीं व स्त्रियांच्या अलंकारांनीं भूषित झालेलें पाहून माझ्या मनाला अतिशय क्लेश होतात. पृथ्वीवरील एकहि धनुर्धर पराक्रमामध्यें ज्याच्या तोडीचा नाहीं, तो धनंजय आज कन्यांनीं परिवेष्टित होऊन गात बसला आहे ! ज्याचा धर्म, शौर्य व सत्य हीं सर्व जगताला संमत आहेत त्या पार्थाला अशा स्त्रीवेषांत पाहून माझें मन तळमळतें. हत्तिणींनीं परिवेष्टित झालेल्या मदोन्मत्त

गजाप्रमाणें हा देवस्वरूपी पार्थ कन्यांच्या समूहानें युक्त होऊन मत्स्यराजापुढें जेव्हां गायन-वादन करूं लागतो, तेव्हां तर मी शोकानें दिङ्मूढ होऊन जात्यें. खरोखर आर्या कुंती धनंजयावरील ही आपत्ति आणि अजातशत्रु धर्मराजानें निंद्य द्यूत खेळून प्राप्त करून घेतलेली ही दुःस्थिति जाणत नसेल !!

त्याचप्रमाणें हे नरशार्दूला, आपला हा कनिष्ठ भ्राता सहदेव गोपालाच्या वेषानें गायींच्या कळपाबरोबर येत असलेला पाहिला म्हणजे मी निस्तेज होऊन जात्यें. सहदेवाचा विचार मनांत आला कीं, मला रात्रीं झोंपहि येत नाहीं, मग मनाला स्वास्थ्य कोठून असणार ! हे महाबाहो, या सत्यप्रतिज्ञ सहदेवाला अशाप्रकारचे क्लेश प्राप्त व्हावे असें एकहि दुष्कृत्य त्यानें केलेलें मला आठवत नाहीं. हे भरतश्रेष्ठा, या आपल्या पुरुषश्रेष्ठ भ्रात्याला विराटराजानें गोपालांचा नायक करून आपल्या सेवेमध्यें नियुक्त केलेलें पाहून मला फार खेद होतो. तो गोपालांचा पुढारी होऊन व गोपालांना योग्य असे तांबडे वस्त्र व अलंकार धारण करून विराटराजापुढें धांवत जाऊन त्याला संतुष्ट करीत आहे, असें पाहून माझ्या मनाचा संताप होतो.

हे भीमसेना, आर्या कुंती वीर सहदेवाची मजपाशीं नित्य प्रशंसा करीत असे. वनवासाला निघते वेळीं ती पुत्रवत्सल माता मला म्हणाली—"हे याज्ञसेनि, माझा हा सहदेव अत्यंत कुलीन, शीलसंपन्न, सदाचरणी, लज्जायुक्त, प्रियवादी व धार्मिक असून तो मला अतिशय प्रिय आहे. वनामध्यें तूं स्वतः त्याला वाढीत जा आणि रात्रीं त्याची काळजी घेत जा. तो सुकुमार असून शूर आहे. हा ज्येष्ठांचा सत्कार करणारा वीर राजाला अनुसरणारा आहे." असें बोलून रोदन करणाऱ्या त्या प्रेमळ जननीनें महारण्यांत जाणाऱ्या त्या प्रिय पुत्राला प्रेमानें कवटाळिलें, अशा योद्ध्यांतील श्रेष्ठ सहदेवाला गायींनीं वेढलेलें व गोवत्सांच्या चर्मावर शयन करीत असलेलें पाहून मी कशी बरें जिवंत राहूं ?

हे पांडवा, कालाचा विपर्यय कसा आहे, पहा ! रूप, अस्त्र व मेधा या तीन गुणांनीं युक्त असलेला हा नकुल विराटाचा अश्वपाल होऊन राहिला आहे. ज्याला पहातांच शत्रूंचा संघ जीव घेऊन पळत सुटतो, तो वीर्यवान् माद्रीसुत ग्रंथिकाचा वेष घेऊन महाराजापुढें वेगवान् अश्वांना शिक्षण देत असतो व श्रीमान् मत्स्यराजाला अश्व दाखवीत उभा रहातो.

हे परंतप, युधिष्ठिराच्या द्यूतामुळें उत्पन्न झालेल्या अशाप्रकारच्या शेकडों दुःखांनीं मी व्याकुल झालें आहें. असें असतां 'मी सुखी आहें' असें आपण मानतां तरी कसें !

हे भारता, याशिवाय मला स्वतःला जीं दुःखें सहन करावीं लागत आहेत तीं तुम्हांला काय सांगूं! आपण सर्व जिवंत असतांना अशीं विविध दुःखें प्राप्त झालेलीं पाहून माझें शरीर दग्ध होतें. याहून आणखीं अधिक दुःख तें काय असणार ! ४. ३. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ द्रौपदीचें स्वदुःखनिवेदन. ]

( १ ) द्रौपदी म्हणाली—हे भीमसेना, युधिष्ठिराच्या निंद्य द्यूतामुळें या राजमंदिरांत सैरंध्रीच्या वेषानें फिरणारी मी राज्ञी सुदेष्णेला मृत्तिका, जल इत्यादि शुद्धिसाधनें देत असतें. हे परंतपा, मज राजकन्येची ही दुःस्थिति पहा. सर्व लोक[1] आपल्या दुःखाचा केव्हांना केव्हां तरी अंत होईल या आशेनें अनुकूल कालाची प्रतीक्षा करीत असतात. मानवांची अर्थसिद्धि व जय-पराजय हीं अनित्य आहेत. भाग्य व संकटें हीं चक्राप्रमाणें फिरत असतात, असें मानून मी माझ्या पतींच्या भाग्योदयाची प्रतीक्षा करीत आहें. हे महाबाहो, ज्या कालानें दुर्योधनादिकांना विजयी केलें, तोच काल फिरला म्हणजे त्यांचा पराजय होईल, अशी माझी खात्री आहे. हे भीमसेना, मी मृतप्राय झालें आहें, हें आपण जाणत नाहीं काय ?

तथापि[2] हे नरश्रेष्ठा, एका कालीं जे स्वतः दाते असतात, तेच कालानें दारिद्री होऊन याचक बनतात. त्याचप्रमाणें जे दुसऱ्याचा वध करितात, त्यांचा कालवशात् इतरांच्या हातून वध होतो. जे दुसऱ्याला पाडतात ते अन्यांकडून पाडले जातात, असें मीं ऐकलें आहे. सारांश कालच सर्व विपरीत प्रकार घड-

---

१ आत्मकालमुदीक्षन्ति सर्वे दुःखं किलान्तवत् । अनित्या किल मर्त्यानामर्थसिद्धिर्जयाजयौ ॥ २ दत्वा याचन्ति पुरुषा हत्वा वध्यन्ति चापरे । पातयित्वा च पात्यन्ते परैरिति च मे श्रुतम् ॥ न दैवस्यातिभारोऽस्ति न चैवास्यातिवर्तनम् । इति चाप्यागमं भूयो दैवस्य प्रतिपालये ॥

वीत असतो. दैवाला दुष्कर असें कांहीं नाहीं. या दैवाचें अतिक्रमण कोणालाहि करतां येत नाहीं. दैवाचें प्राधान्य प्रतिपादन करणारा आगम म्हणजे शास्त्र मी प्रमाण मानिलें. यास्तव मी दैवाधीन आहें असें मानून शोक करीत नाहीं.

ज्याप्रमाणें उन्हाळ्यांत शुष्क झालेलें सरोवर कालानें पुनः वर्षाकालीं जलपूर्ण होतें, त्याप्रमाणें मीहि पुनः माझ्या गतवैभवाला प्राप्त होईन, अशा निश्चयानें विपरीत कालाची इच्छा करणारी मी भर्त्यांच्या उदयाची प्रतीक्षा करीत आहें. ज्या पुरुषाचें भाग्य दैवानेंच नाश पावतें, त्यानें दैवाच्या अनुकूलतेसाठीं प्रयत्न करावा. दैवानें नष्ट झालेल्या ऐश्वर्याची पुनः प्राप्ति होण्यासाठीं जप-होमादि अनुष्ठान करावें. मी जें इतकें बोलत आहें त्याचें प्रयोजन काय, असें मज दुःखितेला आपण विचारा, म्हणजे मी त्याचें खरें कारण सांगतें.

हे वीरश्रेष्ठा, महा बलाढ्य पांडुपुत्रांची महिषी व पराक्रमी द्रुपदराजाची कन्या असलेल्या मला आज ही कष्टकर अवस्था प्राप्त झाली आहे. अशा दुःखप्रद स्थितींत मजवांचून कोणती अन्य राजपत्नी जिवंत राहूं शकेल ! हे परंतपा, मला केशग्रहणादि जे क्लेश प्राप्त झाले, ते आपणां कुंतीपुत्रांच्या, भीष्मादि कुरूंच्या व द्रुपदादि पांचालांच्या सत्कीर्तीचा नाश करीत आहेत. भ्राते, श्वशुर, पुत्र व इतर अनेक आप्तजन यांनीं युक्त असलेली कोणी तरी भाग्यवती स्त्री अशाप्रकारें दुःख भोगीत असेल का ! मजवांचून कोणीहि अशा आपत्तींत पडली नसेल ! धनिकाची आपत्ति केव्हांहि दिसत नसते, परंतु माझी मात्र दिसते, हें केवढें आश्चर्य आहे ! खरोखर मी बालपणीं अजाणतां विधात्याचा कांहीं तरी अपराध केला असेल, त्यामुळेंच मला आज ही दुःस्थिति प्राप्त झाली असावी !

हे भीमसेना, पूर्वीं वनवासांत आपण वल्कलें धारण करून व कंद-मुळें खाऊन रहात होतों, तरी तेथें आपण स्वतंत्र असल्यामुळें मला त्यांत यत्किंचित्‌हि दुःख वाटलें नाहीं. परंतु येथें दिव्य अन्न-वस्त्रादिकांची अनुकूलता असूनहि केवळ पारतंत्र्यामुळें मला ही स्थिति परम दुःसह होत आहे, त्यामुळें मी किती निस्तेज झालें आहें पहा ! वनवासांतहि मी अशी विवर्ण झालें नव्हतें. हे कौंतेया, मी पूर्वीं किती सुखांत होतें हें आपण जाणतच अहां. ती मी आतां दासीत्वाला प्राप्त होऊन अशा पराधीन स्थितींत रहात असतां माझ्या मनाला शांति कशी बरें मिळावी !

हे पांडवा, भयंकर गांडीव धनुष्य धारण करणारा महाबाहु धनंजय राखेनें आच्छादित झालेल्या अग्नीप्रमाणें आज निस्तेज होऊन बसला आहे, हें दैवगतीवांचून घडलें नाहीं, दैवामुळेंच ही स्थिति प्राप्त झाली आहे, असें मी समजत्यें. हे पार्था, प्राण्यांची गति मनुष्यांना कळणें शक्य नाहीं. आपली ही अवनति अकल्पित आहे. इंद्रासारखे असलेले आपण सर्वदा ज्या माझें मुख पहात असा, त्या मज श्रेष्ठ राजपत्नीला अन्य स्त्रीच्या मुखाकडे पहावें लागत आहे. हे भीमसेना, आपण सर्व भ्राते जिवंत असतां मला अशी हीन स्थिति प्राप्त व्हावी ना ! कालाची गति कशी आहे पहा ! समुद्रवलयांकित पृथ्वी जिच्या वश होती, ती मी आज भीतीनें सुदेष्णेच्या वश होऊन राहिलें आहें. ज्या माझ्या मागें-पुढें अनुचर चालत असत, ती मी पांडवांची सम्राज्ञी आज सुदेष्णेच्या मागें-पुढें धांवत आहे. हे कौंतेया, माझें आणखींहि असह्य दुःख ऐका. भीमसेना, आपलें कल्याण असो. ज्या मला आर्या कुंतीवांचून इतर कोणासाठींहि आपल्या हातानें चंदन उगाळावयाचें ठाऊक नव्हतें, ती मी आज त्या क्षुद्र विराटराजाच्या उटीसाठीं चंदन घाशीत असत्यें. हे महाराज, माझे हे हात पहा ! त्यांना पूर्वी असे घट्टे पडले होते का ?

राजा, असें म्हणून द्रौपदीनें आपले घट्टे पडलेले दोन्ही हात भीमसेनाला दाखविले. नंतर ती म्हणाली—"हे प्रभो, जी मी पूज्य कुंतीला किंवा आपणां पांची भर्त्यांसहि कधीं भीत नव्हतें, ती मी आतां 'हा राजा मला काय बरें बोलेल ? या उटीच्या चंदनाचा रंग चांगला झाला आहे किंवा नाहीं ?' या विचारानें विराटराजाच्यापुढें भीत भीत उभी असतें. कारण त्या मत्स्यराजाला मजवांचून अन्य कोणींहि उगाळलेलें चंदन आवडत नाहीं."

राजा जनमेजया, याप्रमाणें आपलें दुःख भीमसेनाला निवेदन करून ती भामिनी कृष्णा त्याच्या मुखाकडे पहात हळुहळू रोदन करूं लागली. नंतर अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें वारंवार निश्वास टाकीत ती भीमसेनाचें हृदय जणुकाय कांपवीतच सद्गदित वाणीनें पुनः म्हणाली—"हे परंतपा, मीं पूर्वी देवांचा फार मोठा अपराध केला असावा, म्हणूनच ही अभागिनी मरण्यास योग्य असतांहि अद्यापि जिवंत राहिली आहे."

पारिक्षिता, त्यानंतर वृकोदरानें त्या आपल्या पत्नीचे घट्टे पडलेले व कृश झालेले दोन्ही हात धरून ते आपल्या मुखाशीं नेले व तो शत्रूंच्या वीरांचा

संहार करणारा वीर्यवान् भीमसेन अश्रु ढाळीत परम दुःखार्त होऊन तिला असें वचन बोलला. ४. ३. २०

## अध्याय २१ वा.

[ १ भीमसेनानें केलेलें द्रौपदीचें सान्त्वन. २ कीचकाचें अपराध वर्णन. ]

( १ ) **भीमसेन** म्हणाला—हे याज्ञसेनि, पूर्वी तुझ्या आरक्तवर्ण असलेल्या हातांना आतां ज्याअर्थी असे घट्टे पडले आहेत, त्याअर्थी माझें बाहुबल व अर्जुनाचें गांडीव धनुष्य यांना धिक्कार असो. विराटाच्या सभेंत मीं त्या क्षणींच भयंकर रक्तपात केला असता, परंतु आम्हीं प्रकट होऊं नये, म्हणून युधिष्ठिरानें मजकडे पाहून तसें सुचविलें. आम्हांला जर कालाची प्रतीक्षा करावयाची नसती, तर एखादा मत्त गजेंद्र जसा क्रीडा करितो, त्याप्रमाणें त्या ऐश्वर्यमदानें मत्त झालेल्या कीचकाच्या मस्तकाचें मीं नुस्त्या पायानेंच चूर्ण केलें असतें !

हे कृष्णे, त्या दुरात्म्या कीचकानें तुला पायानें ताडन केलेलें जेव्हां मीं पाहिलें, तेव्हांच मीं मत्स्यदेशांतील लोकांचा संहार करण्याचें मनांत आणिलें होतें, परंतु त्यावेळीं धर्मराजानें नेत्रानें खूण करून माझें निवारण केलें. तेव्हां त्याचा आशय जाणून मी स्वस्थ बसलों. हे भामिनि, आम्हांला जेव्हां राज्यपदापासून च्युत केलें, तेव्हांच मीं त्या कौरवांचा वध केला नाहीं, हा माझ्याकडून मोठा प्रमाद घडला. दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन यांचा मीं त्याचवेळीं शिरश्छेद केला नाहीं, म्हणून माझ्या सर्व अंगाचा दाह होत आहे व हृदयांत जणु काय शल्यच टोंचत राहिलें आहे.

हे सुकुमारि पांचालि, तूं धर्माचा त्याग करूं नको, हा क्रोध सोडून दे. हे कल्याणि, तूं केलेली ही निंदा युधिष्ठिरानें जर ऐकली तर तो तत्काल प्राणत्याग करील आणि हे सुंदरि, धनंजय आणि नकुल-सहदेव हेहि तुझें हें वचन ऐकून आपले प्राण ठेवणार नाहींत व ते परलोकीं गेले असतां मीहि जिवंत रहाणें शक्य नाहीं.

हे भामिनि, पूर्वी च्यवन भार्गवाची साध्वी भार्या 'सुकन्या' वनामध्यें वारुळ रूपानें शांत होऊन पडलेल्या आपल्या पतीला अनुसरली. अत्यंत रूपवती असलेली नारायणी इंद्रसेना आपल्या हजार वर्षांच्या वृद्ध पतीसह पूर्वी वनांत रहात होती, हें तूं ऐकलेंच असशील. हे पांचालि, जनकराजाची कन्या

जी वैदेही तिची कथा तुला ठाऊक आहे ना? ती रामचंद्राची प्रिय महिषी सीतादेवी भर्त्याबरोबर महारण्यांत राहिली. तिला राक्षसानें पळवून नेलें असतां तिनें अतिशय क्लेश भोगिले, तरीहि ती पतीलाच अनुसरली. हे याज्ञसेनि, त्याचप्रमाणें रूप-यौवनसंपन्न असलेली लोपामुद्राहि सर्व दिव्य विषयोपभोग सोडून अगस्त्याच्याच सहवासांत राहिली. महापतिव्रता निष्पाप सावित्री तर द्युमत्सेनाचा पुत्र जो वीर सत्यवान् त्याच्या मागोमाग एकटी यमलोकीं गेली.

हे कल्याणि, मीं वर्णन केलेल्या या पूर्वीच्या स्त्रिया जशा अप्रतिम रूपसंपन्न व महापतिव्रता होत्या, तशीच तूंहि सर्व गुणांनीं युक्त आहेस. आतां अगदीं अल्प काल राहिला आहे. आणखी पंधराच दिवसांनीं तेरा वर्षें पूर्ण होतील आणि तूं भूपालांची राज्ञी होशील.

(२) द्रौपदी म्हणाली—हे भीमसेना, मी दुःखार्त झाल्यामुळें अश्रु ढाळीत आहें. मीं अंतःकरणांतील दुःख आपणापाशीं प्रकट केलें एवढेंच! राजाची निंदा करण्याचा माझा हेतु नाहीं. हे परंतपा, गत गोष्टींविषयीं अधिक विचार करण्यांत काय अर्थ आहे? सांप्रत उपस्थित झालेल्या कार्याचा प्रतिकार करण्यास सिद्ध व्हा. हे भीमसेना, मी या राजमंदिरांत आल्यापासून राज्ञी सुदेष्णेला 'सौंदर्यामध्यें मी तिचा पराभव करीत आहें' अशी शंका येऊन राजाचें लक्ष मजकडे जाईल कीं काय, अशी भीति तिला नित्य वाटत असते. तिच्या मनांतील हा भाव जाणून दुरात्मा अशुभदर्शन कीचक आपण सैरंध्रीला वश करून घेतलें म्हणजे विराट तिच्याविषयीं उदासीन होईल, अशा आशयानें सर्वदा माझी प्रार्थना करूं लागला, तेव्हां हे कौंतेया, त्याच्यावर कोपलेली मीं आपला क्रोध आवरून त्याला म्हटलें—"हे कीचका, कामासक्त झालेल्या स्वतःचें रक्षण कर. मी पांच गंधर्वांची प्रिय महिषी आहें. ते शूर व साहसी वीर जर क्रुद्ध झाले तर तुझा वध करतील."

मीं असें म्हटलें असतां तो दुष्ट कीचक म्हणाला—"हे सैरंध्रि, मी गंधर्वांना भीत नाहीं. लक्षावधि गंधर्वांचा मी रणामध्यें संहार करीन. यास्तव हे भित्रे, तूं घाबरूं नको. माझा स्वीकार कर."

त्या कामातुराचें हें वचन ऐकून मीं पुनः त्याला म्हटलें—"कीचका, माझ्या यशस्वी गंधर्वांच्या बलापुढें टिकाव धरण्यास तूं समर्थ नाहींस. मी

सत्कुल व सच्छील यांनीं युक्त असून धर्मांत स्थित आहे. कोणाचा वध व्हावा अशी मी इच्छा करीत नाहीं, म्हणूनच तूं जिवंत राहिला आहेस. " पण यावर तो पापात्मा मोठ्यानें हंसला !

त्यानंतर कांहीं दिवसांनीं कीचकानेंच अगोदर सांगून ठेवल्याप्रमाणें भ्रात्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें सुदेष्णेनें मला त्याच्या घरीं पाठविलें. ती मोठ्या प्रेमानें म्हणाली—" हे कल्याणि, कीचकाच्या घरीं जाऊन माझ्यासाठीं मद्य घेऊन ये. " मी तेथें गेलें असतां त्या सूतपूत्रानें मला पाहून सान्त्वनपर प्रिय भाषण करण्यास आरंभ केला. परंतु मीं त्याच्या सान्त्वनाचा प्रतिषेध करतांच तो क्रुद्ध झाला व मला स्पर्श करूं लागला. तेव्हां त्या दुरात्म्या कीचकाचा तो नीच हेतु जाणून मी राजाच्या सभास्थानाकडे मोठ्या त्वरेनें धांवत गेल्यें. परंतु राजाच्या समक्ष त्या सूतपुत्रानें मला स्पर्श केला आणि विराटराजा, कंक, इतर जनसमूह व रथी, राजाचे प्रियजन, व्यापारी इत्यादि अनेक लोक पहात असतां त्या अधमानें पायानें ताडन करून मला भूमीवर पाडविलें. त्यावेळीं मीं पुनः पुनः राजा विराट व कंक यांची निंदा केली, परंतु त्या दुरात्म्या कीचकाचें राजानें निवारण केलें नाहीं किंवा त्याचा नाश केला नाहीं.

हे प्रभो, हा विराटराजाचा सारथि कीचक अत्यंत धर्मभ्रष्ट व क्रूर असून तो राज्ञीचा आप्त असल्यामुळें राजाला प्रिय आहे. ' तर मग त्या उभयतांस प्रिय असलेल्या माणसाचा वध कसा करावा, ' असें जर म्हणाल, तर तो शूर आहे, परंतु अतिशय अभिमानी, पातकी व सर्व विषयांत मूढ आहे. तो परदारासक्त असून त्यानें मला स्पर्श केला आहे. हे महाभागा, हा लोकांना आक्रोश करावयास लावूनहि त्यांचें द्रव्य हरण करितो. हा सन्मार्गांत केव्हांहि स्थित नसतो, किंवा धर्मप्राप्तीची कधीं इच्छा करीत नाहीं. हा पापात्मा पापबुद्धि व कामातुर आहे. त्याचा मीं वारंवार प्रतिषेध केल्यामुळें तो आतां मी दृष्टीं पडलें कीं मला ताडन करीत जाईल आणि त्याच्या ताडनाच्या भयानें मीं जर प्राणत्याग केला तर धर्मरक्षणासाठीं यत्न करणाऱ्या तुमचा क्षात्रधर्मच नष्ट होईल. तुमचें शौर्य व्यर्थ ठरेल. आपल्या तेरा वर्षांच्या प्रतिज्ञेचें पालन करणाऱ्या तुमची भार्या नाहींशी होईल. हे वीरा, भार्येचें रक्षण केलें असतां प्रजेचें रक्षण होतें आणि प्रजेचें रक्षण केलें असतां आत्म्याचें संरक्षण होतें.

हे भीमसेना, भार्येच्या ठिकाणीं पुत्ररूपानें पतीच उत्पन्न होतो म्हणून तिला विद्वानांनीं ' जाया ' असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें माझ्या उदरीं हा कसा

जन्म घेईल म्हणून पत्नीनेंहि पतीची चिंता वहावी, त्याला सुखी करावें, असा वर्णधर्म मीं ब्राह्मणांच्या मुखानें ऐकला आहे. शत्रूचा नाश करणें, यावांचून क्षत्रियांचा अन्य धर्मच नाहीं. हे बलाढ्य भीमसेना, धर्मराजाच्या आणि आपल्याहि समक्ष कीचकानें मला लत्ताप्रहार केला. त्या घोर जटासुरापासून आपणच माझें रक्षण केलें. भ्रात्यांसह जयद्रथालाहि आपणच जिंकिलेंत. यास्तव, माझा अवमान करणाऱ्या या पापिष्ठाचाहि आतां आपणच वध करा.

हे भारता, या कीचकावर राजाचा लोभ असल्यामुळें तो मला पीडा देत असतो. यास्तव दगडावर जसा कुंभ आपटावा तसा या कामासक्ताचा नाश करा. हे भीमसेना, ज्याच्यामुळें मला इतके क्लेश सहन करावे लागले, तो दुरात्मा उद्यां, सूर्योदयाच्या पुढें जर जिवंत राहिला तर मी विष कालवून प्राशन करीन. पण त्या कीचकाच्या वश होणार नाहीं. हे पांडुपुत्रा, मला आपल्या देखत मरणेंच श्रेयस्कर वाटतें.

हे जनमेजया, याप्रमाणें बोलून ती शोकाकुल झालेली कृष्णा भीमसेनाच्या वक्षःस्थलावर मस्तक ठेवून रोदन करूं लागली. तेव्हां भीमसेनानें तिला आलिंगन देऊन अनेक प्रकारें तिचें सान्त्वन केलें. यथार्थ वचनांनीं आश्वासन दिलें. नंतर त्या द्रुपदात्मजेचें अश्रूंनीं भिजलेलें मुख आपल्या हातानें पुसलें व कीचकाचा विचार मनांत आल्यामुळें दांत-ओंठ खात तो क्रुद्ध झालेला भीमसेन दुःखार्त झालेल्या पांचालीला असें म्हणाला. ४. ३. २१.

---

## अध्याय २२ वा.

[१ भीमसेनानें द्रौपदीला दिलेलें आश्वासन. २ कीचकवधाचा संकेत. ३ कीचकवध.]

(१) **भीमसेन**—हे पांचालि, तूं जें म्हणत आहेस, त्याप्रमाणें मी करीन. आजच मी कीचकाचा त्याच्या बांधवांसह वध करीन. हे कल्याणि, तूं आपल्या मुखावर दुःखाचें किंवा शोकाचें यत्किंचित्हि चिह्न दिसूं न देतां उद्यां कीचकाशीं संकेत कर व त्याला रात्रीं नृत्यशालेंत बोलीव. मत्स्यराजानें निर्माण करविलेली ही नृत्यशाला जवळच आहे. तेथें दिवसां मुली नृत्य करितात व रात्रीं त्या आपल्या घरीं जातात. त्या नृत्यशालेंत दिव्य शय्येनें युक्त केलेला लाकडाचा एक प्रशस्त पर्यंक आहे. तेथें या नीचाला मी त्याच्या मृत पूर्वजांचें दर्शन करवीन. परंतु हे भद्रे, त्याच्याशीं हा संकेत तूं कोणाच्या समोर करूं नको. कसेंहि करून तो त्या नृत्यशालेंत जाईल असें कर.

राजा जनमेजया, याप्रमाणें बोलत भीम व द्रौपदी या उभयतांनीं दुःखाश्रु ढाळीत ती अतिशय घोर भासणारी रात्र घालविली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं कीचक राजमंदिरांत आला व द्रौपदीला म्हणाला—"हे सैरंध्रि, काल सभेमध्यें सगळे राजे पहात असतां, त्यांच्या समक्ष मीं तुला लत्ताप्रहार करून पाडविलें. तेव्हां मज बलाढ्याचा पराभव करण्यास समर्थ असा कोणीहि त्राता पुढें आला नाहीं. हा विराट केवल नाममात्र मत्स्यदेशाचा राजा म्हटला जातो. परंतु मी सेनापति या मत्स्यदेशाचा खरा राजा आहें. हे भित्रे, तूं स्वसंतोषानें माझा स्वीकार कर म्हणजे मी तुझा दास होऊन राहीन. मी तुला शंभर सुवर्ण मोहरा, शंभर दासी आणि दुसरे दासहि देईन. त्याचप्रमाणें खेचरी जोडलेला रथहि अर्पण करीन, पण आपला दोघांचा संगम घडूं दे."

(२) द्रौपदी म्हणाली—हे कीचका, माझी एक प्रतिज्ञा तूं पाळशील तर मी तुझें म्हणणें मान्य करीन. माझ्याशीं होणारा हा संबंध तुझ्या भ्रात्याला किंवा मित्राला कळतां कामां नये. माझ्या यशस्वी गंधर्वांच्या कांनीं ही गोष्ट जाईल म्हणून मला फार भीति वाटते. तूं जर असें वचन देत असशील तर मी तुला वश होईन.

कीचक म्हणाला—ठीक आहे. हे सुंदरि, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी वागेन. हे चारुगात्रि, तुझे सूर्यासारखे तेजस्वी गंधर्व जेव्हां तुला पाहूं शकणार नाहींत, तेव्हां कामविह्वल झालेला मी एकटाच तुझ्या समागमासाठीं तुझ्या शून्य असलेल्या गृहीं येईन.

द्रौपदी म्हणाली—हे कीचका, तसें करूं नको. येथें मत्स्यराजानें नुक्तीच तयार करविलेली जी ही नृत्यशाला आहे, तेथें दिवसा मुली नृत्य शिकतात व रात्रीं घरीं जातात. तेथें तूं अंधार पडल्यावर ये. म्हणजे माझ्या गंधर्वांना कळणार नाहीं व तेथें निःसंशय सर्व अनर्थांचाहि परिहार होईल.

राजा परिक्षिता, ती साध्वी कृष्णा त्या दुष्ट कीचकाशीं जरी असें बोलली व त्याच्याशीं तिनें संकेत केला तरी तिला परम उत्कंठेमुळें तो सबंध दिवस एका महिन्याप्रमाणें भासला. तो मूढ कीचक या सैरंध्रीच्या रूपानें आपला मृत्यूच जवळ ओढवला आहे, हें न जाणतां परम हर्षानें आपल्या घरीं गेला. त्या काममोहित झालेल्या कीचकानें आपल्या अंगाला सुगंधी द्रव्यांची उटी लाविली, पुष्पमाला धारण केल्या व इतर अलंकार व भूषणें घातलीं. तो हा सर्व शृंगार त्वरेनें करीत होता व त्यावेळीं त्या कमललोचनेचेंच चिंतन करीत

होता. तरीहि त्याला तो काल अतिशय दीर्घ असल्याप्रमाणें भासला. दीप मालवतेवेळीं त्याची ज्योति जशी अधिकच प्रकाशित होते, त्याप्रमाणें मरण-काल समीप आलेल्या त्या कीचकाची मुखश्री अधिकच शोभूं लागली. त्या नंतर त्या मूर्खानें द्रौपदीच्या वचनावर विश्वास ठेवून तिच्या समागमाचेंच चिंतन आरंभिलें. त्यामुळें तो दिवस केव्हां मावळला हेंहि त्याला कळलें नाहीं.

त्यानंतर द्रौपदी पाकशालेंत जाऊन आपल्या भीमसेन पतीपाशीं उभी राहिली व त्याला म्हणाली—" हे परंतपा, आपल्या आज्ञेप्रमाणें मीं कीचकाशीं नृत्यशालेंत समागम करण्याचा संकेत करून ठेविला आहे. त्याप्रमाणें तो त्या शून्य नृत्यशालेंत रात्रीं एकटाच जाईल. त्यावेळीं हे महाबाहो, आपण त्याचा वध करा. तो मदोन्मत्त सूतपुत्र त्या नृत्यागारांत गेला म्हणजे आपण त्याला गतप्राण करून टाका. हे वीरश्रेष्ठा, हा सूतपुत्र गर्वानें गंधर्वांचा अव-मान करीत आहे. यास्तव श्रीकृष्णानें यमुनेच्या डोहांतून कालिया-नागाला जसें वर ओढून काढिलें, त्याप्रमाणें आपण त्या नीचाला इहलोकांतून काढून दूर यमलोकीं फेंकून द्या. हे भीमसेना, माझ्या दुःखाश्रूंचें मार्जन करा व स्वतःची आणि आपल्या कुलाची कीर्ति कायम राखा. आपलें कल्याण असो.

**भीमसेन** म्हणाला—हे याज्ञसेनि, तुझें स्वागत असो. मला प्रिय असलेलें कामच तूं सांगत आहेस. हे भामिनि, मी अशा कार्यांत दुसऱ्याच्या साह्याची अपेक्षा केव्हांहि करीत नसतों. आज कीचकाशीं माझा समागम जुळवून आणण्यांत तूं माझें अतिशय प्रिय केलें आहेस. अशा प्रकारचा संतोष हिडिंबवधाच्या वेळेस कायतो मला झाला होता. हे मानिनि, मी आज सत्य, धर्म व भ्राते यांना स्मरून तुला सांगतों कीं, इंद्रानें जसें वृत्रासुराला मारिलें, तसाच मी आज रात्रीं कीचकाचा वध करीन. त्या नीच कीचकाला मी अंधकारांत किंवा प्रकाशांतहि ठेंचून टाकीन. कीचकाचा वध केला असतां त्याचा पक्ष घेऊन मत्स्यदेशांतील लोक जर माझ्याशीं युद्धाला उभे राहिले, तर मी तत्काल त्या सर्वांचा संहार करून टाकीन आणि त्यानंतर दुर्योधना-चाहि वध करून समग्र पृथ्वी हस्तगत करून घेईन. मग कुंतीपुत्र युधिष्ठिराला खुशाल मत्स्यराजाची सेवा करीत बसूं दे.

**द्रौपदी** म्हणाली—हे प्रभो, ज्यायोगानें माझ्यासाठीं आपल्याला सत्याचा त्याग करावा लागणार नाहीं, अशाच प्रकारें आपण वागा. आपण गुप्त राहूनच कीचकाचा वध करावा.

भीमसेन म्हणाला—हे भीरु, मी तुझ्या सांगण्याप्रमाणेंच वागेन. आज रात्रीं अंधकारामध्यें अदृश्य राहून मी कीचकाचा बांधवांसह वध करीन. हे निष्पापे, हत्ती जसा बेलफळ पायाखालीं तुडवितो, त्याप्रमाणें अलभ्य असलेल्या तुझी इच्छा करणाऱ्या त्या दुरात्म्याच्या मस्तकाचें मी चूर्ण करून टाकीन.

जनमेजया, याप्रमाणें पांचालीला धीर देऊन तो भीमसेन रात्रीं अंधार पडल्यावर प्रथम नृत्यशालेंत गेला आणि सिंह जसा पशूची वाट पहात बसतो, तसा गुप्तपणें कीचकाची प्रतीक्षा करीत राहिला. त्यानंतर योग्य समय येतांच काममोहित झालेला कीचक अलंकारांनीं भूषित होऊन सैरंध्रीच्या लोभानें त्या नृत्यशालेंत गेला आणि तिच्याशीं केलेल्या संकेताप्रमाणें त्यानें आंत प्रवेश केला. त्या विस्तृत नृत्यशालेंत सर्वत्र निबिड अंधकार पसरला होता. त्यामुळें तो दुर्मति हातांनीं चांचपडत इकडे-तिकडे शोधूं लागला. तेव्हां त्याच्या पूर्वींच तेथें येऊन कृष्णेशीं अतिप्रसंग केल्यामुळें क्रुद्ध झालेल्या व एकांतांत त्या शय्येवर निजलेल्या महापराक्रमी भीमसेनाचा स्पर्श त्या सूतपुत्राला झाला. तेव्हां ती सैरंध्रीच आहे, असें समजून तो काममोहित झालेला कीचक अतिशय हर्षानें क्षुब्ध होऊन म्हणाला—"हे सुंदरि, मीं जेवढें धन मिळविलें आहे, तें सर्व तुला अर्पण केलें आहे. त्याचप्रमाणें धनाच्या राशी, रत्नें अनेक दासी, रूप-लावण्यसंपन्न युवतींनीं अलंकृत असलेलें माझें मंदिर, विषयोपभोगांच्या अनेक वस्तूंनीं युक्त असलेलें माझें अंतःपुर, हें सर्व तुला समर्पण करून मी तुझ्यासाठीं सत्वर येथें आलों आहें. मी असा अकस्मात् घरीं गेलों असतां स्त्रिया 'तुझ्यासारखा असा सुंदर वस्त्रें परिधान केलेला दर्शनीय पुरुष दुसरा कोठेंहि नसेल' अशी माझी प्रशंसा करितात.

(३)भीमसेन म्हणाला—वाः! तूं फारच दर्शनीय आहेस,तुझी आत्मप्रशंसाहि सर्वथा उचित आहे. पण अशाप्रकारचा स्पर्श तूं पूर्वीं कधींहि अनुभविला नसशील. तूं कामशास्त्रांत निपुण असून मोठा मर्मज्ञ आहेस. तेव्हां तूं हा स्पर्श ओळखशीलच. तुझ्यासारखा स्त्रियांचें प्रिय करणारा या पृथ्वीवर अन्य पुरुष नाहीं!

राजा याप्रमाणें बोलून भयंकर पराक्रमी भीमसेन त्वेषानें एकदम त्या शय्येवरून उठला व हंसत म्हणाला—"कीचका, सिंहानें जसें पर्वतप्राय मत्त गजाचें आकर्षण करावें त्याप्रमाणें आज तुज पापिष्ठाला मीं भूमीवर गतप्राण करून पाडलेलें तुझी भगिनी सुदेष्णा पाहील. तुझा वध झाला असतां सैरंध्री निर्भयपणें फिरूं लागेल आणि तिचे बलाढ्य पतिहि निरंतर सुखांत रहातील."

असें बोलून बलवानांतील श्रेष्ठ भीमानें त्या कीचकाचे पुष्पमालांनीं भूषित केलेले केंस वेगानें धरले. तेव्हां कीचकानें जोरानें हिसडा देऊन आपले केस सोडविले व हातांनीं त्या पांडवाला धरून ठेविलें. त्यावेळीं हत्तिणीसाठीं जसे दोन मत्त हत्ती झुंजतात, त्याप्रमाणें त्या दोघां क्रुद्ध झालेल्या नरसिंहांचें बाहुयुद्ध सुरू झालें. तो कीचकांतील मुख्य सेनापति व नरांतील श्रेष्ठ भीमसेन हे दोघे एकमेकांवर संतप्त झाले असून परस्परांस जिंकण्याची इच्छा करीत होते. पूर्वीं ज्याप्रमाणें वानरश्रेष्ठ वालि व सुग्रीव या दोघां भ्रात्यांचें युद्ध झालें त्याप्रमाणें हे दोघे बलाढ्य योद्धे द्वंद्वयुद्ध करूं लागले.

त्यानंतर क्रोधरूपी विषानें देहभान विसरलेले ते दोघे पांच फणांच्या नागासारखे असलेले आपले दोन्ही हात वर उचलून नखरूपी दाढांनीं परस्परांस पीडा देऊं लागले. बलाढ्य कीचकानें भीमावर मोठ्या वेगानें प्रहार केला. पण सत्यप्रतिज्ञ भीमसेन त्या द्वंद्वयुद्धांत एक पाऊलभरहि मागें सरला नाहीं. ते दोन्ही वीर परस्परांचे बाहू धरून एकमेकांस मागें पुढें ओढीत असतां झुंजणाऱ्या दोघां मत्त वृषभांसारखे शोभले. नखें व दंत हींच ज्यांचीं आयुधें आहेत, अशा दोन दृप्त व्याघ्रांप्रमाणें असलेल्या त्या दोघांचा अति भयंकर व तुमुल संग्राम सुरू झाला. ज्याच्या गंडस्थलांतून मदस्राव होत आहे, अशा एका गजाला दुसरा मत्त गज जसा वेगानें अडवून धरितो, त्याप्रमाणें कीचकानें वेगानें भीमाच्या अंगावर धांवून त्याला आपल्या दोन्ही भुजांनीं घट्ट धरून ठेविलें. पण वीर्यवान् भीमानें त्याच्या हातांतून आपल्याला वेगानें सोडवून घेऊन त्याला आपल्या बाहुपाशांत आवळून धरिलें. तेव्हां बलाढ्य कीचकानेंहि स्वसामर्थ्यानें स्वतःला सोडविलें. वेळू मधोमध उभा चिरूं लागलें असतां त्यापासून जसा घोर ध्वनि निघतो, त्याप्रमाणें त्या मल्लयुद्धांत त्या दोन बलाढ्य योद्ध्यांच्या भुजघर्षणापासून घोर ध्वनि निघाला. त्यानंतर झंजावात जसा वृक्षाला हालवितो, तसें वृकोदरानें त्या नृत्यशाळेंत कीचकाला वेगानें धरून जोरानें हालविलें. बलाढ्य भीमसेनानें त्या द्वंद्वयुद्धांत दुर्बल कीचकाला जरी अशा रीतीनें वेगानें हालविलें, तरी त्या कीचकानें आपली सर्व शक्ति खर्च करून पांडवाला ओढण्याचा यत्न केला व भीमानें थोडेंसें आक्रमण केलें आहे, व क्रोधानें त्याचें पाऊल भूमीवर अस्थिर आहे, असें पाहून कीचकानें त्याला गुडघ्यांवर पाडविलें. बलाढ्य कीचकानें आपल्याला असें पाडविलें आहे, हें पाहतांच भीम हातांत दंड घेतलेल्या अंतकाप्रमाणें वेगानें वर उठला.

हे भारता, त्यावेळीं मदोन्मत झालेले ते दोघे—सूत व पांडव त्या निर्जन स्थलीं मध्यरात्रीच्या सुमारास स्पर्धेनें एकमेकांस ओढूं लागले. त्यावेळीं ती नृत्यशाला वारंवार हादरली. ते दोघेहि अतिशय क्रुद्ध झाले व परस्परांच्या अंगावर गर्जना करीत धांवून गेले. तेव्हां भीमसेनानें कीचकाच्या वक्षःस्थलावर आपल्या दोन्ही तलहाताचा भयंकर प्रहार केला. तथापि क्रोधानें संतप्त झालेला तो सूत एक पाऊलभरहि मागें हटला नाहीं. तें पाहून भीमानें पुनः त्याच्या वक्षःस्थलावर दुःसह प्रहार केला. त्यामुळें कीचकाला घेरी आली. तो भूमीवर बसला. भीमाच्या बलानें पीडलेला तो दुष्ट बलहीन झाला. तेव्हां हा नीच सूतपुत्र श्रांत झाला आहे, हें जाणून महाबलाढ्य भीमसेनानें त्याला बाहुपाशांत दृढ धरून आपल्या वक्षःस्थलाशीं घट्ट आंवळिलें व आपल्या बाहुपाशांत त्याचें मर्दन करून मूर्च्छित झालेल्या त्याचे केंस धरिले आणि द्रौपदीचें दुःख आठवून सर्पाप्रमाणें उष्ण निःश्वास सोडणाऱ्या अति क्रुद्ध व विजयी भीमसेनानें त्याच्या शरीराचें आक्रमण केलें. रक्त व मांस यांची इच्छा करणारा व्याघ्र महा मृगाचें आक्रमण करून जसा शोभतो, त्याप्रमाणेंच महाबलाढ्य भीमसेन कीचकाचा पराभव करून अतिशय शोभला. त्यानें धनुष्याच्या दंडाप्रमाणें त्या नीच सूतपुत्राचें शरीर वांकविलें. पशूला ज्याप्रमाणें दोरीनें बांधतात, त्याप्रमाणें वृकोदरानें त्या आपल्या शत्रूला बाहुपाशानें निश्चेष्ट करून सोडिलें. त्यावेळीं मरणकालच्या वेदना असह्य झाल्या-मुळें तो दुरात्मा फुटलेल्या नगाऱ्याच्या ध्वनीप्रमाणें भयंकर आक्रोश करूं लागला. तडफडणाऱ्या व मूर्च्छित झालेल्या त्या नीचाला वृकोदरानें बराच वेळ गरगर फिरविलें व कृष्णेचा कोप शांत व्हावा म्हणून त्यानें त्याचा कंठ दोन्ही हातांनीं जोरानें दाबला. त्यामुळें त्याचे नेत्र बाहेर निघाले. सर्व अवयव छिन्न-भिन्न झाले व तो मरणोन्मुख झाला. तथापि त्यानें कृष्णेला केलेला पाद-प्रहार स्मरून विजयी भीमसेनानें त्याच्या कटिप्रदेशीं आपला गुडघा जोरानें टेंकला व यज्ञांतील पशूप्रमाणें दोन्ही हातांनीं त्याचें सर्व अंग ठेंचून काढण्यास आरंभ केला. त्यामुळें त्या कीचकाला अतिशय पीडा होत आहे, असें पाहून तो पांडुनंदन त्याला भूमीवर पशूप्रमाणें ओढूं लागला व म्हणाला—"आज माझ्या भ्रात्याच्या भार्येचें हरण करणाऱ्या या नरपशूला ठार करून मी त्याच्या ऋणांतून मुक्त झालों आहें. या सैरंध्रीच्या कंटकाला परलोकीं पाठवून मी आतां परम शांतीचा अनुभव घेईन."

इतकें बोलून तो पुरुषश्रेष्ठ ज्याचीं वस्त्रें, आभरणें, इत्यादि अस्ताव्यस्त झालीं आहेत व जो प्राणान्त वेदनांनीं व्याकुल झाला आहे, अशा त्या दुष्टाला गत-प्राण करून त्याच्या शवावर उभा राहिला व दांत-ओंठ खाऊन हातांवर हात चोळीत त्या वीरानें त्याचे हात, पाय, मस्तक, मान इत्यादि सर्व अवयव भरा-भर तोडून ते त्याच्या शरीरांत खुपसून ठेविले. क्रुद्ध झालेला शंकर पशूच्या अवयवांची जी स्थिति करितो, तीच स्थिति या मध्यम पांडुपुत्रानें कीचकाच्या शरीराची केली. त्या दुरात्म्याचे सर्व अवयव त्यांच्या त्यांच्या स्थानापासून दूर करून ते निरनिराळ्या स्थानीं ठेवल्यामुळें तो एक मांसाचा फार मोठा ढीगच दिसला.

त्यानंतर तो बलाढ्य भीमसेन कृष्णेला जवळ बोलावून म्हणाला—" हे पांचालि, ये. या कामासक्त पशूची मीं कशी अवस्था करून टाकिली आहे, ती पहा. "

राजा, सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेल्या द्रौपदीला असें बोलून त्या भयंकर पराक्रम करणाऱ्या भीमानें तेथेंच अग्नि प्रज्वलित केला व त्या दुरात्म्या कीच-काच्या मृतदेहावर पाय देऊन तो आपल्या वीरपत्नीस म्हणाला—" हे सुकेशि, पहा. या कीचकाकडे तूं आतां निर्भयपणें पहा. हा आतां कसा शोभत आहे, तें तूं चांगलें पाहून ठेव. हे भीरु, शील व गुण यांनीं युक्त असलेल्या तुझा अभिलाष जे जे दुरात्मे धरीत आहेत, त्यांचीहि मी अशीच स्थिति करीन."

राजा, त्या कुंतीपुत्रानें कृष्णेला अतिशय प्रिय असलेलें हें दुष्कर कर्म करून व तिचा निरोप घेऊन तो सत्वर स्वस्थानीं निघून गेला. आपली प्रतिज्ञा पूर्ण झाल्यामुळें त्याचा क्रोध शांत झाला. याप्रमाणें कीचकाचा नाश करवून पांडव-पत्नी द्रौपदी संतुष्ट झाली. तिचें सर्व दुःख निवृत्त झालें. तेव्हां ती बाहेर येऊन सभापालांस म्हणाली—"अहो, परस्त्रीच्या अभिलाषानें उन्मत्त झालेल्या या कीचकाला माझ्या गंधर्वपतींनीं ठार मारून टाकिलें आहे. तो दुरात्मा या नृत्यशालेंत भूमीवर मरून पडला आहे. यास्तव तुम्ही या व त्याला पहा."

सैरंध्रीचें भाषण ऐकून त्या नृत्यशालेचे रक्षक त्वरेनें अनेक दिवट्या पेटवून त्या नृत्यागारांत आले. तेव्हां कीचक भूमीवर गतप्राण होऊन पडला आहे, त्याचें सर्व अंग रक्तानें माखलें आहे; त्याचे हात, पाय इत्यादि अवयवहि तुटले आहेत, असें दिसलें. हें पाहून ते सर्व रक्षक अतिशय व्यथित झाले. तें अमानुष

कर्म पाहून ते सर्व आश्चर्यचकित झाले. मृत होऊन पडलेल्या कीचकाकडे निरखून पाहून याची मान कोठें आहे: हात, पाय, मस्तक इत्यादि इतर अवयव कोठें आहेत, इत्यादि बोलत गंधर्वानें मारलेल्या त्या सेनापतीच्या शरीराचें परीक्षण करूं लागले. ४. ३. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १ अनुकीचकांचें सैरंध्रीला बांधून कीचकासह दहनार्थ श्मशानाकडे प्रयाण. २ तिचा आक्रोश. ३ भीमानें केलेला अनुकीचकांचा संहार. ]

(१) **वैशंपायन**—हे भारता, त्यावेळीं कीचकाचे सर्व बांधव त्या नृत्यशालेंत आले व त्याच्या मृत देहाभोंवतीं जमून रडूं लागले. इंद्रानें दानवाचें जसें चूर्ण करावें, तसें भीमानें कीचकाला ठेंचून टाकिलें होतें. त्यामुळें त्याचे अवयव तोडून छिन्न-भिन्न केलेलें शरीर जलांतून बाहेर काढून भूमीवर ठेवलेल्या कांसवासारखें दिसत होतें. तें पाहून त्याचे आप्तजन भीतीनें चकीत झाले व त्यांच्या अंगावर कांटा आला.

त्यानंतर अग्निसंस्कार करण्याच्या इच्छेनें ते सर्व तेथें जमलेले सूतपुत्र कीचकाचा मृतदेह बाहेर नेऊं लागले. इतक्यांत जवळच एका खांबाला टेकून उभी राहिलेली ती सर्वांगसुंदरी कृष्णा त्यांच्या दृष्टीं पडली. तेव्हां तेथें जमलेले ते सर्व अनुकीचक म्हणाले—" जिच्यामुळें कीचकाचा वध झाला, त्या या सैरंध्रीला सत्वर ठार करा. अथवा अगोदर हिला मारूं नका. आपण या कीचकाच्या शवाबरोबर हिचेंहि दहन करूं या. कारण कीचक हिच्यावर आसक्त झाला होता. यास्तव मृत झालेल्याहि याचें प्रिय करणें हें आपलें कर्तव्यच आहे."

नंतर ते सर्व विराटराजापाशीं जाऊन म्हणाले—हे राजा, जिच्यामुळें आज कीचक प्राणास मुकला, त्या सैरंध्रीचेंहि त्याच्याबरोबर दहन करण्याची आम्हांला अनुज्ञा दे.

तेव्हां सूतपुत्राचा पराक्रम स्मरून विराटानें कीचकासह सैरंध्रीचें दहन करण्यास अनुमोदन दिलें. त्याबरोबर भयभीत व मूर्छित झालेल्या कमलनयना कृष्णेपाशीं ते सर्व सूतपुत्र आले व तिला धरून बांधून, स्मशानभूमीकडे निघाले.

हे राजन्, याप्रमाणें ते सूतपुत्र बांधून नेत असतां ती वास्तविक सनाथ असलेली निष्पाप पांचाली त्रात्याच्या अपेक्षेनें एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें आक्रोश करूं लागली.

(२) द्रौपदी म्हणाली—" हे जय, जयंत, विजय, जयत्सेन व जयद्वलहो, हे सूतपुत्र मला नेत आहेत. माझे शब्द आपल्या कानीं जावोत.

ज्या बलाढ्य गंधर्वांच्या धनुष्याचा टणत्कार विजेच्या कडकडाटाप्रमाणें ऐकूं येतो, महायुद्धामध्यें ज्या वेगवान् गंधर्वांच्या रथाचा घोष मेघगर्जनेप्रमाणें शत्रूंच्या कानीं पडतो, ते माझे गंधर्वपति हा माझा आक्रोश ऐकोत. हे नीच सूतपुत्र मला श्मशानांत जाळण्यासाठीं नेत आहेत. धांवा धांवा." हे भारता, कृष्णेचें तें दीन व शोकयुक्त वचन कानीं पडतांच भीमसेन कांहीं विचार न करतां शयनावरून उठला व तिच्याकडे त्वरेनें धावला. भीमसेन म्हणाला— " हे सैरंध्रि, तुझें भाषण मीं ऐकलें. तुला आतां सूतपुत्रांपासून मुळींच भय नाहीं."

(३) हे पांडवेया, असें बोलून त्या महाबाहूनें सूतपुत्रांचा वध करण्याच्या इच्छेनें मोठ्यानें जांभई दिली व मोठ्या प्रयत्नानें गंधर्वासारखा वेष धारण करून तो अमार्गानें उडी मारून बाहेर आला आणि तटावरून एका वृक्षावर चढला. तेथून त्यानें द्रौपदीला कोणत्या दिशेकडे नेत आहेत हें पाहिलें आणि जेथें ते सूतपुत्र चालले होते त्या श्मशानाकडे तो त्वरेनें निघाला. तो भीमसेन तटाचें उल्लंघन करून नगराबाहेर पडला व मोठ्या वेगानें सूतपुत्रांच्याहि पुढें निघून गेला. तेथें चितेच्या समीप त्यानें मोठाल्या शाखांनीं युक्त असलेला व ताडासारखा उंच, असा एक महा वृक्ष पाहिला. तो वृक्ष अति जुनाट असल्यामुळें त्याचा अग्रभाग शुष्क झाला होता. असा तो वृक्ष दृष्टीं पडतांच त्या परंतपानें एखाद्या मत्त गजाप्रमाणें आपल्या दोन्ही हातांनीं तो वृक्ष उपटण्याचा यत्न केला व तो उपटून आपल्या खांद्यावर टाकिला. नंतर तो महा बलाढ्य भीमसेन दहा वावें लांब असलेला वृक्ष खांद्यावर घेऊन दंडधारण करणाऱ्या अंतकाप्रमाणें धांवून येत असतां त्याच्या विशाल मांड्यांच्या गतीनें जवळचे अश्वत्थ, वट, पळस वगैरे अनेक वृक्ष मोडून भूमीवर पडले.

क्रुद्ध झालेल्या सिंहासारख्या भीमाला पहातांच हा गंधर्वच येत आहे, असें समजून ते सर्व सूतपुत्र भयभीत झाले व कापूं लागले ' हा अतिशय क्रुद्ध

झालेला बलाढ्य गंधर्व वृक्ष घेऊन येत आहे, यास्तव या सैरंध्रीला सोडून द्या. आम्हांवर हें एक संकटच ओढवलें आहे' असें ते बोलूं लागले.

इतक्यांत कृतान्ताकार भीमसेन वृक्ष उगारून त्यांच्या समीप येऊन पोंचला. त्याबरोबर द्रौपदीला सोडून ते सर्व अनुकीचक नगराकडे पळत सुटले. परंतु भीमानें त्यांचा पाठलाग केला व इंद्र जसा दैत्यांचा संहार करितो, त्याप्रमाणें त्या बलवान् वायुपुत्रानें एकशें पांच अनुकीचकांना त्या वृक्षाच्या प्रहारानेंच यमसदनीं पाठविलें.

हे पारिक्षिता, त्यानंतर त्या महाबाहूनें बांधलेल्या कृष्णेला सोडून तिला आश्वासन दिलें. अश्रु ढाळणाऱ्या व दीनवदन झालेल्या पांचालीला दुर्धर्ष वृकोदर म्हणाला—"हे भीरु, निष्पाप असलेल्या तुला जे क्लेश देतात, ते असे प्राणांस मुकतात. हे कृष्णे, तूं आतां नगरांत जा. आतां तुला यत्किंचित्‌हि भय राहिलें नाहीं. मीहि अन्य मार्गानें विराटाच्या पाकशालेंत जातों."

हे कुरुश्रेष्ठा, तोडलेल्या महावनांतील सर्व वृक्ष जसे आडवे पडतात, त्याप्रमाणें ते एकशें पांच सूतपुत्र भूमीवर मरून पडले. याप्रमाणें ते एकशें पांच अनुकीचक व पूर्वींच मारलेला तो सेनापति मिळून एकशें सहा कीचक गतप्राण झाले. हें महदाश्चर्य पाहून सर्व नगरवासी स्त्री-पुरुष तेथें जमले. परंतु अतिशय विस्मयानें त्यांच्या मुखांतून शब्दहि निघेनासा झाला. ४. ३. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ राजाज्ञेनें अनुकीचकांसह कीचकाचा अग्निसंस्कार. २ सुदेष्णेची सैरंध्रीला राष्ट्रांतून निघून जाण्याची आज्ञा. ३ तिनें मागितलेली तेरा दिवसांची मुदत. ]

( १ ) **वैशंपायन** म्हणाला—जनमेजया, त्या सूतपुत्रांचा असा अकस्मात् संहार झालेला पाहून ते सर्व नागरिक विराटराजापाशीं गेले व म्हणाले—"हे महाराज, गंधर्वांनीं महा बलवान् सूतपुत्रांना मारून टाकिलें आहे. ज्याप्रमाणें पर्वताचें विशाल शिखर वज्रानें विदीर्ण होऊन पडावें, त्याप्रमाणें सर्व सूतपुत्रांचे मृत देह भूमीवर इतस्ततः पसरलेले दिसत आहेत आणि हे राजन्, त्या गंधर्वांनीं सैरंध्रीला मुक्त केलें आहे. ती या राजमंदिरांत परत येत आहे. हे राजा, ही सैरंध्री रूपवती आहे व तिचे पति गंधर्व महा बलाढ्य आहेत. पुरुषांना विषयो-

पभोग प्रिय असल्यामुळें ते निःसंशय तिचा अभिलाष धरतील आणि तुझ्या या नगरीवर मोठा अनर्थ ओढवेल. यास्तव ज्यायोगें सैरंध्रीमुळें तुझ्या नगरीचा विनाश होणार नाहीं, असा उपाय सत्वर योज.''

त्यांचें हें वचन ऐकून त्या सेनेचा अधिपति विराटराजा म्हणाला—'' प्रथम या सूतपुत्रांचा अग्निसंस्कार करा. एकच मोठी चिता प्रज्वलित करून रत्नें व सर्व प्रकारचीं सुगंधी द्रव्यें यांनीं त्या सर्व कीचकांचें यथाविधि दहन करा.''

(२) त्यांना असें सांगून तो विराटराजा लगेच आपल्या महिषीपाशीं येऊन म्हणाला—''हे सुदेष्णे, सैरंध्री आली असतां तूं माझ्या आज्ञेनें तिला असें सांग—' सैरंध्रि, तुझें कल्याण असो. तूं आतां तुला योग्य वाटेल तेथें निघून जा. कारण गंधर्व आपलाहि पराभव करतील कीं काय अशी राजाला भीति वाटत आहे.' हे सुदेष्णे, गंधर्व तिचें रक्षण करीत असल्यामुळें तिचा त्याग करणें योग्य असतांहि मी स्वतः तिला 'जा' असें म्हणण्यास समर्थ नाहीं. तूं स्त्री असल्यामुळें तुला तिच्याशीं बोलण्यांत कांहीं दोष नाहीं, म्हणून मी तुलाच ही माझी आज्ञा तिला कळविण्यास सांगत आहें. ''

हे पांडवेया, त्यानंतर भीमसेनानें सूतपुत्रांचा वध करून भयरहित केलेली कृष्णा नगरांत आली. सिंहाच्या हातून सुटलेल्या हरिणीप्रमाणें भयभीत झालेल्या त्या पांचालीनें आपलें शरीर आणि वस्त्र जलानें स्वच्छ धुतलें व ती राजगृहाकडे वळली. हे राजा, सैरंध्री नगरांत प्रवेश करीत आहे, असें पाहून ते सर्व नागरिक गंधर्वांच्या भीतीनें दश-दिशांकडे धावूं लागले. कित्येकांनीं तिला पाहून भयानें नेत्र मिटले व कित्येक लपून बसले.

नंतर पांचालीनें पाकशालेच्या दारांत भीमसेनाला मत्त गजेंद्राप्रमाणें उभें असलेलें पाहून स्मित केलें व सांकेतिक शब्दांत म्हटलें—'' ज्यानें मला संकटांतून सोडविलें, त्या गंधर्वाला मी नमस्कार करित्यें. ''

तिचें तें वचन ऐकून भीमसेनहि सांकेतिक भाषेंतच म्हणाला—हे सैरंध्रि, तुझी आज्ञा मान्य करणारे [1]जे पुरुष पूर्वी येथें रहात होते, ते तुझें हें वचन ऐकून तुझ्या ऋणांतून मुक्त होत्साते यापुढें सुखानें विहार करोत.

---

१ येथील पुरुष म्ह० पांडव पूर्वी म्ह० वर्षभर या विराट नगरांत विहार करीत राहिले, ते पांडव 'गंधर्वराजाला नमस्कार असो 'हें द्रौपदीचें वचन ऐकून तिची आज्ञा मान्य करून किंवा अज्ञातवास संपवून कृतकृत्य होत्साते प्रसिद्धपणें विहार करोत. असा भीमाच्या या सांकेतिक वचनाचा स्पष्टार्थ आहे.

राजा, त्यानंतर द्रौपदीनें नृत्यशालेंत विराटाच्या कन्यांनीं नृत्य शिकवीत असलेल्या महाबाहु धनंजयाला पाहिलें. तेव्हां बृहन्नलेसह बाहेर येत असलेल्या त्या मुलींनीं क्लेश पावलेल्या निरपराध सैरंध्रीला पाहून म्हटलें—" हे सैरंध्रि, तूं मुक्त होऊन पुनः आलीस ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. ज्यांनीं निरपराध असलेल्या तुला इतके क्लेश दिले, त्या सूतपुत्रांचा वध झाला हें फार उत्तम झालें."

त्यावेळीं तेथें जवळच उभी असलेली बृहन्नला म्हणाली—" हे सैरंध्रि, तूं कशी सुटलीस ? त्या पाप्यांचा नाश कसा झाला ? हें सर्व सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे."

सैरंध्री म्हणाली—हे बृहन्नले, तूं अंतःपुरामध्यें मोठ्या सुखांत रहात आहेस. तुला सैरंध्रीशीं काय करावयाचें आहे ? तिचें कांहीं कां होईना ? सैरंध्रीला काय दुःख भोगावें लागत आहे याची तुला काय कल्पना ! म्हणूनच तूं मला असें हंसत हंसत विचारीत आहेस.

बृहन्नला म्हणाली—हे कल्याणि, बृहन्नलेलाहि अतिशय दुःख भोगावें लागत आहे. या क्लीबत्वाला प्राप्त झालेली मी काय क्लेश भोगीत आहें, हें तूं जाणत नाहींस. मी तुझ्या बरोबर राहिलेली आहें आणि आपण सर्वांनींच एकत्र काल काढलेला आहे. तेव्हां तुझे क्लेश पाहून मला दुःख होणार नाहीं, हें संभवतें तरी का ? एकाचें हृदय दुसऱ्याला कळणें केव्हांहि शक्य नाहीं. तेव्हां तुला माझ्या दुःखाची कल्पना कशी येणार ?

राजा, त्यानंतर त्या सर्व कन्यांसह द्रौपदीनें राजमंदिरांत प्रवेश केला व ती सुदेष्णेपाशीं जाऊन उभी राहिली. तेव्हां ती राजमहिषी विराटराजाच्या आज्ञेवरून तिला म्हणाली—" हे सैरंध्रि, तुला जेथें जाण्याची इच्छा असेल, तेथें सत्वर निघून जा. हे भद्रे, गंधर्वांकडून पराभूत होण्याची राजाला फार भीति वाटत आहे. हे सुलोचने, तूं तरुण असून या भूलोकीं अप्रतिम रूपवती आहेस आणि तुझे गंधर्व अति क्रोधी आहेत. पुरुषांना तर विषयोपभोग अतिशय प्रिय असतात. यास्तव तूं आमच्या राष्ट्रांतून निघून जा म्हणजे आमच्यावरील अनर्थ टळतील."

( ३ ) सुदेष्णेचें हें निष्ठुर भाषण ऐकून सैरंध्री म्हणाली—हे भामिनि, आणखी तेराच दिवस राजानें मला क्षमा करावी. तेवढ्या अवधींत माझे गंधर्वपति कृतकृत्य होऊन मला आपल्याकडे घेऊन जातील आणि तुमचेंहि प्रिय

करतील. हे राज्ञि, ते वीर बांधवांसह विराटराजाचें निःसंशय कल्याण करतील. ४. ३. २४.

येथें तिसरें कीचकवधपर्व समाप्त झालें.

---

# गोहरणपर्व ४.



## अध्याय २५ वा.

[ १ दुर्योधनानें पांडवांच्या शोधार्थ पाठविलेल्या हेरांचें वृत्तकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पृथ्वीपते, कीचकाचा त्याच्या सर्व बांधवांसह वध झाला असतां सामान्य लोकांना अतिशय भीति वाटून ते विस्मित झाले. ही वार्ता त्या मत्स्यदेशांत व इतरत्रहि पसरली व 'हा बलाढ्य कीचक शौर्यामुळें राजाला प्रिय झाला होता, तो शत्रुसैन्याचा नाश करणारा होता, परंतु तो दुर्मति परस्त्रीचा अभिलाष करणारा असल्यामुळें गंधर्वांनीं त्या पापी दुरात्म्याचा प्राण घेतला.' अशी चर्चा सर्वत्र सुरू झाली. देशोदेशींचे लोकहि त्या शत्रुमर्दक अजिंक्य कीचकाविषयीं अनुकूल व प्रतिकूल बोलूं लागले.

हे महाराज, दुर्योधनानें पांडवांचा शोध करण्यासाठीं अनेक हेर नियुक्त केले होते. ते विविध देशांत, राष्ट्रांत व नगरांत फिरून व त्या त्या प्रदेशीं शोध करून परत आले आणि त्यांनीं तेथें जें जें कांहीं पाहिलें होतें, तें तें सर्व स्मरणपूर्वक त्यांस निवेदन केलें. ते सभेंत बसलेल्या द्रोण, कर्ण, कृप, महारथ त्रिगर्त व भ्रात्यांसह दुर्योधन यांच्या समीप येऊन असें सांगूं लागले.

हेर म्हणाले—हे राजेंद्रा, आम्हीं निर्जन अरण्यांत पांडवांना शोधण्याचा पराकाष्ठेचा यत्न केला. परंतु हिंस्र पशूंनीं युक्त असलेल्या आणि वृक्षलतांनीं व झुडपांच्या जाळ्यांनीं व्यापिलेल्या त्या निबिड वनांतून ते महापराक्रमी पांडुपुत्र कोठें निघून गेले, याचा कांहीं शोध लागला नाहीं. त्यांच्या पावलांचीं जीं चिह्नें उमटलेलीं होतीं, त्यांच्या अनुरोधानें आम्हीं उंच उंच पर्वत शिखरें, नानादेश, लोकवस्तीचीं नगरें, खेडीं व राजधानींचीं स्थानें इत्यादि अनेक ठिकाणीं पांडवांचा शोध केला. परंतु कोठेंहि त्यांचा थांग लागला नाहीं. हे राजश्रेष्ठा, तुझें कल्याण असो. आम्हांला तर पांडव नष्ट झाले असावेत, असेंच वाटतें.

ाम्हीं मार्गांतहि त्यांचा पुष्कळ प्रकारें शोध केला, परंतु हे राजा, त्या पांड-चें निवासस्थान आम्हांला कोठेंहि सांपडलें नाहीं.

हे नरेंद्रा, आम्हीं कांहीं काल पांडवांच्या इंद्रसेनादि सारथ्यांच्या मागो-ग गेलों व त्यांच्याकडून पांडवांची वस्तुस्थिति समजून घेण्याचा प्रयत्न ळा, परंतु त्यापासूनहि कांहीं निष्पन्न झालें नाहीं. हे राजा, महाव्रत धारण णारे पांडव व साध्वी द्रौपदी यांच्या वांचूनच ते सूत द्वारकेस जाऊन राहिले. वरून त्यांचा सर्वथा नाश झाला असावा असेंच दिसतें. हे धृतराष्ट्रपुत्रा, ला नमस्कार असो. राजा, आम्हांला महात्म्या पांडवांचें गमन, निवास, ांचा व्यवहार किंवा त्यांचें एखादें कर्म याचा कोठें सुगावाहि लागला नाहीं. वरून ते निःसंशय मृत झाले असावेत. आतां हे पृथ्वीपते, यापुढें पांड-च्या शोधासाठीं आम्हीं काय करावें, याची आम्हांला आज्ञा कर.

पण हे पुरुषश्रेष्ठा, तुला एक प्रिय व शुभ वार्ता सांगतों ती ऐक. मत्स्यराजाच्या ाबलवान् सूतानें पूर्वी त्रिगर्तांचा वध केला होता, त्या महाबलाढ्य कीचकाचा े भ्राते व इतर बांधव यांसह गंधर्वांनीं गुप्तपणें रात्रीं संहार केला आहे. स्तव हे राजा, तुझ्या शत्रूंचा पराभव झाल्याचें हें प्रिय वृत्त ऐकून पुढें काय ावयाचें याचा तूं निश्चय कर. ४. ४. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १ कर्ण व दुःशासन यांनीं पांडवांच्या शोधार्थ सुचविलेले उपाय. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें त्या हेरांचें भाषण ऐकून ोधन कांहीं वेळ सचिंत होऊन बसला व मग सभासदांना म्हणाला—"हे ासदहो, खरोखर या कार्याचा शेवट काय होणार आहे, हें जाणणें अतिशय ठेण आहे. तस्मात् 'पांडव कोठें गेले आहेत' याचाच तुम्ही सर्व मिळून शोध ा. आतां त्यांच्या वनवासाचा बहुतेक काल संपला असून अगदीं अत्यल्प ल अवशिष्ट राहिला आहे. या तेराव्या वर्षांतील अज्ञातवासाचा हा अवशिष्ट ल जर असाच निघून गेला, तर ते सत्यव्रतपरायण पांडव आपली प्रतिज्ञा ी करून प्रकट होतील आणि मदोन्मत्त गजाप्रमाणें किंवा विषारी सर्पाप्रमाणें क्रुद्ध झालेले कुंतीपुत्र तत्काल सर्व कौरवांना अतिशय दुःख देऊं लागतील. सभ्यहो, ते सर्व पांडव कालज्ञ आहेत. ते कपटवेषानें कोठें तरी राहिले

असतील, यास्तव ज्यायोगें त्यांना पुनः वनवासाला जावें लागेल, अशी कांहीं तरी युक्ति सांगा. जितक्रोध असलेले ते अज्ञातवासाच्या प्रतिज्ञेचा भंग होऊन पुनः वनांत गेले, म्हणजे आमचें हें राज्य निष्कंटक, विक्षेपरहित व शत्रुशून्य होऊन दीर्घकाल टिकेल.

राजा, दुर्योधनाचें हें भाषण ऐकून कर्ण म्हणाला—" हे नरश्रेष्ठा, स्वामिकार्यांत दक्ष व धूर्त असे दुसरे हेर सत्वर पाठीव. त्यांना सर्व विस्तीर्ण राष्ट्रांतून व लोकांनीं व्यापिलेल्या प्रसिद्ध नगरांतून संचार करूं दे. त्याचप्रमाणें विद्वानांच्या सभांतून आणि जेथें सिद्ध व संन्यासी नेहमीं जात असतात, अशा मुनींच्या आश्रमांतून, राजधानींतून त्यांना फिरूं दे. विविध तीर्थें, क्षेत्रें, खाणि, रम्य पर्वतगुहा, नदीतीर, गांवें व नगरें इत्यादि सर्व ठिकाणीं चतुर व तज्ज्ञ लोकांनीं जाऊन युक्ति-प्रयुक्तीनें पांडवांची माहिती मिळवावी व त्या निपुण पुरुषांनीं गुप्तपणें राहिलेल्या पांडवांचा तर्कानें शोध करावा."

हे पांडवेया, त्यानंतर पापभावनेनें युक्त असलेला व अनुरागी दुर्योधनानुज दुःशासन आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला म्हणाला—" हे राजन्, ज्या हेरांवर आपला पूर्ण विश्वास असेल, त्यांना योग्य पारितोषिकें देऊन पुनः पांडवांचा शोध करण्यास जाऊं दे. हे राजा, कर्णानें सांगितल्याप्रमाणेंच आपण सर्व करूं या. आपले सर्व हेर त्यांचा शोध करूं देत. हे व आणखीहि दुसरे हेर विविध देशांत पाठीव. त्यांना सर्वत्र संचार करून हिंडून आपलें इष्ट कार्य साधण्याची आज्ञा कर. आपण इतका प्रयत्न केला असतांहि आपल्याला पांडवांचें गमन किंवा निवास यांचा कांहींच शोध लागला नाहीं. तेव्हां ते कदाचित् समुद्राच्या परतीरालाहि गेले असतील किंवा कोठें तरी अत्यंत गुप्तपणेंहि राहिले असतील. हे राजा, कदाचित् त्या शूराभिमान्यांना एखाद्या महारण्यांत व्याघ्रादि हिंस्र प्राण्यांनींहि भक्षण केलें असेल. अथवा एखाद्या दुर्गम प्रदेशीं जाऊन ते प्राणालाहि मुकले असतील. यास्तव हे कुरुनंदना, तूं आपलें चित्त स्वस्थ करून तुला योग्य दिसेल तो उपाय मोठ्या उत्साहानें व सत्वर योज. ४. ४. २६.

## अध्याय २७ वा.

[ १ धर्मात स्थित असलेल्या पांडवांचा नाश होणें शक्य नाहीं, असे सांगून त्यांच्या शोधार्थ द्रोणाचा उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, दुःशासनाचा हा उपदेश ऐकून महावीर्यवान् तत्त्वदर्शी द्रोणाचार्य म्हणाला—" हे कुरुनंदनहो, ते पांडुपुत्र शूर, बुद्धिमान्, धर्मज्ञ, कृतज्ञ, विद्यासंपन्न व जितेंद्रिय आहेत, त्यांच्यासारख्या महात्म्यांचा विनाश किंवा पराभव होणें संभवत नाहीं. ते सर्व भ्राते धर्मराजाच्या आज्ञेंत वागणारे आहेत. नीति, धर्म व अर्थ यांचें तत्त्व जाणणारा, धर्मामध्यें स्थित असलेला व सत्यनिष्ठ असा जो ज्येष्ठ भ्राता युधिष्ठिर त्याला ते चौघे बंधु पितृस्थानीं मानितात. अशा त्या श्रीमान्, महात्म्या अजात शत्रु भ्रात्याला अनुसरणाऱ्या त्या अनुजांचें अहित कसें होईल ! हे राजा, युधिष्ठिर तरी अशाप्रकारच्या नीतिमान् महात्म्या कौंतेयांचें कल्याण कां करणार नाहीं ? यास्तव त्यांचा नाश झाला नसावा, असें मला वाटतें. ते अनुकूल कालाच्या उदयाची वाट पहात मोठ्या यत्नानें गुप्तपणें रहात असावेत. सांप्रत तुम्हांला जें करावयाचें असेल तें सत्वर करा. व्यर्थ कालक्षेप करूं नका. सर्व कार्यामध्यें धैर्य धारण करणाऱ्या त्या पांडुपुत्रांचा निवास कोठें असेल याचा चांगला विचार करा व शोधाचा प्रयत्न करा. परंतु ते तपस्वी आणि शूर असलेले पांडव दुर्ज्ञेय आहेत. त्यांचा शोध लागणें अतिशय दुष्कर आहे. हे राजा, युधिष्ठिर शुद्धात्मा, गुणवान्, सत्यनिष्ठ, शुचिर्भूत व तेजस्वी आहे. तो कोणाच्या दृष्टीं जरी पडला तरी त्या महात्म्याच्या तेजानें पहाणाऱ्यास मोह पडेल व त्याला ओळखूं येणार नाहीं. यास्तव हें सर्व लक्षांत घेऊन त्यांच्या शोधाचा पुनः प्रयत्न करा. पांडवांना ओळखणारे जे सिद्ध किंवा ब्राह्मण असतील, त्यांचीच या कार्यांत योजना करा. कारण सामान्य हेर त्यांना ओळखूं शकणार नाहींत. ४. ४. २७.

---

## अध्याय २८ वा.

[ १ शुभलक्षणयुक्त प्रदेशीं पांडवांचा शोध करण्याविषयीं भीष्माचा उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन** म्हणाला—राजा, द्रोणाचार्यानें असें सांगितलें असतां विद्वान्, देश-कालज्ञ, तत्त्ववेत्ता व सर्व धर्म जाणणारा भारतांचा पितामह जो भीष्माचार्य त्यानें द्रोणाचार्याच्या भाषणाला अनुमोदन देऊन पांडवांविषयीं कौर-

वांना उपदेश केला. त्यानें धर्मज्ञ युधिष्ठिरामध्यें आसक्त, धर्मयुक्त, दुर्जनांस नित्य दुर्लभ, सज्जनांस सर्वदा संमत व आदरणीय असें पक्षपातरहित भाषण केलें.

भीष्म म्हणाला—हे दुर्योधना, या सर्वार्थ तत्त्ववेत्त्या ब्राह्मणश्रेष्ठ द्रोणानें जें सांगितलें तें योग्य आहे. महात्मे पांडव सर्व लक्षणांनीं युक्त, सुव्रत धारण करणारे, बहुश्रुत, अनेक शास्त्रें जाणणारे, वृद्धांच्या आज्ञेंत वागणारे, सत्यव्रत-परायण, कालवेत्ते, प्रतिज्ञा पालन करणारे, शुचिव्रत, नित्य क्षत्रियधर्मांत रत असणारे, सर्वदा केशवाला अनुसरणारे, उदारचित्त, महाबलाढ्य व वीरश्रेष्ठ आहेत. अशा प्रकारें सज्जनांच्या धर्मांत स्थित असलेल्या त्या पांडवांचा नाश होणें शक्य नाहीं. ते पांडुपुत्र स्वपराक्रमानें व धर्माच्या आश्रयानें गुप्तपणें राहिले आहेत. ते नाश पावले नाहींत, असें माझेंहि निश्चित मत आहे. हे भारता, पांडवांच्या शोधार्थ कोठें प्रयत्न करावा याविषयीं माझा विचार सांगतों, ऐक.

हे धार्तराष्ट्रा, अनीतिमानाला नीतिमानाचा व्यवहार जाणतां येत नाहीं. तरीहि पांडवांचा शोध लावण्यासाठीं कोणती उपाययोजना केली पाहिजे, याचा पूर्ण विचार करून मी तुला सांगत आहें. तुझा द्रोह करण्याच्या हेतूनें सांगत नाहीं. माझ्या सारख्यांनीं सज्जनांसच नीति सांगावी. तुझ्या सारख्या दुर्जनाला सांगूं नये आणि वृद्धांच्या अनुशासनांत स्थित असलेल्या, सत्याचरण करणाऱ्या श्रेष्ठ पुरुषांत भाषण करणाऱ्या धीर पुरुषानें अनीति तर सज्जन व दुर्जन या दोघांनाहि सांगूं नये, नीति मात्र अवश्य सांगावी, असा न्याय आहे. त्याला अनुसरून मी आज तुला धर्मबुद्धीनें माझें मत सांगत आहें. तें तूं लक्षपूर्वक ऐक.

हे गांधारेया, पांडवांचें वास्तव्य कोठें तरी सामान्य प्रदेशीं असेल, असें हे सर्व इतरजन मानोत, परंतु मी तसें मानीत नाहीं. अरे बाबा, युधिष्ठिर कोठें तरी असाधारण शुभ स्थलीं रहात आहे, अशीच माझी समजूत आहे. या तेराव्या वर्षांतील अज्ञातवासाचा काल युधिष्ठिर जेथें घालवीत असेल, त्या राजाचें केव्हांहि अकल्याण होणार नाहीं. ज्या नगरींत किंवा देशांत युधिष्ठिर रहात असेल, तेथील लोक दानशील, प्रियवादी, जितेंद्रिय, अकार्याविषयीं लज्जित होणारे, सर्वदा दमनशील, भव्य, सत्यनिष्ठ, हृष्ट, पुष्ट, शुचिर्भूत, दक्ष, असूयारहित, परोत्कर्षसहिष्णु, निरभिमानी, परद्रोह न करणारे व स्वधर्माचे अनुष्ठान करणारे असतील.

त्या राष्ट्रांत नित्य वेदपठन, पूर्णाहुत्या व विपुल दक्षिणायुक्त यज्ञ होत असतील. तेथें योग्य कालीं पर्जन्यवृष्टि होऊन तृण व धान्य यांची समृद्धि

होत असेल. तो प्रदेश सर्व उपद्रवरहित असून, सत्त्वयुक्त धान्यांनीं व रसयुक्त फलांनीं संपन्न झाला असेल. पुष्पें सुगंधयुक्त व लोकांची वाणी शुभ शब्दांनीं युक्त असेल. तेथील शीत, मंद व सुगंधयुक्त वायूचा स्पर्श सर्व जीवांना सुखावह होत असेल. तेथें पाखंडमार्गवर्जित धर्मानें ब्रह्मस्वरूपाचा विचार होत असेल व भीतीचा प्रवेशहि होत नसेल. तेथें दुर्बल व कृश नसलेल्या विपुल गायी असतील. त्या देशांत दूध, दहीं, तूप, इतर पेयें आणि भोग्य पदार्थ विपुल, पौष्टिक व स्वादिष्ट असतील. तेथें रस, स्पर्श, गंध व शब्द सर्वगुणसंपन्न असतील. तेथील सर्व विविध दृश्यें मनाला प्रसन्न करतील.

हे दुर्योधना, जेथें द्विज आपापल्या गुणांनीं युक्त होऊन स्वधर्माचें आचरण करीत असतील. सर्व जनता प्रेमळ, संतुष्ट, शुचि, देवता व अतिथि यांची श्रद्धेनें पूजा करणारी, इष्टदान देणारी, उत्साही, स्वधर्मपरायण, अशुभाचा त्याग करून शुभाची इच्छा करणारी, यागादि करणारी व दुसऱ्याला सुख देण्याचें व्रत पालन करणारी असेल, तेथें पांडव हा तेराव्या वर्षाचा काल कंठीत असतील. अरे बाबा, सदाचरणी विद्वान् द्विजहि त्या धर्मात्म्या युधिष्ठिराला ओळखूं शकणार नाहींत, मग प्राकृत हेर त्या पृथापुत्रांना शोधून काढण्यास कसे समर्थ होतील ! ज्या ठिकाणीं सत्य, धृति, दान, परा शांति, शाश्वत क्षमा, ह्री, श्री, कीर्ति, श्रेष्ठ तेज, दया, अंतःकरणाचा सरळपणा हे गुण वास करीत असतील, तेथेंच बुद्धिमान् पांडव गुप्तपणें रहात आहेत, असें तूं निःसंशय जाण. तेथेंच जाऊन त्यांचा शोध करणें तुला उचित आहे. हें मी तुला उगीच कांहीं तरी सांगत आहें, असें समजूं नको. कारण हे दुर्योधना, मी या कुरुकुलांतील वृद्ध आहें. पांडवांचा द्वेष करणें हा अधर्म आहे. यास्तव मी विपरीत भाषण करण्यास समर्थ नाहीं. दुर्योधना, माझ्या या निःपक्षपात वचनाचा चांगला विचार करून ज्यायोगें आपलें हित होईल, असें तुला वाटत असेल तें तूं सत्वर कर. माझ्या वचनावर जर तुझा विश्वास असेल, तर तूं माझ्या या हितोपदेशाप्रमाणें वाग. ४. ४. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ हेर व नीति यांविषयीं कृपाचार्यांचा उपदेश. ]

(१) **वैशंपायन**—राजा, त्यानंतर शारद्वत कृपाचार्यानें दुर्योधनाला सदुपदेश केला. तो म्हणाला—" हे कौरवेया, वृद्ध भीष्माचार्यानें आतां पांडवांविषयीं

जें म्हटलें तें सयुक्तिक, प्रस्तुत कालाला योग्य, धर्मार्थ युक्त, मधुर व सत्य आहे. भीष्माच्या मताप्रमाणें माझेंहि म्हणणें सांगतों, तें ऐक. पांडवांचें वास्तव्य कोठें आहे याचा तूं विश्वासु व कुशल हेरांकडून शोध करीव व सांप्रत काय करणें हितावह आहे, याचा पूर्ण विचार करून योग्य व हितकर उपाय-योजनाहि कर. अरे बाबा, उत्कर्षाची इच्छा करणारानें सामान्य शत्रूचीहि उपेक्षा करूं नये. मग पांडवांसारख्या रणांत शस्त्रास्त्रनिपुण असलेल्या वीरांविषयीं काय सांगावें !

यास्तव हे राजा, जोंवर महात्मे पांडव गुप्तवेषानें आपला अज्ञातवासांतील अवशिष्ट काल घालवीत आहेत व आपली प्रतिज्ञा पूर्ण करून प्रकट झाले नाहींत, तोंवर तूं स्वतःचें व परराष्ट्राचें सैन्य व सामर्थ्य किती आहे, हें पूर्णपणें समजून घे. अनुकूल काल प्राप्त होतांच धर्मात्म्या पांडवांचा उदय होईल, यांत संशय नाहीं. प्रतिज्ञेंतून पार पडलेले ते महाबलाढ्य महात्मे पांडुपुत्र स्वपराक्रमानें फार मोठा उत्साह धारण करतील. यास्तव हे दुर्योधना, स्वतःचें सैन्य, सामर्थ्य, कोश व राजनीति यांचा पूर्ण विचार कर. शत्रूपेक्षां तुझें बल व कोश जर हीन असेल, तर त्यांच्याशीं संधि कर आणि तुझें सैन्य व सामर्थ्य शत्रूहून अधिक असेल, तर तूं युद्धांत प्रवृत्त हो. पांडवांच्या उदयाचा काल येतांच, तुला हितावह होईल, अशाच राजनीतीचें अवलंबन कर.

अरे बाबा, तुझें स्वतःचें सामर्थ्य किती आहे, हें समजून घेतल्यावर तुला साह्य करणाऱ्या मित्रांचें व शत्रूंचें बल किती आहे तें पहा. त्याचप्रमाणें तुला अनुकूल व प्रतिकूल कोण व भीष्म-द्रोणांसारखे दोन्ही पक्षांस संमत कोण कोण आहेत, त्यांचें बल तुझ्याहून अधिक आहे, कमी आहे किंवा तुल्य आहे, हें जाणून त्यांतील संतुष्ट व असंतुष्ट सैन्य किती आहे हेंहि लक्षांत घे व त्याप्रमाणें शत्रूशीं संधि कर. साम, दान, भेद, दंड व खंडणी या पांच उपायांनीं शत्रूंचें नियमन करावें लागतें. बलाढ्य शत्रूला सत्कारादि सेवेनें अनुकूल करून घ्यावें. दुर्बलांना बलानें, मित्रांना सामानें व स्वसैन्याला प्रेमळ भाषण, मान, दान, वेतन इत्यादिकांच्या योगें वश करून घ्यावें, अशी नीति आहे. तूं स्वसैन्य व कोश यांची जर चांगल्याप्रकारें वृद्धि केलीस तर तुझा निःसंशय जय होईल. कितीहि बलाढ्य शत्रु उपस्थित झाला, तरी तूं त्यांच्याशीं युद्ध करण्यास समर्थ होशील व सैन्य आणि सामर्थ्य यांनीं रहित असलेल्या पांडवांना तूं सहज जिंकशील. या

सर्वांचा पूर्णपणें विचार करून, क्षत्रियधर्माला अनुसरून तूं स्वकर्तव्य कर. म्हणजे हे नरेंद्रा, तूं योग्य कालीं दीर्घ सुखाला प्राप्त होशील. ४. ४. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १ कीचकाचें निधन ऐकून त्रिगर्तानें विराटनगरीवर चाल करून जाण्यास कौरवांना केलेली प्रेरणा. २ दक्षिण भागातील विराटाच्या गायींचें हरण. ]

(१) **वैशंपायन**—राजा, कृपाचार्यांचें हें भाषण ऐकून त्रिगर्तांचा बलवान् राजा रथाधिपति सुशर्मा त्या कालाला उचित असें वचन मोठ्या त्वरेनें बोलला—"पूर्वी मत्स्य, शाल्व व विराटाचा सारथि कीचक यांनीं आम्हांला वारंवार पीडा दिली आहे." इतकें बोलून त्या त्रिगर्तानें बलाढ्य कौरवस्वामी भीष्म समीप असतांना कर्णाकडे पाहून बंधूंसह बसलेल्या दुर्योधनाला पुढें असें म्हटलें—"हे राजा, पूर्वी जेव्हां पराक्रमी मत्स्यराजानें आपल्या राष्ट्राला वारंवार पीडा दिली, तेव्हां बलाढ्य कीचक त्याचा सेनापति होता. तो क्रूर, असहिष्णु, दुष्टात्मा, पृथ्वीवर पराक्रमामध्यें प्रसिद्ध, निर्दय व पापी होता. पण आतां गंधर्वांनीं त्याचा वध केला आहे. त्यामुळें विराटराजा निराश्रय व निरुत्साह झाला असेल ! यास्तव त्या विराटनगरीवर चाल करून जावें असें माझें मत आहे; तें जर तुम्हां सर्व कौरवांना व महात्म्या कर्णाला रुचत असेल तर या कार्याला हाच योग्य काल आहे. कालक्षेप करणें बरें नाहीं.

हे राजन्, विपुल धनधान्यांनीं समृद्ध असलेल्या त्या मत्स्यदेशावर चाल करून जाऊन आपण त्या राष्ट्रांतून विविध रत्नें व धन घेऊन येऊं. आपण विराटाचे ग्राम आणि राष्ट्रें यांचें विभागशः हरण करूं. अथवा त्याच्या नगरीला पीडा देऊन बलात्कारानें हजारों सुलक्षणी धेनूंचें हरण करून आणूं. हे राजा, कौरव, त्रिगर्त व इतर सर्व योद्धे यांना एकत्र जमवून आपण आज त्यांच्या सर्व गायींचें हरण करून आणूं, आपल्या सैन्याचे विभाग करून त्यांच्या सर्व सैन्याचा संहार करूं आणि याप्रमाणें त्या विराटाला हतबल करून आपल्या वश करून घेऊं. क्षत्रियधर्मानें त्याला वश केलें म्हणजे आम्ही त्रिगर्त सुखानें राहूं व तुम्हां कौरवांच्या सामर्थ्याचीहि निःसंशय वृद्धि होईल."

हे भारता, सुशर्म्याचें तें भाषण संपतांच कर्ण मोठ्या उत्साहानें दुर्योधनाला म्हणाला—"हे राजा, या त्रिगर्तानें प्रस्तुत कालाला उचित व आम्हांला

हितकर असाच हा सुविचार सांगितला आहे. यास्तव आपण सेना सज्ज करून विभागानें किंवा एकत्र तुला जसें योग्य वाटेल त्याप्रमाणें सत्वर जैत्रयात्रा करूं या. हे निष्पापा, हा आम्हां सर्वांचा पितामह महाज्ञानी भीष्म, आचार्य द्रोण व शारद्वत कृप, यांचा विचार घेऊन त्यांची जशी संमति असेल, त्याप्रमाणें त्या समृद्ध विराटनगरीवर आपण त्वरित चाल करून जाऊं या. हे राजा, धन, सैन्य व सामर्थ्य यांनीं हीन झालेल्या त्या पांडवांशीं आपल्याला आतां काय करावयाचें आहे! जेथून परत येणेंहि शक्य नाहीं, अशा कोठें तरी दूरदेशीं ते गेले असावेत किंवा कदाचित् यमसदनींहि गेले असतील. यास्तव आतां आपण त्यांचा विचारच सोडून देऊं व त्यांच्या विचारानें उद्विग्न न होतां विराटनगरीवर चाल करून जाऊं आणि तेथून विविध प्रकारचें धन व धेनु यांचें हरण करून आणूं.

हे जनमेजया, वैकर्तन कर्णाचें हें वचन कांनीं पडतांक्षणीं राजा दुर्योधनानें आपल्या आज्ञेंत असणाऱ्या अनुजाला आज्ञा केली. तो म्हणाला—" हे दुःशासना, भीष्मादि वृद्धांचा विचार घेऊन सत्वर सेना सज्ज कर आणि सैन्याचा यथायोग्य विभाग करून उत्तर किंवा दक्षिण यांतील ज्या दिशेकडे जाण्याचें ठरेल त्याप्रमाणें कौरवांसह त्या दिशेकडे जाण्यास सिद्ध व्हा. महारथ सुशर्म्याला सर्व त्रिगर्तांसह आपलें सर्व सैन्य घेऊन उद्दिष्ट दिशेकडे जाऊं दे. तो आपल्या सैन्यांसह मत्स्यनगरींत आमच्या एक दिवस आधीं जाऊन पोंचेल आणि आपण त्याच्या मागून दुसऱ्या दिवशीं तेथें जाऊं. त्रिगर्तानें त्या विराटनगरीवर चाल करून गोपालांपासून विपुल गोधन घ्यावें व आपणहि आपल्या सैन्याचा विभाग करून सर्व लक्षणांनीं युक्त अशा एक लक्ष धेनूंचें हरण करूं."

( २ ) राजा, याप्रमाणें संकल्प करून ते सर्व महाबलाढ्य वीर रथांत बसून विपुल सैन्यासह हस्तिनापुराच्या आग्नेय दिशेकडे निघाले. सूड घेण्याची इच्छा करणारे ते त्रिगर्त गोहरण करण्यासाठीं आषाढ कृष्ण सप्तमीस विराटनगरींत जाऊन पोंचले आणि दुसऱ्या दिवशीं अष्टमीस सर्व कौरवांनीं एकत्र जमून हजारों धेनूंचें हरण केलें. ४. ४. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ त्रिगर्तांनीं केलेल्या गोहरणाचा वृत्तान्त गोपांच्या मुखानें ऐकून सैन्य व पांडव यांसह विराटाची त्रिगर्तावर चाल. ]

( १ ) **वैशंपायन**—हे महाराजा, इकडे मत्स्यदेशांतील त्या उत्तम नगरींत कपटवेष धारण करणारे अमित तेजस्वी महात्मे पांडव भूपति विराटाच्या राजमंदिरांत राहून स्वीकारलेलीं कामें करीत असतां प्रतिज्ञेचें वर्ष पुरें होत आलें. शत्रूंचा नाश करणारा पराक्रमी विराटराजा कीचकांचा वध झाला असतांहि उद्विग्न झाला नाहीं. त्यानें कुंतीपुत्र युधिष्ठिर कीचकाप्रमाणेंच आपला विजय करणारा आहे, असें मानिलें. त्यानंतर पांडवांच्या अज्ञातवासाच्या तेराव्या वर्षाच्या शेवटीं त्रिगर्ताधिपति सुशर्म्यानें विराटाच्या गोधनाचें हरण केलें. तेव्हां धेनूंचें रक्षण करणारा गोप अतिशय त्वरेनें नगरांत आला व कुंडलें धारण करणारा तो गोपाल मत्स्यराजाला पहातांच रथांतून खालीं उतरला.

सभेमध्यें कुंडलें व बाहुभूषणें धारण करणाऱ्या शूर योद्धयांनीं, मंत्र्यांनीं व महात्म्या पांडवांनीं परिवेष्टित होऊन बसलेल्या आणि राष्ट्राची वृद्धि करणाऱ्या विराटराजापाशीं तो गोप आला आणि राजाच्या समीप जाऊन प्रणामपूर्वक नम्रपणें म्हणाला—" हे महाराज, त्रिगर्तांनीं युद्धामध्यें बांधवांसह आम्हां सर्वांचा पराभव करून तुझ्या एक लक्ष धेनूंचें हरण केलें व ते आतां त्यांस आपल्या देशाकडे नेत आहेत. यास्तव हे राजेंद्रा, ते दूर जाण्याच्या पूर्वींच तूं आपलें गोधन पुनः प्राप्त करून घे. त्याचा नाश होऊं देऊं नको."

गोपाचें हें वचन ऐकतांच त्या विराटराजानें मत्स्यदेशांतील रथ, गज, अश्व यांनीं युक्त असलेलें विस्तीर्ण सैन्य सज्ज केलें. राजे व राजपुत्र यांनीं चकाकणारीं पोलादी व लोखंडी कवचें धारण केलीं. तीं तप्त सुवर्णासारखीं देदीप्यमान, शूरांनीं धारण करण्यास योग्य व विचित्र होतीं. विराटाचा प्रिय भ्राता जो शतानीक त्यानें सुवर्णपटलानें आच्छादित असलेलें लोखंडाचें दृढ व मंगलकारक कवच धारण केलें. शतानीकाचा कनिष्ठ भ्राता जो मदिराक्ष, त्यानें शंभर सूर्य, शंभर चक्रें, शंभर चंद्र व शंभर नेत्राकार पद्में यांनीं सुशोभित केलेलें पोलादी कवच चढविलें.

मत्स्यराजा विराटानें अभेद्य कवच धारण केलें. शंभर सुवासिक कमलें पसरलीं असतां, त्यांनाहि व्यापून टाकील इतकें तें कवच विशाल होतें. सूर्यदत्तानें

सूर्यप्रभेसारखें तेजस्वी सोनेरी कवच अंगांत घातलें. विराटाचा ज्येष्ठ पुत्र जो शंख त्यानें शंभर नेत्रांनीं चित्रित केलेलें वज्रासारखें दृढ व शुभ्र कवच चढविलें. त्याचप्रमाणें अनेक महारथांनीं शेकडों भिन्न भिन्न कवचें धारण केलीं आणि ते सर्व शत्रूंवर प्रहार करणारे देवस्वरूपी महारथ योद्धे शुभ्र, शोभिवंत व विशाल रथांवर आरूढ झाले. नंतर सूर्य व चंद्र यांच्यासारखी प्रभा असलेल्या सुवर्णयुक्त दिव्य रथावर मत्स्यराजाचा महाप्रतापशाली ध्वज उभारला. तेव्हां इतरहि शूर क्षत्रियांनीं आपापल्या रथांवर सुवर्णानें भूषविलेले विविध आकारांचे अनेक ध्वज रोविले.

तेव्हां हे भारता, विराटराजा आपल्या कनिष्ठ भ्रात्याला म्हणाला—" हे शतानीका, आपल्या आश्रयास असलेले कंक, बल्लव, तंतिपाल व ग्रंथिक हे चौघे वीर्यवान् पुरुष निःसंशय युद्ध करतील, असें मला वाटतें. यास्तव त्यांना ध्वज व पताका यांनीं युक्त असलेले रथ, दृढ, मृदु व विचित्र कवचें आणि आयुधें द्या. ते सर्व हत्तीच्या सोंडेसारख्या व वीरांना शोभणाऱ्या अवयवांनीं युक्त आहेत. ते आपल्या अंगावर कवचें चढवून आयुधें धारण करोत. ते युद्ध करणार नाहींत, असें मला वाटत नाहीं. "

मत्स्यराजाचें हें वचन ऐकतांच शतानीकानें तत्परतेनें सहदेव, युधिष्ठिर, भीम व नकुल या चौघां पांडुपुत्रांना पृथक् पृथक् रथ देण्याची आज्ञा केली, तेव्हां त्या राजनिष्ठ सारथ्यांनीं राजाज्ञेनुसार चार रथ सज्ज केले. विराटाची ही आज्ञा ऐकून ते पुण्य कर्में करणारे पांडव अतिशय हृष्ट झाले व त्या परंतप राजानें त्यांना जीं दृढ, मृदु व विचित्र कवचें पाठविलीं होतीं, तीं त्यांनीं धारण केलीं. नंतर ते पुरुषश्रेष्ठ आयुधांनीं सज्ज झाले व उत्तम अश्वयुक्त सुवर्ण रथावर आरूढ झाले, आणि शत्रुसैन्यांचा नाश करणारे, गुप्तरूपानें रहाणारे, युद्धविशारद व शूर असलेले ते चारी भ्राते विराटराजाच्या मागोमाग चालले.

त्यावेळीं ज्यांच्या गंडस्थलांतून मद गळत आहे असे मदोन्मत्त, सुंदर दंतांनीं युक्त व साठ वर्षांचे तरुण गजेंद्र राजाच्या मागोमाग जणु काय गतिमान् प्रचंड पर्वतासारखेच चालले होते.

हे राजा, त्या मत्स्याधिपतीचे युद्धकुशल, सदाचारी व प्रसन्नचित्त मुख्य वीर आठ हजार रथ, दहा हजार गज, साठ हजार अश्व व दोन लक्ष पायदळ इतक्या सैन्यासह विराटाला अनुसरले. हे भरतर्षभा, विराटराजाची गज, अश्व

रथ, दृढ आयुधें व असंख्य लोकसमुदाय यांनीं युक्त असलेली ती सेना गायींच्या पावलांचीं चिह्नें पहात वेगानें चालली. त्यावेळीं ती चपल सेना अतिशय शोभली. ४. ४. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ मत्स्य व त्रिगर्त यांचें तुमुल युद्ध. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, सूर्य अस्तास जाण्याच्या पूर्वींच सैन्याची व्यूह रचना करून ते सर्व शूर मत्स्यवीर नगरांतून बाहेर पडले व त्रिगर्तांच्या समीप जाऊन भिडले. तेव्हां गायींचें हरण करणारे त्रिगर्त आणि गायींना परत नेऊं इच्छिणारे मत्स्य यांचें तुमुल युद्ध सुरू झालें. ते महाबलाढ्य वीर परस्परांवर प्रहार करूं लागले. त्यावेळीं कुशल माहुतांनीं चालविलेल्या मदोन्मत्त प्रचंड हत्तीवर मुख्य मुख्य योद्धे आरूढ झाले होते. त्यांच्या अंगावर रोमांच उभे करणारा घोर संग्राम झाला. त्यांनीं परस्परांचा संहार करून यमलोकाची वृद्धि केली. सूर्यास्ताच्या समयीं पायदळ, रथ, हत्ती, घोडेस्वार, यांच्या अलोट समुदायांनीं परस्परांवर प्रहार करून संहार केला. तेव्हां त्यांचें तें युद्ध देवासुरांच्या संग्रामाप्रमाणें भासलें.

राजा, तीं दोन्ही बलाढ्य सैन्यें परस्परांशीं भिडलीं असतां भूमीवरून इतकी धूळ उडाली कीं, त्यानें अंतरिक्षापर्यंत कांहीं दिसेनासें झालें. सैन्यानें उधळलेल्या धूलीमुळें आकाशांतील पक्षी भूमीवर पडले. अतिशय तीक्ष्ण अग्रें असलेल्या, विद्युल्लतेसारख्या चकचकित सुवर्णपुंखयुक्त शरांनीं आदित्याला झांकून टाकिलें. योद्ध्यांच्या हातांतून सुटणारे सुवर्णपृष्ठयुक्त तीक्ष्ण बाण एकमेकांवर घांसून त्यांतून जीं किटाळें उडालीं, त्यांनीं अंतरिक्ष काजव्यांनीं युक्त झाल्यासारखें शोभलें. दोन्ही हातांनीं शरवृष्टि करणाऱ्या व शत्रूवर तुटून पडणाऱ्या त्या धनुर्धर लोकवीरांच्या हातांतील सुवर्णपृष्ठयुक्त धनुष्यें या हातांतून त्या हातांत जाऊं लागलीं.

रथ रथांशीं, पायदळ पायदळांशीं, घोडेस्वार घोडेस्वारांशीं, हत्ती हत्तींशीं, भिडले. ते क्षुब्ध झालेले वीर तरवारी, पट्टे, प्रास, शक्ति, तोमर इत्यादि विविध शस्त्रांनीं परस्परांचा वध करूं लागले. पण परिघांसारखे बाहु असलेले व समरांगणांत एकमेकाला मारणारे ते वीर परस्परांच्या शूर योद्ध्यांचा पराभव करूं शकले नाहींत.

राजा, त्या रणभूमीवर छिन्नभिन्न झालेलीं व धुळीनें माखलेलीं असंख्य शिरें पडलीं होतीं. त्यांतील कांहीं सुंदर नासिकांनीं युक्त होतीं, कांहींचे वरले ओंठ तुटून मुख उघडलें होतें, कांहींचे अलंकारयुक्त केंस पसरले होते. कित्येक कुंडलांनीं भूषित झालेलीं होतीं. क्षत्रियांच्या धिप्पाड मृत देहांनीं भूमि झांकून गेली. शरांनीं छिन्न भिन्न झालेलीं व अवयव तुटलेलीं तीं शरीरें शाखा तोडलेल्या विशाल शालवृक्षासारखीं दिसत होतीं. सर्पशरीरासारख्या दीर्घ व चंदनाची उटी लावलेल्या बाहूंनीं आणि कुंडलांनीं युक्त असलेल्या मस्तकांनीं तें रणांगण व्याप्त झालें होतें. त्या सैन्यांतील रथी, घोडेस्वार व पायदळ यांनीं परस्परांवर केलेल्या शस्त्रप्रहारांनीं जो रक्तप्रवाह वाहूं लागला, त्यानें त्या भूमीवरील उडणारी धूळ भिजून ती शांत झाली व तो घोर संग्राम अमर्याद होऊन योद्धे मूर्च्छित झाले. अंतरिक्षांत संचार करणारे बलाढ्य पक्षी भयंकर शरवृष्टीनें कंपित होऊन ध्वजाग्रांवर येऊन बसले. अंतरिक्ष बाणांनीं आच्छादित झाल्यामुळें त्यांच्या गतीला निरोध होऊं लागला.

राजा, विराटाचा कनिष्ठ भ्राता जो शतानीक, त्यानें शंभर व विशालाक्षानें चारशें योद्धयांना मारून त्या दोघां महारथांनीं त्रिगर्तांच्या प्रचंड सैन्यांत प्रवेश केला. त्या बलवान् वीरांनीं तुमुल युद्ध केलें. रथावर रथ आदळले. ते वीर शत्रूंचे केंस धरून त्यांस ओढूं लागले, नखांनीं परस्परांना विदीर्ण करूं लागले. याप्रमाणें अतिशय क्षुब्ध होऊन बाहुयुद्ध करीत असतां ते दोघेहि मूर्छित झाले. तेव्हां तत्काल सूर्यदत्त पुढून व मदिराक्ष मागून त्या सैन्यांत शिरला आणि घनघोर युद्ध सुरू झालें. विराटानें त्या संग्रामांत पांचशें रथ, आठशें अश्व व पांच महारथ, यांचा संहार केला. तो श्रेष्ठवीर रथांत बसून विविध मार्गांनीं त्या रणभूमीवर संचार करीत सुवर्णरथांत बसलेल्या त्रिगर्तांच्या सुशर्माराजावर चालून गेला. तेव्हां गोठ्यांतील बलाढ्य वृषभ जसे डुरकण्या फोडतात, त्याप्रमाणें त्या दोघां महाबलाढ्य महात्म्यांनीं परस्परांस पाहून गर्जना केली. हे राजा, त्यावेळीं युद्धाचा मद चढलेल्या सुशर्म्यानें नृपश्रेष्ठ मत्स्यराजाशीं रथानें द्वंद्वयुद्ध आरंभिलें. रथारूढ झालेल्या त्या दोघां वीरांनीं परस्पराभिमुख होऊन मेघांतून होणाऱ्या जलवृष्टीप्रमाणें शरांचा वर्षाव केला. ते दोघेहि असहिष्णु योद्धे क्षुब्ध झालेले असून अस्त्रविद्येंत निष्णात व तीक्ष्ण बाण, खड्ग, शक्ति आणि गदा यांनीं युक्त होते.

विराटराजानें सुशर्म्याला दहा बाणांनीं व त्याच्या चार अश्वांना पांच पांच

शरांनीं वेध केला. त्याचप्रमाणें परम-अस्त्रवेत्त्या युद्धदुर्मद सुशर्म्यानें मत्स्यराजाला पन्नास तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. त्यांच्या या भयंकर संग्रामानें सर्व सैन्य धूलीनें आच्छादून गेलें आणि विराट व सुशर्मा यांच्या सैन्याला स्वकीय व परकीय कोण, हेंहि ओळखतां येईनासें झालें. ४. ४. ३२.

---

## अध्याय ३३ वा.

[ १ युद्धांत सुशर्म्यानें केलेलें विराटाचें ग्रहण. २ युधिष्ठिराच्या आज्ञेनें भीमानें सुशर्म्याला जिकून विराटाची केलेली मुक्तता, सुशर्म्याचें ग्रहण. ३ युधिष्ठिरानें त्याची निर्भत्सनापूर्वक केलेली मुक्तता. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, त्यावेळीं दाही दिशा धूलीनें आच्छादून गेल्या व रात्रीचा अंधकारहि पसरला. त्यामुळें तें परस्परांवर प्रहार करणारें सैन्य चंद्रोदय होईपर्यंत युद्ध थांबवून स्वस्थ उभें राहिलें. पण ती कृष्णपक्षांतील सप्तमी असल्यामुळें चंद्रोदय होतांच सर्व अंधकाराचा नाश झाला व ती स्वच्छ प्रकाशयुक्त रात्र पाहून क्षत्रियांना युद्ध करण्यास अतिशय उत्साह आला. त्या शीतल चंद्रप्रकाशांत त्यांचें पुनः घोर युद्ध झालें.

त्यानंतर त्रिगर्तांचा राजा सुशर्मा आपल्या कनिष्ठ भ्रात्यांसह सर्व रथसमुदायांनीं युक्त होऊन मत्स्याधिपावर धांवून गेला. ते दोघे क्रुद्ध झालेले क्षत्रिय भ्राते हातांत गदा घेऊन रथांतून उतरले आणि मोठ्या वेगानें शत्रूवर तुटून पडले. त्याचप्रमाणें त्यांचीं क्रुद्ध झालेलीं सैन्यें गदा, तलवारी, परशु, प्रास, तीक्ष्ण धारांचे भाले, इत्यादि विविध शस्त्रांनीं परस्परांवर प्रहार करूं लागलीं. त्रिगर्ताधिपति सुशर्म्यानें मत्स्यराजाच्या सर्व सैन्याला जर्जर करून जिंकिलें व तो दुरात्मा पराक्रमी विराटावर धांवून गेला. त्या वीरानें विराटाच्या रथाचे दोन्ही अश्व आणि त्याच्या मागें असणारे दोघे राजरक्षक या सर्वांचा पृथक् पृथक् वध करून त्या विरथ झालेल्या मत्स्यराजाला जिवंत धरिलें आणि प्रथमच सासरीं जातेवेळीं रडणाऱ्या बालवधूला जसें ओढून वाहनांत बसवावें, त्याप्रमाणें त्या विराटराजाला आपल्या रथांत घालून तो सुशर्मा मोठ्या वेगानें निघाला. याप्रमाणें विरथ झालेल्या बलाढ्य विराटराजाला शत्रूनें बद्ध करून नेलें असतां त्रिगर्तांनीं हतबल केलेलें मत्स्यराजाचें सैन्य भयभीत होऊन मोठ्या त्वरेनें पळूं लागलें.

( २ ) राजा जनमेजया, अशा प्रकारें तें सैन्य त्रस्त झालें असतां कुंतीपुत्र युधिष्ठिर शत्रुनाशक महाबाहु भीमसेनाला म्हणाला—"हे वीरा, त्रिगर्त सुशर्मा मत्स्यराजाला बांधून नेत आहे, त्याला सत्वर सोडीव. तो राजा शत्रूंच्या स्वाधीन न होवो. हे भीमसेना, आपण त्याच्या गृहांत सुखानें राहिलों आहों. त्यानें आपला सर्व प्रकारें सत्कार केलेला आहे. यास्तव यावेळीं त्याच्या या ऋणांतून मुक्त होणें हें तुझें कर्तव्य आहे."

भीमसेन—हे धर्मराजा, तुझ्या आज्ञेप्रमाणें मी आतां त्या मत्स्याधिपाला सोडवितों व शत्रूंशीं युद्ध करणाऱ्या माझें अचाट कर्म तुम्हांला दाखवितों. स्वबलाचा आश्रय करून तुम्ही तिघेहि भ्राते एका बाजूला स्वस्थ बसून आज माझा पराक्रम पहा. हा येथें एखाद्या गदेसारखा शाखायुक्त विशाल महावृक्ष दिसत आहे. तो उपटून मी त्याच्या प्रहारानें सर्व शत्रूंना पळवून लावितों.

हे पांडवेया, असें बोलून एखाद्या मत्त गजाप्रमाणें त्या वृक्षाकडे पहाणाऱ्या आपल्या वीर भ्रात्याला धर्मराज युधिष्ठिर म्हणाला—"भीमसेना, असें साहस करूं नको. तो वृक्ष आपल्या जागींच राहूं दे. तूं वृक्ष उपटून अतिमानुष कर्म करूं लागलास तर सर्व लोक 'हा भीम आहे' असें तत्काल ओळखतील. यास्तव बा भीमा, तूं धनुष्य, खड्ग, शक्ति, परशु किंवा अन्य एखादें आयुध घेऊनच मनुष्यासारखें युद्ध कर. ज्यायोगें तुला कोणी ओळखणार नाहीं, असें शस्त्र घेऊन या भूपतीला शत्रूच्या हातून सत्वर मुक्त कर. महाबलवान् नकुल-सहदेव तुझ्या रथचक्राचें रक्षण करतील. त्यांच्यासह तूं समरांगणांत युद्ध करून मत्स्यराजाला सोडीव."

राजा, युधिष्ठिराचें हें वचन ऐकतांच महाबलाढ्य भीमसेन श्रेष्ठ धनुष्य धारण करून जलपूर्ण मेघ जशी जोराची पर्जन्यवृष्टि करितो, तसा अतिशय वेगानें शरवृष्टि करूं लागला. तो वीरश्रेष्ठ भीम भयंकर कर्में करणाऱ्या सुशर्म्यावर धांवून गेला आणि विराटाकडे पाहून व त्याला 'हे साधो,' असें संबोधून सुशर्म्याला 'थांब थांब,' असें म्हणाला. तेव्हां त्यानें मागें वळून पाहिलें व आपल्या मागून 'थांब, थांब,' असें बोलणारा कालांतक यमासारखा पुरुष येत असलेला पाहून तो सचिंत झाला. लगेच तो रथिश्रेष्ठ सुशर्मा हातांत धनुष्य घेऊन आपल्या भ्रात्यांसह परत फिरला आणि 'हा आतां माझें युद्ध-कौशल्य पाहो व मी याचें शौर्य पाहीन,' असें म्हणून तो पुनः युद्धांत प्रवृत्त

ाला. त्याबरोबर इतरहि सर्व रथी मागें वळले व त्यांचें तुमुल युद्ध सुरू झालें. ीमसेनानें त्रिगर्तांचे रथी, गज, अश्व व पायदळ यांचे सहस्रावधि संघ व उग्र ानुष्यें धारण करणारे शूर योद्धे या सर्वांचा विराटाच्या समक्ष संहार करून ाकला. याप्रमाणें त्या महात्म्या भीमानें हातांत गदा घेऊन शत्रुसैन्याचा ुव्वा उडविला असतां युद्धदुर्मद सुशर्मा आपलें किती सैन्य मारलें गेलें याचा वेचार करूं लागला. 'ज्याअर्थीं माझा भ्राता या सैन्यामध्यें कोठें दिसत नाहीं, याअर्थीं त्याचा वध होऊन अपरिमित सैन्याचाहि निःसंशय नाश झाला असावा.' असें बोलून सुशर्म्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढिलें आणि तीक्ष्ण ाणांची वृष्टि केली. इकडे पांडवांनीं आपले रथ त्रिगर्तांच्या सैन्याकडे वळवि- ठेले आहेत, असें पहातांच विराटाच्या सर्व सैन्यानें आपापले अश्व रणांगणा- कडे फिरविले व ते सर्व शत्रूचा प्रतिपराभव करूं इच्छिणारे मत्स्यवीर दिव्य अस्त्रांचा वर्षाव करूं लागले. विराटाचा पुत्र अतिशय क्रुद्ध होऊन अद्भुत ुद्ध करूं लागला.

कुंतीपुत्र युधिष्ठिरानें शत्रूंचे एक सहस्र योद्धे मारले. भीमानें सात सहस्र ीरांना यमलोक दाखविला. नकुलानें बाणवृष्टि करून सातशें व प्रतापवान् सहदेवानें युधिष्ठिराच्या आज्ञेनें तीनशें सैनिकांचा वध केला. याप्रमाणें त्रेगर्तांच्या प्रचंड सैन्याचा निःपात करून महारथ युधिष्ठिर त्वरेनें सुशर्म्यावर ांवून गेला व त्यावर शरांचा वर्षाव करूं लागला. तेव्हां सुशर्म्यानें नऊ ाणांनीं युधिष्ठिराला व त्याच्या चार अश्वांना चार चार बाणांनीं तत्काल ंध केला.

राजा, त्यानंतर वेगवान् कुंतीपुत्र वृकोदर पुढें झाला व त्यानें सुशर्म्याच्या अश्वांना तीक्ष्ण बाणानें मारून त्याच्या पृष्ठरक्षकांचा वध केला आणि याच्या सारथ्याला रथावरून खालीं पाडिलें. तेव्हां विराटाचा शूर भ्राता थचक्ररक्षक मदिराक्ष विरथ झालेल्या सुशर्म्यावर धांवून गेला व त्यानें प्रहार केला, तेव्हां तो रथाचा त्याग करून पळूं लागला. तें पहातांच विराटानें सुशर्म्याच्या रथांतून खालीं उडी टाकिली व त्या त्रिगर्ताधिपाचीच गदा घेऊन ो वीर त्याचा पाठलाग करूं लागला. विराटराजा वृद्ध असूनहि हातांत गदा ोऊन हर्षातिरेकानें एखाद्या तरुणाप्रमाणें त्या रणक्षेत्रांत उत्साहानें फिरूं लागला.

त्रिगर्ताधिपति सुशर्मा पळत असलेला पाहून भीम त्याला म्हणाला—" हे क्षत्रियपुत्रा, परत फिर. युद्धांतून पळून जाणें तुला युक्त नाहीं. अरे, अशाच

पराक्रमानें का तूं गायींचें बलानें हरण करणार ? आपल्या अनुचरांस शत्रुसमूहांत सोडून तूं निघून कसा जात आहेस ?"

राजा, भीमाचें हे मर्मभेदक वचन ऐकतांच तो रथाचा स्वामी सुशर्मा परत फिरला व भीमाला 'थांब, थांब,' असें बोलून त्याच्यावर वेगानें धांवून गेला. त्यावेळीं त्याचा जीव घेण्याची इच्छा करणारा भयंकर पराक्रमी भीमसेनहि रथांतून उतरून निर्भयपणें सुशर्म्यावर तुटून पडला. त्यावेळीं सिंह जसा क्षुद्र हरिणीचा पाठलाग करितो, त्याप्रमाणें तो वीर्यवान् भीम त्रिगर्तेश्वराच्या मागें धांवला. त्यानें सुशर्म्याचे केंस धरून त्याला ओढिलें व क्रोधानें त्याला भूमीवर जोरानें आपटिलें. नंतर वेदनांनीं विह्वल झालेल्या त्याच्या मस्तकावर लत्ताप्रहार करून त्या महाबाहु भीमानें गुडघे व हाताच्या मुष्टि यांचे आघात केले. तेव्हां त्या भयंकर प्रहारांनीं पीडित झालेला तो सुशर्माराजा मूर्च्छित झाला. याप्रमाणें त्रिगर्तांचा महारथ राजा विरथ होऊन शत्रूंच्या हातीं सांपडला असतां त्याचें सर्व सैन्य भयाकुल होऊन पळत सुटलें.

राजा जनमेजया, त्यावेळीं महारथ पांडुपुत्रांनीं विराटाच्या सर्व धेनु परत वळविल्या आणि सुशर्म्यानें लुटलेलें सर्व धनहि त्याला जिंकून त्याच्यापासून परत घेतलें. नंतर ते अकार्याविषयीं लज्जा बाळगणारे, नियतव्रत व स्वतःच्या बाहुबलाचा आश्रय करणारे महात्मे पांडव विराटाच्या क्लेशांचा परिहार करून त्याच्या समीप येऊन उभे राहिले.

तेव्हां भीमसेन युधिष्ठिराकडे पाहून व विराटाला उद्देशून सामान्यतः दोघांनाहि 'राजा' असें संबोधून म्हणाला—"हा दुराचारी सुशर्मा माझ्या हातून जिवंत सुटणें मला योग्य दिसत नाहीं. परंतु हा राजा सतत दयाळु असल्यामुळें माझा कांहीं उपाय नाहीं."

असें बोलून पृथापुत्र वृकोदरानें त्या त्रिगर्तांच्या राजाची मानगुटी धरून त्याला ओढीत आणिलें व पराधीन झालेल्या त्याला दोरीनें दृढ बांधिलें. नंतर धूलीनें माखलेल्या व संज्ञाशून्य झालेल्या त्या राजाला रथांत घालून रणांगणाच्या मध्यभागीं असलेल्या युधिष्ठिरापाशीं आणिलें आणि त्याला दाखविलें.

( ३ ) त्या नराधिप सुशर्म्याची ती दीन अवस्था पाहून पुरुषव्याघ्र धर्मराजाच्या मनांत दया उत्पन्न झाली व तो रणांगणांत शोभणाऱ्या भीमाला हंसून म्हणाला—"हे वीरा, या नराधमाला सोडून दे. राजा अवध्य आहे."

युधिष्ठिराची ही आज्ञा ऐकतांच भीम महाबलाढ्य सुशर्म्याला म्हणाला— "हे मूढा, तुला जर जिवंत रहाण्याची इच्छा असेल, तर मी काय सांगतों तें ऐक. 'मी दास आहें,' असें जर तूं लोकसभेंत व राजसमुदायांत येऊन बोलशील तर मी तुला जिवंत सोडीन. युद्धांत जिंकलेल्या राजांना जीवदान देण्याचा हाच नियम आहे."

भीमाचें हें भाषण ऐकून त्याचा ज्येष्ठ भ्राता त्याला प्रेमानें म्हणाला—"हे आयुष्मन्, तुला जर आमचें म्हणणें मान्य असेल तर तूं या अधमाला सोड. हा विराटराजाच्या दासभावाला प्राप्त झाला आहे. त्याला आतां सोडून दे."

भीमाला असें बोलून धर्मराज सुशर्म्याकडे वळून म्हणाला—"हे सुशर्मन्, आम्हीं तुला मुक्त केलें आहे. आतां तूं दास नाहींस, जा आणि पुनः असें कधींहि करूं नको." ४. ४. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

[ १ त्या रात्रीं रणांगणांतच रहाणाऱ्या विराटानें पांडवांचा वित्तादिकांनीं केलेला सत्कार. २ पांडवांनीं केलेलें त्याचें अभिनंदन. ३ युधिष्ठिराच्या वचनावरून विराटनगरींत दूत पाठवून सूर्योदयसमयीं केलेली राजाची जयघोषणा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, युधिष्ठिराचें तें वचन ऐकून लज्जित झालेला सुशर्मा अधोमुख झाला. त्याला बंधमुक्त केलें असतां तो विराटराजाजवळ आला व राजाला अभिवादन करून आपल्या नगरीकडे निघून गेला. याप्रमाणें सुशर्म्याला सोडून देऊन ते शत्रूंचा वध करणारे, पराक्रमी, नियतव्रत पांडव त्या समरांगणांतच रात्रभर सुखानें राहिले. त्यावेळीं विराटराजानें त्या अतिमानुष पराक्रम करणाऱ्या महारथ कौंतेयांना धन व मान देऊन त्यांचा मोठा सत्कार केला.

**विराट** म्हणाला—हे शूरहो, माझी ही सर्व संपत्ति व गज-अश्वादि रत्नें तुमचींच आहेत, असें समजून तुमच्या इच्छेप्रमाणें त्याचा खुशाल उपभोग घ्या. मी तुम्हांला अलंकृत केलेल्या कन्या व विविध प्रकारचें धन किंवा तुम्हांला जें कांहीं इष्ट असेल तें देतों. युद्धांमध्यें शत्रूंचा संहार करणाऱ्या हे वीरांनो, आज केवल तुमच्या पराक्रमानें मी शत्रूच्या हातून सुटलों व येथें

स्वस्थ चित्तानें बसण्यास समर्थ झालों. यास्तव तुम्हीच सर्व मत्स्यदेशाचे खरे स्वामी अहां.

( २ ) राजा, मत्स्याधिपति विराट असें बोलला असतां ते सर्व पांडुपुत्र युधिष्ठिराला पुढें करून हात जोडून पृथक् पृथक् असें म्हणाले—" हे भूपाला, तुझ्या या वचनाचें आम्ही अभिनंदन करितों. हे नृपश्रेष्ठा, आज तूं शत्रूच्या हातांतून मुक्त झालास, एवढ्यानेंच आम्हाला परम संतोष झाला आहे."

हें ऐकून हृष्ट झालेला महाबाहु विराटराजा युधिष्ठिराला पुनः म्हणाला—" हे द्विजश्रेष्ठा, ये, मी तुला मत्स्यदेशाचा राज्याभिषेक करितों. या पृथ्वीवर दुर्लभ असलेल्या कोणत्याहि वस्तूची तूं मनांत इच्छा करीत असलास तरी मी ती तुला देईन. आमचें जें कांहीं आहे, तें सर्व ग्रहण करण्यास तुम्ही योग्य अहांत.

हे वैयाघ्रपद्य विप्रेंद्रा, मी तुला प्रणाम करितों. माझ्या सर्व धेनु, रत्नें, सुवर्ण व इतर सर्व ऐश्वर्य यांचा तूंच अधिपति आहेस. तुझ्यामुळेंच मी आज माझें राज्य व संतति यांना पुनः पहात आहें. कारण मी जेव्हां शत्रूंच्या हातीं सांपडलों तेव्हां अतिशय भयभीत झालों होतों. पण तुमच्या सामर्थ्यामुळेंच त्यांच्या वश न होतां सुटून आलों."

तेव्हां युधिष्ठिर पुनः मत्स्यराजाला म्हणाला—हे मत्स्याधिपा, तुझ्या या मनोहर भाषणाचें मी अभिनंदन करितों. हे राजा, तूं दयाळु व प्रियवादी होऊन सतत सुखी हो. हे नृपश्रेष्ठा, तूं आतां अगोदर आपल्या दूतांना नगरांत पाठीव. तुझ्या आज्ञेनें ते तुझ्या सुहृदांना हें प्रिय वृत्त कळवून नगरामध्यें तुझ्या जयाची घोषणा करूं देत.

( ३ ) युधिष्ठिराच्या वचनाप्रमाणें विराटराजानें दूतांना आज्ञा केली. मत्स्यराज म्हणाला—" हे दूतहो, तुम्ही नगरींत जाऊन माझ्या विजयाची घोषणा करा आणि मंगल वाद्यें व अलंकारांनीं मंडित झालेल्या गणिका यांच्यासह नगरींतील कुमारिका भूषणांनीं अलंकृत होऊन मला सामोऱ्या येवोत."

मत्स्यराजाची ही आज्ञा शिरसा वंद्य मानून ते हृष्टचित्त झालेले दूत मोठ्या त्वरेनें रात्रींच निघाले आणि सूर्योदयाच्या वेळीं नगरींत प्रवेश करून विराटराजाचा जयघोष करूं लागले. ४. ४. ३४.

---

## अध्याय ३५ वा.

[ १ कौरवांचा विराटनगरींत प्रवेश, त्यांनीं केलेलें गोहरण. २ आक्रोश करणाऱ्या गोपाध्यक्षाचा राजसदनात प्रवेश, विराटपुत्राला गोहरणवृत्तकथन व युद्धाचें प्रोत्साहन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, मत्स्यराज विराट त्रिगर्तांवर चालून जाऊन आपलें गोधन परत मिळविण्याची इच्छा करीत असतां, इकडे अमात्यांसह दुर्योधन विराट नगरीच्या समीप आला. त्याच्याबरोबर भीष्म, द्रोण, कर्ण, कृप, अश्वत्थामा, शकुनि, दुःशासन, विविंशति, विकर्ण, चित्रसेन, दुर्मुख, दुःशल व इतरहि महारथ होते. त्या सर्वांनीं मत्स्यदेशांत प्रवेश करून विराटराजाच्या गोपालांना पळवून त्याच्या सर्व गोधनाचें मोठ्या त्वरेनें हरण केलें. ते कौरव साठ सहस्र धेनूंच्या कळपाला प्रचंड रथसमूहानें सभोंवार वेढून, घेऊन चालले. त्या महारथांनीं गोपालांना ताडण केलें. त्यांच्या अंगावर भयंकर प्रहार केले. तेव्हां त्यांनीं फार मोठा आक्रोश केला. इतक्यांत भयभीत झालेला गोपाध्यक्ष सत्वर रथारूढ झाला व दुःखार्त होऊन आक्रोश करीत नगराकडे निघाला. राजधानींत प्रवेश करून तो राजमंदिरापाशीं आला व रथांतून उतरून हा वृत्तांत कथन करण्यासाठीं मोठ्या त्वरेनें आंत गेला.

( २ ) हे राजा, तेथें विराटराजाचा मानी पुत्र भूमिंजय त्याच्या दृष्टीं पडला. याच राजपुत्राचें उत्तर असेंहि दुसरें नांव होतें. त्या गोपाध्यक्षानें राष्ट्रांतील गोहरणाचें सर्व वृत्त त्याला निवेदन केलें. तो म्हणाला—" हे राजपुत्रा, तुझ्या साठ हजार धेनु कौरवांनीं हरण केल्या आहेत. यास्तव ऊठ व आपलें गोधन जिंकून परत आण. हे राष्ट्रवर्धना, आपल्या हिताकडे लक्ष देऊन तूं स्वतः सत्वर बाहेर पड. सर्व सेनेसह युद्धाला जाणाऱ्या विराटराजानें तुला या मत्स्यदेशाचा शून्यपाल[1] नेमिलें आहे. शिवाय तो पृथ्वीपति राजसभेंत ' माझा हा पुत्र मला सर्वथा अनुरूप व शूर आहे. तो कुलाची कीर्ति वाढविणारा, धनुर्विद्येंत प्रवीण व वीर आहे, ' अशी तुझी नेहमीं प्रशंसा करीत असतो. तेव्हां त्या नृपश्रेष्ठाचें भाषण आज तूं सत्य करून दाखीव. त्या कुरूंना जिंकून आपले श्रेष्ठ पशु परत मिळीव. आपल्या भयंकर शरांच्या तेजानें व धनुष्यापासून सुटलेल्या सुवर्ण-

---

१ जो एकटा सामर्थ्यवान् पुरुष वीररहित नगराचें रक्षण करितो, त्याला शून्यपाल म्हणतात.

पुंखयुक्त नतपर्व बाणांनीं शत्रूच्या सैन्याचा नाश कर. दोन टोकें हींच जिचीं तारा जोडण्याचीं स्थानें आहेत, प्रत्यंचा हीच जिची तार आहे, धनुष्याची कांब हाच जिचा दंड आहे व बाण हेच जिच्यांतून निघणारे स्वर आहेत, अशी आपली भयंकर नाद करणारी धनुष्यरूपी वीणा तूं आज शत्रूंमध्यें वाजीव. आपल्या रथाला रजतासारखे शुभ्र अश्व जोडून त्यावर सुवर्णाचा सिंहाकार ध्वज उभार.

हे प्रभो, शीघ्र वेध करणाऱ्या तुझ्या हातांतून सुटलेले व राजांच्या मार्गाचा निरोध करणारे सुवर्णपृष्ठयुक्त तीक्ष्ण बाण आज सूर्याला झांकून टाकोत. हे राजपुत्रा, इंद्र जसा असुरांना जिंकतो, तसा तूं रणामध्यें सर्व कौरवांना जिंकून महद्यश मिळीव आणि आपल्या नगरींत पुनः प्रवेश कर. अजिंक्य वीरांतील श्रेष्ठ धनंजय जसा पांडवांची परमा गति आहे, तसा तूं मत्स्यराजाचा पुत्र राष्ट्राचा व आम्हां नगरवासियांचा श्रेष्ठ आधार आहेस. आम्ही सर्व नागरिक आज तुजवर अवलंबून आहों.''

राजा, त्या गोपाध्यक्षाचें हें भाषण ऐकून उत्तर अंतःपुरांतील स्त्रियांच्या पुढें आत्मश्लाघा करीत असें अभयप्रद वचन बोलला. ४. ४. ३५.

---

## अध्याय ३६ वा.

[ १ विराटपुत्राची आत्मश्लाघा. २ सैरंध्रीनें बृहन्नलेला सारथि करण्याविषयीं केलेली प्रेरणा. ३ बृहन्नलेकडे उत्तरेचें प्रेषण. ]

( १ ) उत्तर—हे गोपाध्यक्षा, मला जर कोणी अश्वज्ञ सारथि असता, तर दृढ धनुष्य धारण करणारा मी आतांच गायींच्या मागोमाग त्यांना सोडवावयास गेलों असतों. परंतु माझा सारथि होऊं शकेल, असा एकहि पुरुष मला दिसत नाहीं. युद्धाला निघालेल्या मला योग्य असा एखादा सारथि असला तर सत्वर पहा. नुकतेंच अठ्ठावीस दिवस, किंवा जवळ जवळ महिनाभर जें महायुद्ध झालें, त्यांत माझा सारथि मारला गेला. आतां जर मला एखादा अश्वगतिज्ञ सारथि लाभेल, तर मी मोठ्या त्वरेनें निघेन आणि महाध्वजांनीं युक्त व गज, अश्व, रथ यांनीं व्याप्त असलेल्या शत्रुसैन्यांत प्रवेश करून माझ्या शस्त्रप्रतापानें निर्वीर्य झालेल्या कौरवांना जिंकून धेनु परत घेऊन येईन.

देवेंद्रानें जसा दानवांचा पराभव केला, त्याप्रमाणें संग्रामांत दुर्योधन, भीष्म, सूर्यपुत्र कर्ण, कृप, पुत्रासह द्रोण व इतरहि धनुर्धरांना भयभीत करून मी एका क्षणांत गायी परत घेऊन येईन. अहो, जेथें कोणी वीर नाहीं, अशा शून्य प्रदेशांतून कौरवांनीं गायी पळविल्या आहेत. त्यावेळीं मी तेथें नव्हतों, त्याला मी तरी काय करूं ? येथें जमलेले ते सर्व कौरव आज माझा पराक्रम पाहोत. हा साक्षात् पृथापुत्र अर्जुनच आहे कीं काय असा त्यांना मला पहातांच भास होईल.

राजा जनमेजया, अर्जुनानें त्या राजपुत्राची आत्मश्लाघा ऐकिली व आपल्या अज्ञातवासाचा काल आतां पूर्ण झाला आहे, हें जाणून संतुष्ट झालेला व सर्व कर्तव्य जाणणारा तो पार्थ सत्य-आर्जवादि गुणांनीं युक्त व भर्त्याच्या हितांत तत्पर असलेल्या आपल्या पांचाली भार्येला एकांतांत म्हणाला—" हे कल्याणि, तूं माझ्या आज्ञेनें उत्तराला जाऊन सांग कीं, ही बृहन्नला पूर्वीं पांडवांना अतिशय संमत असलेली सारथि होती. या महायुद्धांत ती तुझें उत्तम सारथ्य करील."

(२) राजा, स्त्रियांमध्यें पुनः पुनः आत्मश्लाघा करून अर्जुनाची बरोबरी करणारें तें राजपुत्राचें भाषण द्रौपदीला सहन झालें नाहीं. ती तपस्विनी स्त्रियांमध्यें बडबड करणाऱ्या त्या विराटपुत्रापाशीं जाऊन जणुंकाय लाजत हळूच असें म्हणाली—" हे वीरा, हा 'बृहन्नला'-नांवानें प्रसिद्ध व धिप्पाड हत्तीप्रमाणें असलेला प्रियदर्शन तरुण पूर्वीं पार्थाचा सारथि होता. तो त्या महात्म्या धनुर्धराचा धनुर्विद्येंत निष्णात असलेला शिष्य आहे. मीं पूर्वीं त्याला पांडवाबरोबर फिरतांना पाहिलें आहे. ज्यावेळीं अग्नीनें तें विस्तीर्ण खांडववन दग्ध केलें, तेव्हां अर्जुनाच्या उत्तम अश्वांचें यानेंच नियमन केलें होतें. या सारथ्याच्या साह्यानेंच पार्थानें खांडवप्रस्थांतील सर्व प्राण्यांना जिंकिलें होतें. याच्यासारखा कुशल सारथि नाहीं."

उत्तर म्हणाला—हे सैरंध्रि, ज्याअर्थीं तूं या तरुणाला जाणतेस, त्याअर्थीं तो जसा दिसतो तसा क्लीब नसावा! परंतु मी स्वतः त्याला माझें 'सारथ्य कर' असें सांगण्यास समर्थ नाहीं.

---

१ खांडववनदाहप्रसंगीं अर्जुनानें स्वतःच सारथ्य केलें होतें. त्यामुळें द्रौपदीला अनृतवादित्वाचा दोष लागत नाहीं.

(३) द्रौपदी—हे राजपुत्रा, ही तुझी कनिष्ठ भगिनी येथें आहे, तिला सांग. त्या सुंदर कुमारीचें वचन तो निःसंशय ऐकेल. तो जर तुझा सारथि झाला तर सर्व कौरवांना जिंकून तूं सत्वर गायींना घेऊन परत येशील, यांत संशय नाहीं.

राजेंद्रा, सैरंध्रीचें हें भाषण ऐकतांच तो राजपुत्र आपल्या भगिनीला म्हणाला—" हे मनोरमे, जा आणि त्या बृहन्नलेला घेऊन ये." तेव्हां भ्रात्यानें पाठविलेली ती नृपनंदिनी मोठ्या त्वरेनें निघाली आणि जेथें तो महाबाहु पांडव क्लीबवेषानें रहात होता, त्या नृत्यशालेंत आली. ४. ४. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १ भ्रात्याचें सारथ्य करण्याविषयीं उत्तरेची ब्रहन्नलेला प्रार्थना. २ ब्रहन्नलेचें उत्तरासमीप आगमन. त्याची सारथ्याच्या स्थानीं योजना. ३ कवचादि धारण करण्यांत अर्जुनानें दाखविलेलें अज्ञान. ४ त्याच्यासह उत्तराचें कौरवसेनेकडे गमन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, ज्येष्ठ भ्रात्यानें पाठविलेली सुवर्णमाला धारण करणारी, यशस्विनी, पद्मपत्रासारखी प्रसन्न, मयूरपिच्छानें मस्तक अलंकृत केलेली, विचित्र रत्नांच्या मेखलेनें भूषित झालेली व भ्रात्याच्या आज्ञेंत वागणारी ती मत्स्यराजाची कन्या मेघमंडलांतील विद्युल्लतेप्रमाणें त्या नृत्यशालेंत आली. त्यावेळीं सुंदर दंतांनीं युक्त असलेली ती सुमध्यमा हत्तीण जशी हत्तीपाशीं जाते तशी शोभली. ती उत्कृष्ट, कोणाच्याहि मनाला प्रसन्न करणारी, इंद्राच्या श्रीप्रमाणें सर्वांना पूज्य असलेली, सुंदर व यशस्विनी विराटकन्या अर्जुनाशीं प्रीतीनें कांहीं बोलणार, तोंच पार्थ त्या राजकुमारीला पाहून म्हणाला—" हे मृगाक्षि, तूं इतक्या त्वरेनें कां आली आहेस? हे भामिनि, तुझें मुख प्रसन्न कां दिसत नाहीं? काय असेल तें मला सत्वर सांग."

हे भारता, याप्रमाणें अर्जुनानें हंसतच त्या विशालाक्षी राजपुत्रीला विचारिलें असतां सखींसह असलेली ती प्रियवादिनी त्या पुरुषश्रेष्ठाजवळ जाऊन मोठ्या प्रेमानें म्हणाली—" हे बृहन्नले, कौरवांनीं आमच्या राष्ट्रांतील गायींचें हरण केलें आहे. त्यांना जिंकून परत आणण्यासाठीं माझा धनुर्धर भ्राता जाणार आहे, परंतु नुकत्याच झालेल्या संग्रामांत त्याचा सारथि मारला गेला. त्यामुळें आज त्याचें सारथ्य करण्यास योग्य असा कोणी सूत नाहीं. बृहन्नले, माझा भ्राता सारथि मिळविण्याचा प्रयत्न करीत असतां सैरंध्रीनें तुझें अश्वनिपुणत्व

त्याला सांगितलें व ती म्हणाली—" पूर्वी तूं अर्जुनाचा प्रिय सारथि होतास. त्या श्रेष्ठ पांडवानें तुझ्याच साह्यानें सर्व पृथ्वी जिंकिली." यास्तव तूं आतां माझ्या भ्रात्याचें उत्तमप्रकारें सारथ्य कर. जोंवर कौरवांनीं आमच्या धेनु दूर नेल्या नाहींत, तोंवर त्यांना जिंकून आणा. हे बृहन्नले, मी तुला अतिशय प्रेमानें सांगत असलेलें हें वचन जर तूं ऐकणार नाहींस व मीं नियुक्त केलेलें कार्य करणार नाहींस तर मी खरोखर प्राणत्याग करीन. "

( २ ) आपल्या सखींसह अकस्मात् आलेली ती सुकुमारी असें बोलली असतां अमित पराक्रमी परंतप अर्जुन त्या राजकुमारापाशीं गेला. त्याच्या मागोमाग जाणारी ती विशालाक्षी उत्तरा हत्तीच्या बालवधूसारखी शोभली. एखाद्या मत्त गजाप्रमाणें येत असलेल्या त्या पार्थाला दूरूनच पाहून राजपुत्र त्याला म्हणाला—" हे बृहन्नले, 'पूर्वी पार्थानें तुलाच सारथि करून खांडववनांत अग्नीला तृप्त केलें व त्या कुंतीपुत्र धनंजयानें सर्व पृथ्वी जिंकिली ' असें ही सैरंध्री सांगत आहे. ती सर्व पांडवांना ओळखते. यास्तव तूं पूर्वी अर्जुनाचे अश्व जसे चालविलेस, त्याप्रमाणें कौरवांशीं युद्ध करून आपलें गोधन परत आणण्याची इच्छा करणाऱ्या माझ्या अश्वांचेंहि तूं नियमन कर."

राजपुत्राचें हें भाषण ऐकून बृहन्नला म्हणाली—हे वीरा, रणांगणांत जाऊन सारथ्य करण्याचें माझें काय सामर्थ्य आहे? गायन, नृत्य किंवा विविधप्रकारचें वादन मला सांग. तें मी करून दाखवीन. तुझें कल्याण असो. पण मला सारथ्य कसें येणार ?

यावर उत्तर म्हणाला—हे बृहन्नले, तूं गायक, नर्तक किंवा कोणीहि कां असेनास ? सांप्रत माझ्या रथावर सत्वर आरूढ होऊन माझ्या उत्तम अश्वांचें नियमन कर.

( ३ ) राजा परिक्षिता, याप्रमाणें राजपुत्रानें अर्जुनाला प्रवृत्त केलें असतां त्या युद्धविशारद पांडवानें अंतःपुरांतील स्त्रियांना हंसविण्यासाठीं उत्तरादि कन्यांच्या समक्ष बरीच चेष्टा केली. त्यानें प्रथम कवच उलटेंच चढविलें. गुडघ्यावर बांधावयाचे जानुरक्ष मस्तकावर बांधिले. भुजांचें रक्षण करणारें कवच कंठांत अडविलें. पृष्ठरक्षक कवच मस्तकावर ठेविलें. तेव्हां त्या सर्व विशालाक्षी कुमारी त्याला पाहून हंसूं लागल्या. त्यावेळीं याला कवचाची माहिती नाहीं. या कामांत हा अगदीं मूढ आहे, असें समजून राजपुत्रानें तें

अमूल्य महत् कवच आपल्या हातानें बृहन्नलेच्या अंगावर चढविलें आणि त्यानेंहि सूर्यप्रभेसारखें चकाकणारें तें बहुमोल कवच धारण केलें. नंतर उत्तरानें आपला सिंहाकार ध्वज उभारून बृहन्नलेला रथावर सारथ्याच्या जागीं बसविलें व मोठालीं धनुष्यें व तीक्ष्ण बाण यांनीं सज्ज होऊन बृहन्नला ज्याचा सारथि आहे असा तो वीर रथारूढ होऊन निघाला.

तेव्हां राजकन्या उत्तरा व तिच्या सख्या म्हणाल्या—" हे बृहन्नले, संग्रामांत आलेल्या भीष्म-द्रोणादि कौरवांना जिंकून त्यांचीं सुंदर, सूक्ष्म, मृदु व चित्र-विचित्र वस्त्रें आमच्या बाहुल्यांसाठीं घेऊन ये. "

याप्रमाणें त्या कन्या बोलल्या असतां पांडुपुत्र पार्थ हंसून मेघ-दुंदुभीसारख्या गंभीर वाणीनें म्हणाला—" ठीक आहे, जर हा राजपुत्र उत्तर संग्रामांत त्या महारथांना जिंकील, तर मी त्यांचीं दिव्य व सुंदर वस्त्रें अवश्य घेऊन येईन."

( ४ ) असें बोलून त्या शूर धनंजयानें नानाध्वज-पताकांनीं युक्त असलेल्या कौरवसेनेच्या संमुख अश्व चालविले.

राजा, त्यावेळीं बृहन्नलेसह महाबाहु उत्तराला उत्तम रथांत बसलेलें पाहून स्त्रिया, कन्या व सुव्रत द्विज यांनीं त्याच्या रथाला प्रदक्षिणा घातली व स्त्रिया म्हणाल्या—" हे बृहन्नले, पूर्वीं ऋषभासारखी गति असलेल्या अर्जुनाला खांडवदाहप्रसंगीं तूं सारथ्य केल्यामुळें जें मंगल प्राप्त झालें, तसेंच मंगल आज कौरवांशीं युद्ध करणाऱ्या या उत्तराला प्राप्त होवो." ४. ४. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ कौरवसेना पाहून भ्यालेल्या उत्तराचें रथांतून अवतरण. २ अर्जुनानें केलेलें त्याचें निवर्तन. ३ कौरवांना हा अर्जुन असावा असा आलेला संशय. ४ पार्थाचें उत्तराला आश्वासन व त्याची सारथ्याच्या स्थानीं स्थापना. ]

( १ ) वैशंपायन—हे भारता, याप्रमाणें तो विराटपुत्र राजधानींतून बाहेर पडला आणि निर्भयपणें सारथ्याला बोलला—

" हे बृहन्नले, चल, ज्या दिशेनें कौरव गेले त्या बाजूला रथ चालीव. विजयाची इच्छा करणाऱ्या व एकत्र जमलेल्या या सर्व कौरवांना जिंकून मी त्यांच्यापासून गायींना आतां सोडवितों व सत्वर नगरांत परत येतों. "

त्याचें हें वचन ऐकतांच नरश्रेष्ठ पांडुनंदनानें ते जातिवंत अश्व वायुवेगानें चालविले. तेव्हां सुवर्णमालांनीं युक्त असलेले ते गतिमान् अश्व जणु काय आकाशाला स्पर्श करीत त्वरेनें धावूं लागले. त्यानंतर ते दोघे शत्रुमर्दक मत्स्य-पुत्र व धनंजय नगरापासून थोड्या अंतरावर गेले नाहींत, तोंच त्यांनीं बलाढ्य कौरवांची सेना पाहिली. अर्जुनानें स्मशानाच्या बाजूला रथ वळवून त्या शमी वृक्षाला व व्यूह रचून उभ्या असलेल्या कौरवांना पाहिलें. त्या सागरासारख्या विस्तीर्ण कौरवसैन्याच्या हालचालीनें जी धूळ उडाली तिच्या योगानें कोणाला कांहींच दिसेनासें झालें.

हे कुरुश्रेष्ठा, भीष्मादि धनुर्धर व बुद्धिमान् कौरव यांनीं रक्षण केलेलें आणि अश्व-गज-रथादिकांनीं व्याप्त असलेलें तें महत्सैन्य पाहून विराटपुत्राच्या अंगा-वर रोमांच उभे राहिले. तो भीतीनें उद्विग्न होऊन पार्थाला म्हणाला—
" बृहन्नले, देवांनाहि जिंकण्यास अशक्य अशा अनेक पराक्रमी वीरांनीं युक्त असलेल्या या कौरवांशीं युद्ध करण्यास मी समर्थ नाहीं. माझ्या अंगाला कसा कंप सुटला आहे, पहा ! भयंकर धनुष्यें, रथ, गज, अश्व यांनीं दुष्प्रवेश्य, आणि पायदळ व ध्वज यांनीं व्याप्त, अशा या भारतांच्या सैन्यांत प्रवेश कर-ण्याची माझी इच्छा नाहीं. जेथें भीष्म, द्रोण, कृप, कर्णादि इतर वीर, राजा दुर्योधन व इतरहि युद्धविशारद तेजस्वी धनुर्धर आहेत, त्या संग्रामांत शत्रूंना पाहून माझें मन व्यथित होत आहे. या व्यूह रचून उभ्या राहिलेल्या व शत्रू-वर प्रहार करणाऱ्या कौरवांना पहातांच माझ्या अंगावर रोमांच येऊन मला मूर्च्छा येत आहे. "

राजा जनमेजया, अलौकिक सव्यसाची धनंजयाला न जाणणारा तो मूर्ख, अप्रगल्भ व मंदबुद्धि उत्तर असा विलाप करूं लागला. तो पुढें म्हणाला—
" हे बृहन्नले, शून्य नगरीमध्यें मला स्थापून माझा पिता सर्व सैन्य घेऊन त्रिगर्तांवर चालून गेला आहे. येथें माझ्याजवळ सैनिकहि नाहींत, मी अजून बाल आहें, अस्त्रविद्येंत निपुण नसलेला मी एकटा या असंख्य युद्धकुशल धनु-र्धरांशीं संग्राम करण्यास समर्थ होणार नाहीं; यास्तव तूं रथ परत फिरीव. "

अर्जुन म्हणाला—हे राजपुत्रा, तूं भीतीनें दीन होऊन शत्रूंचा हर्ष वाढवीत आहेस. अरे, अद्यापि शत्रूंनीं तर कांहीं हालचालहि केलेली नाहीं. तूं स्वतःच मला ' कौरवांकडे घेऊन चल ' असें सांगितलेंस, तेव्हां आतां मी

तुला तेथेंच घेऊन जाईन. तुझ्या गोधनाची एखाद्या गृध्राप्रमाणें इच्छा करणाऱ्या या अनेक ध्वजयुक्त आततायी कौरवांमध्यें मी तुला नेईन आणि हे महाबाहो, मी तुला पृथ्वीसाठीं युद्ध करणाऱ्या वीरांच्या रणभूमीवरहि नेऊन उभा करीन.

हे राजपुत्रा, तूं अंतःपुरांतील स्त्रियांच्या व पुरुषांच्या पुढें आपल्या पराक्रमाची इतकी प्रौढी गाऊन नगरांतून बाहेर पडलास व आतां युद्ध कां करीत नाहींस ! आतां जर तूं गायींना जिंकून घेतल्यावांचून परत गेलास, तर सर्व स्त्री-पुरुष तुला हंसतील. शिवाय सैरंध्रीनें माझ्या सारथ्यकर्माची इतकी प्रशंसा केली असल्यामुळें गायींना जिंकल्यावांचून मी कांहीं नगरींत परत जाऊं शकणार नाहीं. सैरंध्रीनें माझी इतकी स्तुति केली व तूंहि मला प्रेरणा केलीस. तेव्हां आतां मी या सर्व कौरवांशीं युद्ध करणार नाहीं, असें कसें होईल ! तूं स्वस्थचित्त हो. मी या शत्रूंशीं युद्ध करितों.

उत्तर म्हणाला—हे बृहन्नले, हे असंख्य कौरव मत्स्यदेशांतील धन यथेष्ट हरण करून नेवोत, स्त्री-पुरुष माझा वाटेल तितका उपहास करोत, पण मला युद्धाशीं कांहीं कर्तव्य नाहीं. माझ्या गायी शत्रूंनीं नेल्या तरी नेऊं देत. मी राजधानी शून्य टाकून आलों आहें. म्हणून मला माझ्या पित्याचें फार भय वाटतें. तो मजवर रागावेल !

( २ ) हे भारता, असें बोलून तो कुंडलें धारण करणारा विराटपुत्र मान व गर्व यांचा त्याग करून व शरासह धनुष्य टाकून रथांतून खालीं उतरला आणि भीतीनें पळूं लागला.

तेव्हां त्याला बृहन्नला म्हणाली—हे नृपनंदना, ' पळणें ' हा क्षत्रियाचा धर्म नव्हे, असें शूरांनीं म्हटलें आहे. भ्यालेल्या वीराला युद्धांत मरणें श्रेयस्कर आहे. पळणें नव्हे.

राजा इतकें बोलून केसांची वेणी घातलेल्या व सुंदर तांबडें वस्त्र परिधान केलेल्या कुंतीपुत्र धनंजयानें रथांतून खालीं उडी टाकिली आणि तो त्या पळणाऱ्या राजपुत्राच्या मागें धांवला. त्यावेळीं ' हा अर्जुन आहे ' हें न जाणणारे सैनिक वेणी हालवीत धांवणाऱ्या त्या क्लीबाला पाहून हसूं लागले.

(३) पण वेगानें धांवणाऱ्या त्याला पाहून कौरव म्हणाले—"भस्माच्छादित अग्नीसारखा गुप्त वेष घेतलेला हा कोण बरें असावा ! हा कांहींसा स्त्रीसारखा

व कांहींसा पुरुषासारखा दिसत आहे. याच्या ठिकाणीं अर्जुनाचें साम्य दिसतें. पण यानें क्लीबरूप धारण केलें आहे. याची मान, मस्तक, परिघासारखे बाहु आणि चालण्याची ढब हीं सर्व पार्थासारखींच दिसत आहेत. हा धनंजया-वांचून अन्य कोणी नसावा ! देवांमध्यें जसा इंद्र, किंवा मनुष्यामध्यें जसा धनंजय, तसा हा एकटाच युद्धाला निघाला आहे. पण आमच्यावर असा एकटा चाल करून येण्यास पार्थावांचून दुसरा कोण समर्थ आहे ? विराटानें आपल्या एकट्या पुत्राला शून्य नगरीचें रक्षण करण्यासाठीं राजधानींत ठेविलें होतें. तो बाल असल्यामुळें मूर्खपणानें नगरींतून बाहेर पडला आहे, पराक्रमानें नव्हे. गुप्त वेषानें फिरणाऱ्या अर्जुनाला सारथि करून हा उत्तर नगरांतून बाहेर पडला आहे. परंतु तो आतां आम्हांला पाहून भीतीनें पळत आहे आणि हा धनंजय पळत असलेल्या त्याला धरण्याची इच्छा करीत आहे, असें आम्हांला वाटतें. ”

हे राजेंद्रा, याप्रमाणें ते सर्व कौरव पृथक् पृथक् विचार करूं लागले. परंतु तशा कपट वेषांत असलेल्या त्या पांडवाला पाहून ते कांहींच निश्चय करूं शकले नाहींत.

त्यानंतर हे भारता, धनंजयानें पळणाऱ्या उत्तराच्या मागें शंभर पावलें धांवत जाऊन व त्याचे केंस धरून त्याला प्रतिबंध केला. पुढें जाऊं दिलें नाहीं.

याप्रमाणें अर्जुनानें अडविलें असतां अतिशय आर्त झालेला तो वैराटि दीन-वाणीनें अर्जुनाची प्रार्थना करूं लागला. तो म्हणाला—“ हे बृहन्नले, मी काय सांगतों तें जरा ऐकून घे. तूं सत्वर हा रथ परत फिरीव. हे कल्याणि, पुरुष जिवंत राहिला, तर तो अनेक प्रकारचें सुख भोगतो. हे सुमध्यमे, माझें ऐक, असें करूं नको. मी तुला शुद्ध सोन्याच्या शंभर मोहरा, सुवर्णाच्या कोंदणांत बसविलेले अतिशय तेजस्वी आठ वैडूर्य मणि, सुवर्ण दंडानें भूषित व सुलक्षणी अश्व जोडलेला रथ आणि दहा गज देईन, पण हे बृहन्नले, तूं मला सोड. ”

( ४ ) राजा, तो राजपुत्र अशाप्रकारें विलाप करीत असतां पुरुषव्याघ्र पार्थानें त्याला ओढीत रथाजवळ आणिलें आणि भयानें आर्त व मूर्च्छित होणाऱ्या त्या राजपुत्राला म्हटलें—“ हे क्षत्रिया, शत्रूशीं युद्ध करण्यास तूं जर समर्थ नसशील, तर कौरवांशीं युद्ध करणाऱ्या माझा तूं सारथि हो. महारथ वीरांनीं रक्षण केलेल्या अजिंक्य व घोर सैन्याकडे रथ चालीव. तूं

माझ्या बाहुबलानें रक्षित आहेस. भिऊं नको. हे श्रेष्ठ राजपुत्रा, तूं क्षत्रिय आहेस. शत्रूंच्या समोर असा खिन्न काय होतोस !

हे नरव्याघ्रा, या दुरासद व अजिंक्य शत्रुसैन्यांत प्रवेश करून मी कौरवांशीं युद्ध करीन आणि तुझ्या धेनु जिंकून परत घेईन. यास्तव हे नरश्रेष्ठा, माझा सारथि हो. मी कौरवांशीं संग्राम करीन.''

हे भरतर्षभा, याप्रमाणें त्या विराटपुत्र उत्तराला धीर देऊन अपराजित धनंजयानें सुटण्याचा प्रयत्न करणाऱ्या व भयभीत झालेल्या त्या राजपुत्राला त्याची इच्छा नसतांनाहि रथावर सारथ्याच्या स्थानीं बसविलें. ४. ४. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १ कुरुसैन्यांत झालेले उत्पात व द्रोणाचा राजाला उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पांडवेया, याप्रमाणें विराटपुत्राला सारथ्याच्या स्थानीं बसवून व स्वतःही क्लीबवेषानें रथारूढ होऊन अर्जुन श्मशानांतील शमीच्या वृक्षाकडे वेगानें निघाला. तें पाहून भीष्म-द्रोणादि महारथ कौरव धनंजयापासून उद्भवणाऱ्या भीतीनें खिन्न झाले. सर्व कौरव उत्साहरहित झाले आहेत व स्वपक्षांत अद्भुत उत्पात होत आहेत असें अवलोकन करून शस्त्र धारण करणाऱ्यांतील श्रेष्ठ गुरु भारद्वाज द्रोण म्हणाला—

'' हे वीरहो, रेति उडविणारा रूक्ष व भयंकर वायु सुटला आहे. सर्व आकाश धुक्यानें व्याप्त झालें आहे. सर्व मेघ उग्र दिसत आहेत. विविध शस्त्रें कोशांतून आपोआप बाहेर पडत आहेत. पश्चिम दिशेमध्यें भालू ओरडत आहेत, अश्व अश्रु ढाळीत आहेत आणि हे स्थिर असलेले ध्वज कांपत आहेत. अशा प्रकारचीं हीं अनेक दुश्चिह्नें होत आहेत. यांवरून फार मोठें भय उपस्थित झालें आहे, असें दिसतें. यास्तव तुम्ही सावध असा आणि सेनेचा व्यूह रचून स्वतःचें रक्षण करा. आपल्यावर येणाऱ्या संकटाची प्रतीक्षा करून हरण केलेल्या गोधनाचें रक्षण करा. हा जो क्लीब वेष धारण करणारा वीर आला आहे, तो सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ अर्जुनच आहे, यांत संशय नाहीं.

हे भीष्मा, लंकाधिपति रावणाच्या वनाचा विध्वंस करणारा हनुमान् ज्याच्या ध्वजावर असतो, तोच हा स्त्रीवेषधारी इंद्रपुत्र अर्जुन आहे. तो

दुर्योधनाला जिंकून गाई परत घेऊन जाईल. यास्तव दुर्योधनाचें रक्षण करा. सर्व सुरासुरहि जरी आले तरी हा पराक्रमी सव्यसाची पार्थ त्यांच्याशीं युद्ध केल्यावांचून परत फिरणार नाहीं. इंद्रानें ज्याला शिक्षण दिलें आहे, त्या वीरानें वनांत अतिशय क्लेश भोगिले आहेत. त्यामुळें इंद्रोपम असलेला तो धनुर्धर आज क्रुद्ध होऊन युद्ध करावयास येत आहे. या सर्व कौरवांमध्यें त्याचा प्रतियोद्धा मला कोणीच दिसत नाहीं. किरातवेषधारी प्रभु महादेवालाहि हिमालय पर्वतावर युद्धामध्यें पार्थानें संतुष्ट केलें, असें आम्हीं ऐकिलें आहे."

द्रोणाचें हें भाषण सहन न झाल्यामुळें कर्ण म्हणाला—तुम्ही नेहमीं अर्जुनाच्या गुणांची प्रशंसा करून आमची निंदा करीत असतां ! परंतु अर्जुन माझ्या किंवा दुर्योधनाच्या एका कलेलाहि पात्र नाहीं.

तें ऐकून दुर्योधन म्हणाला—हे राधेया, हा जर पार्थ असला तर माझें कामच झालें. कारण त्याला आपण ओळखलें म्हणजे पांडवांना पुनः बारा वर्षें वनवास भोगावा लागेल आणि हा क्लीबवेष धारण करणारा पुरुष जर दुसराच कोणी मानव असेल तर माझ्या तीक्ष्ण शरांनीं याला मी गतप्राण करून भूमीवर पाडीन.

राजा जनमेजया, तो धृतराष्ट्रपुत्र असें बोलला असतां भीष्म, द्रोण, कृप व अश्वत्थामा यांनीं त्याच्या या भाषणाची मोठी स्तुति केली. ४. ४. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १ शमीसमीप जाऊन अर्जुनानें उत्तराला वृक्षावरील धनुष्यें काढण्यासाठीं केलेली प्रेरणा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, अर्जुनानें उत्तराला रथावर बसविलें व तो प्रथम त्याच्यासह त्या प्रसिद्ध शमीवृक्षाकडे वळला. शमीजवळ आल्यावर पार्थानें हा विराटपुत्र सुकुमार व युद्धांत अपारंगत आहे, हें जाणून त्याला म्हटलें—" उत्तरा, तूं मीं सांगत असलेलीं धनुष्यें या वृक्षावरून सत्वर काढून आण. हीं तुझीं धनुष्यें माझें बल व सैन्याचा फार मोठा भार सहन करूं शकणार नाहींत. हत्तींवर प्रहार करण्याइतकींहि तीं दृढ नाहींत. किंवा शत्रूंना जिंकणाऱ्या माझा बाहुविक्षेपहि त्यांस सहन होणार नाहीं. यास्तव हे राजपुत्रा,

दाट पर्णांनीं आच्छादित झालेल्या या शमीवृक्षावर तूं चढ. पांडुपुत्रांनीं आपलीं धनुष्यें त्यावर ठेविलीं आहेत. युधिष्ठिर, भीम, अर्जुन व नकुल-सहदेव यांचे ध्वज, शर आणि त्या शूरांचीं दिव्य कवचेंहि येथेंच आहेत.

याच वृक्षावर महापराक्रमी पार्थाचें एक लक्ष धनुष्यांच्या तोडीचें राष्ट्र-वर्धन गांडीव धनुष्य ठेविलेले आहे. तें तालवृक्षासारखें दीर्घ धनुष्य इतरांस सज्ज करितां येणें जरी शक्य नाहीं, तरी मला तें तृणासारखें हलकें वाटतें. तें सर्व शस्त्रांमध्यें श्रेष्ठ व दिव्य धनुष्य सुवर्णांनीं भूषविलेलें, गुळगुळीत, रुंद, व्रणरहित, दर्शनीय, भीषण व शत्रूंना पीडा देणारें असून सैन्याचा फार मोठा भार सहन करण्यास समर्थ आहे. युधिष्ठिरादि इतर सर्व भ्रात्यांचींहि धनुष्यें अशींच दृढ व बलवान् आहेत." ४. ४. ४०.

---